# श्रीमच्छत्रपति शाहुमहाराज

## यांचें चरित्र.

लेखकः—आ० बा० लठ्ठे.

१९२५ ई.

किंमत दोन रुपये.



हें पुस्तक
रा. रा. दत्ताजीराव आबाजीराव सावंत
यांनीं बेळगांव येथें
आपल्या श्रीरामतत्त्व—प्रकाश छापखान्यांत छापिलें,
व
कोल्हापूर येथें रा. रा. बा० ल० पाटील यांनीं प्रसिद्ध केलें.



## श्रीशाहु छत्रपति यांचें चरित्र
## मिळण्याचीं ठिकाणें.

१ श्रीरामतत्त्व-प्रकाश प्रेस ... बेळगांव.
२ नारायण बळवंत वाळवेकर ... सदाशीवपेठ—सातारा
३ रामचंद्र बाळकृष्ण बोधे ... कापडबझार, सांगली.
४ गणपत ज्ञानोबा बटाणे ... स्टेशनरि मर्चंट कऱ्हाड
५ स्टोअरकीपर कोल्हापूर स्टेट ... कोल्हापूर सिटी

# प्रस्तावना.

या चरित्राची इंग्रजी आवृत्ति प्रसिद्ध होऊन एक वर्ष झालें. आज, महाराजांच्या तिसऱ्या पुण्यतिथीचे दिवशीं, मराठींत हें चरित्र प्रसिद्ध करून, हातीं घेतलेलें काम पूर्ण करण्याची संधि आली आहे.

श्रीशाहुछत्रपति कैलासवासी झाल्यानंतर थोड्याच दिवसांत, अगदीं अनपेक्षित रीतीनें, श्रीमच्छत्रपति राजाराममहाराज यांनीं हें चरित्रलेखनाचें काम करण्याविषयीं मला आज्ञा केली. ही आज्ञा पार पाडण्यास अनेक तऱ्हेनें माझ्याहून अधिक योग्य माणसें उपलब्ध होण्यासारखीं असतां आणि एका वेळीं माझ्याबद्दल कै० शाहुमहाराजांचें मन कलुषित झालेलें असतां, मलाच ही आज्ञा कां व्हावी, असा मीं छत्रपतींना प्रश्न केला; पण त्यांनीं आणि त्यांच्या पूज्य मातोश्री आईसाहेबमहाराज यांनीं आपला निश्चय कायमच ठेविला आणि कारणांविषयीं प्रत्येकांस आपापल्या समजुतीप्रमाणें तर्क करावयास सोडून, मीं हें काम अंगावर घेतलें. महाराजांचें चरित्र ह्मणजे पुष्कळ अंशीं संस्थानच्या आणि महाराजांच्या खासगी कागदपत्रांच्या आधारानेंच लिहावयाचें, हें उघड होतें. या कागदपत्रांपैकीं कांहीं भाग गुप्त स्वरूपाचा होता; कांहीं कागदपत्रांचा उपयोग करावा कीं नाहीं हें ठरविणें कठीण होतें; निरनिराळ्या योग्यतेच्या पत्रव्यवहाराच्या पर्वतप्राय राशींतून योग्यायोग्य माहितीची निवड करणेंहि कांहीं कमी नाजुक काम नव्हतें. अशा स्थितींत, सर्व जबाबदारी माझ्यावरच सोंपवून, श्रीराजाराममहाराजांनीं ते कागद माझ्या हातीं दिले. तथापि दिवाणसाहेब रा० ब० सर रघुनाथराव सबनीस यांची महत्त्वाच्या सर्व प्रश्नांसंबंधीं सल्ला घेऊन, त्यांना माझ्या समजुतीप्रमाणें मीं माझ्या जबाबदारीचे भागीदार केलें आहे. माझ्या जबाबदारीचा हिस्सा घेतल्याबद्दल, आणि पावलों-पावलीं चरित्रलेखनाच्या कामीं मला सहाय्य केल्याबद्दल त्यांचा मी आभारी आहें.

श्रीमत्क्षात्रजगद्गुरु आणि श्रीयुत शंकरराव इंदुलकर यांनीं हें लेखन पू करण्याच्या कामीं जी मदत केली त्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें, या ठिकाणं अवश्य आहे.

भाषांतराच्या कामीं पुस्तकप्रकाशक रा० बा० ल० पाटील यांनीं पुष्कळ मेहेनतीनें सहाय्य केलें. सरकारआज्ञेनें जरी त्यांनीं हें काम केलें, तरी त्याबद्द आभारपूर्वक उल्लेख करणें योग्य आहे.

छपाईचें काम दोन तीन महिन्यांच्या आंत आणि तेंहि चांगल्या प्रका केल्याबद्दल रा० रा० दत्ताजीराव सावंत यांची स्तुति करणें वाजवी आहे.

बेळगाव. आ० बा० लट्ठे.

ता० ३ मे १९२५.







श्रीमत्महाराज शाहू छत्रपति, जी. सी. एस्. आय., जी. सी. आय. ई.,



महाराज्ञी श्री लक्ष्मीबाई राणीसाहेब, ऊर्फ आईसाहेब महाराज, कोल्हापूर.

श्रीमन्मातुःश्री

# लक्ष्मीबाई साहेब

## आईसाहेब महाराज,

यांचे हुजूरांस.

आईसाहेब महाराज

कोल्हापूरचे चिरकीर्ति छत्रपति, हीनदीन वर्गांचे उद्धारक आणि आपलें परम दैवत, छत्रपति श्रीशाहुमहाराज यांचें हें चरित्र मुख्यत: आपल्या प्रेरणेनें आणि आपली आज्ञा ह्मणून लिहिलेलें आहे. कै० महाराजांच्या पत्नी या नात्यानें, या पुस्तकांत वर्णिलेल्या लोकोपयोगी कामांतील बराचसा भाग आपला आहे. विशेषत: पतिनिधनोत्तर, त्या कामाची जबाबदारी आपले सत्पुत्र श्रीराजाराम छत्रपति महाराज यांच्याबरोबरच आपणांवर आली. धैर्यानें, निश्चयानें आणि करारीपणानें आतांपर्यंत आपण आपल्या प्रिय पतींच्या आवडत्या कार्याचें निशाण हातीं धरिलें आहे; आणि यावरून कै० महाराजांचें, कोल्हापूरच्या राज्याचें वैभव वाढविण्याचें आणि समाजोद्धाराचें कार्य आपण अधिकाधिक यशस्वी कराल, अशी सर्वांप्रमाणेंच मला उमेद वाटत आहे.

श्रीशाहुमहाराजांचें पुढें वर्णिलेलें कार्य थोडया दिवसांत पूर्ण होण्यासारखें नव्हे, हें या पुस्तकाच्या अवलोकनानें आपल्या आणि श्रीराजाराम महाराजांच्या लक्षांत खचित येईल. कोल्हापूरचे छत्रपति आमच्या राष्ट्राच्या ऐतिहासिक कर्तबगारीचें मूर्तचिन्ह् आहेत. ही जबाबदारी ओळखून ती पार पाडण्याकरितां, आपल्या पतींनीं स्वसुखनिरपेक्षतेनें अखेरपर्यंत प्रयत्न केले; आणि कोणत्याहि पराक्रमी मनुष्यास अभिमान वाटण्यासारखें यशहि त्यांनीं संपादिलें. या त्यांच्या कामगिरीची पुढील हकीकत त्यांच्याच ठिकाणीं आज शोभणाऱ्या आपल्या प्रियतम पुत्रांस, कै० महाराजांच्या कीर्तीचे अंशभाक् असलेल्या आपणांस आणि ज्या समाजाचे महाराज पुढारी होते त्या समाजास, पुढच्या कार्यांत उत्साह, सामर्थ्य आणि प्रेरणा देणारी आणि मार्गदर्शक होईल, अशी मला आशा आहे.

याच आशेनें, आपल्या आज्ञेनें हें अल्पफल आज मी आपणांस अर्पण करण्याची परवानगी घेतों.

| | |
|---|---|
| बेळगांव. | आपला नम्र सेवक, |
| ता. ३ मे १९२५ ई० | आ० बा० लट्ठे. |



# श्रीशाहुछत्रपति यांच्या चरित्राची सामान्य अनुक्रमणिका.

# श्रीशाहुछत्रपति यांचे चरित्रांतील
# चित्रांची अनुक्रमणिका.



| अनुक्रमांक | चित्र | पृष्ठ |
|---|---|---|

---



# श्रीशाहुछत्रपति यांचे चरित्राची प्रकरणवार अनुक्रमणिका.



## प्रकरण १ लें.

### कोल्हापूरच्या गादीची प्राणप्रतिष्ठा.



## प्रकरण २ रें.

### कोल्हापूरचे दुर्दिन.



## प्रकरण ३ रें.

### बालपणाचा काळ.



## प्रकरण ४ थें.

### धारवाड येथील अध्ययनाचा काळ.

## प्रकरण ५ वें.

### शिक्षणाची समाप्ति.



## प्रकरण ६ वें.

### अधिकारी वर्गांतील घडामोड.



## प्रकरण ७ वें.

### १८९९ सालचें वावटळ.



## प्रकरण ८ वें.

### कोल्हापुरांतील बौद्धिक जागृति.

## प्रकरण ९ वें.

### दक्षिणेंतील क्षत्रिय.



## प्रकरण १० वें.

### कोल्हापुरांतील वेदोक्त प्रकरण.

## प्रकरण ११ वें.

### महाराजांचें इंग्लंडला प्रयाण.



## प्रकरण १२ वें.

### श्रीशंकराचार्य–मठ.



## प्रकरण १३ वें.

### कांहीं किरकोळ बाबी.

## प्रकरण १४ वें.

### बेगडी लोकशाही.



## प्रकरण १५ वें.

### १९०७ ते १९११.



## प्रकरण १६ वें.

### राजद्रोह व अराजकता.

## प्रकरण १७ वें.

### १९११ ते १९१४



## प्रकरण १८ वें.

### सत्यशोधक समाज व कुमारांचें इंग्लंडांतील शिक्षण.



## प्रकरण १९ वें.

### महा-युद्ध.

## प्रकरण २० वें.

### कौटुंबिक गोष्टी व शिकार.



## प्रकरण २१ वें.

### शिक्षणविषयक चळवळी.

## प्रकरण २२ वें.

### अस्पृश्य मानलेल्या वर्गांचा उद्धार.

## प्रकरण २३ वें.

### क्षात्रजगद्गुरूची स्थापना.



## प्रकरण २४ वें.

### हिंदी संस्थानिक वर्गाविषयीं प्रश्न.

---

## प्रकरण १ लें.

# कोल्हापूरच्या गादीची प्राणप्रतिष्ठा.




ण्यश्लोक **श्रीछत्रपतिशाहुमहाराजांच्या** कर्तबगारीनें जी गादी ता. ६ मे १९२२ इ० पर्यंत विभूषित झाली होती त्या कोल्हापूरच्या गादीचें ऐतिहासिक महत्त्व लक्षांत घेतलें नाहीं, तर त्या गादीविषयीं सर्व वर्गांच्या हिंदी लोकांच्या मनांत ज्या पराकाष्टेच्या आदराच्या भावना वसत आहेत, त्यांच्या खऱ्या स्वरूपाचें यथार्थ चित्र रेखाटतां येणें शक्य नाहीं. **कोल्हापूर संस्थानचें** क्षेत्रफळ जहागिरीसुद्धां अवघें ३,२१,७०१ चौरस मैल आहे व या संस्थानची लोकसंख्या १९२१ सालच्या खानेसुमारीप्रमाणें ८,३३,७२६ आहे. म्हणजे हें संस्थान ब्रिटिश-हिंदुस्थानांतील कोणत्याहि एका जिल्ह्यापेक्षां विशेष मोठें आहे असें ह्मणतां येणार नाहीं. परंतु कोल्हापूरच्या गादीची थोरवी असल्या बाह्य गोष्टींवरून ठरविणें योग्य होणार नाहीं. या गादीच्या ऐतिहासिक महत्वाच्या कारणांचें पर्यालोचन केल्याखेरीज, आमच्या **चरित्रनायकांनीं** आपल्या संस्थानांतच केवळ नव्हे, तर ज्यांच्या हातांतून ब्रिटिशलोकांनीं हिंदीसाम्राज्याचीं सूत्रें हिसकावून घेतलीं, त्या मराठाराष्ट्राच्या जीवनांत जी विलक्षण क्रांति घडवून आणिली तिची यथार्थ कल्पना वाचकांना होणार नाहीं. छत्रपतिघराण्याचें हल्लीं जरी अखिल मराठाराष्ट्रांतील राजकीय नेतृत्व नष्ट झालें आहे तरी हें घराणें मराठ्यांच्या राष्ट्रीय जीविताचें उगमस्थान गणलें जातें. आणि याच गोष्टींत कोल्हापूरच्या राज्याचें विशिष्ट महत्व समाविष्ट झालेलें आहे.

मराठाराष्ट्राच्या राजकीय जीवनाचा खराखुरा पाया श्रीशिवाजीमहाराजांनीं सतराव्या शतकांत घातला. सम्राट् अशोक याच्या मृत्यूनंतर लोटलेल्या अनेक शतकांच्या दीर्घ कालावधींत हिंदुसमाजांत शिवाजीइतका दीर्घदृष्टी व पराक्रमी मुत्सद्दी क्वचितच निर्माण झाला असेल. या कालांतील हिंदुइतिहासांत, विशेषत: रजपूतसरदारांत, सर्व जगास थक्क करून सोडणारे वीर निर्माण झाले. परंतु राष्ट्रघटना करणारा मुत्सद्दीपणा व त्याचा पाया घालणाऱ्याच्या ठिकाणीं अवश्य असणारी विस्तृत कल्पनाशक्ति अशोक आणि शिवाजी यांच्या मधल्या कालांत फारच थोड्या महापुरुषांच्या वांट्यास आली होती. शिवाजी मराठा जातींत जन्मास आला; परंतु मराठाराष्ट्र त्यानें जन्मास घातलें. शिवाजी मराठा होता, यापेक्षां तो क्षत्रिय असून त्याच्या अंगांत उदेपूरच्या राण्यांचें रक्त खेळत होतें, ही गोष्ट महत्वाची होय. मुसलमानलोकांच्या कित्येक शतकांच्या अमदानींत हिंदुसमाजाची पूर्वींची घडी विस्कळित झाली असून शिवाजीमहाराज जेव्हां जन्मले, तेव्हां हिंदुसमाजाचीं जातिभेदामुळें शकलें होऊन, त्याचें प्राचीन राष्ट्रीयत्व नष्ट झालें होतें. हिंदुसमाजाच्या छिन्नविच्छिन्न स्थितीचें खरें कारण यथातथ्य लक्षांत घेऊन प्राचीन हिंदुराष्ट्राच्या परंपरेस अनुसरून मराठाराष्ट्राची संघटना करण्यास समर्थ झालेला महापुरुष, अशोकानंतर शिवाजी महाराज हा एकच होय. शिवाजीमहाराजांचे पूर्वज व मुसलमानलोकांच्या अमदानींत उदयास आलेले दुसरे पुष्कळ मराठावीर व्यक्तिश: शिवाजीमहाराजांच्या व त्यांच्या संवगड्यांच्या तोडीचेच होते. परंतु व्यक्तिविषयक व जातिविषयक भावनांना फांटा देऊन मराठाराष्ट्राला आपल्या प्राचीन मार्गावर आणण्याची कल्पना शिवाजीच्या कालापर्यंत कोणासहि साध्य झाली नव्हती.

मराठे, * ब्राह्मण, प्रभु व कुणबी या सर्वांचें मराठाराष्ट्र बनविण्याचा शिवाजीमहाराजांनीं स्तुत्य उपक्रम केला. शिवाजीमहाराजांच्या राष्ट्रघटनेंतून कोणत्याहि जातीला वगळण्यांत आलें नव्हतें. कोणत्याहि विवक्षित जातीला महत्व न देतां क्षत्रियबाण्याच्या सर्व लोकांना शिवाजीमहाराजांच्या लष्करांत

---

* मराठाराष्ट्र व मराठाजात यांच्यांतील भेद वाचकांनीं नेहमीं लक्षांत ठेविला पाहिजे. मराठाजात त्याच नांवाच्या राष्ट्राची प्रमुख घटक असून, महाराष्ट्रांतील इतर जातींचाहि मराठाराष्ट्र या संज्ञेंत समावेश होतो.

आणि सर्व जातींच्या लायक माणसांना राज्यकारभारांतहि प्रवेश मिळूं शकत असे. शिवाजीमहाराजांचे सैनिक व मुत्सद्दीपुरुष सर्व जातींचे होते. अशा प्रकारच्या उदार धोरणाचा स्वीकार करून शिवाजीमहाराजांनीं हिंदुपदपादशाहीची स्थापना केली. ही हिंदुपदपादशाही इतिहासांत 'मराठासाम्राज्य' या नांवानें प्रसिद्ध आहे; व या मराठासाम्राजाच्या वैभवाचा व परंपरेचा वारसा कोल्हापूरच्या गादीला प्राप्त झाला आहे. श्रीशाहुमहाराजांना कोल्हापूरच्या छत्रपतिघराण्यांत दत्तक दिल्याच्या प्रसंगीं एका अधिकारारूढ ब्राह्मणसंस्थानिकाच्या नेतृत्वाखालीं पुण्याच्या सार्वजनिक-सभेचें शिष्टमंडळ कोल्हापुराला आलें होतें. या शिष्टमंडळानें या प्रसंगीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले. "हल्लींच्या काळीं कोल्हापूरचें राजघराणें मराठा-राज्य-संस्थापक थोरले शिवाजीमहाराजांचे खास वंशज आहे. कोल्हापूर संस्थानचें क्षेत्रफळ एकाद्या लहानशा जिल्ह्याइतकें परिमित आहे, तरी कोल्हापूरच्या गादीच्या ऐतिहासिक महत्वामुळें जेथें जेथें मराठीसत्ता नांदत आहे तेथें तेथें कोल्हापूरच्या गादीविषयीं अखिल जनतेंत पराकाष्ठेचा आदर वसत आहे, स्वामिनिष्ठेच्या व प्रेमाच्या या राष्ट्रीय बंधनामुळें आज आह्मी येथें आलों आहोंत." कै० गोपाळ कृष्ण गोखले यांनीं पुण्याच्या सार्वजनिकसभेच्या वतीनें बोलतांना एकदा अशाच प्रकारचे उद्गार काढिले आहेत. ते ह्मणतातः—

"मराठ्यांनीं जी थोर कामगिरी बजाविली, त्याचें मूर्तिमंत चिन्ह ह्मणजे कोल्हापूरची गादी होय. या गादीवर ज्या ज्या विभूती आरूढ होतील त्यांच्याविषयीं अखिल महाराष्ट्रांतच नव्हे, तर त्यांच्या राज्याच्या कक्षेबाहेरील लोकांच्या मनांत देखील सदा प्रेमाच्या व आदराच्या भावना वसत राहातील."

कोल्हापूरच्या गादीच्या ऐतिहासिक महत्वामुळें व इतर आनुषंगिक गोष्टींमुळें कोल्हापूरच्या राज्यकर्त्या पुरुषाला जे निसर्गदत्त विशिष्टत्व प्राप्त झालें आहे, तसें फारच थोड्या हिंदी संस्थानिकांना आहे. परंतु या विशिष्टत्वामुळेंच कोल्हापूरच्या राज्यकर्त्या पुरुषांवर कोणत्याहि हिंदी महाराजापेक्षां पराकाष्टेची जबाबदारी स्वाभाविकपणेंच येऊन पडते. कोल्हापूरची गादी अस्तित्वांत येण्यास कोणती परिस्थिति कारणीभूत झाली, व आठराव्या शतकांतील वावटळींतून तिनें आपला बचाव कसा करून घेतला, या गोष्टींच्या दिग्दर्शनानेंच या जबाबदारीचें महत्व

समजून येणारें आहे. मराठाराष्ट्राचा कलिजा जे शिवाजीमहाराज त्यांना देखील या अडचणी टाळतां आल्या नाहींत. शिवाजीमहाराजांचे वडील शहाजी राजे यांना शिवाजीमहाराजांची मातोश्री जिजाबाई यांचें पाणिग्रहण करण्यास पराकाष्ठेचे सायास करावे लागले. त्या काळचे मराठे अमीरउमराव शहाजी राजांना आपल्या बरोबरीचे समजण्यास नाकबूल होते. शिवाजीमहाराज सर्व मराठ्यांचे सर्वमान्य पुढारी झाल्यानंतर देखील ( मी येथें मराठा हा शब्द जाति-निदर्शक या अर्थानें वापरला नाहीं. ) त्या काळचे ब्राह्मणलोक महाराजांना छत्रपति समजण्यास नाकबूल होते. ‘ छत्रपति ’ या पदवीनें महाराजांकडे सर्व राष्ट्राचा सामाजिक व धार्मिक पुढारीपणा स्वाभाविकपणेंच येणार होता. नृपपदाकडे जे आधुनिक दृष्टीनें पाहतील, त्यांना राजकीय पुढारीपणाचा व धार्मिक पुढारीपणाचा मेळ घालणें कठीण जाईल यांत शंका नाहीं. परंतु त्या कालांत राजकारण व धर्म यांच्यामध्यें पराकाष्ठेचा संबंध होता. छत्रपति शब्द केवळ नृपतिदर्शक नसून हिंदुसमाजांतील नरश्रेष्ठांच्या अंगच्या उत्तमोत्तम गुणांचाहि निदर्शक होता प्राचीन काळीं क्षत्रियांवर ब्राह्मणांनीं विजय संपादण्याच्या पूर्वी हिंदुसमाजव्यवस्थे-मध्यें क्षत्रिय हे अग्रस्थानीं होते. त्यांनीं आपल्या राज्यांतील लोकांचें परचक्रा-पासून रक्षण केलें; परंतु हें कृत्य त्यांच्या कर्तव्यक्षेत्रांतील अत्यंत महत्त्वाचें असें ह्मणतां येत नाहीं. लोकांना धर्म समजावून सांगून त्याचें तें संरक्षण करीत असत क्षत्रिय हेच धर्मप्रवर्तक असून, त्यांच्या प्रयत्नामुळेंच संसारी लोकांना अध्यात्मिक ज्ञान प्राप्त होत होतें. पुढें ब्राह्मणांनीं क्षत्रियांची जागा पटकाविल्यानंतर क्षत्रिय लोकांविरुद्ध त्यांनीं युद्ध पुकारलें; कारण राष्ट्राचे शूर पुढारी ह्मणून क्षत्रि-यांनीं जें नांव मिळविलें होतें, त्याचा ब्राह्मणांना हेवा वाटूं लागला. ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यामध्यें जीं रणकंदनें माजलीं, त्यामुळें क्षत्रियसमाज जरी नामशेष झाला नाहीं, तरी तो बराच कमकुवत झाला. या गोष्टींचें चटकदार व सविस्तर वर्णन ब्राह्मणग्रंथकारांनीं लिहिलेल्या पुराणांत सांपडत असल्यामुळें त्याची येथें पुनरावृत्ति करण्याची आवश्यकता दिसत नाहीं. परंतु कोल्हापूरच्या गादीनें मराठ्यांच्या इतिहासांत जी थोर कामगिरी केली व आमच्या **चरित्रनायकांनीं** जें कार्य आमरण चालू ठेविलें होतें, त्याची महती समजून येण्यासाठीं ब्राह्मणांनीं क्षत्रियांवर मिळविलेल्या विजयाचें हिंदुसमाजावर काय अनिष्ट परिणाम घडले ते समजून घेणें अत्यंत जरूर आहे. ब्राह्मणांच्या विजयामुळें हिंदुसमाजाच्या

राष्ट्रीय जीवितावर निखारा ठेविला गेला. आपल्या वर्णाचें महत्व वाढविण्यासाठीं ब्राह्मणवर्गाचें नेहमींचें शस्त्र ह्मणजे अध्यात्मिक गोष्टींविषयीं अज्ञ जनतेच्या डोक्यांत भलत्याच कल्पना भरवून देणें, हें होय! या शस्त्राचा उपयोग करून ब्राह्मणांनीं हिंदुसमाजाचा पाया पोकळ केला व त्यांनीं सर्व इमारत ढांसळून पाडिली. या विजयामुळें क्षत्रियवर्गांत जें राष्ट्रीय पौरुष वसत होतें, त्याचें उदात्त स्वरूप नाहींसें होऊन त्यास केवळ भाडोत्री शिपायीगिरीचें स्वरूप प्राप्त झालें. क्षत्रिय हा ब्राह्मणांच्या हातांतील बाहुलें बनला. युद्धाच्या वेळीं व शांततेच्या काळीं समाजाचें संरक्षण करण्याच्या आद्य कर्तव्यापासून क्षत्रियवर्ग च्युत होऊन पुढें तर त्याच्या अस्तित्वाबद्दलच शंका घेण्यांत येऊं लागल्या. ब्राह्मणलोक आपल्या धर्मग्रंथांतून कलियुगांत फक्त ब्राह्मण व शूद्र असे दोनच वर्ग आहेत असें प्रतिपादूं लागले. शूद्राचें कर्तव्य कोणतें होतें तें सर्वांनाच विदित असल्यामुळें त्यासंबधानें येथें लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. शूद्र हें आर्यांनीं जिंकलेले लोक होत. त्यांना जवळ जवळ गुलामासारखेंच वागविण्यांत येत होतें. यांच्या अवनतस्थितीमुळें हिंदू राष्ट्रीय समाजाची घडी पार विस्कळित होऊन गेली. विश्वामित्राच्या काळापासून क्षत्रिय नरपुंगव आपले हक्क प्रस्थापित करण्यासाठीं व आपल्या गत वैभवाचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं एकसारखी ब्राह्मणांशीं टक्कर देत होते. मुसलमानलोकांनीं हिंदुस्थान पादाक्रांत केल्यानंतर लढवय्या जाती ब्राह्मणांच्या कारवाईला सुलभतेनें बळी पडण्यासारखी अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाली, त्यामुळें क्षत्रियांचें पुनरुज्जीवन होण्याची आशाच राहिली नाहीं. अशा निराशाजनक परिस्थितींत देखील महाराष्ट्रांतून मुसलमानलोकांच्या लाटा परतवून लावणारा क्षत्रियवीर ह्मणजे एकटे शिवाजीमहाराज हेच होत. परंतु या देशाच्या दुर्दैवामुळें, आपण केलेल्या या प्रचंड कामगिरीची घडी सुव्यवस्थितपणें बसविण्यास पुरें इतकें आयुष्य शिवाजींला परमेश्वरानें दिलें नव्हतें. ह्मणूनच जेव्हां श्रीशिवाजीमहाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव संभाजीमहाराज यांना त्यांच्या बायकामुलांसह कैद करून औरंगजेबानें देहांत शासन केलें तेव्हां शिवाजीमहाराजांनीं घातलेली मराठाराष्ट्राची घडी पार विसकटून गेली; आणि शिवाजीमहाराजांचे द्वितीय चिरंजीव राजाराममहाराज यांना, स्वराज्याचा नवीनच पाया घालून त्यावर नवीन इमारत बांधावी लागली. परंतु दुर्दैवानें पुन्हां उचल खाऊन राजाराममहाराजांना, संभाजीमहाराजांनीं केलेल्या अक्षम्य चुकांचें परि-

मार्जन करण्याइतका अवकाश न देतांच कालानें ओढून नेलें आणि आपल्या सर्वश्रेष्ठ पित्याप्रमाणेंच त्यांनाहि इहलोकची यात्रा अकालींच आटोपावी लागली; त्यामुळें कोल्हापूर-राज्यसंस्थापक प्रख्यात सम्राज्ञी ताराबाईसाहेब यांच्यावर राज्याची सर्व जबाबदारी येऊन पडली. मराठासाम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें या लोकोत्तर राज्ञीच्या हातीं सातारच्या गादीचींहि सूत्रें जाणें अत्यंत इष्ट होतें; परंतु दुर्दैवाच्या जोरामुळें तसें घडून आलें नाहीं. संभाजीमहाराजांचा मुलगा शाहु हा मोंगलांच्या हातीं लागून तो दिल्ली येथें अटकेंत होता. तथापि मोंगलांच्या अपेक्षेप्रमाणें मराठासाम्राज्य त्यांच्या हातीं न लागतां, राजाराममहाराज व त्यांची धर्मपत्नी ताराबाईसाहेब यांच्या मुत्सद्दीपणाच्या जोरावर मराठासाम्राज्याची एकसारखी भरभराटच होत चालली. परंतु जो हेतु मोंगललोकांना शस्त्रांच्या, शौर्याच्या आणि इज्जतीच्या जोरावर साधतां आला नाहीं, तोच हेतु मराठ्यांमध्यें भेद करून त्यांनीं सहज साधून घेतला. दिल्लीच्या बादशहाचा प्रतिनिधि या नात्यानें मराठासाम्राज्याचीं सूत्रें शाहूनें आपल्या हातीं घ्यावीं या अटीवर शाहूला बंधमुक्त करण्यांत आलें. सम्राज्ञी ताराबाईसाहेब व तिचे मुत्सद्दी लोक यांच्या लक्षांत मोंगलांचा हा डाव पूर्ण-पणें येऊन शाहूला शक्य तेवढा विरोध करण्याचा त्यांनीं निश्चय केला. शाहु हा संभाजीमहाराजांचा मुलगा नसून तो तोतया आहे व जसवंतसिंगाच्या मरणानंतर औरंगजेबानें जो एक डाव केला होता, त्याचीच ही एक पुनरावृत्ति आहे, असें ताराबाई उघडपणें प्रतिपादूं लागली. यामुळें शाहु व ताराबाई यांच्यांत युद्ध होऊन त्यांत विजयश्री ताराबाईलाच माळ घालील असें दिसत होतें; परंतु तिच्या प्रधानमंडळांत फंदफितुरी माजल्यामुळें खेडच्या लढाईंत शाहु हा विजयी झाला. ज्येष्ठ घराण्यालाच तक्तारूढ होण्याचा स्वाभाविक हक्क असतो, अशी जी हिंदुलोकांमध्यें समजूत दृढमूल झाली आहे, तिचाहि शाहूला फायदा घेतां आला. राजाराममहा-राजांनीं शत्रूच्या हातीं गेलेलें संपूर्ण मराठासाम्राज्य परत मिळविलें असल्यामुळें, स्वाभाविकपणेंच त्यांच्या पश्चात् सातारच्या तक्तावर आरूढ होण्याचा हक्क राजाराममहाराजांचा मुलगा दुसरा शिवाजी याचा होता. दुसरा शिवाजी हा अल्पवयस्क असल्यामुळें ताराबाईनीं राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं होतीं; परंतु कांहीं अगम्य कारणांमुळें, ताराबाईच्या सेनापतींनीं तिच्याशीं एकनिष्टपणें

try to economise wherever possible. even small items should not be left out of consideration & put together they go to make a pretty large sum.

. Please send this letter back by the return post after reading it over to Mr Shrigaonkar.

Yours sincerely.

Shahu Chhatrapati.

महाराजांचें इंग्रजी हस्ताक्षर.

वागण्याच्या जरी शपथा घेतल्या होत्या, तरी ऐन प्रसंगीं ते शत्रूला जाऊन मिळाले; त्यामुळें ताराबाईला साताऱ्याच्या गादीला मुकावें लागलें. परंतु ताराबाई ही सामान्य स्त्री नव्हती. कोणत्याहि प्रसंगाला यशस्वी रीतीनें सामना देण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं असल्यामुळें खेडच्या लढाईंत जरी तिला अपयश आलें, तरी यत्किंचित्‌हि न डगमगतां तिनें पन्हाळा किल्ल्याचा आश्रय केला. पन्हाळा किल्ला हा कोल्हापुरापासून १२ मैलांवर वायव्य दिशेस आहे. हा पन्हाळा किल्ला कित्येक शतकें राजधानीचा ह्मणून प्रख्यात होता. या डोंगरी-किल्ल्यावर तळ देऊन या असामान्य स्त्रीनें शाहूशीं यशस्वी रीतीनें टक्कर दिली. अखेर शाहूला हार खावी लागून इ० स० १७३१ सालीं कोल्हापूरच्या गादीचें स्वातंत्र्य कबूल करून तिच्याशीं त्याला तह करावा लागला.

अशा प्रकारची कोल्हापूरची पूर्वपीठिका आहे. कोल्हापूरची गादी अस्तित्वांत आल्यानंतरहि तिच्या मार्गांत अनेक विघ्नें उपस्थित झालीं. पेशव्यांच्या अभ्युदयामुळें साताराच्या छत्रपति घराण्यावर जी संकटपरंपरा ओढवली, तिचे अनिष्ट परिणाम कोल्हापूरच्या गादीलाहि भोगावे लागले. कोल्हापूरची गादी रसातळाला पोंचविण्याचें पेशव्यांनीं आपल्या हातीं कंकण बांधिलें होतें. तरी ताराबाईनें कोल्हापूरच्या राजघराण्यांत जें स्वातंत्र्यप्रियतेचें बीजारोपण केलें होतें, त्यास फळ येऊन कोल्हापूरच्या रंगभूमीवर साताऱ्याचें नाटक करण्याची पेशव्यांची इच्छा फोल ठरली. शाहु कालवश झाल्यानंतर शाहूला पुत्रसंतान नसल्यामुळें कोल्हापूरची गादी व साताराची गादी एक करण्याची अपूर्व संधि प्राप्त झाली होती. शाहूला पुत्रप्राप्ति होण्याचा संभव नाहीं अशी जेव्हां बाळाजी ऊर्फ नानासाहेब पेशव्यांची खात्री झाली, तेव्हां कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांना साताराच्या गादीवर आरूढ होण्याच्या कामीं मदत करण्याचें त्यांना त्यानें आश्वासन दिलें होतें; परंतु त्या वेळीं आपल्या वचनाप्रमाणें वागण्याचें त्यांच्या ध्यानींमनींहि नव्हतें; व जेव्हां हीं दोन्हीं राज्यें एक करण्याची प्रत्यक्ष वेळ आली, तेव्हां हीं दोन राज्यें एकत्र करूं पाहाणाऱ्यांचे सर्व प्रयत्न त्यानें हाणून पाडिले. आरंभीं बाळाजी पेशव्यानें संभाजीशीं जें सूत बांधिलें होतें, त्याचा हेतु आपला बंधु सदाशिवराव याला कोल्हापूरच्या गादीचें मंत्रिपद हस्तगत करून देण्याचा असावा. परंतु पेशव्याला आपल्या घरीं आश्रय देऊन साताराच्या इतिहासाची कोल्हापुरांत पुनरावृत्ति कर-

ण्याची संभाजीमहाराजांची इच्छा नसल्यामुळें त्यांनीं बाळाजीचें ह्मणणें मान्य केलें नाहीं, ह्मणून संभाजीला या बाबतींत मदत केल्यापासून बाळाजीला कोणत्याहि प्रकारचा फायदा होण्याचा संभव राहिला नाहीं. नागपूरच्या भोंसले घराण्यापैकीं एखादा मुलगा दत्तक घ्यावा, अशी सगुणाबाईराणीची इच्छा होती. तिच्या मरणानंतर शाहूची दुसरी धर्मपत्नी सकवारबाई हिनेंहि याच धोरणाचा पुरस्कार केला. परंतु ही गोष्ट पेशव्याला मुळींच रुचली नाहीं. बाळाजी हा भोंसले घराण्यापैकीं एखादा मुलगा शाहूला दत्तक द्यावा, या धोरणाच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें रघुजी भोंसले व त्याचे मित्र दाभाडे, गाइकवाड वगैरेंनीं बाळाजी पेशव्याला पेशवेपदावरून दूर करण्याचा कृतनिश्चय केला होता. भोंसले घराण्यापैकीं एखादा मुलगा जर साताऱ्याच्या गादीवर बसला तर तो आपल्या या शत्रूंच्या हातांतील बाहुलें बनून, आपले स्वार्थमूलक सर्व व्यूह ढांसळून पडतील अशी बाळाजीपेशव्याला धास्ती होती. ह्मणून त्याच्याच कारवाईमुळें रामराजा नांवच्या एका मुलास ताराबाईचा मुलगा शिवाजी याचा औरसपुत्र ह्मणून पुढें करण्यांत आलें आणि हाच साताऱ्याच्या तक्तावर आरूढ होण्यास लायक आहे, असें शाहूला सांगण्यांत आलें. नागपूरच्या भोंसलेपक्षाशीं सख्य करून भोंसले घराण्यापैकीं एक मुलगा संभाजीनें दत्तक घेऊन त्यानें साताऱ्याच्या गादीवर आपला हक्क सांगावा, असें सकवारबाईनें कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांना सुचविलें होतें, परंतु हा योग जुळून येण्याच्या अगोदरच शाहू कालवश झाला. शाहूनें कोणालाहि दत्तक घेतलें नव्हतें. अर्थातच वर सांगितल्याप्रमाणें या दोन असामान्य राज्यांमध्यें सत्तेबद्दल स्पर्धा सुरू झाली. पेशव्यानें दोघींच्यांहि डोकीवर हात फिरवून सर्व सत्ता स्वतःच बळकाविली. शाहूच्या मरणानंतर, किंबहुना शाहूचें प्रेत चितेवर ठेवण्याच्याहि अगोदरच नानासाहेब पेशव्यानें जो कावेबाजपणा केला त्यांचें सविस्तर वर्णन येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. या भानगडींचा निष्कर्ष ह्मणजे सकवारबाईचा अमानुष रीतीनें खून करून व ताराबाईला विश्वासघातानें बंदिवान करून, नानासाहेबानें चारी दिशा मोकळया करून घेतल्या. लवकरच साताऱ्याच्या अल्पवयस्क छत्रपतीला साताऱ्याच्या किल्ल्यांत, त्याच्याच राजधानींत कैद करून पेशवा हा मराठासाम्राज्याचा संपूर्ण मालक झाला. आतां बाळाजीनें व त्याच्या कोंकणस्थ अनुयायांनीं कोल्हापूरच्या संभाजीमहाराजाकडे आपली वक्रदृष्टि

घळविली. वारणेच्या तहान्वयें, कृष्णा आणि तुंगभद्रा यांच्या दरम्यानच्या सर्व प्रदेशा-वरील संभाजीमहाराजांचें प्रभुत्व मान्य केलें गेलें होतें, तरी कोल्हापूरच्या नृपतींना पेशव्यांनीं या प्रदेशांत केव्हांहि शांततेनें नांदूं दिलें नाहीं. तसेंच या तहान्वयें तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील जिंकलेल्या सर्व प्रदेशांत पूर्ण हिस्सा घेण्याची जरी कोल्हापूरच्या छत्रपतीला मुभा होती, तरी या प्रदेशांत पेशव्यांनीं कोल्हापूरकरांना कधींहि पाय ठेवूं दिला नाहीं. शाहुमहाराजांच्या मरणा-नंतर पेशव्यांनीं कोल्हापूरच्या राज्याचें शक्य तेवढे लचके तोडण्यास सुर-वात केली. या सर्व प्रयत्नांस यश यावें ह्मणूनच कोल्हापूरच्या राज्यासभोंवतीं पटवर्धनी संस्थानांचा गराडा निर्माण करण्यांत आला. अशा प्रकारें पेशवे कंबर कसून कोल्हापूरच्या छत्रपतींशीं विरोध करीत असतां, सुदैवानें संभाजी-महाराजांची आयुष्यमर्यादा विपुल असल्यामुळें आपल्या अंगच्या अतुल पराक्रमानें व चिकाटीनें त्यांनीं कोल्हापूरराज्याचें संरक्षण केलें. पेशव्यांशीं झगडण्यांत संभाजीमहाराजांनीं जें लोकोत्तर धैर्य दाखविलें, त्या तोडीचें धैर्य फारच थोड्या मराठ्यांनीं दाखविलें असेल ! पेशव्यांचा एकनिष्ठ सेवक असल्याबद्दलचा अभिमान बाळगणाऱ्या महादजी शिंद्याच्या पराक्रमी सेनेनें कोल्हापुरावर चढाई करून कोल्हापूरच्या छत्रपतीकडून खंडणी वसूल केली. या अवमानाचा जणूं सूड उगविण्याच्या हेतूनें, संभाजीमहाराजांनीं त्या काळच्या ब्राह्मणांमध्यें पहिल्या प्रतीचा सेनापति ह्मणून नांवाजलेल्या ताम-गांवच्या परशुरामभाऊ पटवर्धनाला रणांगणांत ठार करून पेशव्यांची सत्ता खिळखिळीत करून सोडली. दौलतराव शिंद्याच्या कवाईत शिकलेल्या पलटणी युरोपियन अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं कोल्हापुरावर चढाई करून आल्या. पण याहि बिकट प्रसंगाला संभाजीमहाराजांनीं यशस्वी रीतीनें तोंड दिल्यामुळें कोल्हा-पूरचें राज्य सुरक्षित राहिलें. १८१८ सालीं पेशव्यांची सत्ता नामशेष झाल्या-मुळें कोल्हापूरची गादी पेशव्यांच्या या कटकटींतून एकदांची मुक्त झाली. बाहेरच्या संकटांची कोल्हापूरच्या राज्याला यापुढें कोणतीहि बाधा उपस्थित झाली नाहीं.

## प्रकरण २ रें.

# कोल्हापूरचे दुर्दिन.




भाजी ऊर्फ आबासाहेबमहाराज यांचा तारीख १७ जुलै १८२१ इ० रोजीं खून झाल्यानंतर कोल्हापूरच्या राज्यावर जी संकटपरंपरा गुदरली, तीमुळें संस्थानच्या इभ्रतीला व सत्तेला जबरदस्त धक्का पोंचला. इ० स० १८२१ पासून १८९४ सालीं श्रीशाहुमहाराजांच्या हातीं अधि- कारसूत्रें येईपर्यंत, ही संकटांची एकसारखी मालिकाच लागून राहिली होती. कोल्हापूरच्या प्रजाजनांना व राज्यकर्त्यांना हा काळ सारखाच जाचक झाला. या संकटांचें मूळ ज्या अंत:स्थ दुफळया, त्यांचा पूर्ण इतिहास व त्यामुळें कित्येक लोकांचा जो छळ झाला, त्यांचें सविस्तर वर्णन येथें देण्याची आवश्यकता नाहीं. फक्त १८९४ सालीं श्रीशाहुमहाराजांनीं जेव्हां अधिकारसूत्रें आपल्या हातीं घेतलीं, तेव्हां त्यांना ज्या बिकट परिस्थितीशीं झगडावें लागलें, त्याची यथार्थ कल्पना वाचकांना होण्यासाठीं कोल्हापूरच्या गादीला ज्या कृष्णकारस्थानांमुळें इतकीं संकटें सोसावीं लागलीं, त्यांचें येथें थोडेसें दिग्दर्शन होणें जरूर आहे. ही बिकट परिस्थिति निर्माण होण्याला आमचे चरित्रनायक कारणीभूत झाले नाहींत, ही गोष्ट उघड आहे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें आबासाहेबांच्या खुनानंतर जे कोल्हापुरावर कृष्ण ढग आले, त्यांच्यांत या शाहुमहाराजांच्या सभोंवार पसरलेल्या बिकट परिस्थितीचें मूळबीज पेरलें होतें. अशा रीतीनें उद्भवलेलीं संकटें व त्यांचे कोल्हापूरराज्यावर घडलेले परिणाम यांचा शाहुमहाराजांच्या कारकीर्दीशीं निकट संबंध होता. किंबहुना, त्यांना या परिणामांचें शक्य तितकें परिमार्जन करूनच आपला मार्ग आक्रमणें भाग होतें; ह्मणूनच महाराजांच्या चरित्राला सुरवात करण्यापूर्वीं या दुर्दिनांचें संक्षिप्त वर्णन येथें देणें जरूर आहे.

मारेकऱ्यांनीं संभाजीमहाराजांचा खून केल्यानंतर, पौर्वात्य इतिहासांत वारंवार घडून येतें, त्याप्रमाणेंच अंत:स्थ कलहाग्नीचा स्वाभाविक भडका

उडाला. संभाजीमहाराजांना बाळासाहेब नांवाचा एक अल्पवयस्क मुलगा असून, शहाजी ऊर्फ बुवासाहेबमहाराज नांवाचा एक धाकटा बंधु होता. या दोघांचे दोन पक्ष बनून त्यांच्यामध्यें वर्चस्वाकरितां युद्ध जुंपलें. बुवासाहेबांच्या सुदैवानें संभाजीमहाराजांच्या मरणानंतर थोड्याच दिवसांनीं बाळासाहेब मरण पावले व त्यांचा पक्ष कमजोर झाला. परंतु आपल्या प्रतिस्पर्ध्याचा पक्ष उचलणाऱ्या लोकांचा सूड उगविण्याचा मोह बुवासाहेबमहाराजांना आंवरतां आला नाहीं. परंतु इतक्यावरच भागलें नाहीं. संभाजीचा खून करणारा इसम कागलच्या घाटग्यांचा संबंधी असून, त्याचा व दरबारांतील कांहीं प्रमुख लोकांचा स्नेहसंबंध होता. या सर्वांवरच संभाजीमहाराजांच्या खुनाचा वहीम येऊन बुवासाहेबमहाराजांची बाळासाहेबांच्या पक्षाप्रमाणेंच त्यांच्यावरहि वक्र दृष्टि झाली. या हतभागी लोकांमध्यें महाराजांचे जुने शत्रू इचलकरंजीकर घोरपडे, कागलचे जहागिरदार घाटगे व राजघराण्याचे पिढीजाद उपाध्ये भाऊमहाराज व बाबामहाराज हे होते. ब्रिटिशसरकारच्या कानावर — त्या वेळीं ब्रिटिशसरकारचा राज्यकारभार कंपनीचे हातीं होता — या सर्वांनीं आपलीं गाऱ्हाणीं घातल्यामुळें ब्रिटिशसरकारला बुवासाहेबांच्या राज्यकारभारांत आपला हात शिरकविण्याची रीतीच संधि प्राप्त झाली. कित्तूरच्या बंडखोरांना मदत करण्याचा प्रयत्न करून व कोल्हापूरसंस्थानच्या आसपासच्या ब्रिटिशमुलखांत वरचेवर लुटालूट करून बुवासाहेबमहाराज कंपनीसरकारच्या अधिकारी लोकांच्या रोषास आधींच पात्र झाले होते. त्यामुळें १८२६ सालीं ब्रिटिशसरकार व कोल्हापूरसंस्थान यांच्यामध्यें नवीन तह होऊन, संस्थानमध्यें व संस्थानच्या बाहेर शांतता राहण्यासाठीं छत्रपतिमहाराजांना आपल्या सैन्याची संख्या मर्यादित करावी लागली. जहागिरदारांचीं गाऱ्हाणीं ऐकून घेऊन ब्रिटिशसरकारनें त्यांचें संरक्षण करण्याची हमी घेतली. तसेंच ब्रिटिशसरकारच्या शत्रूंना, बंडखोरलोकांना किंवा गुन्हेगारलोकांना कोल्हापूरच्या हद्दींत आश्रय देतां कामा नये, अशीहि अट या तहांत घालण्यांत आली. चिक्कोडी व मनोळी हे तालुके महाराजांच्या ताब्यांत ठेवण्यांत आले; परंतु इनामदार व वतनदारलोकांना कोणत्याहि प्रकारचा उपद्रव पोंचतां कामा नये, आणि महाराजांच्या दुवर्तनामुळें प्रजेचें जें नुकसान झालें असेल तें महाराजांनीं भरून द्यावें अशा शर्तींवरच हा सुपीक प्रदेश महाराजांकडे ठेवण्यांत आला. परंतु या शर्तींप्रमाणें महाराजांचें वर्तन न घडल्यामुळें हे दोन

तालुके ब्रिटिशसरकारनें खालसा केले. अशा प्रकारें महाराजांना अविचाराचें प्रायश्चित्त भोगावें लागून त्यांची सत्ता बरीच परिमित झाली. मात्र त्या काळच्या ब्रिटिशसरकारच्या परराज्यामध्यें ढवळाढवळ न करण्याच्या नवीन धोरणाचा महाराजांना थोडासा फायदा मिळाला आणि या तहांत महाराजांच्या स्वतंत्र राज्याधिकाराला या तहांतील अटींमुळें कोणत्याहि प्रकारचा बाध येणार नाहीं असा स्पष्ट खुलासा केला होता.

या तहनाम्यानें बुवासाहेबांच्या वर्तनांत कोणत्याहि प्रकारचा फरक पडला नाहीं. तहनाम्याच्या शर्तीप्रमाणें मनोळी व चिक्कोडी या तालुक्यातील लोकांशीं महाराजांचें वर्तन न झाल्यामुळें व बुवासाहेबमहाराजांनीं आपल्या प्रजाजनांचा एकसारखा छळ मांडल्यामुळें १८२७ सालीं पुन: नवीन तह होऊन हे दोन तालुके कायमचे खालसा करण्यांत आले; व संस्थानच्या सैन्यांत केवळ ४०० घोडेस्वार व ८०० पायदळ असावें अशी मर्यादा घालण्यांत आली. कांहीं विशिष्ट जहागिरदारांच्या संरक्षणाबद्दल पुन्हां हमी देण्यांत आली. बंडखोर व लुटारूलोकांचें निवासस्थान अकीवाट ब्रिटिशसरकारच्या हवालीं करण्यांत येऊन छत्रपतीला ब्रिटिशसरकारनें पसंत केलेलाच कारभारी नेमणें भाग झालें. चिक्कोडी व मनोळी हे तालुके छत्रपतींच्या ताब्यांतून कायमचे गेल्यामुळें संस्थानच्या उत्पन्नाला बराच खो बसला. परंतु संस्थानच्या खर्चाच्या बाबी मात्र पूर्ववत् चालू राहिल्या. आपण गमावलेली सत्ता परत मिळविण्यासाठीं बुवासाहेब १८३० सालीं बेळगांवला गेले; परंतु यापासून त्यांचा कोणत्याहि प्रकारचा फायदा न होतां त्याचें दुर्दैव अधिकच खडतर झालें. ब्रिटिशसरकारनें नेमलेले कारभारी **रामराव अकबरनीस** यांचा उपयोग या प्रसंगीं महाराजांना अतिशय झाला. बेळगांव येथें ब्रिटिश राजकीय अधिकाऱ्यांची मुलाखत घेते वेळीं बुवासाहेब महाराजांच्या नोकरांच्या हलगर्जीपणामुळें पिस्तूल उडून अतिशय नाजूक परिस्थिति उत्पन्न झाली. यामुळें कोल्हापूरसंस्थानचें कायमचें नुकसान झालें असतें; व बुवासाहेबांना कोल्हापूरच्या हद्दींत परत पाय ठेवण्याची आशाच राहिली नसती. बुवासाहेबांना नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सलामी न देतां, त्यांनीं बेळगांवहून निघून जाण्याचा हुकूम फर्माविण्यांत आला होता व बुवासाहेबांचा कोल्हापूरच्या तटबंदींत प्रवेश होऊं देऊं नये, असा कोल्हापूर येथील

ब्रिटिश कमांडिंग ऑफिसरला हुकूमहि सोडण्यांत आला होता. या दुर्दैव-गर्तेतून बुवासाहेबांना वर काढण्याचें सर्व श्रेय रामराव अकबरनीस यांनाच दिलें पाहिजे. परंतु त्या कालच्या वेडसर समजुतीप्रमाणें तुळजापूरच्या भवानीच्या कृपादृष्टीमुळें वरील दुर्धर प्रसंग टळला, अशी बुवासाहेबांची समजूत होऊन, ते तीर्थयात्रेला निघाले; व तारीख २९ नोवेंबर १८३८ इ० रोजीं ते यात्रेंत असतांच दिवंगत झाले.

बुवासाहेबमहाराजांची कारकीर्द कोल्हापूरच्या प्रजाजनांना अतिशय दुःसह अशी झाली होतीच, परंतु इःतपरहि त्यांना चांगले दिवस येतील अशी आशा दिसत नव्हती, ही विशेष खेदाची गोष्ट होय. उलट याहिपेक्षां कोल्हापूरच्या प्रजाजनांना अतिशय वाईट दिवस येण्याचा रंग दिसत होता ! बुवासाहेबांच्या मरणानतंर त्यांचे पुत्र शिवाजीमहाराज हे तक्तारूढ झाले. या वेळीं शिवाजीमहाराजांनीं आठ पावसाळेहि पाहिले नसल्यामुळें कोल्हापुरांतील कृष्णकारस्थानांना चांगलाच पूर आला. बाळासाहेबांची माता महाराणी आनंदीबाई ऊर्फ ताराबाईसाहेब ही राज्याची व्यवस्था पाहूं लागली. परंतु ताराबाईसाहेबांना सईबाईसाहेब ऊर्फ दिवाणसाहेब यांच्या सारखी महत्त्वाकांक्षी व जबरदस्त प्रतिस्पर्धी उत्पन्न झाली. ताराबाईसाहेब यांच्या पक्षाला जीवराव जाधव व मोरोपंत हुजूरबझार हे होते व दिवाणसाहेब यांच्या पक्षाला दिनकरराव गाईकवाड व रावजी वाकनीस हे होते. या प्रसंगीं रामराव अकबरनीसांनीं मोठ्या हुशारीनें या दोन पक्षांत क्षणिक का होईना, सख्य घडवून आणिलें. परंतु हें सख्य फार दिवस टिकलें नाहीं. हे दोन्ही पक्ष जर समबल असते तर आघातास प्रत्याघात घडून कोल्हापूरसंस्थानांतील बरींच कृष्णकारस्थानें उपस्थित झालीं नसतीं. परंतु दिनकरराव गाइकवाड यांच्या नेतृत्वाखालीं दिवाणसाहेबांचा पक्ष प्रबल होऊन, अखेर ताराबाईचा पक्ष कमकुवत झाला व दिवाणसाहेब व त्यांचें आवडतें मंत्रिमंडळ यांच्या हातीं कोल्हापूरराज्याचीं सर्व अधिकारसूत्रें गेलीं. त्यांनीं आपल्या हातीं असलेल्या सत्तेचा पूर्णपणें दुरुपयोग केला. एक तर बुवासाहेबमहाराजांनीं आपल्या संस्थानच्या दोनतृतियांश भागाची जहागिरी व इनाम या रूपानें खैरात केली; आणि जो अवशिष्ट भाग महाराजांच्या ताब्यांत राहिला होता, तो त्यांच्या स्वैर वर्तनामुळें उधळपट्टींत व दुःखांत बुडू

गेला. दिवाणसाहेबांच्या अमदानींत संस्थानचें उत्पन्न तीन लक्षांपेक्षां अधिक नव्हतें, परंतु उत्पन्नापेक्षां खर्च दीडपट असून कर्जाचें ओझें संस्थानावर इतकें झालें होतें कीं, संस्थानला यांतून मार्ग काढणें मोठें दुरापास्त झालें होतें. संस्थानच्या कर्जबाजारीपणाला एकसारखी भरतीच येत चालली होती. तथापि, हें खरें आहे कीं, या कालांतच ब्रिटिशसरकारचें वजन कोल्हापुरांत एकसारखें वाढत चालल्यामुळें राज्यपद्धतीला थोडेंसें नवीन वळण लागलें. मात्र याच स्थित्यंतरामुळे आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्याची कारकुनी पेशाच्या ब्राह्मणांना ऐतीच संधि मिळाली. दिनकरराव गाइकवाड यानें जरी दिवाणसाहेबांच्या मंत्रिमंडळामध्यें पहिली जागा पटकाविली होती, तरी तो अगदींच निरक्षर असल्यामुळें राज्यकारभाराच्या बाबतींत रावजी बाकनीस व इतर ब्राह्मणकारकून यांजवर त्याला विसंबून राहावें लागे. दिवाणसाहेबांची महत्वाकांक्षा, दिनकरराव गाइकवाड याची उद्दामवृत्ति व दीर्घसूत्रीपणा, तसेंच बाकनीस आणि त्याचे हस्तक यांचा कारस्थानीपणा इत्यादि गोष्टींमुळें कोल्हापुरांतील बेबंदशाही अधिकच वाढली. याच अमदानींत संस्थानांतील लिंगायत व जैनलोकांना भिक्षुकशाहीच्या अरेरावीपासून स्वतःचें संरक्षण करून घेण्यासाठीं ब्रिटिशसरकाराकडे दाद मागावी लागली. ब्राह्मणेतर हिंदुलोकांवर कुरघोडी करण्याची भिक्षुकशाहीला जी संवय लागली होती, तिची अंमलबजावणी लिंगायत व जैनलोकांवरहि करण्याचा तिला मोह झाला, आणि त्यापासून आपला बचाव व्हावा ह्मणून या जातींनीं कंपनीकडे धांव घेतली. १८४२ सालीं एक ब्रिटिश अधिकारी कोल्हापुराला येऊन त्यानें दिवाणसाहेब व तिचें प्रिय मंत्रिमंडळ यांच्या सत्तेंत ढवळाढवळ न करतां कोल्हापुरांत स्थिरस्थावर करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं, असें जेव्हां आढळून आलें, तेव्हां गाइकवाड व बाकनीस यांना अधिकारावरून दूर करण्याची दरबारला सूचना करण्यांत आली; परंतु या सूचनेकडे दरबारनें कित्येक महिने लक्ष पुरविलें नाहीं. दरबारच्या या बेपर्वाईच्या वर्तनामुळें या बेबंदशाहीची घटका पूर्णपणें भरून आली. दरबारच्या या वर्तनाची ब्रिटिशसरकारला पराकाष्टेची चीड आल्यामुळें, १८४४ सालीं दिवाणसाहेबांची सर्व सत्ता काढून घेऊन व गाइकवाडाला संस्थानमधून हद्दपार करून दाजी पंडीत नांवाच्या एका ब्रिटिशसरकारच्या अधिकाऱ्याची संस्थानचा कारभारी ह्मणून नेमणूक करण्यांत आली

अशी जरी व्यवस्था करण्यांत आली होती तरी कोल्हापुराचें नष्टचर्य अद्याप संपलें नव्हतें. दाजी पंडितांचे सर्व प्रयत्न जरी सदिच्छेनें प्रेरित झाले होते, तरी संस्थानांत सुधारणा घडवून आणण्याच्या पंडीतजींच्या विलक्षण घाईमुळें संस्थानांत बंडाळी माजली व ब्रिटिशसरकारला मध्यें पडून लष्कराच्या साह्यानें ही बंडाळी मोडून टाकावी लागली. त्यामुळें संस्थानच्या कर्जबाजारी तिजोरीच्या छातीवर पंधरा लाखांची नवीन धोंड लादण्यांत आली. कोल्हापुरसंस्थानच्या राजधानींतील व पन्हाळा, सामानगड, भूधरगड व इतर डोंगरी किल्ल्यांतील गडकरी लोकांनीं कावेबाज लोकांच्या कारवाईला बळी पडून कोल्हापूरच्या राज्यावर व आपल्या मालकावर ज्या आपदा आणिल्या, त्यांचा आतां कळसच झाला. हे गडकरी किल्ल्यांतील आनुवंशिक पहारेकरी असून त्यांच्यावर आनुवंशिक पद्धतीचा स्वाभाविक परिणाम होऊन ते चढेल व बेफाम झाले; व जेव्हां दाजी पंडितांनीं ही आनुवंशिक पद्धत मोडून टाकण्याचा उपक्रम केला, तेव्हां गडकरीलोकांनीं व तत्सम इतर आनुवंशिक नोकरांनीं बंड उभारिलें. विशाळगडच्या प्रतिनिधींसारख्या मांडलिक जहागिरदारांपासून तों तहत हलक्या प्रतीच्या मिरासदारांपर्यंतच्या नोकरांनीं कित्येक पिढ्या छत्रपतींची सत्ता नामशेषच केली असल्यामुळें, या प्रसंगीं ते पूर्णपणें बेफाम झाले होते ! त्यामुळें ब्रिटिश तोफांचा उपयोग करून या बंडखोरांचा गर्व हरण करणें भाग पडलें. या चकमकींत इतिहासप्रसिद्ध किल्ले छिन्नविच्छिन्न होऊन कायमचे विद्रूप झाले ! कोल्हापूरचें राज्य खालसा होऊन शिवाजीमहाराजांच्या कार्याचें अवशिष्ट फल जें कोल्हापूरचें राज्य हेंहि आतां स्मृतिशेष होणार कीं काय असा प्रसंग येऊन ठेपला. परंतु कर्नल रीव्हूज यांनीं महाराजांच्या व त्यांच्या कुटुंबांतील माणसांच्या ब्रिटिशसरकारशीं असलेल्या अखंड प्रेमभावाची इंग्लंडांतील अधिकाऱ्यांना खात्री करून देऊन कोल्हापूरचें राज्य वाचविलें; नाहींतर त्या कालच्या इतर कित्येक हिंदीसंस्थानांप्रमाणें कोल्हापूरच्या राज्याचीहि समाप्तीच झाली असती. असो. मेजर ग्रॅहॅम् हे कोल्हापूरचे पहिले पोलिटिकल सुपरिन्टेंडन्ट झाले व त्यांच्या हातीं राज्याचीं सर्व अधिकारसूत्रें येऊन अल्पवयी महाराजांना त्यांच्या खासगी खर्चाकरितां दरसाल ८०,००० रुपयांची नेमणूक करून देवविण्यांत आली. १८५७ च्या बंडानंतर वर लिहिल्या-प्रकारचा आणखी एक प्रसंग आला होता; पण तो त्या वेळच्या तरुण छत्रपतींच्या हुषा-

रीनें टळला. मात्र महाराजांचे सावत्रबंधु चिमासाहेबमहाराज यांचें अंग त्या वेळ कोल्हापुरावर बंडाच्या ज्या ठिणग्या उडाल्या, त्यांत असावें, असा सरकारल वहीम येऊन चिमासाहेबांना हद्दपार करून कराचीस ठेवण्यांत आलें.

१८६२ सालापर्यंत बाबासाहेबमहाराजांना आपला काळ केवळ अधिकार-विहीन स्थितींत बसून काढावा लागला. मात्र या सालीं महाराजांशीं एक करा करून, बऱ्याचशा अटींवर का होईना, महाराजांच्या हातीं राज्याचीं अधिकार-सूत्रें हवालीं करण्याचा ब्रिटिशसरकारनें निश्चय केला. या कराराचा हे महाराजांच्या सत्तेवर गदा आणण्याचा नसून "गतकालीन कोल्हापूरमध्यें जे रक्तपात होत होता व जी बंडाळी माजली होती, तिची पुनरावृत्ति होऊं नये, इत काच होता. याच कारणास्तव सरकारनें पसंत केलेला कारभारी महाराजांन नेमावा, खासगी खातें हें संस्थानच्या इतर खात्यापासून अलग ठेवावें, संस्था-नच्या सर्व कर्जाची फेड होईतोंपर्यंत कोणालाहि नवीन जमीन अगर गांवें इनाम करून देऊं नयेत व कोल्हापूरच्या मांडलिक जहागीरदारांच्या नियमनाच अखेरचा अधिकार ब्रिटिशसरकारच्या हातीं असावा अशा अटी महाराजांव लादण्यांत आल्या. गुन्हेगारांना द्यावयाच्या देहांत शासनाला ब्रिटिशसरकारची मंजूरी घ्यावी आणि विशेष महत्वाच्या गोष्टींत महाराजांनीं ब्रिटिशसरकारच सल्ला घ्यावा असेंहि याच करारान्वयें ठरलें. येथवर कोल्हापुरावर जी दुर्दैव-परंपरा ओढविली होती, तिला जरी अंशत: दैविक आपत्तीच कारणीभूत झाल्य होत्या तरी बऱ्याच अंशीं मानवी दोषहि कारणीभूत झाले होते. ही वस्तुस्थिति लक्षांत घेतां, खरोखरच हा करार करून ब्रिटिशसरकारनें कोल्हापुरावर मोठ अनुग्रहच केला होता, हें उघड आहे. या करारामुळें छत्रपतीच्या बेहद्द दातृत्वाला पायबंद बसून, मराठीसाम्राज्याचे संस्थापक श्री शिवाजीमहाराज यांनीं ज्या सरंजामी पद्धतीचे दोष वेळींच जाणून तिचा प्रसार न होण्याबद्दल पराकाष्टेची दक्षता घेतली होती, तीच सरंजामी पद्धत या तहामुळें कोल्हापुरांत अधिक विस्तृत होणें अशक्य झालें. उलट हा करार पराकाष्टेचा कडक होता, हें निर्विवाद आहे; परंतु त्या वेळीं संस्थानची स्थिति जवळ जवळ खालसा झाल्यासारखीच झालेली होती व या स्थितींतून बाहेर पडण्यास या तहा-वांचून अन्य मार्गच राहिलेला नव्हता, ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे. दोन पिढ्यांच्या अनुभवावरून कोल्हापुरांतील तत्कालीन दरबारी लोकांच्या कलह-

प्रियतेला आळा घालण्याचें काम मोठें कठीण होतें, ही गोष्ट सिद्ध झाली होती. अशा प्रकारच्या परिस्थितीला अमूकच जात अगर वर्ग कारणीभूत झाला होता, असें नाहीं. या गोष्टी घडल्यानंतर बऱ्याच दिवसांनीं ब्राह्मणद्वेष्टे ह्मणून प्रसिद्ध असलेल्या लीवॉर्नर साहेबांचें श्रीशाहुछत्रपतिमहाराजांना जें एक पत्र आलें होतें, त्यांत त्यांनीं ह्मटल्याप्रमाणें केवळ ब्राह्मणलोकच कारस्थानी होते असें नव्हे, तर ब्राह्मणांप्रमाणें मराठे वगैरे जातीहि तितक्याच कारस्थानपटु होत्या. १८९५ सालीं सर वुइलियम लीवॉर्नरसाहेब जर आपला अनुभव अशा प्रकारें सांगतात, तर बाबासाहेबमहाराजांच्या अमदानींत पूर्वींसारख्याच भानगडींची पुनरावृत्ति होऊन कोल्हापूरच्या इतिहासाला पुन: डाग लागूं नये ह्मणून या तहांत घेतल्याप्रमाणें दक्षता घेणें अर्थात क्रमप्राप्तच होतें. परंतु या प्रश्नाची दुसरी व काळी बाजूहि याच ठिकाणीं लक्षांत घेतली पाहिजे. या कराराच्या कांहीं शर्तींचें जरी समर्थन करतां येण्यासारखें होतें, तरी या करारामुळें जहागिरदारांना आपलें वर्चस्व वाढविण्याचा मोह अनिवार झाला, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करितां येणार नाहीं. कोल्हापूरच्या छत्रपतिमहाराजांपासून स्वतंत्र होण्याची त्यांची प्रवृत्ति या तहामुळें बेसुमार वाढली. पेशव्यांचे जहागिरदार शिंदे, होळकर आणि गाइकवाड यांनीं ज्याप्रमाणें आपल्या कायदेशीर मालकाची ह्मणजे पेशव्यांची सत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य संपादन केलें; तद्वतच करण्याची कोल्हापूरच्या जहागिरदारांना या तहनाम्यानें संधि आणून दिली. कोल्हापूरच्या जहागिरदारांच्या जहागिरी जरी लहान होत्या तरी पेशव्यांच्या राज्याशीं गाइकवाड व होळकर यांच्या जहागिरींचें जें प्रमाण होतें, तितकेंच कोल्हापूरचें राज्य व कोल्हापुराच्या जहागिरदारांच्या जहागिरी यांच्यामध्यें होतें. जहागिरदारांची स्वातंत्र्यलालसा छत्रपतींना पुढें बरीच जाचली. १८६२ च्या करारामुळें संस्थानांतील क्षुद्र लोकांच्या कारस्थानांना जरी यशस्वी रीतीनें आळा बसला, तरी याच करारामुळें कोल्हापूरच्या जहागिरदारांना छत्रपतीविरुद्ध कारस्थानें रचून आपल्या सत्तेत भग टाकण्यास पूर्ण अवसर मिळाला. जहागिरदारांची चढेल वृत्ति यापुढें इतकी बेफाम झाली कीं, १८९५ सालीं आपण ज्या ज्या वेळीं कोल्हापुरास येऊं त्या त्या वेळीं कोल्हापूरचे छत्रपतिमहाराज आपलें स्वागत करण्यासाठीं वेशीपर्यंत सामोरे आले पाहिजेत असा हट्ट धरण्याचें एका जहागिरदारानें धाष्टर्य केलें! कोल्हापुरांतील

ब्रिटिशसरकारच्या प्रतिनिधीलाहि अशा प्रकारचा मान मिळाला नव्हता, ही गोष्ट येथें लक्षांत ठेवली पाहिजे. इतर व्यवसायामुळें उद्यां आपलें स्वागत करण्यास मला सवड होणार नाहीं, अशा प्रकारचें टाळाटाळीचें उत्तर देऊन, महाराजांनीं हा प्रसंग कसाबसा मारून नेला. आपल्या नोकरलोकांवर आपल्या वाडवडिलांच्या तोडीची छाप बसविण्यासाठीं आमच्या चरित्रनायकांना जे भगीरथ प्रयत्न करावे लागले, त्यांचें सविस्तर वर्णन पुढें योग्य प्रसंगीं देतां येईल; परंतु या करारामुळें छत्रपतींची आपल्या मांडलिकांवरची पकड ढिली झाली, व महाराजांच्या इभ्रतीला अवास्तव धक्का पोंचला, एवढी गोष्ट येथें नमूद करणें जरूर आहे.

हा करार झाल्यानंतर थोड्याच दिवसांत तारीख ४ आगष्ट १८६६ इ० रोजीं बाबासाहेबमहाराज यांचा काळ झाला. तेव्हांपासून १८९४ पर्यंतच्या कालांतील सर्वच महाराज अल्पवयस्क अवस्थेंतच मृत्युमुखीं पडल्यामुळें आणखी नवीन विघ्नें उत्पन्न झालीं. या परिस्थितीशीं झगडण्याची जबाबदारीहि आमच्या चरित्रनायकांवरच येऊन पडली. बाबासाहेब कालवश होण्यापूर्वीं एक दिवस अगोदर त्यांनीं श्रीराजाराममहाराज यांना दत्तक घेतलें होतें, श्रीराजाराममहाराज हे पाटणकर घराण्यांतील असून बाबासाहेबमहाराजांची बहीण व श्रीमंत रामचंद्रराव पाटणकर यांची पत्नी आऊबाईराणीसाहेब यांचे हे पुत्र होत. श्रीराजाराममहाराज धीरोदात्त स्वभावाचे असून होतकरू होते; परंतु ते इंग्लंडहून परत येते वेळीं फ्लोरेन्स येथें आपल्या वयाच्या २२ व्या वर्षीं स्वर्गवासी झाले. चवथे शिवाजीमहाराज हेहि राजघराण्यांतील दत्तक पुरुष असून श्रीराजाराममहाराजांच्या मृत्यूनंतर तारीख ३० नोव्हेंबर १८७० इ० रोजीं तक्तारूढ झाले; आणि १८८३ सालच्या डिसेंबर महिन्याच्या २५ व्या तारखेस त्यांचा हृदयद्रावक रीतीनें शेवट झाला. या दुर्दैवी अल्पवयस्क नृपतीची कहाणी मानवी इतिहासांत अत्यंत करुणास्पद अशी आहे. याला आंग्लकविभूषण शेक्सपियर यांनीं रंगविलेल्या अल्पवयस्क राजपुत्र **ऑर्थर** या पात्राची उपमा देतां येईल. या कहाणीची खरी स्थिति अद्याप जगापुढें कोणीं मांडिली नाहीं; व पुढेंहि तिचा खुलासा इतिहासकारांस कधीं तरी करितां येईल कीं नाहीं याची शंकाच आहे. पुण्यांतील त्या काळच्या दोन उत्साही ब्राह्मणसंपादकांनीं — टिळक आगरकर यांनीं — आपापल्या पत्रांमध्यें महाराजांच्या तुरुंगवासाचें हृदयविदारक असें वर्णन केलें व या हकीकतीची सत्यता न्यायकोर्टांत सिद्ध करणें अशक्य असल्यामुळें या न्यायप्रिय तरुणांना



श्री छत्रपति ( चौथे ) शिवाजी महाराज.



(१) महाराज (२) श्री बापुसाहेब (३) मे. इंगळे (४) काकासाहेब.

कारागृहवास पतकरावा लागला. हा दुर्दैवी राजपुत्र वेडा झाला होता असें ह्मणतात. याचें वेड घालविण्यासाठीं त्याला त्याच्या सर्व प्रिय नातलगांपासून, त्याच्या तरुण बायकोपासून व त्याच्या वृद्ध आईबापांपासून लांब ठेवण्यांत आलें! त्याच्या तरुण पत्नीची त्या वेळीं काय इच्छा होती, हें सांगतां येत नाहीं; परंतु संस्थानच्या कागदपत्रांवरून, त्याच्या जनकानें आपल्या मुलापाशीं रहाण्यासाठीं शिकस्तीचे प्रयत्न केल्याचें दिसून येतें. 'मी व माझा मुलगा एकत्र राहाण्याच्या अटीवरच मी माझ्या मुलाला दत्तक दिलें आहे,' असें त्यानें आग्रहपूर्वक सांगितलें. परंतु त्याच्या विनवणीकडे कोणींच लक्ष पुरविलें नाहीं. या दुर्दैवी राजपुत्राचे जनक दिनकरराव भोंसले यांच्या पुत्रवात्सल्यरूपी अमृतसिंचनानें या विमनस्क राजपुत्राला निरामय करण्याचा प्रयत्न तर झाला नाहींच; पण उलट या दुर्दैवी राजपुत्राला एका हडेलहप्पी सोजराच्या देखरेखीखालीं अहमदनगरच्या कोटांत कोंडून ठेवण्यात आलें! हा राजपुत्र जात्याच मानी व कर्तृत्ववान् असूनहि त्याची सर्व बाजूंनीं मानखंडना करण्यांत आली. छत्रपतीचें निर्व्याज अंतःकरण भेदण्यास वरील गोष्टी पुरेशा नव्हत्या, ह्मणूनच कीं काय कोण जाणें, या राजपुत्राला ज्या एका मनुष्याविषयीं अत्यंत द्वेष व तिरस्कार वाटत होता, त्याच्याच ह्मणजे रावबहादूर बर्वे यांच्याच देखरेखीखालीं त्यास ठेवण्यांत आलें! अखेर या हतभागी राजपुत्राच्या कपाळावर पूर्ण वेडेपणाचा शिक्का मारण्यांत आला व एके दिवशीं या मानी राजपुत्राची व पहारा करणाऱ्या नोकरांची मारामारी होऊन तींतच महाराजांचा अंत झाला! अशा प्रकारें कोल्हापूरचें तक्त पुन्हां पतिविहीन झालें!

पोलिटिकल सुपरिन्टेंडेंट, पोलिटिकल एजंट, रीजंट आबासाहेब घाटगे कागलकर व १८८५ सालीं रीजंटसाहेब वारल्यानंतर ॲडमिनिस्ट्रेशन कौन्सिल, या सर्वांच्या कारकीर्दींत संस्थानच्या राज्यव्यवस्थेंत ज्या सुधारणा घडून आल्या त्याचा मीं येथवर उल्लेख केलेला नाहीं. तसें करण्याची येथें जरूरी नाहीं. परंतु आमच्या चरित्रनायकांच्या आयुःक्रमावर या कालांतील ज्या एक दोन गोष्टींचा विशेष परिणाम घडला, त्यांचें येथें दिग्दर्शन होणें जरूर आहे. या आमदानींत ब्रिटिश हिंदुस्थानांतील नांवाजलेल्या राज्यपद्धतीचेंच कोल्हापूर संस्थानांतहि अनुकरण करण्यांत आलें. याचें मुख्य श्रेय या अवधींत कोल्हापुरास येऊन गेलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांना दिलें पाहिजे, यांत शंका नाहीं. त्यांच्या सुव्यवस्थेमुळें संस्थानचें

उत्पन्न एकसारखें वाढत जाऊन तिजोरींत वर्षानुवर्ष शिल्लक वाढत चालली. ज्या सुंदर इमारतींमुळें आज कोल्हापुराला मोठी शोभा आली आहे, त्या इमारती या शिलकेंतूनच उभारितां आल्या. संस्थानच्या सर्व खात्यांचें आधिपत्य पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या हातीं होतें. बहुतेक खात्यांतील वरचे अधिकारी शानन, सिंक्लेअर, मिसेस पार व मिस् लिटल यांसारखे युरोपीयन लोक होते. परतु वैद्यकी, आरोग्य, इंजीनिअरिंग खातें, स्त्रीशिक्षण यांसारखीं किरकोळ खातींच यूरोपीयन लोकांच्या नेतृत्वाखालीं होतीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. या व इतर खात्यांतील बहुतेक नोकर परहद्दींतून आणिलेल्या ब्राह्मणलोकांतून भरती करण्यांत आलेले होते. ह्मणजे स्थानिक लोकांना उत्तेजन देण्याचा प्रयत्न कोणींहि केला नाहीं. संस्थानच्या नोकरींत परहद्दींतील ब्राह्मण लोक खच्चून भरल्यामुळें कोल्हापूरच्या प्रमुख वर्गांना घरीं बसून राहावें लागलें व संस्थानचा सर्व राज्यकारभार ब्राह्मणमय झाला. मराठा व इतर जाती संस्थानच्या लोकसंख्येंत प्रमुख असूनहि त्यांना कोठेंहि प्रवेश मिळण्यासारखा नव्हता. १८८१ सालच्या अखेरीला, ह्मणजे शाहुमहाराजांचें दत्तकविधान होण्याच्या सुमारास ब्राह्मणजातींतील साक्षरतेचें प्रमाण शेंकडा ७९.१ होतें; परंतु मराठ्यांच्या साक्षरतेचें प्रमाण ८,६, कुणब्यांचें प्रमाण १.५, मुसलमानांचें ७.५ व जैन व लिंगायत लोकांचें साक्षरतेचें प्रमाण शेंकडा १०.६ होतें. हीच परिस्थिति १८९४ सालीं महाराज अधिकारारूढ होईपर्यंत चालू राहिली; आणि त्यांतील दोष नाहींसे करण्याची व त्या प्रयत्नामुळें उत्पन्न होणारीं संकटें सहन करण्याची जबाबदारी पुढें कालानुसार शाहुछत्रपतींवरच पडली.



# प्रकरण ३ रें.

# बालपणचा काळ.



नकघराण्यांतील यशवंतराव अथवा दत्तकघराण्यांतील श्रीशाहुछत्रपतिमहाराज यांचा जन्म ता० २६ जुलै सन १८७४ इ० रोजीं झाला. हे, कागलकर (मोठी पाती) श्री० जयसिंगराव आबासाहेब यांचे ज्येष्ठ पुत्र होत. यांचे धाकटे बंधु पिराजीराव ऊर्फ बापूसाहेब यांचा जन्म ता. ३ जानेवारी सन १८७६ रोजीं झाला. श्रीशाहुमहाराज यांस महाराणी आनंदीबाईसाहेब यांनीं दत्तक घेतल्यानंतर साहजिकपणेंच बापूसाहेब हे कागलकरांचे ज्येष्ठ पुत्र होऊन कागलजहागिरीचा वारसा हक्क त्यांच्याकडे आला. श्रीशाहुमहाराजांच्या ऐहिक यात्रेची समाप्ति होईपर्यंत हे बंधुद्वय आयुष्यांतील सुखदु:खाचे समान भागीदार झाले होते, हें येथें निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. महाराजांचे दुसरे सहचारी मित्र ह्मटले ह्मणजे कागलकर (लहान पाती) दत्ताजीराव ऊर्फ काकासाहेब हे होत. काकासाहेब हे विजयसिंगराव आबासाहेब यांचे सावत्र बंधु असून यांचा जन्म, महाराजांच्या जन्मापूर्वी सुमारें तीन आठवडे अगोदर ह्मणजे ता० ७ जुलै सन १८७४ इ० रोजीं झाला. काकासाहेबांच्या वडिलांचा अंत सन १८८१ सालच्या जुलै महिन्यांत झाल्यामुळें, काकासाहेबांच्या संगोपनाची जबाबदारी श्रीमंत आबासाहेब यांच्या अंगावर साहजिकपणेंच येऊन पडली. हीं तिन्हीं मुलें प्रथमत: मि० हरीपंत गोखले आणि मि० एल्. बी. वझे या शिक्षकांच्या हवालीं करण्यांत आलीं. या मुलांच्या बालपणाची हकीगत उपलब्ध नाहींच ह्मटलें तरी चालेल. केवळ तीन वर्षांचें वय असतांच महाराजांना बालग्रहाची व्यथा झाली. या आजारांतून ते जगतील कीं नाहीं याची मोठी चिंता उत्पन्न झाली होती. कसेंबसें हें संकट टळल्यावर मात्र महाराजांची शरीरसंपत्ति पराकाष्टेची सुदृढ झाली. याचें सर्व श्रेय श्रीमंत आबासाहेब यांनीं या मुलांना जें शारीरिक शिक्षण दिलें यालाच दिलें पाहिजे. यशवंतराव, एके दिवशीं झोंपी गेले असतां त्यांच्या मस्तकावर एका नागसापानें आपली फणा पसरून महाराजांच्या भावी अभ्युदयाचीं प्रसादचिन्हें दाखविलीं होतीं असें महाराजांच्या बालपणाच्या भाविक संव-

गड्यांचें ह्मणणें आहे. तसेंच यशवंतराव हे इतर मुलांबरोबर खेळत असतां एका नवख्या ज्योतिषानें हा मुलगा छत्रपतिपदारूढ होणार, असें भविष्य वर्तवून ठेविलें व कितीहि शोध केला तरी पुढें त्याचा पत्ता लागला नाहीं, अशीहि एक दंतकथा सांगण्यांत आली आहे. पौर्वात्य देशांतील थोर पुरुषांच्या पूर्व वयांत अशा प्रकारच्या परोपकारी नागसर्पांच्या व निःस्पृह भविष्यज्ञाच्या गोष्टी अचूक सांपडाव-याच्याच ! ह्मणून त्या काळच्या प्रचलित लोकभ्रमाच्या या गोष्टी द्योतक आहेत असें ह्मणण्याव्यतिरिक्त त्यांना महत्त्व देण्याचें कारण नाहीं. यापेक्षां पुष्कळच अधिक मह-त्वाची गोष्ट अशी आहे कीं, छत्रपतिघराण्याला आबासाहेबांनीं आपल्या लहान मुलाला दत्तक द्यावें, असें त्यांना विचारण्यांत आलें होतें. असें करणें अधिक शास्त्रसंमत झालें असतें. परंतु यशवंतराव हे बाह्यत: अधिक साधेभोळे दिसत असल्यामुळें, आबासाहेबांनीं आपल्या अधिक कुशाग्र बुद्धीच्या मुलाला लहान राज्याकरितां राखून ठेवून आपल्या भोळयाभावड्या वडील मुलाला मोटया राज्याच्या सिंहासनावर बसविणें अधिक पसंत केलें. वर दिलेली हकीगत जर खरी असेल तर " लहान मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात" अशी जी समजूत आहे; ती साफ चुकीची आहे, असें आह्मांस खात्रीनें ह्मणतां येईल !

चवथे शिवाजीमहाराज हे अहमदनगर येथें सन १८८३ सालीं मृत्यु पावले. त्या वेळीं त्यांच्या धर्मपत्नी महाराणी आनंदीबाईसाहेब यांनीं कै० छत्र-पति राजाराममहाराजांच्या पत्नी महाराणी सकवारबाई यांच्या संमतीनें या भाग्य-वान् मुलाला आपल्या मत पतीचा वारसदार ह्मणून दत्तक घेण्याचा संकल्प केला. यशवंतराव हे महाराष्ट्रांतील एका प्रसिद्ध व जुनाट सरदार घराण्याचे व कोल्हा-पूरच्या प्रमुख मराठा अमीर कुटुंबाचें वंशज असून श्रीछत्रपति [illegible] ऊर्फ बाबासाहेबमहाराज यांच्या द्वितीय भगिनी राजकन्या बाळाबाईसाहेब यांचे ते नातु होत. यांच्यापेक्षां छत्रपति घराण्याशीं अगदीं जवळच्या आंतड्याचा संबंध असलेला दुसरा वंशज कोणीहि अस्तित्वांतच नव्हता. घाटगे घराण्याच्या इतिहासांतील कांहीं गोष्टी लक्षांत घेतल्या तर महाराष्ट्रांत या घराण्याहून अधिक श्रेष्ठ असें दुसरें खानदानी सरदार घराणें अस्तित्वांतच नव्हतें असें ह्मटलें तरी चालेल. सुप्रसिद्ध " राठोड " घराण्यांतील रजपुतांची एक तुकडी आपलें नशीब काढण्या-साठीं पंधराव्या शतकांत महाराष्ट्रांत आली. यांनीं लौकरच साताऱ्यापैकीं पडळीची पाटीलकी संपादन करून ते पुढें आपल्या अंगच्या करामतीनें नांवारूपास

आले. या रजपुतघराण्यांतील कामराज नांवाच्या एका तरुणानें, साधारण मनुष्याच्या आटोक्याबाहेर अशा उंचीवर एक घांट बांधली असतां, हवेंतच दोन कोलाट्या घेऊन ती वाजविली. या कौशल्यामुळें बेदरच्या सुलतानांनीं खूष होऊन त्याला लष्करी हुद्दा दिला व त्याचप्रमाणें " घाटगे " हा किताब देऊन त्याचा गौरव केला. त्या वेळेपासून या घराण्यानें ' घाटगे ' हें नांव धारण केलें आहे. बेदर व त्याचप्रमाणें कलबुर्गा येथील दरबारांत " नामांकित मनसबदार " किंवा " वंशपरंपरागत लष्करी अधिकारी " असा, इतिहासकार फेरिस्ता यानें घाटगे घराण्याचा उल्लेख केला आहे. या दोन्ही राजघराण्यांचा लय झाल्यानंतर घाटग्यांनीं विजापूरच्या दरबारीं नोकरी धरली; व भानाजी घाटग्यानें कागल परगण्याच्या बंडखोर देसायाचा पाडाव केल्यानंतर सुलतानानें त्याला सन १५७२ सालीं हा जिंकलेला मुलुख मेहेरनजर केला. शिवाजीमहाराजांनीं ही देणगी सन १६६४ सालीं कायम करून पिराजीराव घाटग्याला एक नवीन सनद करून दिली. त्या वेळेपासून घाटगे हे मराठ्यांच्या इतिहासांत विविध मार्गांनीं प्रमुखपणें भाग घेत आहेत. सखारामराव घाटगे हा पुरुष दौलतराव शिंद्याच्या दरबारीं प्रसिद्धीस आला. दौलतराव शिंद्यानें सखारामरावाची चाणाक्ष मुलगी बाइजाबाई हिचें पाणिग्रहण केलें होतें. बाइजाबाईच्या लोकोत्तर बुद्धिमत्तेमुळें तिचें शिंद्याच्या दरबारीं पराकाष्ठेचें वजन होतें. सखारामरावाचा मुलगा इंदुराव याचीहि शिंद्याच्या लष्करांत नामांकित सेनापति ह्मणून प्रसिद्धि होती. याच्या वास्तव्यामुळें त्याच्याच नांवानें आजहि ओळखिली जाणारी एक सुप्रसिद्ध टेकडी दिल्लींतील लोकांस इंदुरावाची आठवण करून देत आहे. त्या टेकडीवर एका बाजूस अशोकाचा प्राचीन स्तंभ व दुसऱ्या बाजूस '५७ च्या बंडांतील विजयाचें इंग्रजांनीं उभारलेलें स्मारक अशा ऐतिहासिक परिस्थितींत उभें असलेलें इंदुरावाचें घर आज दिल्ली येथील प्रसिद्ध **इंदुराव हॉस्पिटल** या नांवानें त्याची कीर्ति कायम ठेवीत आहे. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं ही टेकडी ब्रिटिश इतिहासांत फारच संस्मरणीय अशी झाली. या वेळीं या टेकडीवरील इंदुरावाचा वाडा हें ब्रिटिश सैन्याचें मुख्य ठाणें झालें होतें. कोल्हापूरकर व निपाणीचे देसाई यांच्यामध्यें कित्येक दिवस कलहाग्नि भडकला होता. त्या वेळीं इंदुरावानें कोल्हापूरला जें उत्कृष्ट साहाय्य केलें त्याबद्दल कोल्हापूरच्या महाराजांनीं त्याला ' वजारतमाआब ' असा बहुमानाचा किताब दिला. महाराजांच्या एका बहिणीचा विवाह

विश्वासराव घाटग्याशीं झाला होता. विश्वासराव घाटगे हा याच घराण्यांतील एक प्रसिद्ध पुरुष असून १७९९ सालीं जेव्हां पट्टणकुडी येथें लढाई होऊन परशरामभाऊ मारला गेला त्या वेळीं त्यानें आपलें शौर्य चांगलें गाजविलें अशी प्रसिद्धि आहे. या कामगिरीबद्दल कोल्हापूरच्या महाराजांनीं त्याला १८०१ सालीं भूदरगड नांवाचा प्रख्यात किल्ला बक्षिस दिला होता.

महाराजांचे जनक वडील श्रीमंत जयसिंगराव आबासाहेब घाटगे यांचा जन्म या प्राचीन राठोड घराण्यांत ता. १२ मार्च सन १८५७ इ० रोजीं झाला. बाबा-साहेब महाराजांजवळ यांचेंहि शिक्षण झालें. बाबासाहेब महाराजांच्या भगिनी आक्कासाहेबमहाराज या जयसिंगरावांच्या मातोश्री होत. आबासाहेबांनीं मुधोळच्या राजेसाहेबांची एकुलती एक मुलगी राधाबाईसाहेब यांचें पाणिग्रहण केलें. मुधोळचें घराणें हेंहि महाराष्ट्रांतील दुसरें एक प्राचीन क्षत्रिय घराणें आहे. या विवाह-संबंधापासूनच आमच्या चरित्रनायकांचा १८७४ सालीं जन्म झाला. आमचे चरित्रनायक यशवंतराव हे अवघे तीन वर्षांचे असतां व पिराजीराव ऊर्फ बापूसाहेब यांना जन्मून पुरें एक वर्षहि झालें नसतांनाच राधाबाईसाहेब या १८७७ सालीं स्वर्गवासी झाल्या. १८७८ सालीं कागलाधिपतित्वाचीं सर्व सूत्रें श्रीमंत आबासा-हेबांच्या हवालीं करण्यांत आलीं; चवथे शिवाजीमहाराजांची प्रकृति लौकर सुधारण्याचा संभव न दिसल्यामुळें मार्च १८८२ सालीं श्रीमंत आबासाहेबांना कोल्हापूरचे रीजंट नेमण्यांत आलें. कोल्हापूर स्टेटमध्यें त्यांनीं जी उत्कृष्ट काम-गिरी केली तीबद्दल ब्रिटिश सरकारनें त्यांना नऊ तोफांचा सलामीचा मान दिला. या इतिहासप्रसिद्ध क्षत्रिय घराण्यांत जन्म पावलेले यशवंतराव छत्रपति घराण्याशीं अगदीं निकटचे संबंधी असल्यामुळें, छत्रपति घराण्यांतील राण्यांनीं गादीचे मालक होण्याकरितां यांनाच पसंत केलें तें योग्यच केलें. मुंबईसरकारानें या पसंतीला ता. २२ फेब्रुवारी १८८४ इ० रोजीं आपली मंजुरी दिली. लागलींच पोलिटिकल एजंट हे रीजंट साहेबांसहवर्तमान राजवाड्यांत गेले व आबासाहेबांनीं हें शुभ वर्तमान महाराज्ञी आनंदीबाईसाहेब यांना व राजघराण्यांतील इतरांना कळविलें. या बातमीमुळें सर्व शहरांत आनंदीआनंद झाला. ता. १७ मार्च १८८४ हा दिवस राज्यारोहण समारंभाकरितां निश्चित करण्यांत आला. सर्व दर्जाच्या नागरिकांनीं त्या वेळीं अभिनंदनपर संदेशांचा जणूं पाऊसच पाडला. त्या वेळीं महाराष्ट्रांत अतिशय वजनदार राजकीय संघ ह्मणून प्रसिद्ध असलेल्या पुण्याच्या सार्वजनिक-सभेनेंहि या



महाराजांचे वडील श्री जयसिंगराव आबासाहेब घाटगे सर्जेराव वजारत-मा-आब, कागल.



राजमाता श्री राधाबाईसाहेब महाराज.

समारंभांत भाग घेतला होता. या सभेनें जें मानपत्र अर्पण केलें त्यांत पुढील मजकूर होता:—

" नूतन नृपतींचा राज्यारोहणाचा प्रसंग हा केव्हांहि त्यांच्या प्रजाजनांना त्याचप्रमाणें त्यांच्या राज्याबाहेरील त्यांच्या हितचिंतकांना अत्यंत आनंददायक असा असतो. परंतु अशा प्रकारच्या गतकालीन उत्सवांहून हल्लींचा उत्सव कांहीं विशिष्ट परिस्थितींत होत आहे. कारण विलायतेंत राजाराममहाराजांचा अकालीं मृत्यु झाल्यामुळें व त्याचप्रमाणें कै० हतभागी शिवाजीमहाराजांच्या आजारीपणामुळें, गेलीं पंधरा वर्षे कोल्हापूरच्या संकटपरंपरेची जाणीव अखिल भारताला होऊन सर्व चिंतातुर व शोकाकुल झाला होता. "

मागच्या प्रकरणांत मीं कोल्हापूरच्या संकटपरंपरेची जी कहाणी वर्णन केली आहे, तिच्यामुळेंच लोकांचीं अंत:करणें इतकीं चिंतातुर व शोकाकुल झालेलीं होतीं. चवथ्या शिवाजीमहाराजांच्या मृत्यूपासून सन १८८४ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या अखेरीपर्यंतच्या दरम्यान जो दीर्घ कालावधि लोटला, त्यामुळें कोल्हापूरच्या प्रजाजनांचीच केवळ नव्हे तर कोल्हापूरच्या बाहेर फार अंतरावर असलेल्या लोकांचींहि मनें कोल्हापूरच्या राज्याच्या भवितव्यतेविषयीं साशंक झालेलीं होतीं. **सार्वजनिक सभे**च्या मानपत्राला उत्तर देतांना रीजंट साहेबांनीं " कोल्हापूरचें राज्य हें मराठा-जातीच्या परंपरागत थोरवीचें मूर्तचिन्ह आहे, " असे जे उद्गार काढिले ते यथार्थ होते. कोल्हापूरच्या प्रजाजनांनीं जें एक मानपत्र अर्पण केलें त्यांत नागरिकांच्या प्रतिनिधींनीं, प्रजाजनांच्या मनोभावना योग्य प्रकारें ग्रथित केलेल्या होत्या. या मानपत्रांत त्या वेळच्या परिस्थितीचें चित्र पुढीलप्रमाणें रेखाटलें गेलें होतें:—

" या इलाख्याच्या पश्चिम भागांत कोल्हापूर राज्य हें एक प्रमुख मराठा संस्थान असून श्रीशिवाजीमहाराजांच्या थोर घराण्याशीं या राजघराण्याचा अगदीं निकटसंबंध असल्यामुळें व त्याचप्रमाणें कोल्हापूरच्या राजघराण्यांत जीं दैवी स्थित्यंतरें झालीं, त्यामुळें कोल्हापूर हें अखिल महाराष्ट्राचा कलिजा होऊन बसलें आहे. दुर्दैवी चौथे शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर कोल्हापुरांत जो नृपतिविरहित काळ लोटला त्याची इतिश्री करून ब्रिटिशसरकार कोणतें धोरण स्वीकारणार, याकडे अखिल जनतेचे एकसारखे डोळे लागून राहिले होते. ब्रिटिश-

सरकारच्या संमतीनें महाराजांनीं जो नृपति पसंत केला आहे, तो पाहून कोण-त्याहि विचारी व सरळ मनाच्या मनुष्यास समाधानच वाटेल, असें ह्मणण्यास आह्मांस तिळमात्र संकोच वाटत नाहीं. ही निवड अत्यंत योग्य अशीच झाली. कोल्हापूरच्या राजघराण्याशीं आपल्या इतका कोणाचाच निकट संबंध नाहीं. ह्मणून आपल्या पुत्राला कोल्हापूरची गादी मिळणें अगदीं स्वाभाविक असून, प्रजाजनांनाहि तें अत्यंत प्रिय आहे. ”

कोल्हापूर संस्थानच्या प्रजाजनांना या नवीन मन्वंतराचा प्रारंभ सुखावह करण्यासाठीं कसून प्रयत्न करण्यांत आले. कोल्हापूरच्या राज्याला व राज-घराण्याला जे दुर्दैवाचे फेरे भोगावे लागले, त्यामुळ स्वभाविकपणेंच लोकांच्या मनांत कांहीं खुळया समजुतींना थारा मिळाला होता. या खुळया समजुतींना मूठमाती देण्यासाठीं काळजीपूर्वक प्रयत्न करावे लागले. याप्रीत्यर्थ जी उपाय-योजना करावी लागली तीसंबंधानें कर्नल रीव्हज ह्मणतातः—“ अगदीं अल्पा-वधींत कोल्हापूरचे तीन नृपती एकामागून एक असे स्वर्गवासी झाल्यामुळें स्वाभा-विकपणें शहरांत बऱ्याच वेडगळ समजुती प्रादुर्भूत झाल्या. ( १ ) तिसरे शिवाजीमहाराज, ( २ ) संभाजी ऊर्फ आबासाहेबमहाराज यांच्या पत्नी जिजा-बाईराणीसाहेब, ( ३ ) शहाजी ऊर्फ बाबासाहेबमहाराज यांच्या पत्नी कमला बाईसाहेबमहाराज, ( ४ ) तिसरे शिवाजीमहाराज यांच्या पत्नी सुंदराबाईसाहेब महाराज ( ५ ) व चिमासाहेब ऊर्फ शाहुमहाराज यांच्या पत्नी सकवारबाईसाहेब-महाराज इत्यादिकांच्या अस्थींचें यथाशास्त्र विसर्जन न होतां त्या राजघराण्याचा स्मशानभूमींत अद्याप तशाच पडून राहिल्यामुळें ही दुर्दैवपरंपरा राजघराण्यावर ओढवली आहे, अशीहि सर्वसाधारण लोकांची समजूत झालेली होती; ह्मणून या संधीचा फायदा घेऊन कै० चौथे शिवाजीमहाराजांच्या रक्षेबरोबर त्यांच्याहि अस्थी काशीस नेऊन त्यांचें विसर्जन यथासांग करण्याची मीं सूचना केली. वर लिहिलेली गोष्ट अगदींच क्षुल्लक आहे; तथापि नूतन नृपतीच्या कार-कीर्दीचा प्रारंभ अत्यंत शुभदायक व मंगलमय परिस्थितींत करण्याच्या हेतूनें व या संस्थानच्या इतिहासाच्या नवीन प्रकरणाला प्रारंभ होण्याच्या वेळीं लोकांच्या आचारविचारांनाच केवळ नव्हे, तर त्यांच्या वेडगळ समजुतींनाहि यत्किंचित् देखील धक्का न पोंचण्याबद्दल किती दक्षता घेतली जात आहे, हें दर्शविण्यासाठींच वरील गोष्टीचा येथें उल्लेख केला आहे. ”



नवीन राजवाडा (छत्रपतींचें निवासस्थान).

दत्तकविधि व राज्यारोहणसमारंभ नियमित दिवशीं होऊन लोकांत आनंदी-आनंद झाला. आमचे चरित्रनायक यशवंतराव हे थोरल्या शिवाजीमहाराजांचे एक लोकोत्तर वंशज होण्यापूर्वी कोल्हापूरला ज्या आणीबाणीच्या प्रसंगांतून आपला मार्ग काढावा लागला व ज्याचें वर्णन ' दीर्घसंकटपरंपरा ' असें श्रीआबासाहेबांनीं केलें होतें, त्याची याप्रमाणें परिसमाप्ति झाली. नूतन छत्रपतीचें वयमान मात्र या वेळीं अवघें दहा वर्षांचेंच असल्यामुळ लोकांना चातक पक्ष्याप्रमाणें, त्यानंतर आणखी कांहीं काळपर्यंत वाट पहाणें भाग होतें. महाराजांच्या राजकीय शिक्षणाची जबाबदारी मुंबई सरकारावर स्वाभाविकपणेंच येऊन पडल्यामुळें, त्या वेळचे पोलिटिकल एजंट कर्नल रीव्हूज यांचें दत्तकविधानाच्या दिवशीं जें भाषण झालें, त्यांतच त्यांनीं या बाबतींत सरकारचे व रीजंटसाहेबांचे काय विचार होते, त्याचें दिग्दर्शन केलें होतें. संस्थानला ज्या संकटांतून आपला मार्ग काढावा लागला त्यांचा उल्लेख करून व त्याचप्रमाणें संस्थानच्या कल्याणाविषयीं सरकार सदा दक्ष राहील असें लोकांना आश्वासन देऊन, ते ह्मणाले:—

" या मध्यंतरींच्या काळांत महाराजांवर जी जबाबदारी येऊन पडली आहे, ती योग्य प्रकारें पार पाडण्याचें त्यांस सामर्थ्य प्राप्त व्हावें ह्मणून त्यांना उत्तम शिक्षण देण्याचा विचार चालू आहे. आपल्या मुलांच्या शिक्षणाविषयींचे आबासाहेबांचे विचार कल्पनातीत प्रगल्भ व उदार आहेत. शाळेचा अभ्यासक्रम पुरा करून कॉलेजचें शिक्षण संपादण्यासाठीं आपल्या मुलांना सहा सात वर्षें इंग्लंडमध्यें पाठविण्याची त्यांची इच्छा आहे. महाराजांच्या शिक्षणाविषयींचा हा कार्यक्रम पूर्णपणें किंवा अंशतः जरी अमलांत आला तरी, इंग्रज लोक व या देशाचे रहिवाशी यांच्यामध्यें श्रीछत्रपतींच्या रूपानें एक बळकट प्रेमबंधन निर्माण होईल, अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. उदात्त शिक्षणाला देशपर्यटणाची जोड मिळून ज्या नवीन विचारांची किंवा उपाययोजनेची कल्पना यरोपीयन लोकांच्या डोक्यांतून निघाली असतां लोकांत गैरसमज पसरण्याचा संभव असतो, त्याच विचारांचें बीजारोपण महाराजांना आपल्या वजनाचा व उच्च दर्जाचा फायदा घेऊन सहज करितां येईल. "

खरोखरच आबासाहेब प्रगल्भ विचारांचे गृहस्थ होते. सर्व दत्तकसमारंभ आटोपतांच महाराजांच्या व बापूसाहेबांच्या शिक्षणाची योग्य तरतूद करण्यास त्यांनीं सुरुवात केली. मि० कृष्णाजी भिकाजी गोखले हे आबासाहेबांच्या पूर्ण विश्वा-

साचे व अनुकरणीय अशा शिस्तीचे एक गृहस्थ होते. कित्येक वर्षेपर्यंत आबासाहे-बांचे शिक्षक व तदनंतर खासगी कारभारी या नात्यानें त्यांनीं काम केलें होतें. त्यांची महाराजांचे शिक्षक ह्मणून योजना झाली. मि० हरीपंत गोखले हे पूर्वी-प्रमाणें बापूसाहेबमहाराजांचे शिक्षक राहिले. काकासाहेब व दत्ताजीराव इंगळे ( धाकटे ) हेहि त्यांच्या जोडीनें अभ्यास करूं लागले. मि० फिट्झिराल्ड यांची या सर्वांवरील शिक्षणाधिकारी ह्मणून नेमणूक करण्यांत आली होती. प्रारंभीं कांहीं दिवस सरकारच्या हुकुमाप्रमाणें ते ता० २९ आगष्ट १८८४ इ० रोजीं महाराजांच्या शिक्ष-णाचे सुपरिन्टेन्डंट ह्मणून कामावर रुजूं झाले. मि० फिट्झिराल्ड हे पोलिटिकल खात्यांतील अधिकारी असल्यामुळें महाराजांच्या इंग्लंडला होणाऱ्या सफरीबद्दलच ते विशेष आतुर झाले होते. मात्र बालवयस्क राजकुमारांच्या शिक्षणासारखें कष्टसाध्य काम करण्याइतकी त्यांच्या अंगीं सहनशीलता नव्हती. १८८५ च्या नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीपर्यंत ते या कामावर होते. याच सुमारास आबासाहेबांनीं महाराजांना विलायतेला इतक्या लौकर न पाठविण्याचा ठाम निश्चय केला. महाराजांना सात वर्षेपर्यंत विलायतेंत ठेवण्याच्या ज्या योजनेला कर्नल रीव्हज् यांनीं आपल्या दरबारच्या भाषणांत उल्लेख केला होता, ती योजना १८८५ सालीं जेव्हां आबासाहेब विलायतेला गेले, तेव्हां त्यांनीं स्वतःच रहित केली. आबासाहेबांना विलायतेंत काय अनुभव आला ह्मणून त्यांनीं आपलें मन बदलिलें हें सांगतां येणें कठीण आहे. पुढें रीजंटसाहेबांनीं आपल्या मरणाच्या वेळीं, त्या वेळचे पोलिटिकल एजंट मि० लीवॉर्नर यांना जवळ बोलावून असें सांगितलें कीं, " माझे औरसपुत्र छत्रपतिमहाराज व माझ्या पश्चात् होणारे कागलचे वारसदार ( बापूसाहेब ) यांना राजकोट येथें इंग्रजी भाषेचें पुरेसें ज्ञान झाल्यानंतर त्यांनीं विलायतेस जावें. " यावरून, राजकुमारांना इंग्रजी भाषेचें ज्ञान पुरेसें नसल्यामुळें, विलायतेच्या सफरीचे फायदे घेण्यास ते या वेळीं असमर्थ होते, या सबबीवर हा बेत रहित करण्यांत आला असावा. कोणत्या तरी कारणानें का होईना, हा बेत रहित होतांच मि० फिट्झिराल्ड हे आपला चार्ज ता० २५ नोव्हेंबर १८८५ रोजीं देऊन निघून गेले. मुंबई सरकारनें महाराजांनीं आपल्या सहचारी मित्रांसह राजकोट येथील राजकुमार कॉलेजांत जावें असें ठरविलें. तेथेंच या मुलांना १८८९ पर्यंत ह्मणजे जवळ जवळ साडेतीन वर्षेपर्यंत शिक्षण मिळालें. नंतर त्यांना धारवाडला नेण्यांत आलें.

मि० फिट्झिराल्डच्या देखरेखेखालीं महाराजांनीं जी प्रगति केली, त्या-संबंधानें या शिक्षकाच्याच शब्दांत सांगावयाचें ह्मणजे:—

" महाराजांना माझ्या देखरेखेखालीं घेतल्यानंतर त्यांना देशी भाषेंतील शिक्षणाचें कितपत ज्ञान आहे, याची प्रथम मीं चांचणी करून पाहिली. सरकारी शाळेंतील त्यांच्या वयाच्या मुलाइतकाच महाराजांचाहि देशी भाषेंतील शिक्षणक्रम पुरा झाल्याचें माझ्या निदर्शनास आलें. इंग्रजी भाषाविषयांत मात्र महाराजांच्या बाबतींत विशेष परिश्रम घेतले पाहिजेत, असें माझें व मि० गोखले यांचें सारखेंच मत पडलें.

" शिक्षणखात्यानें अँग्लोव्हर्न्याक्युलर शाळांचा दुसऱ्या इयत्तेकरितां मंजूर केलेले सर्व विषय महाराज आतां शिकत आहेत. "

महाराजांच्या शिक्षकानें आपल्या पहिल्या अहवालांतच ' महाराज हे स्वभा-वानें भित्रे व लाजाळु आहेत, ' असा उल्लेख केला होता. महाराजांच्या बहुतेक संवगड्यांचाहि हाच अनुभव होता. सहा महिन्यांचा अनुभव घेऊनहि मि० फिट्झिराल्ड ह्मणतात:— " जरी महाराज कष्टाळु व शिक्षण संपादन करण्यास आतुर झालेले दिसतात, तरी आतांच महाराजांच्या कार्यक्षमतेबद्दल निश्चय ठरविणें योग्य होणार नाहीं. " महाराजांनीं आपल्या भर ज्वानींत व तदनंतरहि किती उच्च प्रतीची व लोकोत्तर बुद्धिमत्ता प्रगट केली, हें ज्यांना माहित आहे, त्यांना वरील अभिप्राय वस्तुस्थितीस धरून नव्हते असें सहज दिसून येईल; परंतु या-वरून निसर्गाचा एक अबाधित नियम मात्र सिद्ध होतो. तो हा कीं, खऱ्या बुद्धि-मत्तेची वाढ केव्हांहि मंदगतीनेंच होत असते; व प्रारंभींची मंदगति ही कार्यक्षम-तेच्या अभावाचें नेहमींच निदर्शक चिन्ह असतें असें नसून, दीर्घायुषी व चांगलें फळ देणारीं झाडें ज्याप्रमाणें हळूहळूच वाढतात, त्याप्रमाणें जोरकस बुद्धिमत्ता देखील सावकाशच परिणत होत जाते, या सिद्धांतास अनुसरून प्रारंभीं कर्तबगार माणसेंहि मंदपणानेंच वाढत जातात. असो.

सन १८८५ सालच्या अखेरच्या दिवशीं कोल्हापूर सोडून, महाराज व त्यांचा सहाध्यायी वर्ग ता० २ जानेवारी रोजीं मुंबईला येऊन पोंचला. सर-कारनें रीतीप्रकारें त्यांना १९ तोफांची सलामी देऊन त्यांचें स्वागत केलें. हा प्रवास कांहीं अंशीं रेल्वेनें व कांहीं अंशीं पायरस्त्यानें करून हा छात्रवर्ग राजकुमार

कॉलेजांत दाखल झाला. या वेळीं या कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. म्याक्नाक्टन् साहेब हे होते. हे स्वभावानें मनमिळाऊ व दयाळु अंत:करणाचे असल्यामुळें, आपल्या छात्रगणांत बरेच प्रिय झाले होते. गोखलेद्वयहि या मुलांचे शिक्षक ह्मणून बरोबर होते. राजकोटला येऊन थोडा काळ लोटतो न लोटतो, तोंच, रीजंट आबासाहेबांचें त्यांच्या वयाच्या तिसाव्या वर्षी ह्मणजे ता० २० मार्च १८८५ रोजीं आकस्मिकपणें देहावसान होऊन या मुलांवर मोठें संकट ओढवलें. आबासाहेबांच्या भयंकर आजाराची खबर लागतांच, महाराज आपल्या सहाध्यायी वर्गासह त्या काळच्या वाहनांचा शक्य तेवढ्या तांतडीनें उपयोग करून कोल्हापुरास यावयास निघाले; परंतु ते कोल्हापुरास पोंचण्यापूर्वी दोन दिवस अगोदर रीजंटसाहेबांचे देहावसान झालें होतें, असें त्यांना आढळून आलें. महाराजांच्या खास मातु:श्री श्रीमंत राधाबाईसाहेब या, यापूर्वींच दिवंगत झाल्या होत्या. आबासाहेबांच्या अकाली मृत्यूचा परिणाम, या मुलांच्या कोंवळ्या मनावर फारच खोल व चिरस्थायी झाला असला पाहिजे. आबासाहेबांच्या अकाली मृत्यूला ज्या गोष्टी कारणीभूत झाल्या त्यांचाहि महाराजांच्या मनावर कायमचा परिणाम झाला. त्यांच्या सर्व आयुष्यभर मद्यपानाविषयीं त्यांच्या मनांत जो पराकाष्टेचा किळस उत्पन्न झालेला दिसून येत होता, त्याचें कारण आबासाहेबांच्या मृत्यूमुळें आपल्या मनावर झालेला परिणाम हेंच होय, असें खुद्द महाराजच ह्मणत असत. महाराज कोणत्याहि बाबतींत अगदींच कडक स्वभावाचे प्युरिटन होते असें नाहीं; परंतु मद्यपानाच्या बाबतींत मात्र ते इतके कडक असत कीं, मद्यप्याला ते आपल्या जवळ केव्हांहि येऊं देत नसत. चिंचली येथें एकदा महाराज, गाडींतून पडून त्यांना जबर दुखापत झाल्यामुळें ते बेशुद्ध झाले. तेव्हां महाराजांना ब्रांडीचा एक घुटका पाजावा असें भोंवतालच्या लोकांचें बोलणें चाललें होतें; परंतु " ब्रांडी " हा शब्द त्यांच्या कानावर पडतांच ते एकदम शुद्धीवर आले व " कांहीं झालें तरी मी दारूला केव्हांहि स्पर्श करणार नाहीं, " असे त्यांच्या तोंडचे पहिले शब्द निघाले.

दुसरी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, महाराजांच्या हातांत संस्थानचीं सूत्रें आल्यानंतर त्यांच्या वडिलांच्या मित्रांना आपली छाप या नूतन छत्रपतीवर ठेवतां येणें अशक्य आहे, असा अनुभव थोड्याच दिवसांत येऊन चुकला ! ज्या खालच्या लोकांत मिळून मिसळून वागण्याची महाराजांची प्रवृत्ति



धारवाड येथें असल्यावेळचे श्री भाऊसिंगजी व छत्रपति शाहुमहाराज.

वाढतच चालली होती, त्यांच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध न ठेवतां प्रतिष्ठित गणलेल्या लोकांचीच संगति महाराजांनीं धरावी असा महाराजांचे गुरुजी मि० कृष्णाजी भिकाजी यांनीं महाराजांना एकदा सल्ला दिला. 'अशा नोकरलोकांची संगत न धरावी तर दुसऱ्या कोणाची संगत धरावी?' असा महाराजांनीं त्यांना प्रश्न केला. "प्रोफेसर मो० सारखे विद्वान् व प्रतिष्ठित पेन्शनर लोक आपल्या संस्थानमध्यें नाहींत काय ? अशा लोकांचीच आपण संगत धरावी," असें त्यांना उत्तर मिळालें. यावर महाराजांनीं शांतपणें प्रत्युत्तर दिलें कीं, "अशा प्रकारच्या लोकांच्या संगतीचें माझ्या वडिलांना काय फळ मिळालें, तें मी पूर्णपणें जाणून आहें. ज्या दुर्गुणानें त्यांच्या अत्युत्तम शरीरसंपत्तीची राखरांगोळी केली त्याचा संपर्कहि मला होऊं न देण्याचा मीं निश्चय केला आहे. मला प्रतिष्ठित लोकांची संगत नको व त्यांचे प्रतिष्ठित दुर्गुणहि नकोत !"

हीं मुलें बारा वर्षांचीं होतात न होतात तोंच निर्घृण काळानें आबासाहेबांवर अकालीं झडप घातल्यामुळें या मुलांवर अनेक रीतीनें दुर्दैव ओढवलें. राजे लोकांना जिवलग मित्रांची केव्हांहि कमतरता नसते, असें वरवर पहाणाऱ्याला वाटण्याचा संभव आहे. अशा प्रकारच्या अल्पवयांतच प्रिय मातापित्यांच्या वियोगामुळें उत्पन्न होणारी उणीव वयस्क नृपतीच्या बाबतींतहि भरून निघणें अशक्य असतें. पुढें कित्येक वर्षांनंतर महाराजांचा अशाच शोचनीय परिस्थितींत असलेल्या, आपल्या नात्याच्या जवळच्या राजकुमारांशीं संबंध आला असतां यांची त्यांना जीं जिव्हाळयाचीं पत्रें गेलीं होतीं तीं वाचलीं असतां, महाराजांना या प्रस्तुतच्या दुःखद प्रसंगीं जी मानसिक व्यथा झाली होती तिची खरी कल्पना होते. त्यांचीं हीं पत्रें या कुमारांच्या हातीं पोंचविण्यास पराकाष्ठेचे प्रयास पडत असत. या अल्पवयस्क महाराजांना त्यांच्या गरजा भागविण्यासाठीं महाराजांनीं लहान लहान रकमा पाठविल्याचे एक दोन प्रसंग दृष्टोत्पत्तीस येतात. उपरिनिर्दिष्ट राजकुमारांना पालक, शिक्षक, मित्रादि परिवाराची कोणत्याहि प्रकारें कमतरता नव्हती, हीहि गोष्ट याबरोबरच लक्षांत ठेविली पाहिजे.

आबासाहेबांच्या मृत्यूमुळें कोल्हापूरसंस्थानचें केवढें नुकसान झालें याची कल्पना आबासाहेबांच्या मृत्यूची बातमी समजतांच लॉर्ड रे यांनीं जो दुखवट्याचा खलिता पाठविला होता त्यावरून होते. या खलित्यांत पुढील मजकूर होता.

" सम्राज्ञीचे हिंदुस्थानचे प्रमुख मंत्री यांची महाराजांना असें कळविण्यास मला अनुज्ञा झाली आहे कीं, रीजंटसाहेबांच्या मृत्यूमुळें कोल्हापूर दरबारचें जें नुकसान झालें आहे, त्याबद्दल सेक्रेटरीसाहेबांना पराकाष्ठेचें दुःख होत आहे. रीजंट-साहेबांविषयीं लॉर्ड किंबरले यांना अतिशय आदर असे. रीजंटसाहेबांच्या अंगच्या गुणांची व त्यांच्या कर्तबगारीची परीक्षा करण्यास जे विशेष समर्थ होते ते रीजंटसाहेबांना किती चहात असत याबद्दल लॉर्ड साहेब हे या दुःखाचे वांटेकरी झाले आहेत, यावरून महाराजांची व कोल्हापूर दरबाराची खात्री होईल असा मला भरंवसा आहे. "

## राजकोट येथील शिक्षणाचा काळ.

राजकोटला असते वेळीं उन्हाळयाचे व हिंवाळयाच्या सुटीचे दिवस मात्र महा-राजांनीं कोल्हापूर व महाबळेश्वर येथें घालविले. बाकी वर्षभर ते कॉलेजांतच होते. नाताळचे आठवडे आपल्या सहचारी मित्रांसह व कॉलेजांतील आपल्या नवीन मित्रगणासह काठेवाडमध्यें निसर्ग शोभा पहाण्यांत त्यांनीं घालविले. राजकोट येथें असते वेळीं महाराजांना नाताळचे जे तीन आठवडे मिळाले होते, त्यांपैकीं एक त्यांनीं जुनागड व पालिठाणा येथील पवित्र डोंगर पाहण्यांत घालविला. पालिठाणा हें तेथील अनेक सुंदर जैनमंदिरांबद्दल प्रसिद्ध आहे. शेवटचा नाताळ महाराजांनीं आपल्या आयुष्यांतील अत्यंत जिवलग मित्र भावनगरचे भाऊसिंगजीमहाराज यांच्या राजधानींत घालविला. याप्रमाणें काठेवाडांतील सुप्रसिद्ध स्थळें पाहण्यांत व आपल्या जन्मभूमीला भेट देण्यांत जो काल गेला तो खेरीज करून १८८९ सालच्या एप्रील महिन्याच्या अखेरी-पर्यंतचा साडेतीन वर्षांचा काळ महाराजांनीं राजकोट येथें झटून अभ्यास करण्यांत घालविला. शाळेचा अभ्यास करून महाराज राजकोट येथें कवाईत, तालीम, घोडयावर बसणें, नेम मारणें इत्यादि मर्दानी खेळहि खेळत असत. महाराजांना बैठकीचे खेळ मुळींच आवड नसत. रविवारच्या दिवशीं घोडयावर बसणें व शिकार करणें हे त्यांच्या आवडीचे खेळ असत. काठेवाडी मुलांना अशा प्रकारचे मर्दानी खेळ अगदींच वावडे होते. ' परंतु कोल्हापूरच्या मुलांनीं, उत्तम शिकारी म्हणून नांवाजलेले मे० बुवासाहेब इंगळे यांच्या नेतृत्वाखालीं, स्वतःच्या उदाहरणानें इतर मुलांना जो धडा घालून दिला त्याचा बराच परिणाम झाला. भावनगरचे महाराज, जामनगरचे महाराज, ध्रांगध्राचे महाराज व आणखी

कांहींजण महाराजांच्या सहवासांत उत्तम शिकारी बनले. कुस्ती खेळणें हा तर महाराजांच्या अगदीं आवडीचा खेळ होता. कुस्ती खेळण्यांत राजकुमारांपैकीं त्यांना कोणीच प्रतिस्पर्धी नव्हता. घोड्यावर बसण्यांतहि त्यांची बरोबरी करूं शकणारा कोणी नव्हता. काठेवाडी राजकुमारांना घोड्यावर बसणें शिकण्याकरितां मास्तर ठेवावा लागत असे. परंतु या मराठ्यांना घोड्यावर बसण्याचें उपजत ज्ञान असल्यामुळें ते या बाबतींत आपल्या इतर सहाध्यायांपेक्षां वरचढच होते; वार्षिक मर्दानी खेळांत ते नेहमीं प्रमुख भाग घेत असत. कॉलेजमध्यें महाराज जरी दर्जानें सर्वांत श्रेष्ठ होते, तरी त्यांचा स्वभाव इतका साधा, मनमिळाऊ व निगर्वी असे कीं, प्रत्येकाशीं ते त्याच्या बरोबरीच्या नात्यानें वागत असत, ह्मणून कोणालाहि त्यांच्याविषयीं परकेपणा वाटत नसे.

हा स्वभाव महाराजांच्याठायीं आमरण कायम राहिला. महाराजांना हें जें वळण लागलें, त्याचें कारण त्यांचा स्वाभाविक साधेपणा हें तरी आहेच, परंतु स्वानुभवाच्या कडक शिक्षकाकडून जे त्यांना पहिले धडे मिळाले तेहि त्या गुणाच्या परिपोषणाला कारणीभूत झाले. सुदैवानें, महाराजांच्या शिक्षणाची जबाबदारी ज्यांच्यावर सोंपविण्यांत आली होती त्यांची, शिस्त (discipline), ज्ञानार्जनाचा पाया होय, अशी पक्की समजूत असून ती राजकुमारांकडून पाळली जावी अशी ते दक्षता ठेवीत. १८८८ सालीं नियमित वेळेपेक्षां एक महिना अगोदर कोल्हापूरला जाण्याची महाराजांना उत्कंठा वाटत होती. महाराजांचे मुख्य शिक्षक मि. कृ. भि. गोखले यांनीं परवानगीसाठीं पोलिटिकल एजंटना एक लांबचलांब पत्र लिहिलें. काठेवाडचें उष्णतेचें मान कोल्हापुरापेक्षां कडक असल्यामुळें मुलांना कोल्हापूरच्या डंगांत शिकार करण्याची इच्छा होणें स्वाभाविक आहे, असाहि दिवाणांनीं खुलासा केला होता. परंतु त्या वेळच्या कडक पोलिटिकल एजंटनें ही " अपूर्व विनंति मंजूर न करितां राजकोटहून मुलांना उचलून थेट महाबळेश्वरच्या ' क्रेग ' वर ठेवण्याचा हुकूम फर्माविला. मात्र त्यांना उत्कंठा लागलेल्या कोल्हापुराला पाठविलें नाहीं. " आपल्या बालपणांत आपणांस कशा प्रकारचें कडक शिक्षण मिळालें होतें, हें महाराज स्वतः वारंवार वर्णन करीत असत. त्या वेळीं कोल्हापूरहून राजकोटला जावयाचें ह्मणजे कांहीं प्रवास घोड्यावर बसून व कांहीं प्रवास टांग्यांत किंवा गाडींत बसून करावा लागे. " गाडीघोड्यांवरून प्रवास करते वेळीं हंटले पामरच्या बिस्कीटच्या डब्यांतील बिस्किटांप्रमाणें

आह्मी एकमेकांस बिलगून बसत असूं. जेव्हां रस्त्यांत एकादें विश्रांतिगृह लागे, तेव्हां डब्यांतील एकमेकाला चिकटून बसलेल्या बिस्किटांतील पहिलें बिस्कीट काढण्यास बरेच सायास व कौशल्य लागे ! " असें एकदां महाराजांनीं आपल्या प्रवासाचें वर्णन केलें होतें. महाराजांचें जनावरांवर अतिशय प्रेम असे. जनावरांना दाणापाणी देण्याच्या कामीं हीं मुलें आपल्या नोकर लोकांना मदत करीत असत. केव्हां केव्हां हीं मुलें स्वयंपाक करण्याच्या बाबतींतहि नोकर लोकांना मदत करीत असत; व कधींकधीं ते स्वयंपाक स्वतःच तयार करीत असत. पुढील आयुष्यांतहि महाराजांना सूपशास्त्र उत्तम प्रकारें अवगत होतें.

महाराजांना कसा अभ्यास करावा लागत असे, याची कल्पना मि० कृष्णाजी भिकाजी यांच्या एका पत्रांतील पुढील उताऱ्यावरून होईल:—

" येथें आल्यापासून महाराज व त्याचा सहाध्यायी वर्ग बरेच परिश्रम घेत आहेत. त्यांना प्रत्येक दिवशीं आठ तासपर्यंत अभ्यास करावा लागतो. कुमारांना वार्षिक बक्षिस समारंभाच्या दिवशीं मि. मॉकाटन यांनीं केलेल्या भाषणावरून महाराजांची व त्यांच्या सहाध्यायांची परीक्षकांनीं विशेष शिफारस केली आहे, हें आपणांस समजलें असेलच. "

महाराजांचें राजकोट—कॉलेजांत शिक्षण चाललें असतां त्यांनीं कोल्हापूरला ज्या प्रासंगिक भेटी दिल्या त्यांचा उपयोग विविध प्रकारचे समारंभ करण्याकडे झाला. याच्यायोगानें महाराजांनाहि संस्थानच्या कामकाजाची थोडीबहुत माहिती झाली. १८८७ सालीं जो ज्युबिली उत्सव झाला त्यांत महाराजांनीं मोठ्या आनंदानें भाग घेतला होता. त्या वेळचे हिंदुस्थानचे व्हाइसरॉयसाहेब लॉर्ड डफरीन यांच्या खलित्याला उत्तर ह्मणून महाराजांनीं जो एक खलिता पाठविला होता त्यावरून महाराजांची निःसीम सम्राटभक्ति स्पष्ट होते. ती व्यक्त करण्याचा महाराजांचा हा पहिलाच प्रसंग असून पुढेंहि ती एकसारखी वाढतच गेली. या खलित्यांत महाराज ह्मणतातः—

" माझे वडील कोल्हापूरचे माजी रीजंटसाहेब यांच्या सम्राज्ञीविषयीं ज्या प्रेमभावना होत्या, त्या ते इंग्लंडला गेल्यावर द्विगुणित झाल्या. त्यांना महाराज्ञीची दुर्मीळ अशी मुलाखत मिळून त्यांचा बहुमान झाला. माझ्या वडिलांच्या पाऊलावर पाऊल ठेवून वागण्याचा व कोल्हापूरसंस्थान आणि महाराज्ञी

यांच्यामध्यें जीं प्रेमबंधनें आहेत, तीं तशींच अविच्छिन्न राखण्याचा माझा निर्धार आहे, असें मी आपणांला आश्वासन देतों. " यापूर्वींच नोव्हेंबर महिन्यांत जेव्हां व्हाइसरॉयसाहेब मुंबई बंदरांत दाखल झाले, तेव्हां त्यांनीं महाराजांना मुलाखत दिलेली होती. लॉर्ड डफरीन यांना व त्यांच्यामागून आलेल्या व्हाइसरॉयांना, महाराजांनीं आपले वरील शब्द अक्षरशः खरे केल्याचें पाहून समाधान झालें असेल.

१८८६ सालच्या पावसाळ्यांत महाराजांना वरचेवर ज्वराची बाधा होत असल्यामुळें त्यांच्या अभ्यासक्रमांत बराच व्यत्यय आला. तरी देखील, त्या सालच्या महाराजांच्या परीक्षेचा जो अहवाल त्यांच्या शिक्षकानें पाठविला, तो बराच समाधानकारक होता. या वर्षी त्यांनीं प्रत्येक विषयांत $\frac{1}{3}$ पेक्षां अधिक गुण मिळविले असून, एकंदर विषयांतील गुणांमध्यें त्यांनीं मिळविलेल्या गुणांचें प्रमाण शेंकडा ६० पेक्षांहि अधिक होतें.

महाराजांच्या हातचें पहिलें सार्वजनिक स्वरूपाचें कार्य ह्मटलें ह्मणजे गुरुवार ता० ३ मे १८८८ रोजीं कोल्हापूर स्टेट रेल्वेच्या बांधकामाचा प्रारंभविधि हें होय. पुणें ते बेळगांवपर्यंत एम्. एस्. एम्. ची लाईन होण्यापूर्वीं सातारा व कोल्हापूर मुख्य लाईनवर घालून पुढें कोल्हापूर ते मिरजपर्यंत एक फांटा काढण्याची एक योजना तयार करण्यांत आली होती. ही योजना जर अमलांत आली असती तर व्यापाराच्या दृष्टीनें कोल्हापूर हें महत्वाचें ठिकाण होऊन संस्थानला स्टेट रेल्वे बांधून जो खर्च आला त्यापेक्षां बराच कमी खर्च आला असता. परंतु यापेक्षां अधिक अदूरदर्शीपणाची सल्ला अमलांत येऊन पुणें ते मिरजपर्यंत परभारें रेल्वेलाईन बांधण्यांत आली; व ती सुरू झाल्यानंतर कोल्हापूरसंस्थानला मिरजेपर्यंत स्वतःची रेल्वे करावी लागली. या प्रसंगीं महाराजांना पहिलेंच अल्पसें भाषण करण्यास संधि मिळाली. या भाषणांत ते कल्पनातीत मोकळ्या मनानें ह्मणाले कीं, " मीं बोलावें ह्मणून जे मला थोडे शब्द सुचविण्यांत आले आहेत, त्यापेक्षां जास्त कांहीं माझ्यापासून तुह्मीं अपेक्षा करूं नये. "

१८८९ सालच्या प्रारंभीं, महाराजांनीं धारवाडास जाऊन मि. ( नंतर सर ) एस्. एम्. फ्रेजर, आय्. सी. एस्. यांच्या देखरेखीखालीं आपला अभ्यासक्रम पुरा करावा असें ठरलें. या गृहस्थाची महाराजांचे शिक्षक ह्मणून योजना झाली, ही गोष्ट महाराजांच्या आयुष्यांतील अत्यंत सुदैवाच्या प्रसंगांपैकीं एक होय. ही योजना महाराजांचे प्रेमळ स्नेही मि. लीवॉर्नर यांच्या दूरदर्शित्वामुळेंच कर-

ण्यांत आल्यानें त्यांचे आभार मानणें अवश्य आहे. मि. लीवॉर्नर हे महाराजांच्या व त्यांच्या बंधूंच्या कल्याणासाठीं पराकाष्ठेची काळजी वहात असत. महाराज, बापूसाहेब व भाऊसिंगजी या त्रयीचे पालक ह्मणून मि. फ्रेजर यांची नेमणूक झाली, ही गोष्ट महाराजांना विदित करण्यासाठीं ता० ४ मार्च १८८९ रोजीं मुंबईहून महाराजांना जें पत्र त्यांनीं पाठविलें त्यांत ते ह्मणतात:—" पूर्ण विश्रांति घेण्यासाठीं मी एक वर्षाची रजा घेऊन हिंदुस्थान सोडीत आहें; ह्मणून आपले व आपल्या सहाध्यायी वर्गाचें अभीष्ट चिंतण्यासाठीं मी आज हें पत्र लिहीत आहें. ज्या अधिकाऱ्यांची तुमचे करितां आतां नेमणूक होणार आहे, ते गृहस्थ प्रेमळ आहेत. या गृहस्थांच्या दक्षतेचा व मित्रत्वाचा फायदा जर माझ्या मुलांना प्राप्त होईल तरें मी आनंदच मानीन. नेक नामदार गव्हर्नरसाहेबांकडे आपल्या शिक्षकाच्या जागेसाठीं त्यांची शिफारस करतांना माझे मित्र, जे आपले वडील, यांच्या काय इच्छा होत्या त्या मीं पूर्णपणें लक्षांत ठेविल्या होत्या; नेक नामदार गव्हर्नरसाहेबांनीं ही योजना पसंत केली आहे. आपल्या वडिलांप्रमाणेंच आपणहि ( महाराज ) आपल्या खासगी व सार्वजनिक आयुष्यक्रमांत दयार्द्र अंतःकरणाचे, न्यायी व प्रतिष्ठित असे निपजून प्रजाप्रिय व्हाल असा मला भरंवसा आहे. आपल्या जबाबदाऱ्या केव्हांहि मोठ्याच असणार. परमेश्वरानें त्या यशस्वी रीतीनें पार पाडण्यासाठीं आपणांस आरोग्य व अभीष्ट द्यावें, अशी मी त्याची प्रार्थना करितों." मि० लीवॉर्नर यांनीं मि० फ्रेजर यांच्याविषयीं जो अभिप्राय दिला होता, तो अक्षरशः खरा होता, असें पुढें अनुभवास आलें. मि० फ्रेजर यांच्या महाराजांविषयींच्या कळकळीचा व मित्रत्वाचा उपयोग महाराज अल्पवयी असतांनाच झाला असें नसून महाराजांच्या ऐहिक यात्रेची समाप्ति होईपर्यंतहि त्याचा चांगलाच उपयोग झाला.



# प्रकरण ४ थें.

# धारवाड येथील अध्ययनाचा काळ.





जकोट येथील हवा महाराजांच्या प्रकृतीला मानवत नसल्यामुळें मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें महाराजांना धारवाडला पाठविण्याचा निश्चय झाला असावा. हें स्थलांतर त्यांना सर्व प्रकारें हितावह असेंच झालें. महाराजांना यासंबंधीं आपले विचार जरी त्या वेळीं उघडपणें दर्शवितां येत नव्हते, तरी त्यांनाहि हें स्थलांतर अतिशय आवडलें असलें पाहिजे, असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. पुढें बऱ्याच वर्षांनंतर जेव्हां महाराजांना आपलीं मुलें राजकोटला शिक्षणाप्रीत्यर्थ पाठविण्याविषयीं विनंति करण्यांत आली, तेव्हां त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:--

" राजकोट येथील राजकुमारकॉलेजमध्यें राजकुमारांना कशाप्रकारें शिकविलें जातें हें महाराजांना स्वानुभवानें माहीत आहे. या संस्थेला नांवें ठेवण्याची महाराजांची इच्छा नाहीं; परंतु या संस्थेंत आपलीं मुलें पाठविण्याची त्यांची मुळींच तयारी नाहीं. "

काठेवाडच्या हवेविषयीं किंवा राजकुमारकॉलेजांतील व्यवस्थेविषयीं महाराजांच्याठायीं विशेष आदर दिसून येत नव्हता. वरील अभिप्राय देते वेळीं महाराजांनीं, आपण राजकुमारकॉलेज सोडल्यानंतर त्या कॉलेजांत ज्या सुधारणा झाल्या, त्या कदाचित् लक्षांत घेतल्या नसतील. कांहीं असो, जरी आपल्या प्रजाजनांच्या अगदीं सान्निध्यांत नसलें तरी आपल्या जन्मभूमीच्या अगदीं शेजारीं आपल्या उमेदवारीचा राहिलेला काळ घालविण्यांत त्यांना या वेळीं मोठा आनंद झाला असला पाहिजे. जेव्हां महाराजांना पुढें राजकुमारांच्या शिक्षणाची चर्चा करण्याचा प्रसंग आला, तेव्हां राजकुमारांना त्यांच्या भावी प्रजाजनांच्या सान्निध्यांतच ठेवण्याचा त्यांनीं आग्रह धरला. महाराज एका ठिकाणीं ह्मणतात:- " युवराजांचें संगोपन त्यांच्या भावी प्रजाजनांच्या सान्निध्यांतच होणें अत्यंत महत्वाचें आहे;

ह्मणून केवळ राजकुमारांना त्यांच्या संस्थानाबाहेर, युरोपियन पालकांच्या देखरेखेखालीं त्यांची काळजी घेण्यासाठीं एकादा स्थानिक मनुष्य असल्याशिवाय कधींहि ठेवण्यांत येऊं नये." स्वतःच्या बाबतींत स्थानिक मनुष्यांच्या उणीवेबद्दल महाराजांना कुरकुर करण्यास मुळींच जागा नव्हती. मात्र आपण अल्पवयस्क असलेवेळीं आपल्या संस्थानापासून लांब अंतरावर राहणें, महाराजांना बिलकुल पसंत नव्हतें, असें वरील अभिप्रायावरून उघड होतें. राजकोटहून धारवाडला स्थलांतर झाल्याचें पाहून महाराजांना अतिशय आनंद झाला असला पाहिजे, असें अनुमान केलें तर तें चुकीचें होण्याचा संभव नाहीं.

धारवाडला जवळ जवळ चार वर्षे राहून मि. फ्रेजर यांच्या देखरेखीखालीं महाराजांचा अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर कोल्हापूरमध्यें महाराजांना जें उच्चासन मंडित करावयाचें होतें त्यासंबंधीं आपलीं कर्तव्यें करण्यास ते योग्य झाले. प्रत्येक नियतकालाच्या शेवटीं महाराजांच्या व त्यांच्या सहाध्यायांच्या प्रगतीविषयीं जे अहवाल शिक्षकांकडून सादर करण्यांत येत त्यांवरून महाराजांना जें उत्कृष्ट शिक्षण दिलें जात होतें, त्याची चांगलीच कल्पना येते. पूर्वींप्रमाणेंच या छात्रवर्गांत हे बंधुद्वय ( महाराज व बापूसाहेब ), कागलचे ( लहान पाती ) बाळासाहेब ऊर्फ काकासाहेब व दत्ताजीराव इंगळे यांचा समावेश झाला होता. भावनगरचे राजकुमार जरी या छात्रगणापैकीं नव्हते, तरी तेहि मि. फ्रेजर यांच्या सहवासांतच रहात असून त्यांची व कोल्हापूरराजकुमारांची धारवाड येथें चांगलीच मैत्री जडली. या कुटुंबानें ( मि. फ्रेजर हे या छात्रवर्गाला या नांवानें संबोधित असत ) धारवाड येथील बहुतेक काळ अध्ययन करण्यांत किंवा हिंदुस्थानाच्या सर्व भागांत आल्हाददायक पर्यटणें करण्यांत एकत्र घालविला.

१८८९ सालच्या आक्टोबर महिन्याच्या त्यांच्या प्रगतीच्या पहिल्या अहवालांत पुढील मजकूर आहे.

" दत्ताजीराव इंगळयानें पहिला नंबर सहज पटकाविला आहे. त्याच्या प्रगतीचें मासिक पत्रक ठेवण्यांत न आल्यामुळें त्याच्याविषयीं दोन शब्द विशेष लिहावे असें मला वाटतें. हा मुलगा हुशार, चाणाक्ष असून तो इतरांना सर्व विषयांत सहज मागें टाकतो.

" बाकीचे तिघेजण-महाराज, बापूसाहेब व बाळासाहेब—यांची प्रगति जवळ जवळ सारखीच आहे. परंतु बाळासाहेब हा विचारपूर्वक काम करणारा असून

विशेष परिश्रम घेतो. याचा दुसरा नंबर लावण्यास हरकत नाहीं. बापूसाहेबानें महाराजांना मागें टाकिलें आहे. बापूसाहेबानें या टर्मच्या प्रारंभींच विशेष प्रगति केली. परंतु गेल्या पांच आठवड्यांत महाराजांनीं बापूसाहेबाला मागें टाकिलें असून इतरांच्या मानानें बापूसाहेबाची प्रगति मंदगतीनें होत आहे. बापूसाहेब दिवसानुदिवस शिळा होत चालला आहे, असा अभिप्राय रजिष्टरांत दाखल करणें मला भाग पडलें आहे. ''

१८९० सालच्या एप्रिल महिन्याच्या ११ व्या तारखेचा अहवाल बराच व्यापक व मनोरंजक असा आहे. यांतील पुढील कांहीं उताऱ्यांवरून महाराजांच्या प्रगतीविषयीं चांगलीच कल्पना होईल:—

" १८८९ सालच्या मे महिन्याच्या २२ व्या तारखेस मी कोल्हापूर येथें कामावर रुजू झालों, या वेळीं महाराज व त्यांचे संवगडी कोल्हापुरासच होते. धारवाड येथें ता. ११ जून रोजीं अभ्यासास प्रारंभ झाला. तेथें राहण्यासंबंधीं जरूर ती व्यवस्था करण्यासाठीं मी एकटाच कांहीं दिवस अगोदर गेलों होतों. धारवाडला बंगल्यांचा तुटवडा असल्यामुळें पावसाळा इतका समीप आला असतांना सोईस्कर अशी व्यवस्था करून घेणें अशक्य होतें; ह्मणून आह्मांस किल्ल्यांतील साधारण प्रतीच्या घरांतच राहणें भाग पडलें. किल्ला हा धारवाड येथील ठाण्यापैकीं अगदींच कुचकामाचा भाग आहे. तेथें कोल्हापूरचे कुमार एका बंगल्यांत राहिले व भाऊसिंगजी व त्यांचे संवगडी दुसऱ्या बंगल्यांत राहिले. दुसऱ्या टर्मला अधिक हवेशीर भागांतील आणखीं घरें घेण्यांत आलीं. हीं बऱ्याच लांब अंतरावर असल्यामुळें जरी सोईस्कर नव्हतीं, तरी तीं कशींबशीं चालण्यासारखीं होतीं. पुढील वर्षाच्या जून महिन्यापासून कोल्हापूरचे व भावनगरचे कुमार माझ्या बंगल्याशेजारीं एकमेकांपासून जवळ अंतरावर असलेल्या नवीन बंगल्यांत राहतील. तेथेंच आह्मीं आमची धारवाड येथें राहण्याची मुदत संपेतोंपर्यंत राहूं. बहुतेक घोड्यांची व नोकरलोकांची राहण्याची सोय शहरांतील भाड्याच्या "उतारा" मध्यें केली आहे.

" हिवाळ्यांतील सुटीचे दिवस महाराजांनीं कोल्हापुरांत घालविले. तेथें भाऊसिंगजीनेंहि त्यांचा पाहुणा ह्मणून तीन आठवडे काढिले. नेक नामदार प्रिन्स आलबर्ट व्हिक्टर यांचें, पुणें येथें कुमारांना दर्शन घेतां यावें ह्मणून सुटीची मुदत एका पंधरवड्यानें वाढविण्यांत आली. प्रिन्सच्या सन्मानार्थ जे उत्सव झाले

त्या सर्वांना आपणांस हजर राहतां आलें ह्मणून कुमारांना अत्यंत आनंद झाला. दरबारांत महाराजांचें रीतसर स्वागत होऊन त्यांचा गौरव करण्यांत आला. अशा प्रकारचा बहुमान फक्त याच संस्थानिकांचा झाला. दुसऱ्या टर्ममध्यें एक आठवडा (५ ते ११ फेब्रुवारी) सर्वांनीं, कोल्हापूर व दक्षिण महाराष्ट्रांतील जनावरांच्या व घोडयांच्या वार्षिक संमेलनाच्या वेळीं चिंचली येथें घालविला. हे प्रसंग खेरीज करून बाकीची टर्म, उन्हाळयाच्या सुटीनिमित्त भाऊसिंगजी भावनगरला व कोल्हापूरचे कुमार कोल्हापुराला निघून जाईपर्यंत धारवाडांतच घालविण्यांत आली.

" राजकुमार-कॉलेजांत असते वेळींच सर्व मुलांच्या एकमेकाशीं ओळखी झाल्या होत्या ही सुदैवाची गोष्ट होय. ( हें कॉलेज त्यांनीं १८८९ सालच्या एप्रिल अखेर सोडलें ) तेथें ते समरुचित्वामुळें एकमेकांचे जिवलग स्नेही झाले. ह्मणून घोड्यावर बसणें, शर्यत खेळणें व वहानांत बसून हिंडणें फिरणें इत्यादि दैनिक करमणूकीचे खेळ ते मिळूनच खेळतात. कुमारांना विशेषतः घोडयावर बसण्याचा फार शोक आहे. घोडयावर बसून रपेट करण्याच्या कामीं धारवाडच्या आसपासचा प्रदेश बराच सोयीचा आहे.

" धारवाड येथील दिनक्रम पुढीलप्रमाणें आहेः—

कुमार सकाळीं ६-३० ला उठून बुवासाहेब इंगळे यांच्याबरोबर ( व मीहि बहुतकरून त्यांच्या बरोबर जातों. ) घोडयावर बसून रपेट करण्याकरितां, सहल करण्याकरितां किंवा नेम मारण्याकरितां जातात. शाळा सकाळीं दहा ते दोन प्रहरीं एक वाजेपर्यंत चालून पुनः दोन प्रहरीं दोन ते संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत भरते. यानंतर एक अर्धा तास त्यांना कवाईत शिकविण्यांत येते. नंतर ते टेनिस खेळणें, वाहनारूढ होणें किंवा सहल करणें यांपैकीं कोणतें तरी करितात. संध्याकाळीं एका तज्ञाच्या देखरेखेखालीं ते दांडपट्टा व तालीम करितात. संध्याकाळचें जेवण झाल्यानंतर ते दुसऱ्या दिवसाचे धडे तयार करितात. सुटीच्या वेळेकरितां कांहीं ठराविक कार्यक्रम आंखलेला नसतो. मात्र सकाळपासून रात्र होईतोंपर्यंत त्यांचा प्रत्येक तास कामांत किंवा कोणत्या तरी प्रकारचे खेळ खेळण्यांत जातो. अशा प्रकारें त्यांचा प्रत्येक तास बांधला गेला असल्यामुळें, रिकाम्या वेळेंत चावटपणा करण्याकडे मुलांची जी साहजिक प्रवृत्ति असते तिला

बिलकूल अवकाश मिळत नाहीं. रविवारचे व इतर सुटीचे दिवस ते बहुधा लांब अंतरावरच्या शिकारी करण्यांत घालवितात. अशा प्रसंगीं मी यांना निःशंकपणें बुवासाहेब इंगळयांच्या हवालीं करितों. बुवासाहेब इंगळे हे पहिल्या प्रतीचे शिकारी असून साधेपणाचे ते एक मूर्तिमंत उदाहरण आहेत.

" महाराज जरी अभ्यासांत अजून मागेंच पडले आहेत, तरी त्यांचें एका वर्गाचें काम समाधानकारक असें झालें असून त्यांची प्रगति एकसारखी व जलद होत आहे. ते कुशाग्रबुद्धीचे नाहींत; परंतु त्यांना व्यवहारज्ञान फार चांगलें आहे व त्यांची स्मरणशक्तिहि फार चांगली आहे. शिवाय शिक्षणसंपादण्याची त्यांना मनापासून काळजी असून तें लक्षपूर्वक परिश्रम घेतात. आतां सर्वजण नुकतेंच शिकत असलेल्या **प्राथमिक अर्थशास्त्रांत** महाराजांचें व्यवहारज्ञान विशेषें-करून प्रत्ययास येतें. या विषयांत ते इतरापेक्षां हुशार आहेत. त्यांची इंग्रजी भाषेंत संभाषण करण्याची शैली बरीच सुधारली असून ते आतां सहज व अचूक संभाषण करूं शकतात. जसजसा त्यांचा भिडस्तपणा मोडत जाईल तसतशी त्यांची या बाबतींत एक सारखी प्रगतिच होत जाईल. परक्या लोकांसमोर या भिडस्तपणामुळें, त्यांना आपल्या अंगची हुशारी दाखवितां येत नाहीं. त्यांच्या कामांतील मुख्य दोष ह्मटले ह्मणजे निष्काळजीपणा व टापटिपीचा अभाव हे होत. हे दोष विशेषेंकरून त्यांच्या शुद्धलेखनांत, हस्ताक्षरांत व वाक्यरचनेंत दिसून येतात. स्वभावाच्या बाबतींत पाहिलें तर आकृतीच्या मानानें ते अगदींच अल्पवयाचे असून निरोगी मनाचे, उघडया दिलाचे, उदार व सच्छील असे आहेत. त्यांना अहंपणाचा वारा देखील नाहीं. त्यांच्या विचारीपणाचीं व निःस्वार्थीपणाचीं पुष्कळ उदाहरणें मीं पाहिलीं आहेत; त्यावरून महाराज दिसतात त्याप्रमाणेंच खरोखर सुस्वभावी आहेत हें उघड आहे.

" महाराज बरेच धिप्पाड आहेत. त्यांची उंची पांच फूट नऊ इंच असून त्यांचें वजन चौदा स्टोन एक पौंड आहे. त्यांची आकृति भव्य असून त्यांच्या शरीराची ठेवण चांगली आहे. परंतु त्यांच्या परंपरागत वातप्रवृत्ती-मुळें एक नवीन काळजीचें कारण उत्पन्न झालें आहे. मिताहार व भरपूर व्यायाम करून व त्याचप्रमाणें आपल्या वजनावर एक सारखी नजर ठेवून महा-राजांनीं आपलें वजन गेल्या आक्टोबरपासून वाढूं दिलें नाहीं, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. राजकोट येथें असतें वेळीं महाराजांचें वजन केव्हां

केव्हां एकाएकीं वाढत असें, असें मला सांगण्यांत येतें. परंतु हे प्रकार येथें उद्भवले नाहींत. फाजील धष्टपुष्टपणा हेंच त्यांचें निःसंशय कारण असावें. त्यांच्या वागणुकींत पाणीदारपणाचा अभाव हा दोष अद्याप दिसून येतो. या दोषाच्या जोडीला युरोपीयन लोकांशीं वागण्यांत दिसून येणारा त्यांचा भिडस्तपणा हा दुसरा दोष आहे. त्यांना त्यांच्या पुष्कळशा मित्रांची सोबत असल्यामुळें युरोपियन लोकांशीं दळणवळण ठेवण्याची त्यांच्या मनाची विशेष प्रवृत्ति नसावी असें मला वाटतें. हा या व्यवस्थेंत अपरिहार्य असा दोष आहे. आरोग्य-दृष्ट्या गेल्या वर्षांत त्यांची बरीच प्रगति झाली आहे. आतां ते घोड्यावर बसण्यांत पटाईत झाले असून, चिंचली येथें त्यांना कित्येक युरोपीयन प्रतिस्पर्धी असतांनाहि त्यांनीं भाला मारण्यांतलें पहिलें बक्षिस पटकावलें हें येथें नमूद करण्या-सारखें आहे. टेनिस खेळण्यांत ते अतिशय गबाळे आहेत; परंतु ते चांगल्या-प्रकारें नेम मारणारे असून, चार घोड्यांचा रथ हांकण्यास व एकामागून एक असे चार घोडे लावून ते चालविण्यास, पोहण्यास व थोडेंबहूत वल्हविण्यासहि शिकले आहेत. ''

१८९० सालच्या आक्टोबर महिन्याच्या अहवालावरून आमचे महाराज आपल्या बहुतेक संवगड्यांच्या अद्याप मागेंच पडले आहेत असें दिसून येतें. त्यांच्या सहाध्यायांमध्यें महाराजांचा सर्वांत खालचा नंबर लागल्याविषयीं अहवा-लांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे. " महाराज घोड्यावरून पडून त्यांना लिहितां न आल्यामुळें महाराजांचे कांहीं मार्क कमी झाले; याविषयीं मीं त्याच वेळीं लिहिलें आहे. त्यांचा हात शाबूत असतांना देखील त्यांनीं बापूसाहेबाला क्वचितच् मागें टाकलें होतें. बापूसाहेबाचा नंबर यथायोग्यच आहे. बापूसाहेबानें एकसारखी व चांगली मेहेनत केली. महाराज आपल्या धाकट्या बंधूला कायमचे मागें टाकतील अशी जी गेल्या टर्मला आशा वाटत होती, ती नाहींशीं होऊन माझी नाउमेद झाली हें कबूल करणें मला भाग आहे. महाराज आळशी नाहींत; परंतु त्यांच्या सर्व कामांतील दोष गबाळेपणा हा तसाच चालू आहे. हा दोष अंकगणितांत अगदींच अक्षम्य होतो.

"महाराज घोड्यावरून पडून त्यांचा उजवा खांदा दुखावल्यामुळें त्यांना सहा आठवडे आपल्या हाताचा उपयोग करितां आला नाहीं. हा प्रसंग खेरीज करून, या छात्रगणाचें प्रकृतिमान उत्कृष्ट राहिलें. नेहमींचे खेळ खेळून, ते ठाण्यां-

तील शिकारी कुत्रे बरोबर घेऊन नियमितपणें शिकार करीत असत. नवीन बिलिअर्ड टेबल त्यांना फारच आवडलें."

"१८९० सालची हिंवाळयांतील टर्म ता. १५ मार्चला पुरी झाल्यावर कोल्हापूरला एक महिनाभर राहून, महाराज, त्यांचे बंधु व त्यांचे इतर सोबती, राहिलेली सुटी घालविण्यासाठीं महाबळेश्वरला गेले. पूर्वीप्रमाणें ते तेथील "क्रेग" बंगल्यांत जाऊन राहिले. हा बंगला कागल संस्थानचा आहे. यांना भावनगरहून भाऊसिंगजी व काळुबा हे तेथें येऊन ता० १ मेला मिळाल्यानंतर टर्मला सुरवात झाली. नेहमींप्रमाणें या महिन्याअखेरपर्यंत काम चालून नंतर आह्मी परत धारवाडला आलों. आक्टोबर महिन्याच्या पंधरा तारखेला हिंवाळयांतील सुटीला प्रारंभ होऊन, महाराज टेंबलाईच्या यात्रेकरितां व दसरा–दिवाळीच्या सणानिमित्त, कोल्हापूरला गेले; अशा प्रसंगीं महाराजांनीं हजर राहणें हें राज्यांच्या व प्रजाजनांच्या दृष्टीनें महत्त्वाचें समजलें जातें."

या अहवालानंतर हिंवाळयाच्या सुटीचे दिवस आले; ते देशपर्यटनांत घालविण्यांत आले. अशा प्रकारचीं जीं पर्यटनें झालीं त्यांच्यायोगानें महाराजांच्या शिक्षणांत चांगलीच भर पडली असली पाहिजे. महाराजांचीं तीन पर्यटनें—दोन उत्तर हिंदुस्थानांत व एक दक्षिण हिंदुस्थानांत–झालीं. त्यांचें सविस्तर वर्णन मि० फ्रेजरसाहेबांनीं "Three tours in India and Ceylon" ( हिंदुस्थान व सीलोनमधील तीन पर्यटनें ) या नांवच्या आपल्या एका सुंदर लहानशा ग्रंथांत केलें आहे. खासगी रीतीनें या ग्रंथाचा प्रसार करण्यासाठींच हा ग्रंथ छापलेला होता. ता० १६ नोव्हेंबर रोजीं या पर्यटनाला सुरवात होऊन महाराज कोल्हापूरहून निघून दुसऱ्या दिवशीं कल्याणला आपले मित्र भाऊसिंगजी यांना मिळाले. या सर्वांनीं आपला पहिला मुक्काम नाशीक क्षेत्रांत केला. येथें महाराजांना आपल्या दर्जाच्या मनुष्याला एकाद्या पवित्र क्षेत्रांत कसा त्रास होतो, याचा पहिला अनुभव आला. त्यांच्या बंगल्याच्या आवारांत बुभुक्षित भिक्षुकांचा जणूं गराडाच पडला होता. भटजींच्या सुळसुळाटाबद्दल नाशीकची प्रसिद्धीच आहे. ओट्यावर त्यांना चढूं न देण्याबद्दल कडक उपाय योजावे लागले. महाराजांच्या तेथील कुलोपाध्यायानें महाराजांच्या कँपांतील रावापासून रंकापर्यंतचे लोक शोधून काढून त्यांचीं नांवें आपल्या वहींत सामील केलीं. महाराजांच्या सहीचा आपणांस बहुमान ( व फायदा ) मिळावा

ह्मणून दोन प्रतिस्पर्ध्यांमध्यें एकदां तंटा लागला. दोघांचीहि आह्मांस जरूरी नाहीं असें सांगून हा तंटा मिटवावा लागला. ता २० रोजीं जबलपूर गांठल्या-नंतर तेथें नर्मदेच्या कांठच्या प्रदेशांत चांदण्या रात्रीं सहल करण्यांत आली. यानंतर अलाहाबाद आलें. तेथेंहि भटांनीं महाराजांवर स्टेशनवरच झडप घालून ते आपल्या " रेवाकोठी " बंगल्याला पोंचतात न पोंचतात तोंच त्यांना संगमाला नेलें. किल्ला पहाण्याकरितां " आह्मी गेलों असतांना एका भुयारांतून अक्षय्य वृक्षाला जाऊन पोंचलों. हा अक्षय्य वृक्ष ह्मटला ह्मणजे अंजिराच्या झाडाच्या फांद्या व मुळें नसलेला असा एक बुंधा असून तो दगडांत रोंवलेला आहे. या वृक्षाला पानें येत असून तो चिरकाल टिकणारा आहे, असा लोकभ्रम आहे. परंतु जेव्हां आह्मीं हा वृक्ष, पाहिला तेव्हां त्याच्यावर एक पान देखील नसून तो वृक्ष दिसत होता त्याप्रमाणेंच मृतप्राय असावा. " ता० २३ रोजीं हे कुमार सुप्रसिद्ध काशी-क्षेत्रास जाऊन पोंचले. काशींतील विविध क्षेत्रांचें दर्शन घेत असतां महाराजांना त्यांच्या उपाध्यायाच्या हुकमतीखालीं गंगेंत अनेकदां स्नान करावें लागलें. परंतु हाच प्रकार " सर्वांत अतिशय घाणेरडें व सर्वांत अतिशय पवित्र " अशा मणिकर्ण-कुंडांत करण्यास जेव्हां महाराजांना विनंति करण्यांत आली, तेव्हां त्यांनीं तसें करण्याचें साफ नाकारिलें. " या कृत्यामुळें महाराजांचा धार्मिक वाटाड्या जो उपाध्याय त्याच्या मनास जबरदस्त धक्का बसला असावा असें मला वाटतें. "

" ता. २७ रोजीं राजकुमार कलकत्त्याला जाऊन पोंचले. कलकत्त्याला कुमार पोंचतात न पोंचतात तोंच ते, तेथील परिस्थितीची मुंबईशीं तुलना करूं लागले. त्यांच्या मतें कलकत्त्याला अनुकूल अशी पहिली गोष्ट ह्मटली ह्मणजे तेथील हवा ही होय. आह्मी कलकत्त्याला असते वेळीं तेथील हवा अतिशय आल्हादकारक अशी होती. तेथील प्राणीसंग्रहालय, इतर बागबगीचे व सुंदर आणि विस्तीर्ण मैदान यांची तुलना मुंबई येथील शुष्क एस्प्लेनेडशीं केली असतां ती कलकत्त्याला अनुकूल अशीच ठरली. परंतु आमच्या भागांतील सार्वजनिक इमारती एक एकट्या घेतल्या तर त्या या ' प्रासाद—नगराच्या ' ह्मणजे कलकत्त्याच्या इमारतींहून अधिक सुंदर आहेत असें सर्वांचें एकमत पडलें. रस्त्यांतील घोडे जरी बहुधा चांगले असत तरी ट्रॅमगाड्या व ट्रॅमचे घोडे मात्र मुंबईपेक्षां खराब होते हें महा-राजांच्या तत्काल लक्षांत आलें. लहान सहान पुष्कळ गोष्टींकडे कुमार तुलनात्मक

व टीकात्मक दृष्टीनें पहात होते हें पाहून मला आनंद झाला. कलकत्त्याला असते वेळीं कुमारांनीं मध्येंच दार्जिलिंगला जाऊन, कांचनगंगेचा अत्यंत उंचीचा व बर्फाच्छादित भाग पाहिला. दार्जिलिंगला जात असतां, चहाची लागवड करणाऱ्या एका वृद्ध गृहस्थानें ' बोटींत एक राजा आहे ' असें मि० फ्रेजर यांच्या कानांत सांगितलें व राजा ह्मणून, आपल्या अंगाभोंवतीं डोक्यापर्यंत शाली गुंडाळून घेऊन बसलेल्या एका गृहस्थाकडे बोट केलें. हा गृहस्थ दुसरा कोणी नसून, दम्याच्या विकारामुळें खोकत बसलेले मि० गोखले हे होत !

दुसऱ्या एका प्रसंगीं अशाच एका अनोळखी गृहस्थानें महाराज कोण हें फ्रेजरसाहेबांना दाखविलें. दाखविलेले गृहस्थ महाराजच होते. मात्र बाकीची त्यांच्या बरोबरची मित्रमंडळी ह्मणजे महाराजांचीं मुलेंच होत, असें त्यानें सांगितलें व हंसतां हंसतां फ्रेजरसाहेबांचीं मुरकुंडी वळविली !

लखनौ येथें दोन दिवस घालवून ते ता. १२ रोजीं आग्र्याला आले. हीं मुलें सोळा वर्षांचीं असल्यामुळें तीं बांधकामाचीं विशेष चहातीं असण्याचा संभव नसूनहि — निदान महाराज तरी अशा बाबतींत विशेष लक्ष कधींच घालीत नसत—महाराज व इतर कुमार ताजमहाल पहाण्यांत बरेच गुंग झाले होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं महात्मा अकबरचें प्राचीन निवासस्थान—फत्तेपूर शिक्री—हें पहाण्यासाठीं सर्वजण गाडींतून गेले.

" थंडी जबर पडल्यामुळें, सबंध दिवसभर आमचे ओव्हरकोट आह्मांला आरामदायकच केवळ नव्हे तर अत्यंत आवश्यक असे वाटले. या लांबच्या प्रवासाचा आह्मांस योग्य मोबदला मिळाला. अकबरच्या अत्यंत काळजीपूर्वक राखून ठेवलेल्या राजवाड्याला जें एकप्रकारचें विशिष्ट मनोहरत्व आहे तें आह्मीं पाहिलेल्या इतर राजवाड्यांत नव्हतें. हा राजवाडा ह्मणजे अनेक इमारतींचा एक संग्रहच आहे. " राजवाड्याची " आपली अशी कल्पना नसते असें खुद्द महाराज व भाऊसिंगजी ह्मणाले. निरनिराळ्या खोल्या एकाच इमारतींत नसून, प्राचीन काळच्या अनेक तंबूंच्या छावणीप्रमाणें त्या एकमेकापासून अलग आहेत. हें स्थळ फिरून पाहिलें असतां, अनेक ठिकाणीं ह्मटल्याप्रमाणें, या थोर बादशहाच्या दैनिक कार्यक्रमाचें चांगलेंच चित्र डोळ्यासमोर उभें राहतें. कल्पनाशक्तीच्या जोरावर एकाद्याला बादशहाच्या मागून सहज जातां येईल. पहा,- बादशहा आपल्या लहान परंतु साध्या अशा खोलींतून उठून सकाळींच भव्य दर्ग्याचें व फकीर शेख

शेलीम खिस्ती या आपल्या जुन्या मित्राचें दर्शन घेण्याकरितां निघाला आहे. नंतर तो " हरण-मिनार " वरून क्रीडा करण्याच्या ठिकाणीं जात आहे. हरण-मिनार हा सत्तर फूट उंचीचा मनोरा असून त्याच्यावर खुंट्याप्रमाणें हत्तींचे सुळे बसविलेले आहेत. या मनोऱ्याजवळून त्याच्याकडे हरणें हांकललीं जात आहेत. नंतर लोकांचे अर्ज घेण्याकरितां व ' दिवाणी-ई-आम'मधून लोकांना दर्शन देण्यासाठीं तो ' हत्तीपाळ ' येथें जात आहे. हत्तीपाळ येथील दगडी हत्ती, जीवंत हत्तीच्या आकारा इतके मोठे आहेत.

खास बैठकीच्या दिवशीं, बादशाह आपल्या दिवाणासह एकांत—दिवाण-ई-खासमध्यें—बसत असे. या दिवाण-ई-खासच्या अपूर्व रचनेची कल्पना त्याची स्वत:चीच असली पाहिजे. बादशहाच्या खासगी चारित्र्याची कल्पना पचिशी तक्तपोशी व रासक्रीडागृहावरून होते. येथें तो आपल्या झनान्यांतील स्त्रियांशीं क्रीडा करीत असे. पांचमजली पंचमहाल हा मुलांना खेळण्यासाठीं बांधला होता असें ह्मणतात. उत्पादकाच्या चारित्र्याची कल्पना देणारा यासारखा दुसरा राजवाडा कोठेंहि नसेल, अशी माझी समजूत आहे. अकबरच्या धर्म-सहिष्णुतेचें फत्तेपूरशिक्री इतकें स्पष्ट उदाहरण दुसरें सांपडावयाचें नाहीं. येथें जुन्या पद्धतीवर बांधलेल्या मशीदीशेजारींच महाराणी जोधबाईकरितां हिंदु देवतेचें मंदीर, पोर्चुगीज राणीचा महाल, बिरबलचा रत्नमहाल व त्याच्या दुसऱ्या एका गुरूचें धवल जैनमंदीर इत्यादि इमारती बांधल्या आहेत.

दगडी हत्ती व खोदीव कामांतील आकृती ज्या छिन्नविछिन्न झालेल्या आहेत त्यावरून अवरंगजेबाच्या धर्मवेडाचीहि याच ठिकाणीं ताजी आठवण होते. या त्याच्या धर्मवेडाला हिंदूंचीं देवालयें व त्याच्या पूर्वजांनीं बांधिलेल्या पुराण-पद्धतीविरुद्ध असलेल्या सुंदर इमारती याही सारख्याच बळी पडल्या. हें स्थळ पहातांच, ज्यांच्याविषयीं यांनीं थोडेंबहुत वाचलें आहे अशा या दोन बादशाहांमधील महदंतर कुमारांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नसेल. कुमा-रांच्या मतें या अतिशय बोधप्रद गणलेल्या इमारतींचा जो चोहोंकडे एकजात-पणा दिसून येत होता, तो महादरवाजावरून कित्येक खेडगळ लोक ८० फुटांखालील खंदकांत उड्या टाकीत असलेले पाहून, थोडासा कमी झाला. या खंदकांतील पाण्याच्या घाणेरडेपणामुळेंच उड्या मारणाऱ्यांच्या करामतीची किंमत दर माणसीं चार आण्यांइतकी स्वस्त झाली कीं काय असें आह्मांस

वाटलें. मशीदीच्या आवारांतील शेक शेलीम खिस्तीच्या थडग्याचा येथें उल्लेख करणें भाग आहे. या थडग्याचे संगमरवरी दगडाचे जाळीदार पडदे नाजूक-पणाच्या बाबतींत आग्रा व शिकंदरा येथील जाळीदार कामांपेक्षांहि उच्च प्रतीचे आहेत. ज्या वृद्ध मुल्लयानें आह्मांस हें ठिकाण फिरून दाखविलें, वो मुल्ला अकबराच्या या प्राचीन फकीराचा खास वंशज आहे. त्याच्या पूर्वजांनीं हें शहर बांधण्यासाठीं अकबरचें मन वळविलें, अशी जी आख्यायिका आहे ती लक्षांत घेतां, प्रस्तुतचा मुल्ला या शहराचा माहितगार ह्मणून येथें असणें, हें यथा-योग्यच आहे. ''

ता. १८ रोजीं दोन प्रहरीं राजकुमार दिल्लीला दाखल झाले. फेरोजशा कोट व तेथील अशोक स्तंभ पाहिल्यानंतर ते पुराणा किल्लयाला गेले. महाभारत-कालीन युधिष्ठिर राजानें हा बांधला अशी आख्यायिका आहे. महाराजांचा थोर पूर्वज श्रीशिवाजी हा, अवरंगजेबनें त्याला विश्वासघातानें बंदिवासांत टाकल्यानंतर, या किल्लयांतूनच निसटला, हीच प्रचलित गोष्ट महाराजांना येथें विशेष महत्वाची वाटली असेल.

दुसऱ्या दिवशीं फलाहारानंतर आह्मी ५७ च्या बंडामुळें प्रसिद्धीस आलेलीं स्थळें पहाण्यास गेलों. प्रथम आह्मी काश्मीरगेटकडे गेलों. तेथून हालण्यापूर्वीं कोणत्याहि काळच्या अंगावर अत्यंत शहारे आणणाऱ्या अशा रक्तपाताच्या प्रसंगासमोर आपण प्रत्यक्ष उभे आहोंत, असें कुमारांना वाटलें असेल. या तटाभोंवतीं आह्मी फिरत असतां, आह्मीं नुक्तेंच पाहून आलेल्या लखनौ येथील व दृष्टीसमोर असलेल्या दिल्ली येथील त्या काळच्या लढाऊ पक्षांच्या बलाबलाची तुलना केल्याशिवाय राहवत नसे. असहाय स्थितींत असलेल्या छावणीसभोंवतीं लाखों लोकांचा गराडा पडला असतांना किंवा मूठभर इंग्रजलोक एकादें तटबंदीचें शहर घेत असतांना, इंग्रजांला जें हटकून यश येई तें पाहून इंग्रजांच्या नेतृत्वाखालील शिपाई व इंग्रजाचें नेतृत्व नसलेला शिपाई या दोहोंमधील महदंतर कोणत्याहि हिंदी मनुष्याच्या मनावर ठसल्याखेरीज राहणार नाहीं. नंतर आह्मीं " रिज " ( टेकडी ), विजयस्तंभ, इंदुरावाचा वाडा आणि स्मारक हीं स्थळें पाहण्यास गेलों. इंदुराव हा आपल्या ह्यातींत कागलचा चीफ असून बापूसाहेबांचा आजा असल्यामुळें, इंदुरावाचा वाडा पाहून कुमारांना विशेष आनंद झाला. इंदुरावाचें खरें नांव जयसिंगराव घाटगे असें होतें. दौलत-

राव शिंद्याची राणी बायजाबाई ही इंदुरावाची बहीण असल्यामुळें ग्वाल्हेरच्या दरबारीं त्याची पुष्कळ सत्ता होती. परंतु तो तिच्याशीं भांडून दिल्ली येथें स्वतः बांधलेल्या आपल्या या वाड्यांत येऊन राहिला. १८५५ पर्यंत आपल्या आयुष्याचा राहिलेला काळ दिल्ली येथें मुख्यत्वेंकरून शिकार करण्यांत त्यानें घालविला. मालेसननें बेअर्ड स्मिथच्या आठवणींतून घेतलेल्या उताऱ्यामध्यें त्याचा पुढीलप्रमाणें उल्लेख केलेला आहे:—" हा वृद्ध गृहस्थ स्थानिक समाजामध्यें नामांकित होता. हा उदार, मनमिळाऊ, निष्कपटी परंतु आडदांड स्वभावाचा असून प्रेमळ अंतःकरणाचा होता. हें वर्णन कै० आबासाहेबांना तंतोतंत लागूं पडण्यासारखें होतें. आबासाहेब हे इंदुरावाचे पणतु असून त्यांचेंहि नांव जयसिंगराव असें होतें. "

पुढचा मुक्काम जयपूरला झाला. राजकोट-कॉलेजाविषयीं त्यांच्या ज्या आठवणी होत्या, त्यांच्या सहाय्यानें त्यांना अजमीर येथील मेयो कॉलेजकडे टीकात्मक दृष्टीनें पहातां आलें. त्यांना तेथील इमारती बांधण्याची पद्धत पसंत पडली; परंतु मुलें व प्रिन्सिपाल एकाच इमारतींत जवळ जवळ राहण्याची राजकोटची पद्धत त्यांना अधिक पसंत वाटली. मि. फ्रेजर पुढें ह्मणतात-" या दिवशीं संध्याकाळीं बडोदा येथील गव्हर्नरजनरलच्या एजंटाकडून मला अशी तार आली कीं महाराजांची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें गाइकवाडमहाराजांच्या भेटीचा बेत रहित करण्यांत यावा. महाराजांना व कुमार श्रीभाऊसिंगजी यांना खास निमंत्रणें देऊन हा भेटीचा योग फार दिवसांपासून जुळवून आणला असल्यामुळें सर्वांची यामुळें फारच निराशा झाली. बडोदा पाहून आपले नातलग गाइक-वाडमहाराज यांची प्रत्यक्ष ओळख करून घेण्यास महाराज फार आतुर झाले होते. महाराजांची दिलगिरी प्रदर्शित करण्यासाठीं ता. २५ रोजीं मी बडोदा येथें उतरलों. तेथेंहि इतकीच तीव्र निराशा झाल्याचें दिसून आलें. महाराजांच्या स्वागताप्रीत्यर्थ स्टेशनपासून महाराज उतरावयाच्या बंगल्यापर्यंत रस्ते शृंगारिलेले होते. "

ता. २५ रोजीं कुमार अजमीरहून मुंबईला निघाले. नंतर शास्त्रीय प्रदर्शनाला हजर राहण्यासाठीं चार दिवस कोल्हापूरला जाऊन ते ता. ३० रोजीं धारवाडला पोंचले व नवीन वर्षाच्या प्रारंभाबरोबरच त्यांनीं आपल्या अभ्यासालाहि प्रारंभ केला. " अशाप्रकारें यशस्वी रीतीनें हें देशपर्यटण शेवटास जाऊन

माझ्या अपेक्षेप्रमाणें त्यापासून कुमारांना आनंद व फायदा झाला. वेळ पुरेशी नसूनहि त्यांनीं ४,८९९ मैलांपेक्षांहि अधिक प्रवास केला. व हिंदी साम्राज्याच्या आकाराची व त्यांत समाविष्ट झालेल्या नानाविध लोकांची व प्रदेशाची त्यांना थोडीबहुत कल्पना झाली. महाराजांनीं एकदां झटल्याप्रमाणें, जेथें कोल्हापूरचें नांव देखील ऐकूं येत नसें अशा ठिकाणीं ते गेले होते. त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेल्या नैसर्गिक देखाव्यांचीं व इमारतींचीं प्रतिबिंबें आणि ऐतिहासिक गोष्टी, केवळ वाचनानें कधींहि शक्य होणार नाहीं अशा उत्कृष्ट रीतीनें, त्यांच्या मनावर या प्रवासांत ठसल्या गेल्या. देशपर्यटनानें जे नवीन विचार प्राप्त झाले त्यांचें दृश्य फळ ह्मणजे सर्वसाधारणपणें त्यांचीं संभाषणें उठावदार होत गेलीं."

ता० १ एप्रील सन १८९१ सालीं महाराजांचा विवाह बडोद्याचे मेहरबान गुणाजीराव खानवीलकर यांची कन्या व गणपतराव गाइकवाडमहाराज यांची नात श्री. लक्ष्मीबाईसाहेब यांच्याशीं झाला. १८८० सालच्या नूतन वर्षाच्या प्रारंभा दिवशीं यांचा जन्म झाला होता. ह्मणजे आतां महाराज्ञीपदारूढ झालेल्या श्री. लक्ष्मीबाईसाहेब यांचें वय विवाहाच्या वेळीं अवघें ११ वर्षांचें होतें. पूर्वीं खानवीलकर हे रत्नागिरी तालुक्यांतील पांच गांवच्या खोतीचे मालक असून सुर्पे हें त्यांचें केंद्रस्थान होतें. पेशव्यांच्या अंमलाखालीं वसईचा किल्ला असते वेळीं हे खानवीलकर कांहीं दिवस या किल्ल्याचे मुख्य अधिकारी होते. हा किल्ला ब्रिटिशांच्या ताब्यांत गेल्यानंतर खानवीलकर हे मातार्‍याला आले. तेथें आल्यावर त्यांचा छत्रपतिघराण्याशीं विवाह-संबंध झाला. तेथून त्यांनीं पुनः बडोद्याला स्थलांतर केलें. तेथें महाराणी लक्ष्मीबाईसाहेबांच्या आजांचा विवाह श्रीमन्महाराज मयाजीराव ( वडील ) गाइकवाड यांच्या कन्येशीं झाला. अशाप्रकारें कोल्हापूरच्या महाराणीसाहेब या मराठाजातीच्या एका अत्युच्च घराण्यांतील वंशज असून त्या आपल्या अत्युच्च कुलानें, त्याचप्रमाणें आपल्या अंगच्या गुणांनीं आपल्या नवप्राप्त उच्च पदाला योग्य अशाच आहेत.

हा समारंभ झाल्यानंतर महाराज आपल्या संस्थानच्या पहाडी मुलुखांत शिकार करण्याकरितां गेले. तेथें एक आठवडा घालवून त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड हॅरीस यांचें स्वागत करण्याकरितां कोल्हापूरला आले. संस्थानच्या रेल्वेचा व औद्योगिक प्रदर्शनाचा उद्घाटण समारंभ करण्याकरितां हे कोल्हापुरास याव-

याचे होते. मे महिन्यांत धारवाडला जाणें जरी प्राप्त होतें, तरी महाराजांना आपले बंधु बापूसाहेब व चुलते बाळासाहेब यांच्या विवाहसमारंभाला हजर राहण्यासाठीं कोल्हापूरला आणखी दोन आठवडे राहावें लागलें. हे विवाह-समारंभ मे महिन्याच्या अकराव्या तारखेला झाले. ता. २ आक्टोबर रोजीं पुऱ्या झालेल्या पावसाळयाच्या टर्ममध्यें झालेल्या कामासंबंधानें मि० फ्रेजर साहेब लिहितात:--

" महाराज हे २३४ मार्कांनीं आपल्या बंधूच्या मागें आहेत. परंतु ते पूर्वीपेक्षां त्यांच्याजवळ आले आहेत. दोघां मुलांनींहि एकसारखी मेहनत केली. परंतु ज्या चुका त्यांना स्वतः दुरुस्त करण्यासारख्या आहेत, त्या न होऊं देण्या-बद्दल जर ते दक्षता घेतील, तर शेंकडा २५ प्रमाणांत त्यांच्या मार्कांची वाढ होत जाईल.

" या पांच महिन्यांत सर्व कुमारांची प्रकृति चांगलीच राहिली हें सांगण्यास मला समाधान वाटतें. महाराजांचें वजन विशेष वाढलें नाहीं. परंतु बापूसाहेब बराच धष्टपुष्ट झालेला आहे. "

महाराजांच्या प्रगतीसंबंधानें त्यांचे शिक्षक ह्मणतात:--" महाराज मेहनत करून आपल्या शिक्षणांत बरेंच लक्ष घालीत आहेत. परंतु त्यांच्या बंधूनें त्यांना मागें टाकल्याचें पाहून माझी निराशा झाली. एकाद्या विषयाची रूपरेखा त्यांच्या लक्षांत लवकर येऊन ते त्यासंबंधीं माहिती देऊं शकतात. महाराज हुशार आहेत; परंतु त्यांच्या निष्काळजीपणामुळें त्यांचें लेखन समाधानकारक नसतें. या वर्षांत त्यांनीं सर्वसाधारण प्रगति केल्याचें दिसून येतें. कायदा व भौतिक शास्त्रांचीं मूलतत्त्वें या विषयांत त्यांनीं बरेंच लक्ष घातलें असून ते स्वतःच विचार करण्यास शिकले आहेत, असें अनेक अनपेक्षित मार्गांनीं आमच्या निदर्शनास आलें. संभाषण करणें आतां त्यांना बरेंच सोपें जातें. परंतु अद्याप त्यांचा स्वभाव भिडस्त असल्यामुळें त्यांना आपल्या अंगची हुशारी परक्या लोकांसमोर दाखवितां येत नाहीं. त्यांचा मनमिळाऊ स्वभाव पूर्वीप्रमाणेंच आहे. पुस्तकाकडे व खेळा-कडे महाराजांचा विशेष ओढा असल्याचें दिसून येत नाहीं. परंतु घोडा, कुत्रीं व बंदुका या त्यांना पूर्वीप्रमाणेंच परम प्रिय आहेत. त्यांच्या वडिलांचें चाबूक चालविण्याचें कौशल्यहि त्यांच्यांत उतरलेलें आहे. गेल्या टर्ममध्यें धारवाड येथें

ते स्वतःच सहा घोड्यांची एक जोडी तयार करून ती पूर्णपणें आपल्या ताब्यांत ठेवून हांकीत असत.

" त्यांचें प्रकृतिमान अत्यंत चांगलें आहे. त्यांचें वजन बहुतेक गेल्या वर्षी इतकेंच ह्मणजे चौदा स्टोन २१ पौंड भरते, मात्र आतां त्यांची उंची ५ फूट, १०$\frac{1}{4}$ इंच भरते. "

आपल्या उत्तर वयाच्या विविध व्यवसायांत महाराजांनीं जी असामान्य बुद्धिमत्ता प्रगट केली, ती ज्यांना ह्मणून माहित आहे, त्यांना टापटिपपणाचा अभाव, निष्काळजी वर्तन व युरोपीयन लोकांच्या सहवासांत भिडस्तपणा हे वरील दोषारोप त्यांच्या खऱ्या स्वभावाशीं कांहींसे विसंगत दिसण्याचा संभव आहे. परंतु त्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत हे दोष बाह्यतः तरी त्यांना बिलगूनच होते. महाराजांना अत्यंत प्रिय असलेल्या शेतकरी पेशाच्या साधेपणाचा हा साहजिक परिणाम असावा, असें मला वाटतें. युरोपीयनसमाजांच्या चालीरीती यांचा त्यांना बराच कंटाळा असे. ह्मणून ते एखाद्या मेजवानीला हजर राहण्याचें किंवा आपल्या युरोपीयन मित्रांच्या सहवासांत जास्त वेळ घालविण्याचें बहुधां टाळीत असत. गरीब लोकांशीं ते मन मोकळें करून वागत व त्यांच्याच सहवासांत राहणें त्यांना आवडे. महाराजांच्या स्वाभाविक निर्बंधरहित वर्तनांत एखाद्या युरोपीयन किंवा हिंदी सुव्यवस्थित गृहस्थाला टापटिपीचा अभाव दिसून आल्याखेरीज राहत नसे. परंतु महाराजांना अशाच प्रकारची राहणी मनापासून आवडत असे. महाराज लहान असतां त्यांच्या बाह्यतः दिसणाऱ्या गबाळेपणाबद्दल त्यांना बोलून घ्यावें लागत असें. या बाबतींत महाराजांच्या परिवारांतील नोकरलोकांवरहि थोडीबहुत जबाबदारी असल्यामुळें, त्यांनाहि याबद्दल बोलून घेणें भाग पडे. परंतु निःस्वार्थीपणाला साजेशा खऱ्या धैर्यानें व सुविचारीपणानें ते सर्व दोष आपल्या माथीं घेऊन आपल्या नोकरलोकांना याबद्दलच्या सर्व जबाबदारींतून ते मुक्त करीत असत. कर्नल रीव्हज हे एकदां अल्पवयस्क महाराजांचीं नखें न काढल्याबद्दल एका हजामाला रागें भरले. परंतु महाराज एकदम उठून त्यांना ह्मणाले, " हा दोष हजामाचा नसून मींच त्याला माझीं नखें काढूं दिलीं नाहींत. " साधेपणाची मर्यादा संपून गबाळेपणाला कोठें सुरवात होते, हें ठरविणें खरोखर कठीण आहे. या दोन

गुणावगुणांची इयत्ता ठरविण्याच्या भरीस महाराज केव्हांहि पडले नाहींत. कडक शिष्टाचाराचा अंगीकार करण्यापेक्षां निर्भेळ साधेपणाच पतकरणें त्यांना अधिक श्रेयस्कर वाटत असें.

अशाप्रकारें महाराजांच्या शिक्षणाची काळजी घेतली जात असतां, महाराज्ञींच्या शिक्षणाचीहि योग्यप्रकारें व्यवस्था ठेवण्यांत येत होती. महाराणी या सकवारबाई राणीसाहेब-यांच्या देखरेखीखालीं होत्या. महाराज्ञींच्या शिक्षणाची काळजी घेण्यासाठीं मिसेस कॉक्स या युरोपीयन बाईची नेमणूक होऊन, या बाईनें महाराणीच्या सहवासांत रोज चार तासाप्रमाणें चार वर्षे काढलीं. यामुळें राज्ञीपदास योग्य असें शिक्षण त्यांना सहजच प्राप्त झालें.



# प्रकरण ५ वें.

## शिक्षणाची समाप्ति.



महाराज धारवाडला राहून वर्ष होतें न होतें तोंच शिक्षण परिपूर्ण करण्यासाठीं त्यांना इंग्लंडला पाठविण्याचा प्रश्न पुन: उपस्थित झाला. महाराजांच्या कल्याणाविषयीं विशेष कळकळ बाळगीत असलेले मि० लीवॉर्नर यांनीं " शीक्स वर्थ पार्क " हें महाराजांचें इंग्लंडमधील निवासस्थान ठरवून, ही व्यवस्था मान्य आहे किंवा कसें हें विचारण्यासाठीं त्यांनीं कोल्हापूर दरबारला लिहिलें. सहा महिन्यांनंतर या बाबतींतील श्रीमंत आबासाहेबांची इच्छा पार पाडण्याच्या अवश्यकतेचें महत्व, कर्नल रीव्हज, हे महाराजांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करीत असल्याचें आढळून येतें. दुसरे एक माजी पोलिटिकल एजंट कर्नल सी. वूडहॉऊस हेहि १८९१ सालच्या प्रारंभीं हीच विनंति थोड्याशा व्यापक स्वरूपांत करितात. संस्थानांतील कोणत्याहि राजकीय अधिकाऱ्यापेक्षां ज्यांचा संबंध कोल्हापूर संस्थानला विशेष दिवस घडला असे जे अलीकडचे रेसिडेंट कर्नल वुडहॉऊस त्यांचे, कर्नल सी. वुडहॉऊस हे वडील होत. या वर्षाच्या मध्याच्या सुमारास या प्रश्नाला व्यवस्थित स्वरूप येऊन सन १८९१ सालीं मुंबईसरकारकडून आपल्या एका ठरावांत पुढील उल्लेख करण्यांत आला:—

" महाराजांचें इंग्लिश भाषेचें वाढतें ज्ञान व नुकत्याच झालेल्या देशपर्यटनामुळें त्यांना झालेलें सौख्य या गोष्टी लक्षांत घेतां कै० रीजंटच्या उत्कट इच्छेनुरूप जेव्हां त्यांना इंग्लंडला पाठविण्यांत येईल तेव्हां महाराजांच्या वडिलांच्या अंदाजाप्रमाणें महाराजांना त्यापासून सौख्य व फायदा होईल अशी आशा बाळगण्यास जागा आहे. "

अशाप्रकारें इंग्लंडला जाण्यासाठीं चोहोंकडून आग्रह होत असतांना अवघ्या अठरा वर्षांच्या वयाच्या महाराजांनीं आपल्या या वजनदार पालकांचा व आपल्या हितचिंतकांचा उपदेश जर मान्य केला असता, तर तें अगदीं

स्वाभाविक झालें असतें. परंतु याच्या उलट महाराजांना बेत ठरला असल्या-मुळें, त्यांच्या मनावर जो चोहोंकडून दाब पाडला जात होता, त्याचा प्रतिकार करण्याचा त्यांनीं ठाम निश्चय केला. महाराजांचा अशा प्रकारचा निश्चय होण्यास झालेलीं कारणें पुढें लौकरच त्यांच्याच शब्दांत देण्यांत येतील. येथें सांगा-वयाची मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे, या बाबतींतील महाराजांच्या विचारसरणीचा भारदस्तपणा किंवा फोलपणाहि नसून, प्रतिपक्ष अत्यंत जोरदार असतांनाहि महाराजांनीं जे अनेक यशस्वी सामने केले त्यांपैकीं हा पहिला सामना होता हीच होय.

विरोधाच्या प्रसंगीं कधींहि न डगमगणारे अंतःकरण, प्रतिकूल परिस्थितींतहि स्वतःच्याच मार्गानें जाण्याची हिंय्या व या सर्वांहूनहि कोणत्याहि प्रश्नाची चर्चा करण्याच्या प्रसंगीं किंवा एकादा गुंतागुंतीचा प्रश्न उपस्थित झाला असतां त्यांच्या अंगीं जी एक प्रकारची असामान्य कार्यक्षमता दिसून येत होती, त्यामुळें शिक्षकांनीं वारंवार उल्लेख केलेल्या महाराजांच्या निष्काळजी वर्तनावरून, ज्यांनीं महाराजांच्या बुद्धिम-त्तेची व स्वभावाची कल्पना बांधलेली होती, ते आश्चर्यविमूढ झाले असले तर नवल नाहीं. ज्यावरून महाराज लाजाळु स्वभावाचे आहेत अशी यूरोपीयन लोकांची चुकीची समजूत झाली, तो भिडस्तपणा धिटाई दाखविण्याचा प्रसंग येतांच नाहींसा झाला. आपण काय करावयाचें तें आपल्या मनांत पक्कें ठरवून, आपल्या कै. पित्यांच्या इच्छेमुळें महत्व पावलेला आपल्या पालकांचा सल्ला त्यांनीं झुगारून दिला. आपल्या अंगीं प्रामुख्यानें वसत असलेल्या चाणाक्षपणाच्या सहाय्यानें आपल्या मताविरुद्ध बहुतेक एकूण एक लोक असतांना देखील त्यांच्या मताऐवजीं आप-लेंच मत लॉर्ड हॅरिस साहेबांनीं मान्य करावें म्हणून त्यांचें मन वळविण्यासाठीं महाराज महाबळेश्वराला तांतडीनें निघाले; व ते आपल्या आयुष्यांतील मुत्सद्दि-गिरीच्या या पहिल्या परीक्षेंत विजयीहि झाले.

महाराजांनीं लॉर्ड हॅरिस यांच्यासमोर आपलें जें म्हणणें मांडलें, तें त्यांनींच मागाहून लिहून काढिलें होतें. त्यांत ते म्हणतातः—

" येत्या वर्षीं मी या प्रवासापासून उद्भवणारे फायदे घेण्यास समर्थ होईन, असा जो पहिला मुद्दा आहे, त्यासंबंधानें मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, कांहीं अंशानें ही गोष्ट मी कबूल करितों; परंतु मी आणखी कांहीं दिवस वाट पाहिली तर याहिपेक्षां माझा अधिक फायदा होईल असें मला वाटतें. कारण, अनुभवानें माझें ज्ञान वाढतच जाईल. माझें इंग्लिश भाषेचें ज्ञान तसेंच जागृत

ठेवण्याचा माझा हेतु आहे. मला शिकारीचा मोठा नाद आहे तरी मी माझें इंग्रजी वाचन कायमच ठेवीन. वाचन अगदींच सोडून देण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. मि. फ्रेजर यांनीं मला जें ज्ञान दिलें आहे, तें वृद्धिंगत करण्याची माझी इच्छा आहे. शिवाय हाच पैसा जर मी मागाहून खर्च केला तर माझा अधिकच फायदा होईल. ह्मणून मीं घाई कां करावी ?

" पुढें माझें कुटुंब सोडून जाणें मला अवघड जाईल, असा जो दुसरा मुद्दा आहे, त्यासंबंधानें मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, इंग्लंडच्या संस्कृतीविषयीं माझ्या ठायीं मोठा आदर आहे. आणि हा आदर दिवसानुदिवस वाढतच जाईल. मीं थोडेंसें संसारसुख अनुभवल्यानंतर, या पर्यटनापासून होणारे फायदे माझ्या दृष्टीनें कमी किंमतीचे ठरतील, असें मला वाटत नाहीं. शिवाय माझ्या पत्नीलाहि इंग्लंडला जाण्याचें आवडून आह्मी दोघें मिळून जाऊं; असाहि संभव आहे. असें झालें तर माझें कुटुंब माझ्या मार्गांतील एक विघ्न न होतां उलट तें माझें मन वळविण्याचें एक नवें साधनच होईल.

" कांहीं वर्षांनंतर माझ्या प्रजाजनांना माझी जरूरी राहील, व माझे नातलग देखील माझ्या मार्गांत आडवे येतील, हा जो तिसरा मुद्दा आहे त्यासंबंधानें ह्मणाल, तर मी कांहीं काळपर्यंत निघून गेलों तर माझे प्रजाजन नाराज होणार नाहींत, अशी माझी खात्री आहे; कारण त्या वेळेपर्यंत मला कांहीं मुलें होतील व त्यामुळें माझी आठवण त्यांना तितकी होणार नाहीं. ज्याच्याकरितां ते पुष्कळ दिवस वाट पहात बसले आहेत तें त्यांच्या छत्रपतींचें राज्य त्यांना अनुभवावयास सांपडेल. कोल्हापूरच्या गेल्या तीन पिढयांचा इतिहास अशुभ असा असल्यामुळें लोकांचीं मनें साशंक झालेलीं आहेत; परंतु कांहीं दिवस मीं राज्य केल्यानंतर त्यांची भीति दूर होऊन ते माझ्या प्रयाणाविषयीं शंका घेत बसणार नाहींत. त्या वेळीं राज्यसूत्रें कार्यक्षम माणसांच्या हातीं मी हवालीं करीन. सरकार त्यांच्यावर देखरेख ठेवील, अशी मला आशा आहे. कांहीं वर्षांनंतर माझ्या वडील माणसांची परवानगी मिळण्याविषयींसुद्धां संशय राहणार नाहीं. कारण ते मला पुढें विलायतेस जाऊं देऊं असें ह्मणतात व माझ्या गैरहजेरींत ते माझ्या मुलांचें संगोपन करण्यांत आपली वेळ घालवितील अशी त्यांना आशा आहे. आतांच जर मी गेलों तर माझें शील अजून दृढ झालें नसल्यामुळें तें बिघडून जाईल

व युरोपसारख्या खंडांत मोह पडण्याचे पुष्कळ प्रसंग असतात असें त्यांचें ह्मणणें आहे.

" मि० फ्रेजर साहेबांना कांहीं वर्षांनंतर माझ्याबरोबर विलायतेस येतां येणार नाहीं, असा चौथा मुद्दा आहे. यासंबंधान मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, मि. फ्रेजरसारखे कनवाळु गृहस्थ माझ्याबरोबर येतील तर त्यापासून मला अधिकच आनंद होईल. मी पुढें मागें इंग्लंडला गेल्यावर मि. फ्रेजर यांना कांहीं काळपर्यंत माझ्याबरोबर देण्यासाठीं सरकारला विनंति केली असतां सरकार नाहीं ह्मणणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. परंतु सरकार त्या वेळीं नाकबूलच झालें तर मी दुसरा मनुष्य माझ्याबरोबर घेईन. माझे वडील जेव्हां विलायतेला गेले तेव्हां कर्नल गॉर्डनची माझ्याकडे योजना झालेली होती. पुढील वर्षी इंग्लंडला न जाण्याचीं माझीं कारणें आपल्यासमोर मांडण्याची जी आपण संधि दिली तीबद्दल मी आपला फार आभारी आहें. माझ्या प्रकृतीसंबंधींचा मि. कॅनॉर्थी यांचा अभिप्राय मि. फ्रेजर यांनीं मला दाखविला. यासंबंधीं दोन शब्द सांगणें मला इष्ट वाटतें. मीं जलपर्यटन करावें असें त्यांचें मत आहे. यासंबंधानें आतांच निश्चय करण्याचें कारण दिसत नाहीं. "

याला ता. २० जुलै सन १८९२ रोजी लॉर्ड हॅरिस साहेबांचें पुढीलप्रमाणें उत्तर आलें:—

" महाबळेश्वर येथील आमच्या भेटीच्या वेळीं इंग्लंडला जाण्याच्या अवश्यकतेसंबंधीं जे मुद्दे मीं आपल्यासमोर विचार करण्याकरितां मांडले होते, त्यासंबंधींचें आपलें ता. २० जुलै सन १८९२ चें पत्र पोंचलें. आपलीं राज्य-सूत्रें आपल्या हातीं येण्यापूर्वीं इंग्लंडला जावयाचें नाहीं, असा आपला निश्चय झालेला आहे. असा निश्चय झाल्याचें पाहून माझी नाउमेद झाली, हें मी आप-ल्यापासून लपवून ठेवीत नाहीं. तथापि असा निश्चय आपल्या घराण्यांतील राझ्यांच्या सल्लयानें झाल्याचें पाहून मला त्याबद्दल आश्चर्यहि वाटत नाहीं. जसजसा काळ लोटत जाईल व जसजसे आपले कौटुंबिक व व्यावहारिक व्यवसाय एकसारखे वाढत जातील तसतसे आपण लांबचा प्रवास करण्यास तयार व्हाल किंवा नाहीं याविषयीं माझें मन साशंक आहे. शिवाय आपणास फायदेशीर अशी जी व्यवस्था आतां करणें शक्य होईल ती पुढच्या काळाच्या परिस्थित्यनुरूप करितां येणें अशक्य होईल. आपल्या हल्लींच्या वयाच्या वेळीं युरोपला गेल्यापासन जसा फायदा होईल

तसाच फायदा आणखी कांहीं वर्षानंतर गेल्यानेंहि होईल, ही गोष्ट मला नाकबूल करितां येत नाहीं. आपण ज्या भावनांनीं प्रेरित होऊन हा निश्चय केलेला आहे. त्या भावना मला पूर्णपणें समजून आल्या आहेत, असें मला वाटतें. मीं आतां-पर्यंत आपणास जितका आग्रह केला, त्यापेक्षां मीं अधिक कांहीं करावें, अशी माझी इच्छा नाहीं. ''

महाराजांच्या विचार-सरणीचा विजय या ठिकाणीं अपुराच झाला आहे, हें उघड आहे. पुढें कांहीं काळानंतर—ह्मणजे लॉर्ड हॅरिस यांच्या—या निराशेची तीव्रता कमी झाल्यावर, चिंचली येथील यात्रेच्या वेळीं लॉर्ड हॅरिस यांनीं आपल्या भाषणांत महाराजांच्या विचारसरणीचा विशेष गौरव केला. महाराजांना उप-देशादाखल केलेल्या भाषणांत ते ह्मणाले:—

" आणखी एक दोन वर्षें ( विलायतेचा प्रवास ) पुढें लोटणें आपणांस पसंत आहे, असें आपण पूर्ण विचारांतीं ह्मणालात. आपली भारदस्त विचार-सरणी ऐकून घेतली; व जसजसें वय होत जातें, तसतशी मनुष्याची प्रवास कर-ण्याची प्रवृत्ति कमीकमी होत जाते व जसजसें आपण राज्यकारभारांत पडत जातों, त्यामानानें आपले व्यवसाय फार दिवसपर्यंत सोडून राहण्याचे प्रसंग टाळण्याची इच्छा वाढतच जाते. परंतु जसजसे आपण मोठे होत जाल, त्या मानानें आपल्या पाश्चात्य देशाच्या सफरीपासून उद्भवणारे फायदे ग्रहण करण्यास आपण अधिक समर्थ व्हाल, या आपल्या अभिप्रायास विरोध करणें मला योग्य वाटलें नाहीं. ही आपली भारदस्त विचारसरणी लक्षांत घेण्यासारखीच होती. कांहीं संस्थानिक सिंहासनारूढ होण्यापूर्वीं विलायतेला गेले होते ह्मणून, आपणहि राज्यसूत्रें हातीं घेण्यापूर्वीं अशा प्रकारची सफर केलीच पाहिजे असें सिद्ध होत नाहीं. शिवाय हिंदुस्थानचा बराच भाग प्रत्यक्ष जाऊन पाहण्याच्या संधीचा आपण उपयोग केलाच आहे. आपण सीलोनपासून मद्रास ते पेशावरपर्यंत प्रवास केला असून हिंदुस्थानचे बहुतेक प्रांत आपण प्रत्यक्ष जाऊन पाहिले आहेत. अशा प्रकारचें कित्येक वर्षांचें पर्यटन, ब्रिटिशराज्याच्या ध्येयाचों, उद्देशाची व सामर्थ्याची यथार्थ कल्पना आपणांस करून देण्यास जर पुरेसें होत नसेल, तर इंग्लंडच्या सफरीपासून, या वयांत आपल्या उपयोगीं पडेल कीं नाहीं, याबद्दल मला शंका वाटते. आतां इंग्लंडच्या सफरीपासून जे फायदे होण्याचा

संभव आहे, तेच फायदे ग्रहण करण्यास आणखी थोड्या वर्षांनीं आपण अधिक समर्थ व्हाल, हें आपलें ह्मणणें मला या परिस्थितींत सयुक्तिक वाटलें; आणि आपली इच्छा ही आपल्या घराण्यांतील माणसांच्या व आपल्या बहुतेक प्रजा-जनांच्या इच्छेचा प्रतिध्वनि आहे असें मानून आपणांस अनुकूल असें धोरण स्वीकारण्यास मी तयार झालों. ''

अशा प्रकारें महाराजांच्या इंग्लंडच्या सफरीची वासलात लावण्यांत येईतों-पर्यंत, दक्षिण-हिंदुस्थान व सीलोनमधील महाराजांची दुसरी सफर पुरी झाली होती. १८९१ सालच्या ता. ५ नोव्हेंबरला कोल्हापुराहून निघून, विजापूर, हैद्राबाद, मद्रास, पांदिचरी, तंजावर, तुतीकोरीन, कोलंबो, कांडी व नेवारा-एलिआ इत्यादि स्थळें कुमारांनीं या प्रवासांत पाहिलीं. परत येते वेळीं ह्मैसूर संस्थानची बंगळूर व ह्मैसूर हीं दोन प्रमुख शहरें पाहून कुमार ता. २४ डिसेंबरला परत आपल्या धारवाड येथील छावणीला आले. मि. फ्रेजर साहेबांच्या या हकीगतीं-तून घेतलेल्या उताऱ्यावरून कुमारांना हा प्रवास किती आल्हाददायक झाला, याची कल्पना होईल:—" दहा वाजण्याच्या पूर्वींच आह्मी विजापुराला पोहोंचलों. महाराज व त्यांचा इतर परिवार वाहनांतून आनंद—महालामध्यें गेला. तेथें त्यांच्या राहण्याची चांगली सोय लागली; संध्याकाळीं आह्मी टांग्यांत बसून निघालों. कोणतेंहि वाहन हांकण्यास महाराज नेहमींच आतुर असल्यामुळेंच ते आज रडक्या खेचरांची एक जोडी हांकीत होते. आह्मी प्रथम ताजबावडीला गेलों. ताजबावडी हें एक बांधीव तळें असून यांत, शहरापासून तीन मैलांवर तोर्वी नांवाच्या पाण्याच्या मुख्य सांठ्यांतून नळानें पाणी आणून सोडलें आहे. विजापुरासारखें स्थळ राजधानीकरितां पसंत करण्यांत आलें होतें, हें पाहून सकृद्दर्शनीं आश्चर्य वाटलें. कारण, तटबंदी करण्याकरितां अनुकूल अशी नैसर्गिक परिस्थिति येथें नसून चालू वर्षासारख्या अवर्षणाच्या काळांत मोठ्या लोकसंख्येला पुरेसा पाण्याचा पुरवठा करण्याचीं साधनेंहि उपलब्ध नाहींत. परंतु विजापूरच्या प्राचीन इंजिनीअर व कारागीर लोकांनीं आपलें कौशल्यसर्वस्व भव्य तटबंदी, घुमट व राजवाडे बांधण्यांतच खर्च केलें नसून, शहराच्या आसपासच्या तलावांना व शहरांतील पाण्याच्या सांठ्याला जोडणाऱ्या कालव्यांचें व नळांचें एक जाळेंच निर्माण करून उपयुक्त अशा कामींहि त्यांनीं आपलें कौशल्य दाखविलें आहे.

मद्रास दृष्टीस पडतांच स्वाभाविकपणेंच महाराजांना, हिंदुस्थानच्या प्रमुख प्रांतांच्या मुख्य शहरांची तुलना करण्याची प्रवृत्ति झाली:—

" आतांपर्यंत महाराजांनीं तीन प्रांतिक शहरें पाहिलीं असून मुंबई व कलकत्ता या शहरांशीं तुलना करण्यासारखी महाराजांना मद्रासमध्यें भरपूर सामुग्री सांपडली. येथें जागेला महत्व नाहीं, असें दिसतें. इमारती जागजागीं पसरल्या आहेत. शहर किल्ल्यापासून लांब आहे व किल्ला घाटापासून लांब आहे. आसपासचा प्रदेश कित्येक मैलपर्यंत पसरला आहे. मद्रास येथील विस्तीर्ण आवारें पाहून कलकत्ता व मुंबई येथें राहणाऱ्यांना हेवा उत्पन्न होण्यासारखा आहे. परंतु यांहीपेक्षां विशेष आश्चर्य करण्यासारखी गोष्ट ही कीं, बगींचशीं दुकानें व माऊंट-रोडसुद्धां आपापल्या स्वतंत्र आवारांत आहेत. ह्मणून मद्रास शहरांत रस्ते नसून सडका आहेत, असे उद्गार काढण्याची एकाद्याच्या मनाची सहज प्रवृत्ति होते. येथें विशेष गडबड दिसून येत नाहीं. येथील लोक हात-गाड्यांत बसण्यांतच समाधान मानतात. हें कदाचित् येथील लोकरिवाजास अनुसरून असेल. आपल्याकडे व कलकत्ता येथें ज्याप्रमाणें व्हिक्टोरिआ व टांगे आहेत, तसे येथें सहसा आढळत नाहींत. कूमनदीच्या शाखा व कालव्यांप्रमाणें दिसणारे तिचे लहान लहान पाट यांच्यावरून लोक एकसारखे जात येत असतात. ताडांच्या व इतर वृक्षांच्या समृद्धीमुळें या शहराच्या बऱ्याचशा भागाला खेडवळ स्वरूप प्राप्त झालें आहे. स्त्रियांचा पोषाख, दुड-दुड चालणारे लहान लहान बैल व इंग्लिश भाषेचा प्रसार इत्यादि विविध प्रकार कुमारांच्या दृष्टींत येथें विशेष भरले. रस्त्यांतील भिकारी व कुली लोक-सुद्धां इंग्लिश भाषा बोलत असल्याचें पाहून त्यांना आश्चर्य वाटे. मद्रास शहरांतीलच केवळ नव्हे, तर त्या प्रांतांतील खेडेगांवांतीलहि प्राथमिक शाळांत इंग्रजी भाषा शिकविली जाते, असें मला सांगण्यांत आलें. जसजसें आपण दक्षिणे-कडे जातो, तसतसा इंग्रजीभाषेचा अधिकाधिकच प्रसार आढळून येतो. येथें व सीलोनमध्यें नेटिव्ह लोकांशीं संभाषण करतांना कुमारांना इंग्रजी भाषेचें अवलंबन करावें लागलें; हा अनुभव त्यांना उपयुक्त असाच झाला.

फ्रेंच हिंदुस्थानच्या राजधानीविषयीं व लोकसत्तात्मक फ्रेंच राष्ट्र आपल्या हिंदी प्रजाजनांना कशाप्रकारें वागविते, यासंबंधीं कुमारांना पुढीलप्रमाणें अनु-भव आला:—

" संध्याकाळीं आह्मी डुप्लेच्या उत्कृष्ट पुतळयानजिक असलेल्या प्रासादांतून गाडींत बसून गेलों, व तसेंच वाळवंटावरून सार्वजनिक बगीच्यांत गेलों. या बगीच्यांत, पोखरलेल्या विहिरी, कांहीं असामान्य लतावेली व समुद्रकिनाऱ्यावर दुसरीकडे न आढळणारीं अशीं भाकरीचीं झाडें इत्यादि पाहण्यासारखें आहे; हें पाहिल्यानंतर पांदिचरी येथील बहुतेक स्थळें पाहून झालीं. आमची जी येथें छोटेखानी सफर झाली, तिचा योग्य मोबदला आह्मांस मिळाला. कोणत्याहि अँग्लोइंडिअन पद्धतीच्या स्थळापेक्षां हें थोडेंसें तऱ्हेवाईक लहानसें शहर आहे. जेथें जेथें इंग्रजी गृहस्थ जातो, तेथें तेथें तो आपल्याबरोबर आपले रीतरिवाज नेतो, असें जें ह्मणतात, तें जर खरें असेल, तर आह्मांपेक्षांहि फ्रेंचलोकांनीं आपल्या घरची परिस्थिति अधिक चांगल्या प्रकारें येथें उतरविली आहे. बागबगीचे व आवार असलेले बंगले येथें नाहींत; परंतु येथील घरें नॉर्मंडी येथील कोणत्याहि लहान शहरांतील घरांप्रमाणें एकमेकाला चिकटून आहेत.

" हें स्थळ अगदीं स्वच्छ आहे. फ्रेंचलोक जरी आपणांस स्वातंत्र्याचे, समतेचे व बंधुप्रेमाचे चहाते समजतात, तरी त्यांनीं यूरोपीयन लोकांची छावणी व काळया लोकांचें शहर हीं दोन्हीं एकमेकांपासून अगदीं अलग ठेविलीं आहेत. या दोहोंमध्यें एक कालवा आहे.

" तंजावर हें स्थळ मराठाकुमारांना विशेष चित्ताकर्षक वाटलें, तंजावर येथील इमारती व त्यांचा तेथील ऐतिहासिक गोष्टींशीं संबंध या कारणद्वयामुळें तंजावर हें दक्षिण दिल्ली होय, या ह्मणण्याची सार्थता मनास बरोबर पटते. आतांपर्यंत ज्यांचीं आह्मांस नांवें देखील माहीत नव्हतीं असे भव्य देवालयें बांधणारे चौल राजे, विजयानगरचे विजयी नायक इत्यादि जुन्या घराण्यांची आठवण आह्मांस येथें प्रथमच झाली. या सर्वांहूनहि कुमारांना अत्यंत मनोवेधक गोष्ट ह्मटली ह्मणजे विख्यात शिवाजीमहाराजांचे सुप्रसिद्ध वडील शहाजी राजे यांच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांनीं येथें १६६० सालीं मराठाराज्याचा पाया घातला ही होय. कोल्हापूरचे राजे, शिवाजीमहाराजांचे खास वंशज आहेत. आपल्या जातीचा अभिमान असलेल्या तंजावरच्या मराठ्यांनीं महाराजांचें प्रेमानें स्वागत करून आपणांस आपल्या आप्तपणाची आठवण आहे, असें निदर्शनास आणिलें."

सीलोनला गेल्यावर तेथील डोंगराळ प्रदेशाची नैसर्गिक शोभा पाहून कुमारांना आनंद झाला. महाराजांना नेहमीं प्रिय असलेल्या अशा कांहीं शिकारीहि तेथें झाल्या.—

" सुदैवानें नजरेस पडलेल्या सांबरांची शिकार करून कुमारांना अतिशय आनंद झाला. सर सॅम्युअल बेकर यांनीं प्रथम सुरू केलेली ही सांबरांची शिकार अद्याप या भागांत चालू आहे. शिकारी कुत्र्यांचे मालक सी. डब्ल्यू व जॅक्सन हे दुय्यम सरकारी मुनीम मि. फाउलर यांच्या सुचनेवरून, नेवारा इलिआपर्यंत आले होते. येथील रानांत सांबरें पुष्कळ असून तीं नेहमींच सांपडतात. रान सोडून अगदीं जवळच्या ओढ्याचा आश्रय घेऊन सांबर फिरून उभें राहीतोंपर्यंत सहासात कुत्रीं सर्व जंगलभर त्याचा एकसारखा पाठलाग करितात. सांबर कोठून निसटून जाईल ती जागा त्यांना अचूक माहित असते. तेथें तोंडावर दोन तीन कुत्र्यांच्या जोड्या बसविलेल्या असतात. हे कुत्रे मोठे असून मजबूत असतात. यांची पैदास बहुतकरून स्कॉच व कांगारू जातीच्या कुत्र्यांच्या मिश्रसंबंधापासून झालेली असते. सांबर बाहेर पडतांच ते त्याच्या तोंडावरच हल्ला करितात, किंवा सांबर अशक्त असलें तर त्याच्याशीं पाण्यांत बराच वेळपर्यंत झगडून त्याला लोळवितात. आह्मी तेथें असेतोंपर्यंत आमच्या तीन सहली झाल्या. दोन दिवस मात्र आह्मांला चांगलीच शिकार साधली. पहिली शिकार सितालियानजिक झाली. लौकरच एक सांबर उठलें व तें आतां निसटून जाणार इतक्यांत त्याला परतवून मार्गे लावण्यांत आलें व बगीच्याकडे तें धांवत सुटलें. तिकडे आह्मी कुत्र्यांसहित धांवत गेलों. जंगलाच्या दुसऱ्या बाजूला आह्मी पोंचतों न पोंचतों तोंच सांबर माळावर उड्या मारीत जात असलेलें दृष्टीस पडलें. तें कुत्र्यांपासून बऱ्याच अंतरावर होतें. त्याच्यावर दोन कुत्रीं सोडून देण्यांत आलीं. एका क्षणार्धांत सांबर व कुत्रीं अगदीं उभ्या दरींत खरखडत जाऊन अखेर खालच्या ओढ्यांत कुत्र्यांनीं सांबराला खालीं पाडलें. बऱ्याच खांचा खळग्यांतून त्यांच्या पाठीमागून आह्मांस जावें लागलें."

दुसरी शिकार चंद्रकांत मैदानांत झाली. सांबर बाहेर पडेतोंपर्यंत दाट जंगलांत कुत्र्यांना दोन तासपर्यंत एकसारखा त्याचा पाठलाग करावा लागला. शेवटीं एका आवाजासरशीं सावजानें रस्त्यावर उडी घेतली. बाणासारखें एका ओढ्यांतून निघून त्यानें मोठ्या त्वरेनें त्याचा दुसरा तीर गांठला. आतां ते दुसऱ्या

रानांत नाहींसें होणार इतक्यांत एकट्याच कुत्र्यानें त्याला उत्कृष्ट प्रकारें जमिनीवर लोळविलें. या ओढ्याचा कांठ अतिशय खडा होता. तरी आतां सर्व कुत्रीं एका ठिकाणीं जमल्यामुळें, त्यांचा जोर इतका अनिवार झाला होता कीं झुडुपापासून २० फूट खालीं त्यांनीं एकदम उडी घेतली व तेथें बुवासाहेबानें प्रथम जाऊन सावजाला मृत्यूची वाट दाखविली.

या सर्व सफरींच्या वेळीं महाराजांबरोबर अगदीं आवश्यक असा बेताबाताचाच परिवार असून महाराजांनीं जीं जीं स्थळें पाहिलीं, त्यांच्याशीं व तेथील लोकांशीं महाराजांचा एकाद्या सामान्य गृहस्थाला शक्य होईल तितका निकट संबंध आणण्यासारखी प्रवासाची योजना करण्याची पूर्णपणें दक्षता घेण्यांत आली होती. हुजरेप्याद्यांचा राजेलोकांसभोंवतीं सदा गराडा पडला असल्यामुळें ज्या नवीन जगाचें त्यांनीं अवलोकन करावयाचें असतें, त्याचें ज्ञान त्यांना होणें प्राय: अशक्यच होतें. अशा राजेलोकांच्या गाजलेल्या सफरीप्रमाणें या सफरी झाल्या नसून त्यांच्यायोगानें कुमारांचा अगणित फायदा होऊन त्यांच्या चौकस दृष्टीचा एकसारखा विकास होत गेला. फ्रेजरसाहेब म्हणतात, “ पहिल्या सफरीपासून कुमारांना जे धडे मिळाले, त्यांचें महत्व त्यांनीं दक्षिणहिंदुस्थानमध्यें जें पाहिलें त्याच्यायोगानेंच द्विगुणित होऊन त्यांच्या मनावर तें पूर्णपणें ठसणें शक्य झालें. जी जी सफर ते करितात तिच्या अनुभवानें नवीन सफरीचें महत्व जाणून तिचा फायदा करून घेण्यास ते अधिक समर्थ होतात. ”

यानंतरच्या उन्हाळ्याच्या सुटींत कोल्हापूर व महाबळेश्वर येथें महाराजांना पुष्कळदां ताप आला. त्यांच्या अंगांत मलेरियाचा कांहीं अंश राहिल्यामुळें धारवाड येथें ता० २३ जूनला त्यांना पुन: ज्वर आला. यानंतर त्यांची प्रकृति पुन: पूर्व स्थितीवर आली.

अल्पवयस्क महाराणी लक्ष्मीबाईसाहेब याहि आपल्या अभ्यास, ललितकला, विणकाम व खेळ इत्यादि विषयांत समाधानकारक अशी प्रगति करीत होत्या. त्यांच्या अध्यापिका मिस् लिटल यांनीं ‘ बुद्धिमान् व मेहनती ’ असा त्यांच्याविषयीं आपला अभिप्राय दिला. त्यांनीं नियमितपणें आपले धडे करून मिस् लिटलना खूष केलें. मिस् लिटल या बाई कोल्हापूरराज्यांतील महिलाशिक्षणाच्या सुपरिन्टेन्डन्ट असून त्या दररोज कांहीं तास त्यांच्या संगतींत घालवीत असत.

महाराजांनीं १८९२ सालचा उन्हाळा महाबळेश्वर येथें घालविला. पंजाब व सिंधप्रांतांत सफर करण्यांत महाराजांनीं यापुढील हिंवाळा घालविला. हिंदुस्थानचा हाच काय तो भाग महाराजांनीं अद्याप पहावयाचा राहिला होता. पूर्वींप्रमाणें आतांहि महाराजांबरोबर त्यांचे बंधु, भावनगरचे महाराज व इतर लोक होते. हे सर्वजण १८९२ सालच्या आक्टोबर महिन्याच्या २८ तारखे रोजीं शुक्रवारीं कोल्हापुराहून निघाले. " ही तारीख ठरविण्याच्या कामीं आह्मांस संस्थानच्या ज्योतिष्याची मदत झाली. जर एकाद्या राजाच्या मनांत आपल्या घरांतील वडील माणसांच्या समजुतीबद्दल आदर वसत असेल, तर अशा ज्योतिष्याचा सल्ला घेतल्याखेरीज त्याला आपली राजधानी शुभपणें सोडतां येणार नाहीं. या ज्योतिष्यानें प्रथम या दिवसाला हरकत घेतली. याच्याखेरीज दुसऱ्यानें जर एकादा दिवस ठरविला असला, तर बहुधा हा त्या दिवसाला हरकत घेतो, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. परंतु ' प्रस्थान ' ह्मणून एक प्राचीन विधि करून ही अडचण दूर करण्यांत आली. हा प्रस्थानविधि ह्मटला ह्मणजे एकाद्या मंगल दिवशीं शुभ मुहूर्तावर राजा आपल्या प्रतिनिधित्वाचें चिन्ह ह्मणून आपली तरवार घराबाहेर पाठवितो. ( ब्राह्मण असेल तर जानवें, व्यापारी असेल तर मध व अंत्यज असेल तर फळ. ) ही तरवार जिकडे जावयाचें असतें त्या बाजूच्या रस्त्यावर राहणाऱ्या एकाद्या गृहस्थाच्या घरांत ठेवण्यांत येतें. निघते वेळीं राजा मोठ्या समारंभानें विधिपूर्वक या ठिकाणाहून ती आपल्या जवळ घेतो. अशा प्रकारचे जरी शांतिकारक उपाय योजण्यांत आले तरी हा शुक्रवारचा दिवस त्याच्या नेहमींच्या लौकिकाप्रमाणें अशुभच ठरला. कारण आह्मीं निघण्याची सर्व तयारी केली असतां, या ऋतूंत असंभवनीय अशा जोरानें पाऊस पडण्यास सुरवात झाली; व कोल्हापूर ते पुण्याच्या दरम्यान कित्येक ठिकाणीं रेल वाहून गेली. रविवारपर्यंत वाहतूक बंद होती. जेजुरी व राजेवाडीच्या दरम्यान जेथें लाइन अतिशय खराब झालेली होती तेथें नाल्यांवरून थोडासा तात्पुरता रस्ता तयार करण्यांत आला होता. रविवारानंतर देखील एक पावसाची सर पडून हा रस्ता वाहून जातो कीं काय असें वाटलें. सर्व प्रवासामध्यें आमच्या इच्छेप्रमाणें हें दुर्दैव पुनः आमच्यावर ओढवलें नाहीं. उशीरा का होईना आह्मी आमच्या परिवारासह एकदांचें पुणें गांठलें. तेथून आह्मी ता० ३१ रोजीं दोन प्रहरीं दादरला दाखल झालों.

ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें आमच्या पहिल्या मुक्कामाचें ठिकाण जे अबु त्याला जाणारी बी. बी. सी. आय्. कंपनीची रात्रीची मेल गाडी पकडली.

"नोव्हेंबर महिन्याच्या पहिल्या तारखेस पांहाटेस बडोद्याच्या रेल्वे स्टेशनवर अगोदरच ठरल्याप्रमाणें बडोद्याचे दिवाणांनीं व अधिकारी लोकांनीं महाराजांची भेट घेतली. गाडींतून बाहेर येऊन महाराजांनीं आपला तेथील १० मिनिटांचा मुक्काम महाराणी अहिल्याबाई राणीसाहेब यांच्याशीं व आपल्या कुटुंबाच्या आप्तांशीं संभाषण करण्यांत घालविला. महाराजांना पाहून त्यांनींहि या संधीचा फायदा करून घेतला. बडोदें व कोल्हापूर येथील मराठा घराण्यांमध्यें एकमेकांशीं विवाहसंबंध होऊन पूर्वींपासून सख्य उत्पन्न झालें आहे. बडोद्याच्या राजघराण्यांतील कन्येशीं महाराजांचा अगदी अलीकडे विवाह झाल्यामुळें हें सख्य द्विगुणित झालें आहे."

नोव्हेंबरच्या पहिल्या तारखेला कुमार अबूला पोंचले. त्यांनीं तेथील सुंदर जैनमंदिरें पाहिलीं. या मंदिरांची थोरवी दक्षिणेंतील भव्य देवालयांप्रमाणें मनावर सर्वसाधारण परिणाम उत्पन्न करण्यांत नसून, त्यांच्या गाभाऱ्यांतील संगमरवरी दगडावर जे नाजूक नकशीचें काम आहे त्याच्यामुळेंच आहे. हीं मंदिरें पाहून झाल्यावर ता. ५ रोजीं येथून निघून मारवाडांतून दुसऱ्या दिवशीं महाराज जोधपूरला पोंचले. मारवाडांतील उद्योगी लोकांना आपल्या ओसाड प्रदेशांत राहणें अशक्य होऊन ते महाराष्ट्रांतील रयतेवर यथेच्छ पुष्ट होऊन परत मारवाडला येतात. मराठ्यांनीं गेल्या शतकांत ( आठराव्या शतकांत ) मारवाडांत जी लुटालूट केली, त्याचें जणूं हें अशाप्रकारें उट्टेंच काढीत आहेत! सुप्रसिद्ध राठोड घराण्याचे प्रमुख वंशज सर जशवंतसिंग व त्यांचे बंधु कर्नल सर प्रतापसिंह यांनीं महाराजांचें स्टेशनवर स्वागत केलें. येथेंच त्यांची प्रथम मैत्री जडून ती आमरण टिकली. पौरुषाबद्दल व मर्दानी खेळाबद्दल ख्याति असलेल्या जोधपूर येथें महाराजांना शिकारीचे पुष्कळ धडे मिळाले. हे धडे त्यांनीं उत्साहानें व लक्षपूर्वक घेतले. महाराजांना जन्मभर प्रिय असलेल्या खेळांपैकीं डुकराची शिकार ही एक होय. येथील डुकराच्या शिकारीच्या दिवसाचें वर्णन या सफरीच्या लेखकानें पुढीलप्रमाणें केलें आहे:—" ज्याबद्दल या स्थळाची प्रसिद्धी आहे. असा खेळ ह्मटला ह्मणजे डुकराची शिकार होय. हल्लींच्या काळीं यासारखी शिकार हिंदुस्थानांत दुसरीकडे सांपडणें अशक्य आहे; ह्मणून आमचें या गोष्टी-

कडे विशेष लक्ष लागून राहिलें होतें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पांच वाजतां सर प्रतापांनीं बोलावितांच आह्मी त्यांच्याबरोबर जाण्यास निघालों. शहरापासून तीन मैलांच्या अंतरावर राखून ठेवलेल्या रानांत पोंहचेतोंपर्यंत आह्मी वाहनांतच बसून गेलों. या शिकारी लोकांमध्यें युवराजमहाराज, कुमार व कांहीं तरुण रजपूत गृहस्थ होते. युवराज हा अकरा वर्षांचा सुंदर मुलगा असून त्याला उत्तमप्रकारें इंग्लिश बोलतां येतें. आह्मां सर्वांना उत्तम घोडे देण्यांत आले होते. या घोड्यांपैकीं बहुतेक घोडे, सर प्रतापांनीं स्वतः तयार केले असल्यामुळें त्यांना हवें तसें सहज वळवितां येत असें. या शिकारीची त्यांना संवयहि झालेली होती. रस्ता सोडून मैल दीड मैल गेल्यावर आह्मांस नापीक असें एक रेताड मैदान लागलें. याच्या पूर्वेकडील बाजूला सखल असा डोंगराळ प्रदेश असून, दुसऱ्या बाजूला एक विस्तीर्ण असें खुरटें जंगल होतें. याच जंगलांत डुकरें होतीं. कांहीं उंटावरच्या स्वारांखेरीज कोणी रान धरणारे तेथें नव्हते. डुकर त्यांच्यावर चाल करून जाते वेळीं त्यांना स्पर्श देखील करीत नसे, ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. आह्मांखेरीज बहुतेक सर्वजण, साऱ्या संस्थानमध्यें घोड्यावर बसण्यांत पटाईत असलेले सर प्रतापांचे ए० डी० सी० हिराजी यांच्या नेतृत्वाखालीं, रानांत शिरले व एका रांगेनें दौड करून एका आस्वलाला उठवून त्याला डोंगराळ प्रदेशाकडे हांकून लाविलें. नंतर आह्मींहि दौड केली. बुवासाहेबानें प्रथम त्याच्यावर चाल केली. परंतु विचारापेक्षां शौर्यानेंच त्यानें घोडा दामटल्यामुळें त्याचा नेम चुकून आस्वलानें त्याच्या घोड्याच्या मागच्यां पायांना मुसंडी मारून त्याला बहुतेक पालथा केलें होतें. दुसऱ्यांनीं त्याचा पाठलाग केला व सर्वांना आनंदाची गोष्ट ह्मणजे महाराजांचा भाला आस्वलाला प्रथम लागला. उत्तम प्रकारें लढून तें गतप्राण झालें. तें आकारानें बरेंच मोठें होतें. जंगलाच्या कांठाशीं येऊन आणखी एकाची वाट पहात आम्ही आपापल्या जागीं उभे राहिलों. परंतु या डुकराची उघड्या मैदानांत सामना देण्याची तयारी नसल्यामुळें तें बाहेर पडेना, ह्मणून रान धरणाऱ्यांना जाऊन मिळण्यासाठीं आह्मी तेथून निघालों. इतुपांत थोडीशी दौड करितांच डुकरानें एका झाडीचा आश्रय केला; परंतु सर प्रताप हे प्रसंगावधानी असून उत्तम शिकारी असल्यामुळें ते हताश होणारे नव्हते. त्यांनीं भाला फेंकून डुकराच्या छातींत घाव घातला. त्यामुळें डुकर जागच्या-जागींच मरून पडलें. यापेक्षां ज्यास्त डुकर सांपडण्यासारखे नसल्यामुळें,

झालेल्या शिकारीनें खूष होऊन, दुसऱ्या दिवशीं याहिपेक्षां अधिक डुकर सांपडतील अशी आशा करीत आह्मी मागें फिरलों. ”

यानंतर अलवारला जावयाचें होतें. अलवारच्या महाराजांना दारूचें घातुक व्यसन लागल्यामुळें कुमारांच्या तेथें जाण्याच्या वेळीं कांहीं शोचनीय प्रकार घडले. त्यानें या व्यसनापासून परावृत्त व्हावें अशी राजकीय अधिकाऱ्यांची इच्छा असल्यामुळें महाराजांवर देखरेख करण्यासाठीं व त्यांचें दारूचें व्यसन घालविण्यासाठीं कुंजविहारी नांवाच्या गृहस्थाची नेमणूक केली होती. याचा असा परिणाम झाला कीं, या महाराजानें मेजर रामचंद्र नांवाच्या आपल्या हस्तकाकडून विहारीचा खून करविला व दुसऱ्या दिवशीं खुनी मनुष्याच्या हस्तें नव्हें तर भयंकर मद्यपानामुळें या महाराजालाहि तीच वाट धरावी लागली! ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं या प्रकरणाची चौकशी करून खुनाच्या आरोपावरून रामचंद्र व त्याचा लेफ्टेनंट किसनसिंग यांच्यावर खटला केला. कोल्हापूरचें कुमारमंडळ अलवारला पोंचण्यापूर्वीच या दोन आरोपींना फांशीच्या शिक्षा फर्मावण्यांत आल्या होत्या. फ्रेजरसाहेब ह्मणतात कीं, एक ब्रिटिश अधिकारी आसपासच्या एका संस्थानिकाशीं यासंबंधीं बोलत असतां, असलीं कामें करण्यास 'विषप्रयोग' हें नेहमींचें साधन असल्यामुळें, शस्त्रांचा उपयोग करणें खरोखर भयंकर आहे,' असें संस्थानिकानें त्या अधिकाऱ्यास सांगितलें !

भरतपूरच्या ज्या सुप्रसिद्ध किल्ल्यासमोर लॉर्ड लेकला आपल्या पराक्रमाची पराकाष्टा करावी लागली, तेथें राजकुमार ता. १२ रोजीं दाखल झाले. आपल्या भागांतील संस्थानिकांच्या लष्करी व्यवस्थेसंबंधीं महाराजांना जी माहिती होती तिच्याशीं तुलना केली असतां, राजपुतान्यांतील संस्थानें बरींच पुढें गेलेलीं आहेत, असें येथें महाराजांच्या नजरेस आलें. परंतु रस्ते, शाळा, हॉस्पिटलें इत्यादि लोकोपयोगी संस्थांच्या बाबतींत कोल्हापूर व दक्षिण महाराष्ट्रसंस्थानें उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानांपेक्षां फार पुढें गेलीं आहेत, असा महाराजांनीं तत्काळ आपला अभिप्राय दिला. यानंतर दिल्लीला जाऊन त्यांनीं चांगलीच शिकार केली. तेथून रस्त्यांत गोवर्धनपर्वत करून ते मथुरेला गेले. या पर्वताशीं असतांना 'कोल्लाहल' करणाऱ्या ब्राह्मण भिक्षुकांचा आह्मांभोंवतीं जणूं गराडाच पडला ! एका गोष्टींतील रशियन शेतकऱ्यानें आपला पाठलाग करणाऱ्या लांडग्यांना भक्ष्य ह्मणून ज्याप्रमाणें त्यांच्या रोंखावर एक लहान मूल फेंकलें, तद्वत् या

भिक्षुकांना थोपवून धरण्यासाठीं हातांत थोडी तांब्याचीं नाणीं देऊन वृद्ध गोरख-ल्यांना आह्मीं त्यांच्या तोंडांवर फेंकिलें. या अवधींत महाराजांनीं कशीबशी गाडी गांठली. भिक्षुकांचा उपद्रव आतां जोरांत सुरू झाला. मथुरेच्या घाटावर महाराजांनीं काय काय करावयाचें असतें, तें महाराजांना निवेदन करण्यासाठीं ह्मणून आलेले पंडे लोक भरतपुरापासून दिल्लीपर्यंत टांग्यांतून आमचा पाठलाग करीत होते.

"मथुरेला घडलेली अत्यंत महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे तेथील आर्यसमाजानें महाराजांना मानपत्र दिलें ही होय. अशाप्रकारें या समाजाचा महाराजांशीं जो संबंध जडला, त्यामुळें त्यांच्या भावी आयुष्यक्रमावर महत्वाचे परिणाम घडले. यानंतर वृंदावन लागलें. काशीच्या ब्राह्मणांपेक्षां येथील भिक्षुकांच्या झुंडीच्या झुंडी आरडाओरड करीत मोठ्या चिकाटीनें महाराजांवर तुटून पडल्यामुळें, आमच्या स्वास्थ्यावर बरेंच विरजण पडलें. या पंडेलोकांचा घोळका इतका त्रासदायक झाला कीं, " महाराजांच्या आवारांतून पंडे लोकांना हांकून लावण्यासाठीं पोलीसचा पहारा ठेवणें मला जरूर वाटलें. वृंदावनाला येणाऱ्या प्रत्येक राजानें देवदर्शनाच्या वेळींसुद्धां आपल्या बरोबर शिपाई घ्यावेत, अशी माझी शिफारस आहे. कारण अर्धचंद्र दिल्याखेरीज हे कोलाहल करणारे लोक मागें घेणार नाहींत. आह्मीं आमच्या वाहनांचा आश्रय केला असतांनादेखील त्यांच्या तावडींतून सुटण्यासाठीं मूठभर तांब्याचीं नाणीं त्यांच्या तोंडावर फेंकून तीं घेण्यासाठीं त्यांची आपापसांत लठ्ठालठ्ठी जुंपली असतां, कसाबसा पुढचा मार्ग काढावा लागला. महाराजांच्या सहीचा मान आपला आहे, असा हक्क सांगणाऱ्या दोन पंड्यांमध्यें एक मनोरंजक प्रश्न उपस्थित झाला. नाशिक, प्रयाग, काशी व हरिद्वार इत्यादि क्षेत्रांत वंशपरंपरागत भिक्षुकांचीं कुटुंबांचीं कुटुंबें वसलीं असून, रावापासून रंकापर्यंतचा प्रत्येक प्रवासी, ज्या भिक्षुकांच्या पूर्वजांनीं त्याच्या पूर्वजांचे धार्मिक विधि केले होते, अशाकडेच जातो. स्नानाच्या वेळचे विधी बरेंच किफायतशीर असल्यामुळें हे भिक्षुक आपल्या कुळांच्या नांवाच्या याद्या फार जपून ठेवितात. ह्मणून महाराजांच्या व भाऊसिंगजीच्या हजाम, पाणक्यांनासुद्धां त्यांच्या मालकांप्रमाणेंच त्यांच्या त्यांच्या भिक्षुकांनीं शोधून काढून पकडलें. दोन भिक्षुक, एक महाराजांच्या जनक वडिलांच्या ( कै० आबासाहेब ) सहीवरून व दुसरा, सातारच्या एका गतकालीन राजानें आपल्या पूर्वजांस जमिनीची

सनद करून दिली होती या सबबीवर, महाराजांवर हक्क सांगूं लागले ! या सनदे-वरील नांव व तारीख त्या वेळीं ओळखण्यासारखी नव्हती, ह्मणून या प्रश्नाचा निकाल सन १७३० सालीं, ज्या वेळीं कोल्हापूरची गादी सातारच्या गादीपासून अलग झाली, यानंतर किंवा यापूर्वीं ही सनद देण्यांत आली होती, या प्रश्नाच्या निकालावर अवलंबून ठेवण्यांत आला. शिवाजीच्या वंशाच्या दोन शाखा अलग होण्यापूर्वीं जर ही सनद देण्यांत आली असेल तर या पंड्यास महाराजांवर हक्क सांगतां येईल; परंतु ही सनद यानंतरची जर असेल तर त्याचा कोल्हापूरच्या छत्रपतीशीं कांहीं संबंध उरत नाहीं. कुमार हे यात्रेकरू नसून, प्रवासी आहेत, अशी भिक्षुकांची समजूत करून देणें दुरापास्त होतें. याच दर्जाच्या इतर हिंदु यात्रेकरूंनीं जी अवाढव्य खैरात केली त्या मानानें मीं अगदींच हात आंखडतां घेतल्यामुळें त्यांनीं माझ्यावर शिव्यांची लाखोली वाहिली असली पाहिजे. ”

“ सहाराणपूर व हरिद्वार करून हें कुमारमंडळ ता० २२ रोजीं अमृतसरला दाखल झालें. सुवर्ण—मंदीर, शाली व इतर लोकरी जिनसाकरितां प्रसिद्ध असलेला बाजार पाहून झाल्यावर ते पेशावरला निघाले. तेथें ते ता० २४ रोजीं संध्याकाळीं ४ वाजतां पोंचले. या सफरीपासून हिंदुस्थानची सरहद्द हें काय गौडबंगाल आहे, याची महाराजांना चांगलीच कल्पना आली. येथें एक आठवडा घालवून कुमार लाहोरला परतले. शापडेरा व किल्ला यांसारखीं तेथील ऐतिहासिक स्थळें पाहण्यांत तीन दिवस घालवून ते मुलतानला आले. या ठिकाणचा अत्यंत मनोरंजक देखावा ह्मटला ह्मणजे “ एक चिमुकला कारागीर एका साध्या पांढऱ्या मृत्तिका पात्रावर रंग भरीत होता हा होय. सुरेखसा एक केसाळ ब्रश घेऊन, आपल्या वंशपरंपरागत व स्वाभाविक कौशल्यानें, आह्मी सही करितों इतक्या त्वरेनें, व अचूकपणें त्यानें गुंतागुंतीचें एक चित्र त्याच्या-वर काढलें. ता० ७ रोजीं सकाळीं ९ वाजतां आह्मी सक्करला पोंचलों. येथें पाहण्यासारखा काय तो एक भव्य पूल आहे. सिंधला जाण्यांत देखावे पाहणें हा हेतु नसून शिकार करणें हा प्रमुख हेतु होता. तेथें गेल्यावर पहिली गोष्ट ह्मटली ह्मणजे आमच्याजवळ ज्यांची शिफारस करण्यांत आली होती, अशा बहादूर अलीसाहेब नांवाच्या वृद्ध शिकाऱ्याला आह्मीं बोलावून आणिलें व शिकार मिळण्याचा तेथें कितपत संभव आहे, याची चौकशी केली, ही होय. बदकांचा व बगळ्यांचा हा काळ नव्हता; परंतु ए.नो-अकील येथें कांहीं काळीं कबुतरें

सांपडतील अशी त्यानें थोडीशी आशा दाखविली. हें ठिकाण रेल्वेलाइनवर दोन स्टेशनें इतक्या अंतरावर होतें. तेथें उंटाची व रान धरणाऱ्यांची तयारी ठेवण्यास तारेनें कळवून, ता० ८ रोजीं आह्मी सकाळीं निघालों. ज्यांच्या रानांत आह्मी शिकार करणार होतों, ते मुखत्यारकर व जमीनदार अबदुल कदर हे महाराजांना स्टेशनवर भेटले. तेथून उंटावर बसून आह्मी दोन मैल अंतरावर असलेल्या रानांत गेलों. तेथें मधून मधून शेतीमध्यें एका जातीच्या झाडांचीं झुडपेंच झुडपें दिसून येत होतीं. शिकारीची जागा जमीनदारानें राखून ठेविली आहे. हे प्रतिष्ठित गृहस्थ असून सबंध इलाख्यांत नसले तरी निदान या भागांत ते बड्या लोकांत मोडतात. आपण कित्येक गव्हर्नरांना व सेनापतींना शिकार करून दाखविली, ह्मणून ते आह्मांस मोठ्या अभिमानानें सांगत होते. पक्षी पुष्कळ असल्यामुळें दोनप्रहरापर्यंत आह्मांला पक्ष्यांच्या वीस जोड्या व कांहीं ससे सांपडले.''

हैद्राबादला जाण्याकरितां निघून ता० १० रोजीं कोत्री ओलांडून दुसऱ्या दिवशीं हें कुमारमंडळ जंगाशाईला दाखल झालें. सट्टा येथें त्यांना उंटावर बसून प्रवास करावा लागला. या प्रकारचा कुमारांचा हा पहिलाच अनुभव होय.

'' दुसऱ्या दिवशीं हरणांसाठीं रान धरण्यांत आलें. या प्रकारचीं हरणें महाराष्ट्रांत आढळत नाहींत. ह्मणून एकादें हरण पकडण्यासाठीं आह्मी फार आतुर झालों होतों. जंगलाच्या विस्तीर्ण अशा भागांत दोनदां जरी रान धरण्यांत आलें तरी एकहि हरण उठलें नाहीं. परंतु डुकरें मात्र पुष्कळशीं होतीं व महाराजांना व दत्ताजींना त्यांपैकीं एक एक सांपडलें. सिंधचे अमीर राखलेल्या रानांत हरणांचे कळप जमूं देतात. व तेथून त्यांना हुसकावण्यांत आल्यानंतर कुंपणाला राखलेल्या तोंडावाटें तीं बाहेर पडूं लागलीं ह्मणजे ते त्यांची शिकार करितात. या हरणांच्या आवाजासारखाच आवाज काढून, त्यांची शिकार करण्याची इकडे एक पद्धत आहे. हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि जातीच्या हरणांची अशाप्रकारें शिकार करण्यांत येत नाहीं, अशी माझी समजूत आहे. या पद्धतीनें शिकार करण्यांत फारच थोड्या शिकारी लोकांनीं व साहेबांनीं प्राविण्य संपादिलें आहे. आह्मी परत येते वेळीं बाभूळवृक्षांचें आह्मांस मोठें अरण्य लागलें. सिंधमध्यें याच झाडाची वाढ विशेष होते. सुजवाला येथील शेवटचा दिवस नदकांची शिकार आणखी एकदां करण्यांत घालविला.

शिकारी लोक विभागून दोन बोटींत बसले. जेथें शेती जलमय झाली होती अशा उघड्या प्रदेशांत हा प्रयत्न करण्यांत आला. परंतु पूर्वीप्रमाणें आतांहि बदकें विशेष नसल्यामुळें एकाद दुसरा बार काढण्यापलीकडे आह्मांस कांहीं करितां आलें नाहीं. परंतु संध्याकाळ होऊन पक्षी इकडे तिकडे उडूं लागतांच आह्मांला कांहींशी मजेदार अशी उडती शिकार करितां आली.

"ता. १५ रोजीं कराचीला जाण्याकरितां कुमारमंडळ गाडींत बसलें. तें कराचीला दुसऱ्या दिवशीं पोंचलें. स्टेशनवर ना० उदेराम मूलचंद यांनीं महाराजांचें स्वागत करून, मेरीवेदर बगीच्यांतील सरकारी बंगल्यांत त्यांनीं महाराजांची उतरण्याची व्यवस्था केली. विशेषतः कोल्हापूरच्या कुमारांना हें घर मनोवेधक वाटलें. कारण या घरांतील खोल्यांच्या विशिष्ट रचनेवरून कुमारांना येथें मराठा पद्धतीची ओळख पटली. चिमासाहेबांची हद्दपारी झाली असतां ते या बंगल्यांत राहत असत, असें कुमारांना मागाहून समजून आलें."

आरबी समुद्रांतून दोन दिवस प्रवास केल्यानंतर, कोट, हिंदीशहर व मलबार हिल, यांच्याशीं आपली झालेली जुनी ओळख ताजी करण्यासाठीं हें कुमारमंडळ मुंबईला दाखल झालें. महाराजांनीं आतां आपला मायदेश बहुतेक सर्व पाहिला असून, हिंदुस्थान व सीलोनमधील बडींबडीं शहरें पाहून जेव्हां ते परत मुंबईला आले, तेव्हां " सौंदर्यांत व विविध मनोवेधक गोष्टींत मुंबईशीं तुलना करण्यासारखें कोणतेंच शहर नाहीं." असें त्यांनीं आनंदानें कबूल केलें. या शहरांत त्यांना चित्ताकर्षक अशी गोष्ट झटली ह्मणजे, आरबांचे तबेले व वालर घोडे हे होत. हे पाहण्यांत त्यांनीं तासाचे तास घालवून आपल्या संस्थानाकरितां त्यांपैकीं कांहीं घोडे त्यांनीं खरेदी केले. पुणें त्याच दिवशीं रात्रीं गांठून, दुसऱ्या दिवशीं सकाळीं मिरज, दोनप्रहरीं बेळगांव करून, पांच वाजतां नाताळच्या सुमारास हें कुमारमंडळ परत आपल्या बिऱ्हाडीं आलें.

नवीन वर्ष सुरू होतांच मि० (आतां सर) रघुनाथ व्यंकाजी सबनीस महाराजांचे आमरण स्नेही व विश्वासुक दिवाण हे आपल्या भावी मालकाचे हिंदी शिक्षक ह्मणून धारवाडला दाखल झाले. याच जागेवर आतांपर्यंत काम करीत असलेले मि० कृ. भि. गोखले गतवर्षाच्या प्रारंभापासून रिटायर होण्यास उत्सुक झालेले होते. १८९३ सालीं होऊं घातलेल्या महाराजांच्या विलायतेच्या सफरीच्या वेळीं महाराजांचे हिंदी सहचारी होण्यास, पात्र असलेल्या कोणाची तरी त्यांच्या जागीं नेमणूक

व्हावी अशी फ्रेजर साहेबांनीं मागणी केली होती. पुढें जरी ही सफर करण्याचा बेत सोडून देण्यांत आला, तरी त्या वेळीं ठाणें हायस्कूलचे ॲक्टिंग हेड मास्तर म्हणून काम करीत असलेले मि० सबनीस यांची महाराजांच्या तैनातींत मि० गोखले यांच्या जागीं नेमणूक झाली. या रिटायर होणाऱ्या शिक्षकाविषयीं फ्रेजर साहेबांनीं पुढीलप्रमाणें आपला अभिप्राय व्यक्त केला होता:— " मि० गोखले हे महाराजांना अगदीं लहानपणापासून ओळखतात; त्यांच्या प्रकृतीविषयीं व शिक्षणाविषयीं त्यांनीं मनःपूर्वक सतत काळजीहि वाहिली. हे फारच चांगल्या वर्तनाचें गृहस्थ असून, दयाळू परंतु कडक शिस्तीचे चहाते, अति जुन्या पद्धतीचे कट्टे भक्त तथापि उदात्त विचाराचे, असे होते. आपला शिष्य पुढें कसा निपजावा या विषयींचें त्यांचें ध्येय फार उच्च होतें. " मि० सबनीस हे १८९३ च्या जानेवारी महिन्यांत कामावर हजर झाले. धारवाड येथें टर्मचा कार्यक्रम पार पडल्यानंतर कुमारांनीं उन्हाळयाच्या सुटीचे दिवस महाबळेश्वरला घालविले. सुटीपूर्वी धारवाडला असते वेळीं महाराज मध्यंतरीं थोडे दिवस चिंचलीची यात्रा व लॉर्ड हॅरिस साहेबांनीं उघडलेलें जनावरांचें प्रदर्शन पाहण्यासाठीं गेले होते. महाराजांच्या अभ्ययन काळाच्या शेवटच्या वर्षाची दुसरी टर्म ता. १५ नोव्हेंबरला पुरी झाली. ही टर्म संपल्यानंतर, महाराजांनीं आपल्या स्वतःच्या राज्यांत फिरण्यास सुरवात केली. महाराजांच्या हातीं सर्व अधिकारसूत्रें हवालीं करण्याचा आपला मनोदय सरकारनें यापूर्वीच जाहीर केला असल्यामुळें, या प्रसंगीं आपल्या संस्थानची स्थिति प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा महाराजांना होणें, अगदीं स्वाभाविक होतें.

"हातकणंगलें, इचलकरंजी, शिरोळ, कुरुंदवाड, निपाणी ( जि० बेळगांव ), गडहिंग्लज, अजरें, धनगरमाळ, गारगोटी, वाकी, दाजीपूर व आंबोली इत्यादि स्थळें महाराजांनीं प्रत्यक्ष जाऊन पाहिलीं. अशाप्रकारें प्रमुख मांडलिकांच्या अंमलाखालील कांहीं प्रदेश त्याचप्रमाणें या प्रदेशाची विविधता, पूर्वेकडील काळया जमिनीचीं मैदानें व कोल्हापूरसंस्थानांतील सह्याद्रीचा डोंगराळ प्रदेश, महाराजांना पाहतां आला. कचेऱ्या, शाळा व रुग्णालयें पाहण्यास महाराजांनीं या संधीचा चांगला फायदा घेतला. त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या अधिकाऱ्यांच्या ओळखी करून घेऊन त्यांच्याशीं त्यांच्या खात्याच्या गोष्टींविषयीं चर्चा केली. जेथें तेथें जहागिरदार व रयतलोकांनीं महाराजांचें मोठया उत्साहानें स्वागत केलें. पन्नास वर्षांनंतर प्रथमच आलेल्या कोल्हापूरच्या तरुण छत्रपतींना पाहण्यासाठीं लोक लांबलांच्या अंतरावरून येत होते.

" गेल्या वर्षांत महाराजांनीं व त्यांच्या बंधूंनीं ज्या विषयांचें अध्ययन केलें, त्यासंबंधानें सांगावयाचें ह्मणजे, राज्यपद्धति व कायदेकानूंचीं सर्वसाधारण तत्त्वें व राज्यकारभाराच्या निरनिराळ्या शाखांचें नियमन करणारे नियम यांचें ज्ञान त्यांना व्हावें हा हेतु पुढें ठेवून आह्मी त्यांना शिकवीत होतों. "

येथें महाराजांच्या उमेदवारीचा काळ संपला. आतांपर्यंत त्यांचा ज्या ज्या मनुष्याशीं संबंध आला त्याच्याशीं ते आपल्या सर्व आयुष्यांत प्रेमानें राहिले. यामध्यें जर निवडानिवड करावयाची असेल, तर मि० ( आतां सर ) एस्. एम्. फ्रेजर यांना प्रमुख स्थान दिलें पाहिजे. ते जितके सदय अंत:करणाचे होते, तितकेच ते शिस्तीचे कडक पुरस्कर्ते होते.

मि. फ्रेजर यांच्या शिक्षणाचा त्यांच्या शिष्याच्या मनावर कायमचा परिणाम झाला. या शिष्यालाहि आपल्या गुरूविषयीं पराकाष्टेचा आदर व प्रेम वाटत असे. महाराजांचा अध्ययनाचा काळ एकंदरींत लक्षांत घेतां महाराजांना या अवधींत जो विविध प्रकारचा अनुभव आला त्याचा महाराजांच्या मनावर इष्टच असा परिणाम झाला. मानवी आयुष्यांत सहानुभूतीची थोरवी केवढी असते व तिच्या अभावामुळें महाराजांच्या दर्जाच्या कमारांचें देखील जीवित किती कष्टमय होतें, याची त्यांना चांगलीच कल्पना आली. आपल्या सर्व आयुष्यभर महाराजांच्या ठायीं कष्टमय व साध्या आयुष्यक्रमाबद्दल जें प्रेम दिसून येत होतें, त्याचें कारण अंशतः तर त्यांच्या शिक्षणकाळीं त्यांना मिळालेला हा अनुभव, हें होय. महाराजांचें अंत:करण तयार होण्यास जीं अनेक कारणें झालीं, त्यांमध्यें मि. फ्रेजरसारख्या मनुष्याची सहानुभूति व इतरांची कठोरहृदयी बेपर्वाई या दोहोंतील महदंतराचा महाराजांना आलेला अनुभव हा कमी महत्वाचा मानतां येणार नाहीं. महाराजांच्या ठायीं या आपल्या शिक्षकाविषयीं जी पराकाष्टेची भक्ति वसत होती, ती अनेक मार्गांनीं दृष्टोत्पत्तीस आली. मि. फ्रेजर यांनीं आपल्या नृपछात्राला कोल्हापूर येथें सोडल्यानंतर ह्मणजे महाराजांनीं राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतल्यावर मि० फ्रेजर यांना कांहीं गुरुदक्षणा देण्यासाठीं सरकारची संमति मिळविण्याकरितां पराकाष्टेचे प्रयत्न केले, परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. आणि सिव्हिल सर्व्हिसचे नियम या गोष्टीला आड आल्यामुळें महाराजांना हा विचार सोडून द्यावा लागला.

---



१६ र्षांचे महाराज.




सर एस्. एम्. फ्रेजर, के. सी. आय. ई.

# प्रकरण ६ वें.

# अधिकारी वर्गांतील घडामोड.




रीख २ एप्रील सन १८९४ या दिवशीं श्रीछत्रपति शाहूमहाराजांच्या हातीं सर्व अधिकारसूत्रें हवालीं करण्यांत आलीं. या अधिकारदानानिमित्त जो महोत्सव झाला, तो या ऐतिहासिक महत्त्वाच्या प्रसंगाला अनुरूप असाच होता. अखिल महाराष्ट्रांतील हिंदी व ब्रिटिश जनसंमर्द हा महोत्सव पाहाण्यासाठीं कोल्हापुराला लोटला. कोणत्याहि प्रकारच्या जातिविशिष्ट भावना मनांत न आणतां, केवळ कोल्हापूरच्या जनतेचींच नव्हे तर अखिल महाराष्ट्रांतील लोकांचीं अंःतकरणें आनंदातिशयानें या वेळीं उचंबळून गेलेलीं होतीं. कित्येक वर्षेपर्यंत दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून मोकळया पडलेल्या शिवरायाच्या वंशजाच्या गादीवर योग्य असाच नृपति आतां बसणार, ही एकच गोष्ट लोकांचीं अंतःकरणें हालवून सोडण्यास पुरेशी होती. ज्यांचा ज्यांचा ह्मणून महाराजांशीं प्रत्यक्ष संबंध आला होता, त्यांचीं मनें महाराजांनीं आपल्या स्वाभाविक साधेपणामुळें सहज आपणाकडे ओढून घेतलीं होतीं. अधिकारसूत्रें आपल्या हातीं घेण्यापूर्वींच महाराजांचें विलायतेला प्रयाण होणार या कल्पनेमुळें लोकांचीं मनें कांहीं दिवस साशंक झालेलीं होतीं; विलायतेला महाराज जाऊन आल्याशिवाय त्यांना अधिकार मिळत नाहीं, ही शंका लोकांत पसरल्याबरोबर चोहोंकडे जें असमाधान पसरलें, त्यावरून महाराजांनीं छत्रपति पदाचे अधिकार लवकर स्वीकारावे ह्मणून लोक किती उत्सुक झाले होते, हें स्पष्ट दिसून आलें. महाराजांच्या विलायतेच्या सफरीमुळें कांहीं अकल्पित अशा नवीन अडचणी उपस्थित होऊन जनतेची पुन्हां निराशा होईल अशी या वेळीं पुष्कळांना, निराधार का होईना, पण भीति वाटत होती. अशा प्रकारची जनतेची मनःस्थिती लक्षांत घेऊनच त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिससाहेब यांनीं अधिकारदानानिमित्त जो

दरबार भरविला त्या प्रसंगीं पुढील उद्गार काढिले:— " अमरकीर्ति शिवरायापासून आपणाला व आपल्या पूर्वजांना वंशपरंपरागत आलेल्या गादीवर आरूढ होण्यासाठीं जेव्हां आपणांस सार्वभौम सरकारनें पसंत केलें, त्या वेळीं कोल्हापूरच्या प्रजाजनांना जें आश्वासन देण्यांत आलें होतें, त्याची परिपूर्तता करण्याचा मान माझ्या अमदानींत मुंबईच्या गव्हर्नराकडे आला, हें पाहून मोठी धन्यता वाटते. जवळ जवळ तीस वर्षांच्या अवधींत महाराज, आपल्या घराण्यावर जी दुर्दैवपरंपरा ओढवली, त्यामुळें या संस्थानांतील प्रजाजनांना, छत्रपतीचे हक्कदार वंशज सिंहासनावर आरूढ होऊन त्यांच्या अमदानीस केव्हां सुरुवात होईल, असें होऊन गेलें आहे, या गोष्टीची मला पूर्ण जाणीव आहे. "

या महोत्सवानिमित्त जो कार्यक्रम ठरलेला होता, त्यामध्यें महाराजांनीं आपलें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. महाराजांना उत्तरादाखल भाषण करितांना नेक नामदार गव्हर्नरसाहेब ह्मणाले:—

" आपल्या भाषणाचा बाणेदारपणा व सहानुभूतीनें ओथंबलेला त्यांतील उत्कृष्ट गर्भितार्थ पाहून श्रोत्यांचें समाधान झाल्याशिवाय राहणार नाहीं, याची मला खातरी आहे. आपल्या प्रजाजनांशीं यथायोग्य रीतीनें वागून त्यांच्या हिताच्या क्षुल्लक बाबतींत देखील आपण लक्ष घातल्याखेरीज राहणार नाहीं, अशी या भाषणावरून त्यांची खातरी झाली असेल. मी या इलाख्यांत पाय ठेवल्यापासूनच मला आपला परिचय घडला, हें मी आपलें सुदैव समजतों. आपल्या मानसिक शक्तीचा झालेला विकास आणि सार्वजनिक प्रश्नांसंबंधानें आपण दाखविलेली आस्था, हीं पाहून आणि आपल्याशीं केलेल्या चर्चेंत अशा विषयांबद्दलचीं जीं स्पष्ट मतें आपण बनविलीं आहेत, त्यांचा विचार करून मला मनापासून आनंद होत आहे. आतां आपल्या अंगावर जें जबाबदारीचें काम पडणार आहे, त्यांत देखील आपण याच गुणांचा विकास करून जेव्हां प्रजाजनांच्या हितासंबंधाचे प्रश्न आपणापुढें निर्णयासाठीं मांडण्यांत येतील, त्या वेळीं आपण समतोल न्यायबुद्धीच व्यक्त कराल, असें यावरून मी भाकीत करितों. "

अशा प्रकारचे उत्सव चालले असतांनाच, महाराजांनीं पुढील जाहीरनामा काढला:—

" आमचे प्रजाजन सदा सुखी व संतुष्ट असावे, त्यांच्या हितसंबंधाची एकसारखी अभिवृद्धि होत जावी व आमच्या संस्थानचा सर्व बाजूंनीं अभ्युदय



१८९४ सालांतील महाराज.

व्हावा, अशी आमची उत्कट इच्छा आहे. हा उद्देश सफल होण्याच्या कामीं आमचे जहागीरदार, आप्तजन, सरदार, मानकरी, इनामदार, कामदार सर्व दर्जाचे शेटसावकार व इतर प्रजाजन यांच्या उज्ज्वल राजनिष्ठेची व सहकार्याची आह्मांस आवश्यकता आहे. आज आमच्या आमदानीस सुरवात होणाऱ्या दिवशीं, आमचा राज्यकारभार दीर्घकाळपर्यंत टिकून तो सुखद व्हावा, ह्मणून आह्मी त्या परात्पर जगच्चालकाच्या अनुग्रहासाठीं प्रार्थना करितों."

हे विविध समारंभ आटोपल्यानंतर महाराजांनीं सर्व परिस्थितीचें निरीक्षण करून आपलें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं काय उपाययोजना करावी लागेल, याचा विचार करण्याकडे लक्ष पुरविलें. गादीवर बसल्याबरोबर आपले पाय जमिनीस लागण्याकरितां प्रत्येक हिंदी संस्थानिकाला प्रथम खबरदारी घेणें भाग पडतें. याचा खरा अर्थ काय ? जमिनीवर आपले पाय स्थिर करण्यासाठीं त्याला काय अडचणी भोगाव्या लागतात, याची यथार्थ कल्पना हिंदी संस्थानांतील परिस्थितीशीं परिचय नसलेल्या गृहस्थाला होणें शक्य नाहीं. अंतःस्थ कारभाराच्या बाबतींत संस्थानि-काला कर्तुमकर्तुम् असे अधिकार असतात, ही गोष्ट खरी आहे. या सत्तेची केव्हां केव्हां झारशाहीच्या ऐन भरभराटीच्या स्थितीशीं तुलना करण्यांत येते; दोघांत फरक इतकाच कीं झारप्रमाणें आमच्या संस्थानिकांवर परराष्ट्रीय राजकारणाची जबा-बदारी पडत नाहीं. कायद्याच्या दृष्टीनें पाहतां हिंदी संस्थानिकावर परराष्ट्रीय गोष्टीची कोणत्याही प्रकारची जबाबदारी नसल्यामुळें व त्यांच्यावर कोणत्याही प्रातिनिधिक संस्थेचेंहि नियंत्रण नसल्यामुळें, आपल्या संस्थानापुरते ते पूर्ण सत्ताधारी असतात, असें दिसतें, परंतु अतिशय अनियंत्रित दिसणारा नृपतीहि अतिशय निर्बल असतो, अशी जी एक ह्मण आहे, ती जर कोठें यथायोग्य लागूं पडत असेल, तर ती हिंदी संस्थानिकांनाच होय. वाळूच्या डळमळीत पायावर ही सत्ता उभारली असल्यामुळें, स्वाभाविकपणें ती अतिशय कमकुवत अशी असते. नृपसत्तेची शाश्वति ही केव्हांही राज्याच्या बाहुबलावर अवलंबून असते; परंतु हा नियम हिंदी संस्थानिकाला मुळींच लागूं पडत नाहीं. राजकारणशास्त्रावरील कित्येक ग्रंथकारांच्या मताप्रमाणें, जनतेची इच्छा ही राजकीय सत्तेचें उगमस्थान समजली जाते. परंतु ज्या संस्थानावर एकादा नृपति राज्य करितो, तेथें लोक-मताला बिलकूल अवसर मिळत नाहीं; व एकाद्या बिकट प्रसंगीं या लोकमताचा आपणास पाठिंबा मिळेल अशीहि हिंदी संस्थानिकांना आशा असत नाहीं.

तात्विक दृष्टया नसलें तरी व्यावहारिक दृष्टया, सार्वभौम सत्तेच्या आधारावरच हिंदी संस्थानिकांची सत्ता अवलंबून असते. व या सार्वभौम सत्तेच्या प्रतिनिधींची त्यांजवर मेहेरनजर असेतोंपर्यंतच, ती त्यांच्या हातीं राहूं शकते. अगदीं उघड दिसणाऱ्या या विचित्र व असमाधानकारक परिस्थितीला संस्थानिकांची सध्यांची पिढी कारणीभूत झाली नसून किंवा सम्राटाची सत्ता गाजविणाऱ्या अधिकारी लोकांची अरेरावी ही देखील याचें कारण नसून, आमच्या संस्थानांच्या गतकालीन ऐतिहासिक परिस्थितींमुळेंच ती उद्भवलेली आहे. व स्वतंत्र रीतीनें राजकीय सत्ता उपभोगण्याचा जर हिंदुस्थानांतील कोणत्या संस्थानाला नीतिदृष्टया अधिकार असेल तर तो कोल्हापुरालाच होय. हिंदुस्थानांतील कांहीं मुसलमानी संस्थानांप्रमाणें परकीय मुलुखावर हल्ले करून हें संस्थान निर्माण झालेलें नाहीं. किंवा कोल्हापूरच्या सरहद्दीवरील कांहीं छोटया संस्थानांप्रमाणें अवनत झालेल्या साम्राज्याची मूळ सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र होऊं पाहणाऱ्या साम्राज्याच्या नोकरांनीं बेइमानपणाच्या आधारावर उत्पन्न केलेलें कोल्हापूर हें संस्थान नव्हे. बाहुबलाच्या जोरावर परक्या लोकांवर गुलामगिरी लादून हें संस्थान अस्तित्वांत आलेलें नाहीं. अशाप्रकारचीं उदाहरणें गुजराथ व माळवा प्रांतांतील मराठा राज्यांत सांपडतील. वस्तुत: कोल्हापुराचें राज्य हें तेथील लोकांच्या इच्छेनेंच अस्तित्वांत आलेलें आहे. कोल्हापूरसंस्थान हें मराठा राष्ट्राच्या पराक्रमाचें मूर्त स्वरूप होय. दुसऱ्या संस्थानांना अशा प्रकारचें नैतिक पाठबळ नसतांनाहि तीं दर्जानें उच्चतर गणलीं जातात व कोल्हापुराला मात्र हिंदुस्थानांतील संस्थानांच्या मालिकेंत अस्पृहणीय असें स्थान प्राप्त झालें ! अशा प्रकारची हीन स्थिति प्राप्त होण्याचीं कारणें कोल्हापुराच्या इतिहासांतच सांपडूं शकतील.

शिवरायाच्या पवित्र घराण्यानें पुनीत झालेल्या कोल्हापूरच्या प्राचीन गादीवर जेव्हां महाराज बसले, तेव्हां दुसऱ्या प्रकरणांत नमूद केलेल्या कारणास्तव कोल्हापूरची इभ्रत बरीच खालावलेली होती. रीजन्सी किंवा कौन्सिलच्या अनेक वर्षांच्या कारभारामुळें कित्येकांच्या चढेलपणाला व महत्वाकांक्षेला अतिशय जोर आलेला होता. हा चढेलपणा कित्येक वर्षें अप्रतिहत चालूं राहिल्यामुळें संस्थानिकांची स्थिति बरीच नाजूक झाली होती. पहिल्या प्रतीच्या हिंदी संस्थानिकाच्या अधिकारांना व मानमरातबाला पारखे होऊन, आपण एका विशिष्ट वर्गाच्या व वर्चस्वाच्या घेऱ्यांत पूर्णपणें सांपडलों आहोंत,

असें महाराजांच्या निदर्शनास तात्काल येऊन चुकलें. या वर्गाची अरेरावी इतकी बोकाळलेली होती कीं, त्यांना आपली सत्ता ही निसर्गदत्त असून नूतन नृपतीच्या अमदानींत देखील ही सत्ता अबाधित चालूं राहील, अशी त्यांना अपेक्षाहि पण होती. जवळ जवळ दोन पिढ्या कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट यांना अनियंत्रित सत्ता उपभोगण्याची संवय लागली होती. परंतु यापुढें कायद्यानें ज्याप्रमाणें महाराज संस्थानचे खरे राज्यकर्ते होते, त्याप्रमाणें वस्तुतः आपणच सर्व सत्तेचें केंद्रस्थान बनण्याची महाराजांची इच्छा असल्यामुळें, संस्थानांतील प्रमुख सत्ता हातची जाऊन पोलिटिकल एजंटला फक्त यथार्थनामा होऊन बसण्याची वेळ प्राप्त झाली. हा फरक अमलांत येणें बरेंच कठीण होतें. या संक्रमणावस्थेंत महाराजांना किती त्रास सोसावा लागला, याची यथार्थ कल्पना या चरित्रांत वाचकांना हळुहळू येत जाईल. सिंहासनारूढ होऊन कांहीं दिवस लोटतात न लोटतात तोंच, पोलिटिकल एजंट आपल्या दौऱ्यावर जाण्यास निघते वेळीं किंवा ते परत येते वेळीं त्यांचें स्वागत करण्यासाठीं महाराजांनीं स्टेशनवर जाणें योग्य आहे किंवा नाहीं, हा वादग्रस्त प्रश्न उपस्थित झाला; ही एकच गोष्ट येथें तूर्त नमूद केली असतां पुरें होईल. पोलिटिकल एजंट जो हक्क प्रस्थापित करण्यासाठीं झटत होते, तो हक्क शहराच्या वेशीवर आपलें स्वागत करण्यासाठीं महाराजांनीं सामोरें आलें पाहिजे, या इचलकरंजी-कराच्या मागणीच्याच तोडीचा होता. महाराजांचा प्रमुख अधिकारी वर्ग देखील जहागिरदारांप्रमाणें आपल्या मोठेपणाच्या खोट्या अभिमानानें शेंफारून गेलेला होता. आक्टोबर १८९४ सालीं मि० फ्रे० ( महाराजांचे एक मित्र ) लिहितात:—

" कौन्सिल व उच्च अधिकारी लोक तत्काळ हुकुमाबरहुकूम वर्तन करीत नाहींत असें आपण ह्मणतां; सध्यांच्या परिस्थितींत असें होणें अगदीं स्वाभाविक आहे; परंतु प्रथमपासूनच तुह्मी खरे मालक आहां अशी प्रत्येकाला जाणीव उत्पन्न करून द्याल तरच पुढें तुह्मांला विशेष त्रास पडणार नाहीं. "

पत्रांत नमूद केलेली परिस्थिति इतकी दुस्तर होती कीं, महाराजांना ती पूर्णपणें आपल्या कह्यांत आणण्यासाठीं बरेच सायास करावे लागले. हें कौन्सिल तीन अधिकारी मिळून झालेलें होतें; हे आपापल्या खात्याचे जवळ जवळ पूर्ण स्वामी बनले होते. यांपैकीं दोघेजण. दिवाण खानबहादूर तारापूरवाला व सर-

न्यायाधीश मि० बी. एन्. जोशी, हे महाराजांचे खास वडील कै० आबासाहेब यांचे जिवलग स्नेही असल्यामुळे, यांना वृद्ध व कसोटीस उतरलेल्या अधिकारी लोकांपेक्षांहि अधिक मान मिळत असे. कौन्सिलाखेरीज संस्थानांतील कांहीं प्रमुख जागा बऱ्याच काळापासून यूरोपीयन लोकांनीं काबीज केल्या होत्या. आरोग्यखातें, कॉलेज, महिलाशिक्षण, आल्बर्ट एडवर्ड हॉस्पिटलांतील प्रसूतिगृह, हीं सर्व यूरोपीयन अधिकारी लोकांच्या ताब्यांत होतीं. परंतु महाराजांनीं हातीं अधिकार घेतल्यानंतर एकामागून एक बहुतेक यूरोपीयन अधिकारी लोक संस्थानांतील नोकऱ्या सोडून निघून गेले. फक्त दरबारसर्जन डॉक्टर सिंक्लेअर हेच काय ते कोल्हापूरचे कायमचे रहिवासी झाले. मिसेस साईक्स या बाईनें १ जानेवारी १८९६ रोजीं आपल्या जागेचा राजीनामा दिला. मि० शानॉन् यांनीं रजेवर जाऊन १८९६–९७ च्या सुमारास आपल्या जागेचा राजीनामा पाठविला. तारीख २० आगष्ट १८९५ रोजीं मिस् लिटल् या बाईनें आपल्या जागेचा राजीनामा दिला. नोव्हेंबर सन १८९५ सालच्या सुमारास, कोल्हापूर संस्थानामध्यें यूरोपियन नोकरांची बरोबर चहा होत नाहीं, अशी सर्व साधारण तक्रार आहे, असें महाराजांच्या एका स्नेह्यानें त्यांना पत्र लिहिलें. याला महाराजांनीं निर्भीडपणें पुढील उत्तर दिलें:—

" राज्यकारभारांत विविध जातींचे लोक असणें मला आवडतें, हें आपणांस विदितच आहे. येथें यूरोपीयन अधिकाऱ्यांनीं जी कामगिरी केली तिच्याविषयीं व त्यांच्या शिस्त राखण्याच्या पद्धतीविषयीं माझें चांगलें मत आहे. पॅलेस अधिकारी ह्मणून एक यूरोपीयन गृहस्थ नेमावा, असें मला वाटल्यावरून मीं पुण्याहून एक गृहस्थ मागविला होता. तो कोणत्या कारणामुळें मला सोडून गेला हें आपणांस ऐकून कदाचित् माहित असेल. कांहीं क्षुल्लक कारणावरून माझे कांहीं यूरोपीयन अधिकारी लोक पोलिटिकल एजंटकडे तक्रारी नेतात, हीच गोष्ट मला आवडत नाहीं. "

महाराजांना अशा प्रकारची तक्रार याच वेळीं करावी लागली असें नाहीं; कांहीं अधिकारी लोकांच्या विशेषत: यूरोपीयन लोकांच्या बेमुर्वतपणामुळें महाराजांना आपल्या अमदानीचीं पहिलीं कांहीं वर्षें बरींच त्रासाचीं गेलीं. अशा प्रकारच्या अडचणींतून आपला मार्ग काढून त्यांना स्वतंत्र व्हावें लागलें. जेणेंकरून कौन्सिलच्या राज्यपद्धतीऐवजीं महाराजांचा राज्यकारभार सहज रीतीनें



महाराज अधिकारसंपन्न झाल्यानंतर. लॉर्ड हॅरिस व महाराज

अमलांत येईल, अशा प्रकारच्या राज्यपद्धतीची योजना महाराजांना प्रथम तयार करावयाची होती. ' महाराजांच्या हातीं राज्यसूत्रें येण्यापूर्वी दोन महिने अगोदर ह्मणजे ता० १ फेब्रुवारी १८९४ रोजीं, याप्रीत्यर्थ काय उपाय योजना करणें योग्य आहे, याकडे नेक नामदार लॉर्ड हॅरिससाहेबांनीं महाराजांचें लक्ष वेधिलें होतें. '' "मध्यवर्ती सुव्यवस्थित राज्यपद्धतीची योजना प्रथम आपण तयार करावी ह्मणून आपल्या व आपल्या प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें आपणांस दोन शब्द लिहिणें मला इष्ट वाटतें...... ' आपल्या संस्थानांतील कामाच्या विभागणीकडे प्रथम आपलें लक्ष जावें, ह्मणजे सध्यांप्रमाणेंच आपल्या हातीं राज्यसूत्रें आल्यावरहि कामकाज सुव्यवस्थितपणें चालेल, असें मी आपणाला मित्रत्वाच्या नात्यानें सुचवितों. '' ह्मणूनच प्रथम महाराजांना आपल्या विश्वासांतील एक हुजूर चिटणीस पसंत करणें जरूर पडलें.

अविश्वासुक अशा नोकरलोकांच्या परिवारांत सांपडलेल्या हिंदी राजांची करुणास्पद स्थिति एका उच्च प्रतीच्या राजकीय अधिकाऱ्यानें महाराजांपुढें पुढीलप्रमाणें वर्णन केली होती:—

"आपली जबाबदारी पूर्णपणें आपल्या आंगावर घेण्यास व प्रजेचें कल्याण करण्यास आपण उत्सुक आहां हें जरी मला माहित आहे, तरी आपले नोकर लोकहि त्याचप्रमाणें विश्वासास पात्र असे आहेत, अशी मला उमेद आहे. एकाद्या प्रामाणिक राज्यकर्त्याचा परिवार जर अविश्वासुक असेल, तर सर्व कामें स्वतःच पाहण्याची त्याची साहजिकच प्रवृत्ति होऊन त्याला आपलें काम बरेंच कष्टमय होऊं लागतें. आपला कारभार चांगला चालावा अशी महाराज (क्ष) यांची मनापासून इच्छा असल्याचें मला माहित आहे; परंतु आपल्या सर्व अधिकारी लोकांवर सारखाच विश्वास टाकतां येत नाहीं या भावनेनें,—अशा प्रकारची भावना हिंदुस्थानांतील प्रत्येक अधिकाऱ्याची असणें कांहीं अंशीं अपरिहार्यच आहे—त्यांची मनःस्थिति साशंक, चंचल व किंकर्तव्यतामूढ अशी झाली आहे. "ब्राह्मणी कारस्थानालाच केवळ तेथें ऊत आला आहे असें नसून, मराठा व इतर वर्ग यांचीं कारस्थानें देखील त्याच तोडीचीं आहेत. कोल्हापूरची सद्यःस्थिति मला अपरिचित असल्यामुळें माझा उपदेश कदाचित् अस्थानीं होण्याचा संभव आहे; परंतु कोल्हापूरचे महाराज प्रामाणिक व सदय अंतःकरणाचे आहेत हें मी जाणत असून, जेव्हां त्यांच्या हकमांची अमल-

बजावणी करण्याचें काम बापट व नामजोशी यांच्या हातीं गेल्यास त्यांना किती त्रास सोसावा लागेल याचीहि मला चांगली कल्पना आहे. ''

महाराजांना हुजूर चिटणीसाची निवड करितांना ही अडचण भासली व अखेर मि. फ्रेजर यांच्या विचारानें मि. आर. व्ही. सबनीस यांना पसंत करण्यांत आलें. त्यांचा महाराजांशीं परिचय घडून एका वर्षापेक्षां अधिक काळ लोटला नव्हता. नवीन हुजूर ऑफिसमध्यें निवडक लोक नेमण्यांत आले होते. तथापि हीच कामगिरी अत्यंत महत्वाची होती असें कांहीं ह्मणतां येणार नाहीं. हुजूर ऑफिसाबाहेरील नोकरलोकांना नवीन राज्यपद्धतीला अनुसरून वागण्यास लावण्याचीच खरी अडचण होती. त्यामुळें बरेच भानगडीचे प्रश्न उपस्थित होऊन, ते यशस्वी रीतीनें सोडविण्यास महाराजांना आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करावें लागलें. एक उदाहरण असें झालें कीं, एका विहिरीची दुरुस्ती करण्याकरितां अंदाजपत्रकांत अल्पशी रक्कम नमूद झाली असतांनादेखील, या कामीं हजारों रुपये खर्च करण्यांत आले. तेव्हां हुजूर ऑफिसनें, एक्झिक्युटिव्ह इंजीनियर मि० शानॉन यांना खुलासा विचारिला. हुजूर ऑफिसांतील क्षुद्र मनुष्यांनीं पी. डब्ल्यु. डी. च्या प्रमुख अधिकाऱ्यांच्या कामगिरीबद्दल शंका घेणें हें केवढें महापातक ! मि० शानॉन थेट महाराजांकडे धांवतच आले व त्यांना ह्मणाले, "जो खर्च मला आवश्यक वाटला त्याबद्दल शंका प्रदर्शित करणारा असा कोणता शहाणा हुजूरऑफिसमध्यें आहे !'' हुजूरऑफिसांतील पी० डब्ल्यु० डी० चें दप्तर ज्या गरीब बिचाऱ्या ओव्हरसीअरच्या ताब्यांत होतें त्याची घाबरगुंडीच उडाली. महाराजांची समजूत घालून, हुजूरऑफिसांतील या गरीब नोकराला रसातळाला पोंचवीन, असें एक्झिक्यूटिव्ह इंजीनियरला वाटत असलें पाहिजे. एक्झिक्यूटिव्ह इंजीनियरचें ह्मणणें महाराजांनीं अगदीं शांतपणें ऐकून घेऊन तितक्याच शांतपणानें पुढील उत्तर दिलें:— " पुष्कळ वेळां अंदाजापेक्षां जास्त खर्च होत असल्याचें निदर्शनास आल्यावरून नूतन छत्रपति हेच याबद्दल नाखूष आहेत व हुजूरऑफिसनें जो खुलासा विचारिला तो खुद्द महाराजांनाच हवा होता.'' स्टेटच्या कौन्सिलनें महाराजांच्या अमदानीच्या पहिल्या वर्षी जें अंदाजपत्रक महाराजांकडे सादर केलें त्याची आपण कशी वासलांत लाविली याचें महाराजांनीं पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

" अंदाजपत्राक प्रथम जेव्हां माझ्या मंजूरीकरितां आलें तेव्हां त्यांत साठ हजार रुपयांची तूट दर्शविण्यांत आली होती. त्यामध्यें कांहीं फेरबदल

करण्यासाठीं सूचना करून, उपयुक्त कामाची हरकत न होतां त्यांत काय फरक करितां येईल तो करावा, अशीहि मीं कौन्सिलास सूचना दिली. त्याप्रमाणें आतां तोंडमिळवणी कशी तरी झाली आहे. ५०,००० रुपयांची बचत करण्याचाहि माझा हेतु होता, परंतु तसें करणें अशक्य होतें. डिस्ट्रिक्ट जज्ज या नात्यानें सर न्यायाधीशाला जें काम करावें लागे, तें कमी करून न्यायाच्या बाबतींत मला सल्ला देण्यासाठीं त्यांना सवड दिली आहे. माझ्या अंगावर वाजवीहून जास्त काम मीं घेतलें आहे, असें मला वाटतें. माझ्यासमोर ज्या हरएक बाबी येतात त्यावरून मला बरीच माहिती होईल असें मला वाटत असल्यामुळें, निदान पहिल्या वर्षी तरी हें जास्त काम मी सोडून देणार नाहीं. महत्वाच्या बाबतींत मी कौन्सिलचा सल्ला घेतों. व त्यांच्या समोर आलेल्या गोष्टींचा निर्णय ते कोणत्या तत्त्वावर लावितात हें मी बारकाईनें पाहातों. अशाप्रकारें मला एका वर्षांत बरीच माहिती होईल असें वाटतें."

संस्थानांतील एका उच्च यूरोपीयन अधिकाऱ्याला एक्सचेंज भरपाई देण्याचें नाकारण्यांत आल्यामुळें, महाराजांना एका मोठ्या संकटाला तोंड द्यावें लागलें. महाराज यासंबंधानें एका मित्रास लिहितात:-

"कायदेशीरपणें मि० सीं० ना एक्सचेंज भरपाई आह्मांस देतां न आल्यामुळें त्यांनीं नाखूष होऊन व आह्मांला एक उद्धट पत्र लिहून सरकारकडे तक्रार नेली, हें आपणांस कळविण्यास मला मोठी दिलगिरी वाटते. सरकारनें आमची बाजू घेतल्यामुळें त्यांना तें पत्र दिलगिरी प्रदर्शित करून परत घेणें भाग पडलें; परंतु विश्वसनीय बातमीवरून मला असें समजलें आहे कीं, यूरोपीयन लोकांमध्यें त्यांनीं माझ्यासंबंधीं गैरसमज पसरविला आहे. हीच गोष्ट काय ती मला तापदायक वाटते."

हा उद्धटपणाचा आरोप एका विशिष्ट वर्गाच्या अधिकारी लोकांवरच होता असें नाहीं. अगदीं प्रारंभापासूनच संस्थानमध्यें मागसलेल्या लोकांतील सुशिक्षित लोकांचा भरणा करावा असें महाराजांना वाटत होतें. या उद्देशानें महाराजांनीं आपल्या संस्थानांतील एका जैन अंडर ग्रॅज्युएटला मुलकीखात्यांत नेमिलें. त्या काळचे सर न्यायाधीश मि० जोशी यांनीं याबद्दल तत्काळ महाराजांकडे तक्रार केली. यापेक्षांहि कमी पगारावर ब्राह्मण पदवीधर मिळत असतांना, ब्राह्मणेतर अंडर ग्रॅज्युएट पसंत करण्यास महाराजांना कोणता अधिकार पोहोंचतो? असें

मि० जोशी यांनीं महाराजांना विचारिलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, महाराजांनीं आपला हुकूम रद्द करून बी. ए. ची पदवी घेईतोंपर्यंत त्या तरुण ब्राह्मणेतराला वाट पहाण्यास सांगितलें. महाराजांच्या अमदानीची प्रथमचीं कांहीं वर्षे त्यांना कितीं त्रासदायक गेलीं, याची थोडीबहूत कल्पना, हिंदी संस्थानांशीं चांगला परिचय घडलेल्या एका इंग्रज गृहस्थाच्या पत्रावरून होतेः--

"कृष्ण कारस्थानांपासून अद्याप आपणांस त्रास होतो काय ? बहुतेक सर्व राज्यकर्त्या संस्थानिकांच्या पिच्छेस लागलेला कृष्ण कारस्थानरूपी समंध आपली पिच्छा सोडीत नाहीं काय ? याच कारणामुळें चिंतातुर झालेल्या कित्येक संस्थानिकांनीं माझ्याकडे अनेकदां कागाळया केल्या होत्या. माझ्या हाताखालच्या नोकरांनीं माझी दिशाभूल केल्याचें, किंवा माझी खात्री केल्याखेरीज त्यांनीं स्वतःच्याच ह्मणण्याप्रमाणें माझ्याकडून काम करून घेतल्याचें, एकहि उदाहरण मला सांगतां येणार नाहीं. जेव्हां जेव्हां एकादी शंका उपस्थित होईल, तेव्हां तेव्हां एजंटसाहेबांशीं जोंपर्यंत आपणांस प्रत्यक्ष बोलण्यास सवड आहे, तोंपर्यंत आपणांस भिण्याचें मुळींच कारण नाहीं, असें मला वाटतें. एजंटसाहेब अमूक अमूक ह्मणाले व ते अमूक कारणास्तव खूष किंवा नाखूष झाले, अशा ज्या गप्पा उठतात, त्यावर आपण मुळींच विश्वास न ठेवतां, एजंटसाहेबांची प्रत्यक्ष गांठ घेऊन आपल्या शंकांचें आपण निरसन करून घ्यावें, ह्मणजे गैरसमज उद्भवण्यास मुळींच जागा राहणार नाहीं."

सर्वच एजंट, लीवॉर्नरसाहेबांच्या तोडीचे नसतात व एकादा कमी योग्यतेचा मनुष्य या महत्त्वाच्या जागेवर आला असतां, सहज उद्भवणारीं कारस्थानें कोणत्या थराला जाऊन पोंचतात, हा मुद्दा या चाणाक्ष लेखकाच्या लक्षांत आला नाहीं, असें दिसतें. पुढें पुढें महाराजांच्या सुदैवानें त्यांना चांगलेच एजंट लाभत गेले, आणि त्यांचे व एजंटऑफीसचें नातें सलोख्याचें राहिलें; परंतु ज्या काळासंबंधानें मी येथें लिहित आहे, तो काळ महाराजांना फार त्रासाचा गेला, यांत शंका नाहीं. महाराजांचे जे जुने नोकरलोक होते, ते आपलें वर्चस्व कायम राखण्यासाठीं एजन्सी ऑफीसच्या तंत्रानेंच प्रयत्न करीत असत. नवीन लोकहि याच द्वारानें संस्थानच्या अधिकारीवर्गांत प्रवेश करण्यास प्रयत्न करित असत. यामुळें महाराजांच्या राज्यव्यवस्थेच्या योजनेंत अनेक विघ्नें उपस्थित होत. एकदां डॉ० ( अ ) एक ब्राह्मण पदवीधर यांना

कोल्हापूरच्या दवाखान्यांत नेमण्याचें कर्नल × × यांच्या मनानें घेतलें. दिवाणांच्या मनांत एका पारशी डॉक्टराची याच जागेवर वर्णी लावण्याची इच्छा होती. महाराजांना दोघेहि नको होते; पण तसें स्पष्ट ह्मणण्याची पंचाईत होती. अर्थातच अनिष्ट गोष्ट अंगावर आली असतां, कालहरण करणें हाच प्रशस्त उपाय आहे. या प्राचीन तत्त्वानुसार महाराजांनीं टाळाटाळी केली. परंतु कर्नलसाहेबांनीं सामोपचाराचे सर्व प्रयोग संपल्यावर, अखेरीस धमकीवजा पुढील सल्ला महाराजांना दिला:—

" कोल्हापूर शहर व संस्थान या दोहोंवर प्लेगाच्या सांथीमुळें जो दुर्धर प्रसंग ओढवणार आहे, त्याचा विचार करितां जादा मेडिकल अधिकारी नेमण्याच्या बाबतींत माझा सल्ला घेण्याचें आपणांस योग्य वाटलें नाहीं, हें पाहून मला फार वाईट वाटतें. "

पुनः ते लिहितात:—

" आपल्या खास तैनातींतील डॉक्टर ब्राह्मण आहे व संस्थानमधील एक व्यक्तीखेरीज करून बहुतेक सर्व हिंदी मेडिकल खात्यांतील दुय्यम अधिकारी ब्राह्मणच आहेत, याची आपणांस आठवण करून देणें मला इष्ट वाटतें. ह्मणून अशा आणीबाणीच्या प्रसंगीं केवळ तो ब्राह्मण आहे, या मुद्द्यावर अनुभविक अशा मेडिकल अधिकाऱ्याची हंगामी नेमणूक करून घेण्यास आपण कां हरकत घ्यावी, हें समजणें कठीण आहे. "

१८९९ सालीं विषप्रयोगाच्या कज्जाचा बोजवारा उडाल्यानंतर जेव्हां कर्नल डब्ल्यु. हे रिटायर झाले, तेव्हांच या त्रासाची परिसमाप्ति झाली; तथापि या अवधींत राज्यकारभारांतील बहुतेक नोकरलोकांची उलथापालथ करणें महाराजांना भाग पडलें. मुलकी खात्यांतील प्रमुख अधिकारी मि० वैद्य रिटायर झाल्यावर कौन्सिलमध्यें प्रवेश करण्यास मि० सबनीस यांचा मार्ग खुला झाला. सर न्यायाधीश मि० जोशी यांच्या मृत्यूमुळें संस्थानांतील जुने अधिकारी मि० के० एन्० पंडीत हे सर न्यायाधीश व कौन्सिलचे मेंबर होऊन त्यांच्याहून सीनियर असलेले मि० व्ही० बी० गोखले यांचे ते वरिष्ठ झाले. कर्नल रे व दिवाण यांच्यामध्यें दुय्यम सर्जनच्या नेमणुकीसंबंधीं जो लढा उपस्थित झाला त्याचा परिणाम असा झाला कीं, खानबहादूर मेहरजी कुवरजी तारापूरवाला यांना रिटायर व्हावें लागून, त्यांच्या जागीं मि० सबनीस यांची

नेमणूक झाली; व सबनीसांच्या जागीं मि० आर० आर० शिरगांवकर आले. खानबहादूर निघून जाण्याच्या पूर्वीं, पारशी जातीचे संस्थानचे चीफ् पोलीस ऑफीसर मि० दोराबजी पालांजी हे नोकरी सोडून निघून गेले होते. कॉलेजचे प्रिन्सिपाल मि० क्यांडी यांच्यापासून महाराजांना कित्येक वर्षें त्रास सोसावा लागला. त्यांच्या बेमुर्वत वर्तनामुळें महाराजांची अगोदरच त्यांच्यावर इतराजी झाली होती. कर्नल रे व त्यांच्या पत्नींनाहि ते अप्रिय झाले होते. ते स्तब्ध राहाते तर आपल्या उद्धट वर्तनाबद्दल माफी मागितल्यानंतर, महाराज त्यांच्या वाटेला गेले नसते; परंतु मि० सीं० यांनीं रे यांच्याशीं तंटा केल्यामुळें महाराजांना पुन: या कामीं हात घालणें भाग पडलें. मि० सीं० यांना कायमचा निरोप देण्यासाठीं महाराजांना पराकाष्ठेचे प्रयत्न करावे लागले. महाराजांचे व एजंट-साहेबांचें या बाबतींत जरी एकमत झालें होतें, तरी मि० सीं० हेहि एक वजनदार गृहस्थ असल्यामुळें त्यांची उचलबांगडी करणें बरेंच कठीण गेलें. मि० सीं० यानां व त्यांच्या पक्षाच्या लोकांना चिथावून त्यांचीं मनें संस्थानाविरुद्ध करण्यास जरी महाराज अत्यंत नाखूष होते, तरी मिसेस डब्ल्यु. या बाई आपल्यास हव्या त्या मजकुरांचीं पत्रें लिहून त्यांवर महाराजांच्या फक्त सह्या करून घेऊन, तीं वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे पाठवीत असत. महाराजांना या बाबतींत इकडे आड तिकडे विहीर होऊन गेलें. कोल्हापुरांतील बहुतेक मिशनरी लोक मि० सीं० यांच्या पक्षालाच होते. हा पक्ष कांहीं कमी वजनदार नव्हता. याखेरीज आपल्या पक्षाला इतर लोकांचें आपणांस सहाय्य मिळेल अशी मि० सीं० यांची अपेक्षा होती. कोणताहि यूरोपीयन गृहस्थ संस्थानामध्यें ठेवण्याची कोल्हापूरची इच्छा नाहीं असें सर्वसाधारण यरोपीयन लोकांना वाटत होतें. अर्थातच त्यांना व अमेरिकन मिशनरी लोकांना मि० सीं. यांचा पक्षच जोरदार करावयाचा असल्यास आश्चर्य नाहीं. याप्रमाणें एकीकडे महाराज व अस्थिर बुद्धीचे कर्नल X व दुसरीकडे सर्व यूरोपीयन आणि अमेरिकन लोक असे पक्ष निर्माण होण्याचा संभव दिसूं लागला. त्या वेळीं ताज्या सुरू झालेल्या प्लेगच्या व्यवस्थेस अनुसरून, पन्हाळ्यास अमेरिकन मिशनऱ्यांना जाण्यायेण्यास अडचण होऊं लागल्यामुळें, त्यांच्या आगींत तेल ओतल्यासारखा प्रकार झाला. त्यांनीं लागलीच इंग्रजी वर्तमान-पत्रांतून दरबारच्या प्लेगव्यवस्थेवर भडीमार सुरू केला. इतक्यांत दरबारसर्जन मिं. सिंक्लेअर यांच्यावर कर्नल साहेबांची इतराजी झाल्यामुळें मि. सिंक्लेअर

यांनीं कोल्हापुरांतून निघून जावें असा बूट निघाला व यूरोपीयन लोकांच्या वैमनस्यास आणखी एक पीळ पडला! महाराजांनीं या परिस्थितीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

"एकेकदां असें होतें कीं, पोलिटिकल एजंट एक प्रकारचा सल्ला देतात तर मिसेस डब्ल्यु यांचें मत त्याच्या अगदीं उलट असतें; अशा परिस्थितींत पोलिटिकल एजंट व दरबार यांच्या विरुद्ध जाऊनहि मिसेस डब्ल्यु. या बाई आपलेंच ह्मणणें खरें करून दाखवितात.

"डॉक्टर सिंक्लेअरसारखे वरिष्ठ अधिकारी, माझे मित्र, सरदार, मिशनरी यांच्या व माझ्यादेखील हालचालींवर नजर ठेवण्यासाठीं गुप्त हेर ह्मणून पाठविण्यांत येतात, ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. एकाद्या नवख्या मनुष्याला ही अतिशयोक्ति वाटेल; परंतु कोल्हापूरमध्यें व कोल्हापूरच्या आसपास राहणाऱ्यांना या विधानाची सत्यता पटल्याखेरीज राहाणार नाहीं. हें चित्र मी विशेष रीतीनें रंगवून आपल्या पुढें मांडतों असें नाहीं, हें मी आपणास खात्रीपूर्वक सांगतों. उलट हें चित्र वस्तुस्थितीपेक्षां बरेंच फिकें आहे, हें मी आपणाला स्पष्ट करून दाखवीन."

१८९८ सालीं अमेरिकन मिशनरी लोकांची एक सभा भरून कर्नल रे यांनीं प्लेगसंबंधीं जे उपाय केले त्यांची चौकशी करण्यांत यावी, ह्मणून मुंबईसरकाराकडे एक अर्ज पाठविण्यांत आला. या विनंतीचा कांहींच विचार न झाल्यामुळें मुंबईच्या दैनिक पत्रांत एका लेखकानें या बाबतींतील लोकांच्या मनःस्थितीचें चित्र पुढीलप्रमाणें रेखाटिलें आहे:—

"आपण या बाबतींत जो पत्रव्यवहार प्रसिद्ध केला आहे, त्यामध्यें मुंबईसरकारच्या तटस्थपणाविषयीं टीका प्रसिद्ध झाली आहे. कोल्हापुरांतील स्थिति लक्षांत घेतां, याचा उलगडा तत्काळ होईल असें वाटतें. पोलिटिकल एजंट हे आपल्या कृत्याची किंवा शैथिल्याची जबाबदारी संस्थानवर लोटीत असतात; व संस्थानच्या कामकाजांत ढवळाढवळ करण्यास मुंबईसरकार तयार नसतें, हाच याचा खरा खुलासा आहे. कर्नल रे हे येथील प्रमुख प्लेग अधिकारी आहेत, ह्मणून या बाबतींत जें जें घडतें तें त्यांच्याच करणीमुळें होय; परंतु त्यांच्या कृत्याची जबाबदारी दरबारवर येते. अलीकडे दरबाराच्या नोकरलोकांत जी उलथापालथ करण्यांत आली आहे. तीमुळें त्यांना हवें असें एक नवीन शस्त्र

उपलब्ध झालें आहे. हा विषय संस्थानांतील प्रजाजनांच्या अगदीं जिव्हाळयाचा आहे, ह्मणून वस्तुस्थिति जाणण्यासाठीं बारकाईनें प्रयत्न झाले पाहिजेत. प्लेगसंबंधीं जे उपाय करण्यांत येतात, ते महाराजांच्या नेतृत्वाखालीं करण्यांत यावेत, अशी एका ठिकाणीं सूचना करण्यांत आली आहे. कर्नल रे यांच्या ढवळाढवळीपासून महाराजांना जर अलिप्त राहातां येईल, तर ही सूचना अत्यंत नामी होईल यांत शंका नाहीं; परंतु दरबारच्या अधिकारी लोकांवर कर्नल रे यांचा हल्लीं जो दाब आहे, तो तसाच अढळ राहील, तर ही सूचना अगदींच निरर्थक होय. "

यावरून महाराजांच्या बिकट परिस्थितीची बरीच कल्पना येण्यासारखी आहे. नवीन अधिकारी लोकांवर जो दुबळेपणाचा आरोप करण्यांत येत होता, याचें कारण खुद्द महाराजांनाहि त्यांच्या इतकेंच दुबळें होणें भाग पडलें होतें, हें असावें. किंकर्तव्यमूढ होऊन महाराजांनीं आपल्या त्रिशंकुवत् परिस्थितीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. " मि० क्यांडी यांची बदली वऱ्हाडांत करण्यांत आली आहे, हें आपण ऐकलेंच असेल. नवीन अधिकाऱ्यांच्या योगानें सर्व सुरळीत चालेल अशी मला आशा आहे. सर्वांना खूष ठेवणें अशक्य असल्यानें व कांहीं लोकांच्या इच्छेविरुद्ध कांहीं गोष्टी होणें अपरिहार्य असल्यामुळें, तज्जन्य निंदेचा वांटेकरी होणें मला भाग आहे. सध्यांच्या परिस्थितींत सर्व यूरोपीयन लोकांना संतुष्ट ठेवणें अशक्य आहे. या विषयासंबंधानें आपणांशीं प्रत्यक्ष संभाषण करावें, अशी मला कितीतरी इच्छा होते. ही एक मोटी गूढ कथाच असल्यामुळें ती सर्व लेखणींतून उतरविणें कदाचित् योग्य होणार नाहीं. "

महाराजांच्या अंगावर पडलेलें या काळांतील काम अधिक बिकट करण्याच्या कामीं, कोल्हापूरच्या जनतेनें देखील आपल्यापरी थोडाबहूत हातभार लाविला होता. आतांपेक्षांहि अधिकच जातिविशिष्ट भावनांनीं प्रेरित झालेलीं त्या वेळचीं देशी वर्तमानपत्रें, महाराज ब्राह्मणलोकांशीं दोन हात करण्यास सिद्ध झाले आहेत, अशा अर्धवट शंकेनें दरबारावर वेळीं अवेळीं तोंडसुख घेत होतीं. दिवाण तारापूरवाला अधिकारारूढ असते वेळीं त्यांनीं महाराजांना असा इषारा दिला कीं, जनतेनें महाराजांचा हा डाव ओळखला असून, महाराजांचे प्रयत्न जरी सद्धेतूनें प्रेरित झाले असले, तरी हा सामना संस्थानला अत्यंत घातुक होईल. कौन्सिलचे सभासद बदलण्यांत आल्यामुळें या टीकाकारांचें पित्त भडकून

गेलें होतें; मात्र ही सर्व बदलाबदल महाराजांच्या इच्छेविरुद्ध करण्यांत आली असून, त्याचें सर्व खापर एजन्सी ऑफिसच्या माथ्यावर फोडणेंच योग्य व जरूर आहे, अशी या लोकांची अद्याप समजूत होती! त्यामुळें या टीकाकारांचा दरबारावर तितका कटाक्ष नव्हता. या नवीन नेमणुकीसंबंधानें लोकांना ह्मणतां येण्यासारखें इतकेंच होतें कीं, नवीन अधिकारी लोक अननुभवी व कोत्या दिलाचे असून, महाराजांच्या इच्छेविरुद्ध ते कोल्हापूर संस्थानावर लादण्यांत आलेले आहेत. अधिकारी लोकांचें वजन संपुष्टांत आणून, निरनिराळया खात्यांत बचत करणें एवढेंच महाराजांचें मुख्य धोरण होतें, अशी सर्वसाधारण समजूत झालेली होती; ह्मणजे पुढें महाराजांच्या अगदीं अंगवळणी पडलेले वर्तमानपत्रांचे मर्मभेदी प्रहार अद्यापि यावयाचेच होते. महाराज हे एक बाहुलें असून, सर्व सूत्रें आंतून दुसऱ्या कोणाकडून तरी हालविलीं जातात अशीच लोकांची स्पष्ट समजूत होती. अशा प्रकारचें टीकाकारांचें ह्मणणें कांहीं अंशीं खरे होतें व कांहीं अंशीं चुकीचें होतें. नवीन प्रधानमंडळाची निवड महाराजांनीं स्वतःच केली होती. यामुळें जे फेरफार करावे लागले, त्यास पोलिटिकल एजंटची संमति घेण्याकरितां महाराजांना बरेच सायास पडले असतील ही गोष्ट निराळी. उलट हेंहि खरें आहे कीं, पोलिटिकल एजंटची पसंति मिळविण्याकरितां महाराज जरी इतकी यातायात करीत असत, तरी कधीं कधीं महाराजांच्या हेतुविरुद्धहि कांही गोष्टी घडून येत असत. पोलिटिकल एजंटच्या खटपटीविषयीं वर थोडासा उल्लेख करण्यांत आला आहे; त्यावरून वाचकांस आमच्या ह्मणण्याची सत्यता पटेल. १८९४ सालीं महाराजांनीं आपल्या हातीं अधिकारसूत्रें घेतल्यानंतर थोडया दिवसांनीं पुण्याचे रावबहादूर म्हस्के यांना, आपल्या संस्थानमध्यें नोकरीसाठीं कांहीं तरुण सुशिक्षित मराठे पदवीधर मिळूं शकतील काय ? ह्मणून विचारिलें होतें व मि० म्हस्के यांच्या शिफारसीवरून मि० डी० ए० विचारे एल० सी० ई० यांना नेमूनहि घेतलें होतें. याचा परिणाम काय झाला हें महाराजांवर टीका करणाऱ्या एका वर्तमानपत्रांतील लेखकाच्याच शब्दांत सांगावयाचें ह्मणजे:—

"यांची निवड करतांना शानॉन यांचे खास मदतनीस व मि० शानॉन हे रजेवर असते वेळीं एक्झिक्युटिव्ह इंजीनियर ह्मणून काम करणारे मि० तांबे यांच्या हक्कांकडे दुर्लक्ष करण्यांत आल्यामुळें, महाराजांच्या सल्लागार मंडळांत देखील बराच मतभेद होऊन पोलिटिकल एजंट कर्नल रे यांनीं मि० विचारे

यांच्या नेमणुकीस जोरानें विरोध केला. याचा परिणाम असा झाला कीं, मि० विचारे यांना हुजूर आॅफीसमध्यें दाखल करून घेऊन, एक्झिक्युटिव्ह इंजीनियरची जागा मोकळी ठेवण्यांत आली. गेल्या दोन वर्षांत सहाजीकपणें बरीच भानगड उपस्थित होऊन अखेर मि० विचारे हे आतां पक्के स्टेट एक्झिक्युटिव्ह इंजीनियर झाले आहेत. ''

या नेमणूकीविरुद्ध कर्नल रे हे एकटेच नसून, महाराजांच्या एका वजनदार मित्रांनींहि महाराजांना [illegible] सल्ला दिला:—

" स्टेटइंजीनियरच्या बाबतींत आपण काय करीत आहां ? मि० शानोन हे परत निघून जात आहेत काय ? असे जर असेल या जागीं एकाद्या यूरोपीयन अधिकाऱ्याची काळजीपूर्वक निवड करून आपण त्याला नेमाल, असा मला भरवंसा आहे, कारण या जागीं शिस्त राखण्याची व काळजीपूर्वक देखरेख ठेवण्याची अत्यंत आवश्यकता असल्यामुळें एकादा नेटिव्ह मनुष्य नेमणें चुकीचें आहे असें मला वाटतें. ''

अशाप्रकारच्या [illegible] परिस्थितींतहि महाराज एकाद्या अनुभवी राज्यकर्त्याला साजेशा हुशारीनें व चतुराईनें आपला राज्यशकट हांकीत होते. गेल्या अर्धशतकांत संस्थानचा जो दर्जा व हक्क नष्ट झाले होते, ते परत मिळविण्याचा महत्वाचा प्रश्न महाराजांच्या डोळ्यासमोर एकसारखा होता. महाराजांच्या राज्यारोहण प्रश्नासंबंधीं जेव्हां चर्चा चालू होती, तेव्हां १८६२ च्या तहान्वयें महाराजांच्या कोर्टानीं फर्माविलेल्या फांशीच्या शिक्षेला मुंबई सरकारची जी मंजुरी लागे ती इतःपर लागूं नये, ह्मणून मुंबई सरकारचें मन वळविण्यासाठीं प्रयत्न करण्यांत आले. मुंबई सरकार ही विनंति मान्य करील ह्मणून दिवाणांना इतकी आशा वाटत होती कीं, लॉर्ड हॅरिससाहेबांचें राज्यारोहणानिमित्त जें भाषण होणार होतें, त्यांत यासंबंधानें उल्लेख येईल असा त्यांनीं आदमास केला होता. मांडलिक संस्थानांसंबंधीं रेसिड्युअरी हक्क जे आतांपर्यंत मुंबई सरकाराकडेच होते ते परत मिळविण्याबद्दलहि त्या वेळीं प्रयत्न करण्यांत आले; परंतु या बाबतींत लौकर यश येईल अशी दिवाणांना खात्री वाटत नव्हती. तथापि राज्यारोहणाच्या वेळीं सरकारानें या दोनहि बाबतींत कांहींच केलें नाहीं. राज्यारूढ होऊन पुरें वर्षहि झालें नव्हतें, इतक्यांतच ( १४ नोंव्हेंबर १८९४ ) महाराजांनीं या दिशेनें प्रयत्न करण्यास प्रारंभ केला; आणि गव्हर्नरसाहेबांपुढें त्यांनीं आपलें ह्मणणें मांडिलें:-

" मीं राज्यशकट हांकूं लागून मला जवळ जवळ सहा महिने होऊन गेले. मला आतां बरीच माहिती झाली असून, त्याकडे माझें बरेंच लक्ष वेधलें आहे. आपण लौकरच नेक नामदार व्हाइसरॉयसाहेबांच्या भेटीचा लाभ घेण्यास जाणार आहां, तेव्हां पुढील मुद्यावर आपण त्यांच्याशीं प्रत्यक्ष भाषण करावें ह्मणून, मला चार शब्द लिहिण्यास परवानगी द्याल काय? १८६२ सालच्या नवीन तहनाम्यांतील कलम सात अन्वयें फांशीच्या शिक्षेला मुंबई सरकारची मंजुरी मिळवावी लागते. त्या वेळीं धामधूमीचा काळ होता; आतां परिस्थिति निवळली असल्यामुळें, या बाबतींतील संस्थानचे हक्क परत देण्याकरितां जी मी विनंति करीत आहें, तिचा विचार करून त्याबद्दल नेक नामदार व्हाइसरॉय साहेबांकडे आपण शिफारस करावी, अशी मी आपणांस विनंति करीत आहें. ती आपणांस अयोग्य वाटणार नाहीं अशी मला आशा आहे. सन्मान, क्षेत्रफळ, लोकसंख्या व जमाबंदी या बाबतींत कोल्हापुरापेक्षां पुष्कळ संस्थानें कमी प्रतीचीं असूनहि त्यांना जीवदानाचे व फांशीची शिक्षा फर्माविण्याचे अधिकार आहेत.

याच तहनाम्यांतील आठव्या कलमांत नमूद असलेल्या माझ्या अमलांखालील कांहीं उच्च प्रतीच्या जहागिरदारांच्या जहागिरींतील फौजदारी कज्जे चालविण्याच्या हक्कासंबंधीं व त्यांच्यावर सर्व साधारण देखरेख ठेवण्याच्या हक्कासंबंधींहि थोडी दुरुस्ती होणें इष्ट आहे. १८६२ सालानंतर शिक्षणाची बरीच प्रगति झाली असून, येथील न्यायपद्धतिहि बरीच सुधारली आहे, त्याप्रमाणें संस्थानांत पूर्ण शांतताहि प्रस्थापित झालेली आहे. ह्मणून या जहागिरीवर देख-रेख ठेवण्यास कोल्हापूरदरबारला पूर्ववत् परवानगी मिळावी, असें जर मीं ह्मटलें तर तें आपणास कबूल होईल असें मला वाटतें."

या पत्राचा तत्काळ असा परिणाम झाला कीं, याच वर्षाच्या फेब्रुवारी महिन्यांत महाराजांना फांशीची शिक्षा फर्माविण्याचा अधिकार देण्याचें अभिवचन लॉर्ड हॅरिससाहेबांनीं देऊन, लागलींच सरकारीरीत्या दरबारला तसें कळविण्यांत आलें.

प्रारंभापासूनच संस्थानच्या राज्यकारभारांत महाराजांनीं आपलें पूर्ण लक्ष घातलें होतें. राज्यपदारूढ होऊन दोन महिने झाले नाहीं तोंच महाराज ह्मणतात:-

" माझ्या हातून कामकाज चांगल्या प्रकारें होत आहे, हें पाहून मला आनंद होत आहे, अखेरच्या निर्णयाकरितां पडून राहिलेलीं कौन्सिलचीं ६०० कामें

आहेत; त्यांपैकीं २५० स्पेशल अपीलाचीं कामें आहेत. नेहमींचें कामकाज करून रोज सहा कज्जांची मी वासलात लावितों. या गतीनें थोडया महिन्यांत, पडून राहिलेल्या कामांचा निकाल लावतां येईल, असें मला वाटतें."

ठरीव मार्गानें मिळणाऱ्या माहितीवर विशेष विसंबून न राहतां, कोणत्याहि बाबतींत प्रत्यक्ष माहिती मिळविण्याची महाराजांना मोठी हौस असे. सर्व साधारण जनता किती गाढ अज्ञानांधःकारांत चांचपडत पडली आहे, व निरनिराळया खात्यामार्फत उपलब्ध होणारी माहिती धूर्त लोकांच्या डावपेंचांमुळें व अधिकारी लोकांच्या पक्षपातीपणामुळें किती रंगविलेली असते, हें महाराजांना पूर्णपणें ठाऊक होतें. दौऱ्यावर असतांना किंवा राजधानींत असतांना देखील गरीब लोकांशीं आपला प्रत्यक्ष संबंध कसा येईल याजकडे महाराजांचें विशेष लक्ष असें. महाराज आपला शक्य तितका वेळ जंगलामध्यें व खेडयापाडयामध्यें फिरण्यांत घालवीत. जंगलांत भटकल्यापासून महाराजांना शिकार करितां येऊन गरीब लोकांची स्थिति त्यांस प्रत्यक्ष पाहतां येई. महाराजांचा पहिला दौरा शिरोळ पेठयांत झाला. या दौऱ्यांतील त्यांच्या अनुभवाचें पुढीलप्रमाणें वर्णन करण्यांत आलें आहेः—

"जिल्ह्यांतील दौऱ्यावरून मी नुकताच परत आलों. सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहण्यांत व रयत लोकांशीं त्यांच्या नडीविषयीं प्रत्यक्ष भाषण करण्यास मला मोठा आनंद होतो. मी दौऱ्यावर असतांना नरसोबाची वाडी हें क्षेत्र मीं प्रत्यक्ष पाहिलें. येथें सर्व बाजूचे यात्रेकरू जमतात. भिकारी लोकांच्या पोषणाकरितां येथें बरींच अन्नसत्रें आहेत व महारोगी या ठिकाणीं बरे होतात, अशीहि लोकांची समजूत आहे. ह्मणून या ठिकाणीं हे दुर्दैवी लोक बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आढळतात. यांची वासलात कशी लावावी, हा एक माझ्यापुढें मोठाच प्रश्न आहे."

व्हिक्टोरिया महारोगी–आश्रम पुढें लौकरच कोल्हापुरांत स्थापन करण्यांत येऊन, हा महारोग्यांचा प्रश्न सोडविण्यांत आला. पुढें हा आश्रम संस्थानच्या घाटवळ भागांत नेण्यांत आला. दुसरा दौरा १८९५ सालच्या मार्च व एप्रील महिन्यांत झाला. या दौऱ्याचें वर्णन पुढीलप्रमाणें देण्यांत आलें आहेः—

"महाराजांनीं कित्येक पेठयांची पाहणी करून त्यांतील प्रमुख खेडीं प्रत्यक्ष जाऊन पाहिलीं. प्रथम गडइंग्लज पेठयाच्या पाहणीस सुरवात झाली.

या पेठ्यांतील कांहीं विशिष्ट ठिकाणीं बेरड लोकांचे अत्याचार होत असतात. नेहमींप्रमाणें महाराजांनीं पेठ्यांतील तुरुंगांत असलेल्या कैद्यांशीं संभाषण केलें. साहजिकपणें यांपैकीं बहुतेकांनीं आपण निरपराधी असल्याचें सांगितलें, तथापि त्यांपैकीं एकानें अशी तक्रार केली कीं, आपली चौकशी कित्येक महिने चालू असून तत्काळ न्याय मिळावा एवढीच आपली इच्छा आहे. महाराजांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवून व या प्रकरणांची योग्य प्रकारें चौकशी करून, एका महिन्यापेक्षां अधिक दिवस चौकशीमुळें तुरुंगांत असलेल्या कैद्यांचा मासिक तक्ता खुलाशासह प्रत्येक मॅजिस्ट्रेटनें सादर करावा, असा वटहुकूम काढिला. या वटहुकुमाचे सुपरिणाम तत्काळ दिसून आले, व या बाबतींतील महाराजांच्या करड्या नजरेमुळें हे तक्ते बहुतेक कोरेच पाठविण्याचे दिवस लवकरच येतील, असें वाटतें. गडइंग्लजहून गारगोटीला अल्पावकाशांत जातां येतें. गारगोटींतील लोकांना एक मुलींची शाळा हवी होती. महाराजांनीं ही शाळा उघडण्याकरितां तत्काळ हुकूम सोडिला. तेथें गोड्या पाण्याचा पुरवठा पुरेसा नसल्याची गोष्टहि महाराजांच्या कानावर घालण्यांत आली. येथून दोन मैल अंतरावर असलेल्या एका झऱ्याचें पाणी गांवांत नेण्याच्या योजनेचा विचार महाराज करीत आहेत. गारगोटीपासून थोड्या मैलांच्या अंतरावर असलेल्या शेणगांव नांवाच्या खेडें गांवीं काताचा एक लहानसा कारखाना आहे. महाराजांनीं या संधीचा फायदा घेऊन तो प्रत्यक्ष जाऊन पाहिला. हा पदार्थ उत्पन्न करण्याचे प्रयोग येथें चालू आहेत. हे प्रयोग यशस्वी झाल्यास जंगल लगतच्या खेडेंगांवीं अशा प्रकारचे थोडे कारखाने काढण्याचा महाराजांचा संकल्प आहे. कात हा शुद्ध जंगली पदार्थ असल्यानें त्याच्या उत्पत्तीपासून जंगलखात्याच्या उत्पन्नांत जरी विशेष भर पडणार नाहीं, तरी त्याच्या योगानें कांहीं खेडगळ लोकांना रोजगार लागण्याचा संभव आहे. यानंतर महाराज कोल्हापुराला परत आले; व तेथें दोन दिवस मुक्काम करून, महाराजांनीं आपला दौरा पुनः सुरू केला. आतां त्यांनीं दक्षिणेकडून सह्याद्रीच्या टेकडीकडे आपला मोर्चा वळविला. पाचोली व वाकी जंगलानजिकचीं खेडीं पाहून, उत्तरेकडे ते दाजीपूरपर्यंत गेले. येथें त्यांनीं कोल्हापूर दरबार व कोल्हापूरच्या एका मांडलिकामध्यें हद्दीसंबंधानें वादग्रस्त असलेलें एक स्थळ प्रत्यक्ष जाऊन पाहिलें. याच्यायोगें या प्रकरणाचा सहज निकाल लागेल अशी आशा वाटते. 'कांहीं जरूरीच्या कामाचा निकाल

लावण्यासाठीं तारीख ६ एप्रील रोजीं महाराजांना कोल्हापुराला परत यावें लागलें. परंतु या दिवशीं सकाळीं, आदल्या दिवशीं वाघानें दोन बैल ठार केले अशी पारध्यांनीं वार्ता आणिली. महाराजांसारख्या शिकारीच्या भोक्त्याला अशी संधि दवडणें अशक्य होतें. या वनराजाचा माग लावण्यास महाराज तत्काळ परत गेले. सुदैवानें महाराजांच्या बंदुकीला तो वाघ बळी पडला. सह्याद्रींतील हा एक उत्तम प्रतीचा वाघ असून, याची लांबी आठ नऊ फूट होती. ही शिकार जरी कोल्हापुराहून चाळीस मैल अंतरावर झाली, तरी देखील महाराज जरूरीचें काम करण्यासाठीं वेळेवर हजर राहिले. तारीख ७ ते २० पर्यंत त्यांनीं पन्हाळा येथें मुक्काम केला. व या अवधींत मधून मधून या पेठ्यांतील खेडीं त्यांनीं प्रत्यक्ष जाऊन पाहिलीं.

तारीख १० एप्रील रोजीं महाराज महाबळेश्वराला निघाले, व तेथें त्यांनीं ३० मेपर्यंत मुक्काम केला. मध्यंतरी ते थोडे दिवस ( २९ एप्रील ते ४ मे ) मुधोळच्या महाराजांच्या ज्येष्ठ पुत्राच्या विवाहसमारंभाला हजर राहण्याकरितां मुधोळला गेले होते. मुधोळचे महाराज हे महाराजांच्या खास आईचे बंधु होत. महाराजांनीं आपलें हुजूर ऑफिस आपल्याबरोबर महाबळेश्वरला नेलें होतें; त्यामुळे महाराजांना बरेंच काम करतां आलें. तारीख २९ रोजीं महाराजांनीं तेथील कांहीं निवडक लोकांना वनभोजन दिलें. या प्रसंगीं यूरोपीयन व हिंदी लोकांनाहि निमंत्रण देण्यांत आलें होतें. ''

दुसऱ्या वर्षी महाराजांनीं जो दौरा केला त्याचीहि थोडीशी सविस्तर हकिगत दिली असतां वाचकांना ती मनोरंजक होईल असें वाटतें:—

" महाराजांच्या दौऱ्याला सुरुवात होऊन तारीख २० नोव्हेंबर १८९६ इ० रोजीं महाराज गडइंग्लजला गेले. रायबाग व कटकोळ सारख्या बाजूस पडलेल्या भागाची पाहणी झाल्यावर हा दौरा तारीख २० नोव्हेंबर रोजीं पुरा करण्यांत आला. या वर्षी या प्रदेशांत अखेरचा पाऊस न झाल्यामुळें लोकांची स्थिति बरीच हलाखीची झालेली होती. या प्रदेशांतील पिकें बुडालीं असल्यामुळें महाराजांनीं लांब लांब मजला मारून व जागजागीं मुक्काम करून अल्पशा परिवारासह रस्त्यापासून लांब अंतरावर असलेल्या भागांतील पिकाची स्थिति पहाण्यासाठीं उंटांवरून व घोड्यांवरून प्रवास केला.

" महाराजांचे दुसरे दौरे भूधरगड व पन्हाळा पेठ्यांत झाले. कटकोळच्या खालोखाल, या पेठ्यांतील प्रदेश डोंगराळ व निःसत्व असल्यामुळें येथेंहि लोकांची अत्यंत हलाखीची स्थिति झालेली होती. भूधरगड पेठ्यांतील पहिला दौरा तारीख २७ जानेवारी ते ११ फेब्रुवारी १८९७ पर्यंत झाला; आणि दुसरा दौरा २२ फेब्रुवारी ते ३१ मार्चपर्यंत झाला. या पेठ्यांतील अर्धपोटी राहिलेल्या लोकांना महाराजांचें दर्शन इतकें सुखदायक झालें कीं, भूधरगड पेठ्यांतील महाराजांच्या प्रयाणसमयीं, आजूबाजूंच्या खेड्यांतील लोकांनीं महाराजांचा मुक्काम आणखी कांहीं दिवस वाढावा ह्मणून आपापल्या आराध्य देवतेला नवस केला.

" पन्हाळा पेठ्यांतील दुष्काळ निवारणार्थ ता० ७ एप्रील पासून मे अखेर पर्यंत महाराजांनीं जारीनें प्रयत्न केले. मध्यंतरी एक आठवडा महाराजांनीं महाबळेश्वर येथें घालविला. हे दौरे चालू असतांना महाराजांबरोबर प्रांतऑफिसर, जंगलखात्याचे अधिकारी व एक्झिक्युटिव्ह इंजीनियर होते. दुष्काळ निवारणार्थ सुरू केलेल्या कामगिऱ्या व अन्नछत्रें कशीं चालली आहेत, हें त्यांनीं प्रत्यक्ष जाऊन पाहिलें; व नवीन उद्योगधंद्याच्या योजनेचा ज्या ज्या ठिकाणीं त्यांची आवश्यकता होती त्या त्या ठिकाणीं जाऊन त्यांनीं विचार केला."

महाराजांनीं आपल्या एका मित्राला पाठविलेल्या पत्रांत या दौऱ्यासंबंधीं पुढीलप्रमाणें उल्लेख करण्यांत आला आहेः—

" सह्याद्रीच्या रांगेंतील दूरदूरच्या प्रदेशाची मी पाहणी करीत आहें. वार्का भाग अशाचपैकीं एक आहे. जंगलामध्यें राहाणाऱ्या लोकांच्या बऱ्याच तक्रारी असून, जंगलखात्याचे नियम अद्याप त्यांच्या आंगवळणी पडले नाहींत. त्यांचें ह्मणणें रास्त आहे किंवा कसें तें मीं प्रत्यक्ष पाहून त्यांच्याकरितां काय करणें शक्य आहे तेंहि मी पाहाणार आहें. जंगलांमधील त्यांच्या घरीं जाऊन त्यांची भेट घेतल्यानें त्यांच्या व अधिकारी लोकांमधील तेढ बरीचशी कमी होईल, असें मला वाटतें. रयतलोकांचा अत्यंत कर्जबाजारीपणा हाहि पण माझ्या नजरेस आला. त्यांच्या सर्व जमिनी सावकारांच्या ताब्यांत गेल्या आहेत. त्यांना कोणत्या तऱ्हेनें मदत करावी, याचा मी विचार करीत आहें."

पुनः ते ह्मणतातः—

"पेठयांतील माझ्या गेल्या दौऱ्यांत मी गडइंग्लज व भूधरगड हे पेठे प्रत्यक्ष जाऊन पाहिले. गडइंग्लज पेठयांतील लोक बरेच सुखी आहेत; परंतु भूधरगड हा पेठा सह्याद्रीच्या रांगेनजिक असल्यामुळें, तो विशेष सुपीक नाहीं. ह्मणून लोकांच्या जंगलासंबंधीं तक्रारी ऐकूं येतात, व रयतलोक कर्जांत बुडून गेले आहेत. या आपदा कशा दूर करतां येतील याचा मी विचार करीत आहें. जंगली लोकांना यत्किंचितहि सवलत दिली तर तेवढयानें ते धीट होऊन जंगलाची नासाडी करितात; ह्मणून त्यांना मदत करतांना देखील दक्षता घेतली पाहिजे. रयतलोकांच्या दारिद्र्याचा प्रश्न हाहि तितकाच बिकट आहे. खऱ्या शेतकरीलोकांच्या नांवानेंच जमिनी असणें मला फार आवडतें; परंतु त्यांची स्थिति एक सारखी खालावत जाऊन, ते मजूरलोकांच्या स्थिती-प्रत पोंचत आहेत. सह्याद्रिलगतच्या भागांत मुलींच्या शाळेची व मुसलमान-लोकांकरितां एका शाळेची आवश्यकता आहे, असें वाटल्यावरून या शाळा उघडण्याकरितां मीं हुकूम केले आहेत. नरसोबावाडींतील महारोग्यांचा प्रश्न कित्येक वर्षांपासून माझ्या डोळयासमोर आहे. हें एक क्षेत्र असल्यामुळें दूर-दूरच्या अंतरावरील लोक येथें नेहमीं येतात. महारोग्यांची व्यवस्था करण्याची माझी इच्छा आहे. परंतु हा मोठा बिकट प्रश्न असल्यामुळें, आपणाशीं या बाबतींत मला बोलावयाचें आहे. या बाबतींत माझे असे विचार आहेत कीं, त्यांच्याकरितां एक रुग्णालय स्थापन करून त्यांच्यापैकीं स्त्री पुरुष वेगवेगळे करावेत. प्रथम या रुग्णालयांत फक्त कोल्हापूरचे प्रजाजन घ्यावयाचे व मांड-लिक जहागिरदारांकडून त्यांच्या जहागिरींतील महारोग्यांच्या खर्चाकरितां रक्कम वसूल करावयाची, असा माझा बेत आहे."

खिस्तवासी महाराणी व्हिक्टोरिया यांच्या डायमंड जुबिली उत्सवप्रसंगीं महाराजांना महारोग्यांचा प्रश्न सोडविण्याची संधि मिळाली. या आश्रमाचा पाया तारीख २२ जून १८९७ रोजीं महाराजांनीं स्वतः घातला.

आपल्या संस्थानांतील उद्योग धंद्यांना उत्तेजन देण्याची व जरूरी भास-ल्यास नवीन उद्योग धंदे सुरू करण्याची, महाराजांना प्रथम पासूनच मोठी हौस होती. या दिशेनें महाराजांचे पहिले प्रयत्न ह्मटले ह्मणजे चहा कॉफीची लागवड करण्याचे प्रयोग होत.

" दक्षिणहिंदुस्थानांतील कॉफीची लागवड करण्यांत येणाऱ्या भागांतील हवापाणी इत्यादि स्थानिक परिस्थितीचें निरीक्षण करून, व कॉफीची लागवड करणाऱ्या अनुभविक यूरोपीयन व हिंदी लोकांचा अभिप्राय घेऊन, जंगल खात्यांतील तज्ञांचें असें मत पडलें कीं, दक्षिण हिंदुस्थानांतील अनकूल परिस्थिति इतकी कोल्हापूर घाटमाथ्यावरील परिस्थिति कॉफीची लागवड करण्यास अनकूल नाहीं. या भागांतील मुख्य दोष ह्मटला ह्मणजे सर्व वर्षभर या भागांत पाऊस सारखा पडत नाहीं. तथापि या पदार्थाला चांगली किंमत येत असल्यामुळें व रुपयाची किंमत कमी झाल्यामुळें, दक्षिण हिंदुस्थानांत कॉफीचा धंदा कित्येक दिवसांपासून किफायतशीर होत आहे; ह्मणून त्याचे प्रयोग कोल्हापुराला होणें जरूर आहे. जरी या प्रयत्नांना अर्धवट यश आलें तरी देखील याचा परिणाम असा होईल कीं, घाटवळ भागांतील जमीन कित्येक वर्षें पडित टाकून, तींत उत्पन्न करावयाचें अशी जी वहिवाट आहे, ती मोडून या जमिनींत कांहीं तरी पीक होईल व डोंगराळ प्रदेशांतील लोकांना रोजगारहि लागेल.

"ह्मणून छत्रपतिमहाराजांच्या आज्ञेवरून कृत्रिम उपायांनीं पाण्याचा पुरवठा न करितां अल्प प्रमाणांत कॉफीची लागवड करण्याचे प्रयोग महाराजांच्या अमदानीच्या पहिल्या वर्षीं करून पाहण्याचें जंगलखात्यानें ठरविलें. या प्रयोगांसाठीं पन्हाळा पेठ्यांतील पेंढखलें हा प्रदेश पसंत करण्यांत आला.

हा प्रदेश उतारावर असून याचा उत्तरभाग बराच थंड आहे. शिवाय घाटापासून थोड्याच अंतरावर सुरक्षित अशा दरींत हें ठिकाण आहे. अगदीं कोरी जंगली जमीन असून ती विस्तीर्ण अशी आहे. पन्हाळ्याहून दोन हजार रोपे मागविण्यांत येऊन, मृग नक्षत्राच्या झडींत यांची ह्मैसुरी पद्धतीनें लागवड करण्यांत आली. दुसऱ्या वर्षांकरितां रोपे तयार करण्यासाठीं वाफे तयार करण्यांत आले. "

१८९८ पर्यंत महाराजांनीं लोकहितार्थ जे उपाय केले, त्यांपैकीं कांहींचा निर्देश करण्यासारखा आहे. वेठ व बिगार धरण्याची पद्धति १८९४ सालीं बंद करण्यांत आली. कर्जबाजारी झालेल्या इनामदारांना व जमीनदारांना ऋण-मुक्त करण्यासाठीं थोड्या अटीवर त्यांना कर्ज देण्यास सुरुवात झाली. संरक्षित जंगलांत जनावरांना चरण्याची परवानगी देणारे नियम करण्यांत आले. कोल्हा-पूर शहरांतील दाटी कमी करण्यासाठीं व व्यापाराला प्रोत्साहन देण्यासाठीं शाहुपुरी

हें नवीन शहर वसविण्याची योजना १८९५ सालीं हातीं घेण्यांत आली; व पुढें थोडयाच वर्षांत ही योजना पूर्ण यशस्वीहि झाली. शाहुपुरी हें आतां व्यापाराचें व उद्योग धंद्याचें भरभराटीस आलेलें एक केंद्र आहे; व येथें कोल्हापुरांतील सधन लोकांचे रमणीय बंगले आहेत. या वसाहतीस महाराजांचें नांव देण्यांत आलें असून, महाराजांच्या स्मारकांत त्याची प्रामुख्यानें गणना करितां येईल. महाराजांनीं लक्ष घातलेला दुसरा धंदा ह्मटला ह्मणजे पुण्यांतील कापसाची व रेशमाची गिरणी ही होय.

१८९४ सालच्या सप्टेंबर महिन्यांत पुणें येथें महाराजांचें जें आगमन झाल, त विशेष महत्त्वाचें असल्यानें त्याचा येथें सविस्तर उल्लेख होणें इष्ट आहे. हें आगमन सरकारीरीत्या झाल्यामुळें महाराजांचें स्टेशनवर पद्धतशीर स्वागत करण्यांत आलें. ( महाराजाबरोबर राणीसाहेबहि होत्या ) पुणें सार्वजनिकसभा नांवाच्या त्या काळच्या महाराष्ट्रांतील प्रमुख राजकीय संस्थेनें महाराजांना हिराबागेंत मेजवानी दिली. या प्रसंगीं पुण्यांतील बहुतेक प्रमुख नागरिक ( त्याकाळीं पुण्यांत राहाणारे पेशवाईच्या काळचे बडे लोक देखील ) हजर होते. महाराज व त्यांच्या बरोबर असलेले त्यांचे बंधु बापूसाहेब व इतर गृहस्थ या सर्वांचें पुण्यांतील पुढारी लोकांनीं अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. प्रमुख सरदारलोकांची व नागरिकांची महाराजांना ओळख करून दिल्यानंतर त्या वेळीं नुक्तेच उदय पावूं लागलेले मुत्सद्दी प्रो० गोपाळ कृष्ण गोखले यांनीं मानपत्र वाचून दाखविलें. प्रो० गोखले यांचा जन्म कोल्हापूर संस्थानामध्येंच झाला असल्यामुळें, या दिवशींच्या पाहुण्यांविषयीं त्यांच्याठायीं विशेष कळकळ असणें अगदीं स्वाभाविक होतें. त्या मानपत्रांत पेशव्यांच्या जुन्या राजधानींतील महाराजांच्या आगमनानें लोकांत जो उत्साह उत्पन्न झाला त्याचा पुढीलप्रमाणें उल्लेख करण्यांत आला होता.

"आपल्या घराण्याच्या प्रख्यात संस्थापकानें मराठयांच्या राष्ट्रीयत्वाचा पाया घातल्यावर तो दृढ करण्याची पवित्र कामगिरी विधात्यानें एकेकाळीं पुण्यावर सोंपवलेली होती; परंतु ही गोष्ट आतां केवळ कथाविषय होऊन बसली आहे. मात्र कोल्हापूरची गादी ह्मणजे मराठयांच्या पराक्रमाचें आज हयात असलेलें दृश्य चिन्ह आहे असें सर्वांस वाटत असून, गादीवर आरूढ होणाऱ्या छत्रपतीविषयीं अखिल महाराष्टांतील लोकांना व प्रत्यक्ष त्यांच्या

छत्राखालीं नसलेल्या लोकांनादेखील, नेहेमीं पराकाष्ठेचें प्रेम व आदर वाटत राहील. ह्मणून आपलें स्वागत करीत असतांना, ज्यांच्याशीं गतकालाच्या बंधनांनीं आह्मी निगडित झालों आहों, व ज्यांच्याबरोबरच कधींहि न विसरण्यासारख्या आठवणी जागृत होऊन डोळ्यासमोर उभ्या राहतात, अशा एका विभूतीचें स्वागत आपण करीत आहोंत, असें लोकांना वाटत आहे. " पुढें याच मानपत्रांत महाराजांच्या भावी-चरित्राशीं निकट संबंध असलेल्या एका मुद्याचा निर्देश करण्यांत आला. तो असा:—

" आपल्या प्रजाजनांचें सौख्य व प्रगति साधणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे, यांत तिळमात्र शंका नाहीं. तथापि सामान्यपणें आपणां सर्वांच्या मातृभूमीच्या व विशेषत: महाराष्ट्राच्या अभ्युदयासाठीं प्रयत्न करणें हेंहि आपलें कर्तव्य आहे. आपल्या संस्थानच्या प्रजाजनांसंबंधानें असलेल्या आपल्या कर्तव्याच्या खालोखाल हें महत्वाचें कर्तव्य आहे. "

मानपत्रांत उल्लेख करण्यांत आलेल्या या दुसऱ्या मुद्याविषयीं आपलें मत स्पष्टपणें सांगण्याची दक्षता महाराजांनीं आपल्या उत्तरादाखल केलेल्या भाषणांत घेतली होती. महाराज ह्मणाले:—

" माझ्या प्रजाजनांच्या कल्याणाखेरीज अखिल महाराष्ट्रांतील लोकांच्या कल्याणाची मीं काळजी बाळगावी, असें आपण सांगण्याची मुळींच जरूरी नव्हती. दयाळु ब्रिटिश सरकारच्या अमलाखालीं साम्राज्याचे सर्व घटकावयव इतके संलग्न झालेले आहेत कीं, सर्वांची सारखीच प्रगति झाल्याखेरीज एका विशिष्ट अवयवाची प्रगति होणें अशक्य आहे. शिवाय, महाराष्ट्रांतील लोकांना आजपर्यंत ज्या सामान्यबंधनांनीं एकमेकांशीं जखडून टाकिलें आहे, तींच बंधनें त्यांच्यांत परस्पर सहानुभूति कायम राहील, याबद्दल खात्री करण्यास पुरेशीं आहेत. "

महाराजांच्या पुढील आयुष्यांतील टीकाकारांनीं सार्वजनिक सभेनें १८९४ सालीं केलेली ही सूचना व तिला महाराजांनीं दिलेलें उत्तर लक्षांत ठेविलें असतें तर महाराजांवर टीका करण्यास त्यांना विशेष जागा राहिली नसती.

पुण्यास महाराजांची दुसरी महत्त्वाची सफर १८९५ सालच्या मार्च महिन्यांत झाली. चतु:शृंगीच्या मैदानांतील फर्ग्युसन कॉलेजची नवीन इमारत उघडण्याकरितां ही सफर करण्यांत आली होती. डेक्कन् एज्युकेशन सोसाय-

टीचे महाराज अध्यक्ष असल्यामुळें, ही नवीन इमारत उघडण्याकरितां नूतन इलाखाधिपति लॉर्ड सॅन्ढर्स्ट यांना विनंति करण्याचें काम महाराजांकडे सहजच आलें; आणि ही कामगिरी त्यांनीं थोडया पण गोड शब्दांत बजाविली. याच भाषणांत, सोसायटीनें सर्व लोकांना शिक्षण स्वस्त व सुलभ करून दिल्याबद्दल महाराजांनीं सोसायटीचें अभिनंदन केलें.

कोल्हापुरांत व कोल्हापूरच्या बाहेर ज्या ज्या सार्वजनिक स्वरूपाच्या चळवळी होत, त्यांना आपल्या सहाय्याची कितपत आवश्यकता आहे, त्याची ते कसोशीनें चौकशी करीत असत. जेव्हां जेव्हां एखाद्या चळवळीच्या पुरस्कर्त्यांचा स्वार्थत्याग त्यांच्या दृष्टोत्पत्तीस येई, तेव्हां तेव्हां महाराज पराकाष्टेचें दातृत्व दाखवीत असत. महाराणीनें महाराजांना जी० सी० एस० आय्० हा बहुमानाचा किताब तारीख १ जानेवारी १८९५ रोजीं अर्पण करून महाराजांनीं केलेल्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल त्यांचा गौरव केला. महाराजांना हा किताब समारंभपूर्वक अर्पण करण्याचा विधि याच वर्षी तारीख १८ सप्टेंबर रोजीं झाला. हा किताब महाराजांना बहाल करते वेळीं नेक नामदार लॉर्ड सँढर्स्ट यांनीं सरकारांना महाराजांविषयीं किती आदर वाटत होता, हें सांगितलें:—

“ मराठासत्तेचे जे थोडे अवशिष्ट प्रतिनिधी आहेत त्यांपैकीं महाराजहि एक आहेत. मराठासाम्राज्याचे आद्य संस्थापक हे यांच्या पूर्वजांपैकीं एक होते. यांच्या पूर्वजांच्या वेळीं मराठ्यांचा इतिहास वीरश्रीनें जसा उज्ज्वल झाला होता, तद्वतच आपली अमदानीहि थोड्याशा निराळ्या दिशेनें म्हणजे महाराज शांततेच्या काळीं राज्य करीत असल्यानें सहानुभूति, न्यायप्रीति, करारीपणा व सर्व साधारण प्रगति, या गुणांनीं तितकीच उज्ज्वल होईल, असा मला भरंवसा आहे. महाराजांची एक उत्कट इच्छा व्हाइसरॉयसाहेबांनीं मान्य केल्याचें जाहिर करण्याची आनंदाची कामगिरी थोडया दिवसांपूर्वी माझ्याकडे आली होती. यामुळें महाराजांना मिळालेले अधिकार कांहीं लहान सामान्य नाहींत. त्या अधिकारांचा योग्य रीतीनें उपयोग करण्याची जबाबदारीहि फार मोठी आहे. संस्थानच्या राज्यपद्धतींत न्यायबुद्धि व निःपक्षपातीपणा असल्याशिवाय ही जबाबदारी पार पडणें शक्य नाहीं. आपणांवरील अतिशय उच्च व अत्यंत जबाबदारीचें कर्तव्य म्हटलें म्हणजे शहाणपणानें व चांगल्या प्रकारें राज्य करणें हेंच होय. ”

१८९५ सालच्या मे महिन्यांत कोल्हापुराहून घोड्यावरून निघून महाराजांनीं महाबळेश्वर अवघ्या सहा तासांत गांठलें. या प्रसंगीं महाराजांचें सामर्थ्य व तेज कसोटीला लागून त्यांची अद्वितीय घोडेस्वार अशी ख्याति झाली. प्रकृतीच्या मानानें इतके परिश्रम घेणें अशक्य होईतोंपर्यंत महाराज कित्येक वर्षें हें अश्वारोहणपटुत्व एकसारखें दाखवीत होते.

ज्या बाईच्या विवाहबंधनानें बडोदा व कोल्हापूर हीं दोन मराठा घराणीं एकजीव झालीं, अशा महाराजांच्या पणजी अहल्याबाई राणीसाहेब या तारीख १४ डिसेंबर १८९५ रोजीं स्वर्गवासी झाल्या. या बाईबद्दल महाराजांच्या ठायीं पराकाष्ठेचा आदर वसत होता; ह्मणून यांच्या नांवानें एक देशी दवाखाना उघडून यांची आठवण चिरस्मरणीय करण्याचा महाराजांचा विचार ठरला. कोल्हापूर येथील मुलींच्या प्रमुख शाळेशीं या बाईच्या नांवाचा यापूर्वीं संबंध आला होता. हिंदी वैद्यकशास्त्रानें कांहीं बाबतींत जी अद्वितीय प्रगति केलेली होती, तिला प्रोत्साहन देण्याच्या हेतूनें हा दवाखाना उघडण्यांत आला. तारीख १५ आक्टोबर १८९६ इ० रोजीं या दवाखान्याला सुरवात होऊन, तो एका अनुभविक वैद्याच्या हवालीं करण्यांत आला. विद्यार्थ्यांना थोडका खर्च यावा ह्मणून त्यांच्याकरितां एक वसतिगृह १८९६–९७ सालीं स्थापण्यांत आलें. या संस्थेवर देखरेख करण्याचें काम एका कमिटीकडे सोंपविण्यांत आलें होतें. या कमेटीचे अध्यक्ष संस्थानांतील एक प्रमुख ब्राह्मण अधिकारी होते. दुसऱ्या एका प्रकरणांत या संबंधानें आह्मांस पुनः या कमिटीचा उल्लेख करावा लागेल.

महाराजांच्या अमदानीच्या पहिल्या पांच वर्षांचा हा संक्षिप्त इतिहास आहे. सर्व बाबतींत या अवधींत महाराजांनीं आपलें कर्तव्य यशस्वी रीतीनें पार पाडिलें; याबद्दल कोल्हापूरच्या प्रजाजनांची एकवाक्यता झाली. जेथें जेथें महाराज जात, तेथें तेथें ते आपल्या स्वाभाविक साध्या राहणीमुळें व आपल्या सुस्वभावाच्या योगें, कोणांवरहि तत्काळ आपली छाप बसवीत असत. या वेळेच्या एका वर्तमानपत्रकारानें महाराजांसंबंधीं पुढील उद्गार काढिले होते.

"महाराजांचें साधेपणाचें खासगी वर्तन, बडेजावीचा अभाव व दुसऱ्यांच्या मनाला यत्किंचित्हि धक्का न पोंचण्याबद्दल त्यांची पराकाष्ठेची दक्षता, यांच्या योगें महाराजांशीं ज्याचा ह्मणून संबंध येतो, त्याच्या मनांत पराकाष्ठेचा आदर उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. ते व त्यांचे धाकटे बंधु कागल-

कर या दोहोंमध्यें जो प्रेमभाव वसत आहे, त्यावरून महाराजांच्या गृहचारित्र्याची बरीच कल्पना होते. हे दोन तरुण एकत्र असतांना त्यांचें परस्परांशीं वर्तन, एकमेकांविषयीं त्यांचें पराकाष्ठेचें प्रेम व न कळत प्रत्येक जण दुसऱ्याच्या सुखदुःखाविषयीं किती कळकळ बाळगितो इत्यादि गोष्टी पाहून मोठा आनंद होतो. उदार मालकाला स्वामीनिष्ठ नोकरांची केव्हांहि उणीव नसते; परंतु श्रीशाहुछत्रपति यांच्या बाबतींत ते केवळ आपल्या औदार्यानेंच नव्हे, तर आपल्या तैनातींत असलेल्या लोकांच्या सुखदुःखाबद्दल ते स्वतः काळजी घेत असतात, यामुळेंच महाराजांच्या नोकरलोकांचें महाराजांवर पराकाष्ठेचें प्रेम आहे."

अखिल महाराष्ट्रांतील लोकांच्या मनांत या नूतन नृपतीविषयीं ज्या भावना वसत होत्या, त्यांचें हें यथातथ्य चित्र होय. महाराजांच्या एकाद्या कृत्यावर व विशेषतः कोल्हापुरांतील नवीन प्रधान-मंडळाच्या घटनेवर जी टीका होत होती तेवढी खेरीज करून, जनतेची सर्व सहानुभूति महाराजांच्या बाजूला होती असें ह्मणतां येईल. पुण्यांतील वर्तमानपत्रांनीं महाराजांवर टीकेचा भडीमार करण्यास सुरवात केली होती; परंतु यासंबंधीं कोल्हापूरच्या ब्राह्मणांचें देखील सर्वसाधारण धोरण कशा प्रकारचें होतें, याचें 'समर्थ' पत्रानें यथार्थ वर्णन केलेलें होतें. त्या पत्राच्या ह्मणण्याप्रमाणें, एकंदरींत टीकास्पद गोष्टी अगदींच क्षुल्लक स्वरुपाच्या असल्यामुळें, महाराजांच्या टीकाकारांनीं आपले शब्द फुकट दवडूं नयेत, असाच 'समर्था' चा सल्ला होता. सामान्य जनतेचें याप्रमाणें महाराजांविषयीं अनुकूल मत होतें, इतकेंच नव्हे तर खुद्द त्यांच्या भावी प्रतिपक्षांला देखील महाराज या वेळीं प्रिय झालेले होते. आज एकाद्या वृद्ध ब्राह्मण कारकुनाच्या विधवा मुलीला एक लहानसें वर्षासन दे, तर उद्यां एकाद्या पोरक्या ब्राह्मण मुलाला शिष्यवृत्ति देऊन अनुग्रह कर, अशा प्रकारच्या भूतदयेच्या कृत्यांनीं महाराजांनीं लोकांच्या अंतःकरणांत प्रेमाची जागा पटकविलेली होती. सदयतेच्या एकाद दुसऱ्या कृत्यानें आपल्या नेहमींच्या कंटाळवाण्या व्यवसायाला एक प्रकारचा सजीवपणा ते आणीत असत; व हेंच महाराजांच्या लोकप्रियतेचें रहस्य होतें. १८९५ सालच्या प्रारंभीं महाराजांचा शिरोळ येथें मुक्काम असतांना त्यांनीं आपले गुरु मि० फ्रेजरसाहेब यांना पुढीलप्रमाणें लिहिलें:—



रजपूतवाडी येथील महाराजांचें बसण्याचें ठिकाण.

" मी सिंहासनारूढ झाल्यापासून ऑफिसच्या दिवशीं जे माझ्या भेटीची वाट पाहात असतात, त्यांना ११ ते १२ च्या दरम्यान मी ठरावीक वेळीं भेटतों. भेटीची वेळ अगोदर ठरविल्याखेरीज जे मला भेटण्यास येतात, त्यांची मी गांठ घेत नाहीं. ही यूरोपीयन लोकांची पद्धत असून ती आपणांस आवडत नाहीं असें लोकांचें ह्मणणें आहे. संध्याकाळीं ४।। वाजतां तबेल्याकडे जाते वेळीं मी रयत लोकांची गांठ घेतों. अशा प्रकारें त्यांना माझ्याशीं मन मोकळें करून बोलण्याची संधि मिळते. "

लौकरच ठरावीक वेळीं भेटण्याची पद्धत बहुतेक सोडून देऊन, लोकांना व आपणाला सोईस्कर अशा कोणत्याहि वेळीं दर्शनाकांक्षी लोकांना भेट देण्याची पौर्वात्य पद्धति त्यांनीं स्वीकारिली. या पद्धतींत कांहीं दोष आहेत, यांत शंका नाहीं; परंतु ज्या गरीब लोकांना महाराजांचें लांबूनच दर्शन घेऊन तृप्त व्हावें लागलें असतें, अशा लोकांना महाराजांची भेट या पद्धतीच्या योगें पुष्कळच सुलभ झाली, हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. महाराजांच्या दर्जाच्या दुसऱ्या कोणाचीहि ज्या प्रतीच्या लोकांना गांठ घेणें अशक्य असतें, त्या लोकांपेक्षां पन्नास पटीनें कमी दर्जाच्या लोकांचीहि गांठ घेण्यास व त्यांच्याशीं सर्व विषयांसंबंधानें मनमुराद चर्चा करण्यास महाराजांना यत्किंचित्‌हि कमीपणा वाटत नसे. बऱ्याचशा बाबतींत संस्थानिकांशीं साम्य असलेल्या एखाद्या गव्हर्नराशीं महाराजांची तुलना केली असतां, हें त्यांच्यांतील अंतर स्पष्ट दिसून येईल. मुंबईचे इलाखाधिपति हे कोणत्याहि संस्थानिकापेक्षां जास्त काम करीत असतात; परंतु ज्यांच्या हितसंबंधांविषयीं आपल्या हातीं कर्तुमकर्तुम् अशी शक्ति आहे, अशा लोकांशीं महाराजासारखा त्यांचा प्रत्यक्ष संबंध येणें संभवनीय नसतें. महाराजांसारखा साधा व सहजदर्शनीय नृपति लोकांचें प्रेम जसें सहज संपादन करूं शकतो, तसें आपल्या ताब्यांतील जिल्ह्यासाठीं मरमरून काम करणाऱ्या एखाद्या अधिकाऱ्याला करितां येत नाहीं. महाराज जात्याच व शिक्षणानें खरेखुरे पौर्वात्य पद्धतीचे नृपति असल्यामुळें त्यांच्या आचारविचारांना व त्यांच्या प्रजाजनांना लौकरच सोईस्कर असें वळण लागलें. सामान्य लोकांत महाराज मिळून मिसळून वागत असत. आपल्या राजधानीच्या शहरामध्यें हिंडतांना देखील, ते आपल्याबरोबर सर्व प्रकारचे लोक घेत. अशा लोकांच्या सहवासापासून काय फायदा आहे ? असें एकदां त्यांच्या एका मित्रानें त्यांना विचारिलें

होतें. महाराजांनीं या प्रश्नाला तत्काळ उत्तर दिलें नाहीं. संभाषण चाललें असतांना राजवाड्यांतील नवीन वैदिक प्राठशाळा कशी काय चालली आहे ह्मणून महाराजांनीं त्या मित्राला विचारिलें. वैदिक विद्यालयाची प्रगति चांगली असून, या विद्यालयाच्या अधिकाऱ्यानें आपलें कर्तव्य चांगल्या प्रकारें बजाविलें आहे, असें त्यानें उत्तर दिलें. यानंतर थोड्या वेळानें महाराजांनीं आपल्या परिवारांतील कनिष्ट दर्जाच्या एका मनुष्याला तोच प्रश्न केला. त्यासरशीं तो मनुष्य एकदम उठला व त्यानें महाराजांसमोर व त्यांच्या मित्रासमोर त्या विद्यालयाच्या अधिकाऱ्याच्या तऱ्हेवाइकपणाचा पाढा वाचण्यास सुरवात केली. तेव्हां महाराज लागलींच त्या मित्राकडे वळून ह्मणाले, ‘ अशीं माणसें जवळ बाळगण्याचा फायदा आतां आपणांस दिसून आला काय ? आपल्या सारख्या चांगल्या मनुष्याकडून प्रत्येक गोष्टीची चांगली बाजू समजते; परंतु एकाद्या गोष्टींतील काळें बेरें समजण्यासाठीं अन्य साधनाचा उपयोग करावा लागतो; व तें अन्य साधन ह्मटलें ह्मणजे अशा प्रकारचे लोक होत.’ अशा मार्गापासून होणाऱ्या फायद्यांना कांहीं मर्यादा ह्मणून असते, हें निर्विवाद आहे. परंतु अशा मार्गाच्या अवलंबनानें कित्येक पापभीरु संस्थानिकांना कधींहि न लाभलेली अशी लोकप्रीयता महाराजांना प्राप्त झाली, हेंहि तितकेंच खरें आहे.



## प्रकरण ७ वें.

# १८९९ सालचें वावटळ.



८९९ सालच्या प्रारंभीं क्यांडीप्रकरण खेरीज करून बाकीचें कोल्हापूरचें वातावरण बरेंच निवळलेलें होतें. महाराजांच्या हातीं आतां स्वयंनिर्मित असें प्रधानमंडळ असल्यामुळें त्यांना तें हवें असेंच होतें. अंत:स्थ परि-स्थिति माहित नसलेल्या लोकांना महाराज अवघे २४ वर्षांचे असल्यामुळें पोलिटिकल एजंटच्या तंत्रानें वागत असावेत असें वाटे. व या कारणामुळेंच माजी दिवाण मि० तारापूरवाला यांच्या सारख्या अनुभविक सल्लागारास महाराजांना मुकावें लागलें, अशीहि त्यांची समजूत झालेली होती. माजी दिवाण व मि० कीर्तिकर यांना त्यांच्या जागे-वरून दूर करण्यांत आल्यामुळें महाराजांचे दोन्ही हात निकामी झाले, असें वाटून जनतेचीं मनें हवालदील झालीं आहेत, असें एका वर्तमानपत्रानें त्या वेळीं प्रसिद्ध केलें होतें. मि० कीर्तिकर हे महाराजांच्या वडीलांचे जिवलग स्नेही असून महाराजांच्या अत्यंत सरळ नोकरांपैकीं ते एक होते, अशी त्यांची ख्याति होती. मि० सबनीस हे सरसुभे झाल्यानंतर त्यांच्या जागीं मि० कीर्तिकर यांची हुजूर चिटणीस या नात्यानें नेमणूक झाली होती. याच जागेवरून त्यांना दूर करण्यांत येऊन, तेथें मि० मराठे यांना नेमण्यांत आलें. नवीन प्रधानमंडळ पूर्वीच्या मानान अगदींच कमी पगाराचें व अननुभवी असल्यामुळें, विशेष बिकट प्रसंगास तोंड देण्यास अगदींच नालायक आहे; असेंहि कित्येकांकडून उपहासात्मक दृष्टीनें प्रतिपा-दण्यांत येत होतें. माजी अधिकारी लोकांचे गुणावगुण कांहीं असोत, नवीन प्रधानमंडळ महाराजांच्या स्वत:च्याच निवडीचें होतें, ही गोष्ट खरी! या नवीन प्रधानमंडळामध्यें विश्वविद्यालयांतील उच्च शिक्षण संपादलेले लोक होते, हेंहि तितकेंच खरें होतें. जरी हे नवीन अधिकारी कोल्हापूर संस्थानच्या नोकरींत नवीन होते, तरी ते सर्व अनुभववृद्ध लोक असून, त्यांचा अनुभव कोणत्याहि प्रसंगाला चांगल्या प्रकारें तोंड देण्यास समर्थ असाच होता. महाराजांची ही

निवड किती शहाणपणाची होती, हे ठरण्यास फार उशीरहि लागला नाहीं. प्रधानमंडळ निवडून एक वर्ष होतें न होतें, तोंच महाराजांच्या नवीन अधिकाऱ्यांची व खुद्द महाराजांचीहि चांगल्याच प्रकारें कसोटी लागून महाराजांनीं निवड करण्याच्या कामीं जी दूरदर्शिता दाखविली होती; ती निर्विवाद सिद्ध झाली.

महाराजहि नेहमींप्रमाणें आपला राज्यकारभार पाहून मधून मधून शिकार करण्याकरितां लांबचे प्रवास करीत असत. या शिकारीच्या संधीचा उपयोग महाराजांना आपल्या कोल्हापूरच्या गरीब रयतेची प्रत्यक्ष माहिती करून घेण्यास चांगला होई. या प्रसंगीं महाराज जी कामगिरी करीत असत, तिचा कोल्हापूरच्या सुशिक्षित लोकांच्या प्रमुख पत्रांत झालेला उल्लेख लक्षांत ठेवण्यासारखा आहे. पुढें या पत्रांचें धोरण इतकें बदललें कीं, महाराजांविषयीं एकादाहि अनुकूल शब्द या पत्रांत प्रसिद्ध होणें अशक्य झालें. हें पत्र ह्मणतें:--

" महाराज शिकारींतच गुंग होतात असें नसून या प्रसंगीं ते रयतलोकांच्या स्थितीविषयीं व खेडयांतील लोकांच्या नडीविषयीं खेडयांपाडयांत लोकहितार्थ जीं कामें चाललीं आहेत त्यांच्याविषयीं अत्यंत कसोशीनें चौकशी करीत असतात. त्यांना एकादी मननीय अशी गोष्ट दृष्टोत्पत्तीस आली तर, ते तीसंबंधानें जरूर ते तत्काळ हुकूम सोडितात." रामलिंगला जाते वेळीं मार्गांत ते आळतें नांवाच्या खेडयांतून जात असतां त्या गांवच्या लोकांनीं महाराजांचें पौर्वात्य पद्धतीला अनुसरून अत्यंत उत्साहानें स्वागत केलें. त्या वेळीं डोंगराळ प्रदेशांत ते हिंडत असल्यावेळींच मकरसंक्रांत झाली. या सणाचे दिवशीं खेडगळ लोकांच्या झुंडींच्या झुंडी रामलिंग डोंगराच्या जंगलांतील महाराजांच्या छावणीकडे लोटल्या व त्यांनीं छावणींत दरबारी थाटानें बसलेल्या आपल्या हुजूरांना शर्करायुक्त तीळ नजर केले. राजधानीला न जातां महाराजांनीं डोंगरांतच सण साजरा केला; हें पाहून खेडयांतील लोकांना आनंद झाला, असेंहि याच लेखकानें वर्णन केलें आहे.

फेब्रुवारी महिन्यांत महाराज युवराजासह कागलास गेले. तेथें त्यांचें त्यांच्या नातलगांकडून व लोकांकडून नेहमींप्रमाणें मोठ्या थाटानें स्वागत झालें; या प्रसंगीं एवढीच महत्त्वाची गोष्ट झाली नसून निपाणीच्या व्यापारी लोकांना महाराजांच्या मुलाखतीकरितां बोलाविण्यांत आलें होतें. त्यांच्याशीं केलेल्या चर्चेंत कोल्हापूर हें व्यापाराचें केंद्र करण्यासंबंधानें खल झाला. या

प्रीत्यर्थ शाहुपुरीमध्यें जाऊन राहणाऱ्या व्यापारीलोकांना विविधप्रकारच्या सवलती देण्याचें महाराजांनीं अभिवचन दिलें. या काळांतील महाराजांच्या ठिकठिकाणच्या हालचाली लक्षांत घेतां, महाराज किती निरलस परिश्रम घेत होते, हें पाहून विस्मय वाटतो. १८९९ सालच्या डिसेंबर महिन्यांत ते लिहितातः—

पन्हाळा येथें फक्त मी झोपतों; याखेरीज बाकीचा सर्व काळ ऑफिस येथेंच असल्यानें मी ऑफिसमध्यें काम करण्यांत घालवितों. सकाळचा माझा वेळ शहरांतील प्लेगसंबंधीं कामाची देखरेख करण्यांत खर्च होतो. पीकपाण्याची स्थिति प्रत्यक्ष पाहाण्यासाठीं थोडया दिवसापूर्वीं शेतवार्डींत सुमारें ४० मैलांचा मीं प्रवास केला. बरोबर मीं एकच घोडा घेतला होता. चौकशी करीत करीत मला जावें लागल्यामुळें तासीं सुमारें ३ मैलप्रमाणें माझा प्रवास झाला. त्यामुळें मला बराच त्रास झाला. घोडयावर बसून महाबळेश्वरपर्यंत मीं जी मजल मारिली होती, त्यापेक्षांहि हा प्रवास तापदायक झाला. दोन दिवसांनंतर मी पन्हाळयाला जाणार आहे. ''

महाराजांचा आपल्या सर्व आयुष्यभर जो जीवनक्रम ठरलेला होता, त्याचा हा एक मासला आहे. ज्या काळचें वर्णन मी देत आहे, त्या काळीं महाराजांना इतके अविश्रांत परिश्रम करण्यास तशीं विशेष कारणेंहि होतीं. वास्तविक पाहिलें असतां त्यांच्या सभोंवतीं संकटांचा जणू गराडाच पडला होता. महाराजांच्या अंगीं जी असामान्य बुद्धिमत्ता व दूरदृष्टित्व होतें, त्यांच्या अभावीं, या संकटांत महाराजांचा चुराडाच उडाला असता.

१८९६ च्या अखेरीला कर्नल डब्ल्यु० पोलिटिकल एजंट या नात्यानें कोल्हापूरला आले. महाराजांच्या वडलांचे ते एके काळीं मित्र असल्यामुळें, आरंभीं आरंभीं दोघांमध्यें मोठया सलोख्याचें नातें होतें. ज्याला स्वतःची कांहीं तरी बुद्धि आहे अशा कोणत्याहि मनुष्याचें त्यांच्याशीं पटणें अशक्य होतें, असें लौकरच अनुभवास आलें.* * *१८९७ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत कर्नल व दरबार यांच्यामधील दुही विकोपास जाऊन ती महाराजांच्या कित्येक मित्रांना

* या प्रकरणांत जेथें फुल्या दिलेल्या आहेत तेथील कांहीं मजकूर गाळला गेला आहे, असें वाचकांनीं समजावयाचें आहे. गाळण्याचें कारण त्याची प्रसिद्धि करण्याचा काळ अद्याप आला नाहीं, हेंच होय.

विदितहि झाली. यांपैकीं मि० ई० नांवाचे एक मित्र दोघांमध्यें सख्य उत्पन्न करण्याच्या हेतूनें महाराजांना लिहितातः—

" आपण तो ( प्लेग ) बळाऊं देणार नाहीं, असा मला भरंवसा आहे. या कामाप्रीत्यर्थ कर्नल रे हे आपणांस हवे असेच सल्लागार आहेत, अशी माझी समजूत आहे. त्यांच्या मदतीचा उपयोग करून घेतां येऊं नये इतक्या थराला गोष्टी गेल्या नाहींत, अशी मला आशा आहे. उतार उतरून पलीकडे जाई-पर्यंत घोड्याचें मन दुखविणें योग्य नव्हे, अशी एक आह्मांमध्यें जुनी ह्मण आहे. आणि प्लेगाचें काम ह्मणजे ज्या ठिकाणीं पाणी खोल व ओढतें असतें, असा हा एक उतारच आहे. "

या प्रकरणांतील सर्व पक्षांचे सारखेच मित्र मि० एन्. हे तडजोड कर-ण्याच्या हेतूनें कोल्हापुराला जाईतोंपर्यंत परिस्थिति निवळेल असें वाटत नव्हतें; परंतु मि० एन्. यांच्या आगमनानें प्रस्थापित झालेली शांततावहि क्षणिकच होती.

* * *

या थराला गोष्टी येऊन पोंचल्या असतां, ता० ५ आगष्ट १८९९ रोजीं मुंबईच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे एक सभासद नामदार जेम्स यांचें कोल्हा-पुराला आगमन झालें. त्याच दिवशीं रात्रीं त्यांच्या सन्मानार्थ नवीन राज-वाड्याच्या दरबारहॉलमध्यें कर्नल रे व त्यांची पत्नी यांच्या देखरेखेखालीं एक मेजवानी देण्याचें ठरलें. दोन प्रहरीं कर्नल रे यांना एक निनांवी पत्र आलें, त्यामध्ये त्यांना वीष चारण्याचा एक कट झाला असून, हा सिद्धीस नेण्यासाठीं मि० फर्न्यांडिस यांनीं कांहीं लोकांना लांच दिली आहे, असा इषारावजा मजकूर होता. ही बातमी ऐकतांच ठरलेल्या कार्यक्रमांतून मेजवानी वगळ-ण्यांत यावी किंवा मेजवानीच्या व्यवस्थेवर स्टेटपोलीस लोकांचा पहारा ठेवावा असें महाराजांनीं ताबडतोब सुचविलें. कर्नल रे यांना या दोन्ही सूचना अमान्य होऊन आपल्या माजी बटलरच्या मदतीनें सर्व व्यवस्था स्वतःच्या नजरेखालीं त्यांनीं करविली. या बटलरचें नांव मि० फिलिप्स असें असून थोड्या दिवसामागें त्याला संस्थानच्या पी० डब्ल्यु० डी० मध्यें स्टोअर कीपरची जागा देण्यांत आली होती. मेजवानीच्या बाबतींत आलेल्या पत्रावरून कर्नलनीं कोणत्या तऱ्हेची दक्षता घेतली होती हे दरबारपैकीं कोणालाहि कळविण्यांत आलें नव्हतें. परंतु पाहुण्यासाठीं पानें मांडण्यांत आल्यानंतर पानावर वाढ-

लेल्या रोट्या कर्नल रे यांनीं तावडतोब काढून टाकण्यास लावून, त्या एका खोलींत अगोदरच ठेवलेल्या टोपलींत भरून ठेवण्यास सांगितलें. नंतर पानां-वर नवीन रोट्या वाढण्यांत आल्या. एक महिन्यानंतर रसायनचिकित्सकानें या रोट्यांत कांचेची पूड व कांचेचाच एक तुकडा आढळून आल्याचा रिपोर्ट केला. अपराधी लोकांना शासन करितां यावें, ह्मणून या प्रकरणाची पुरी चौकशी करणें, हा जो एकच मार्ग या वेळीं महाराजांना खुला होता, तो त्यांनीं सुचविला. परंतु "या प्रकरणाला प्रसिद्धि दिली तर दरबारावर मोठाच आळ येईल." ह्मणून या गोष्टी जेथल्या तेथेंच राहूं द्याव्यात, अशी कर्नलनें सूचना केली या आत्मघातकी सल्ल्याला बळी पडण्याइतकें महाराज कांही दुधखुळे नव्हते. महाराज ह्मणाले, "मला असें वाटतें कीं, या मार्गाचा जर आपण स्वीकार केला, तर दरबारासंबंधीं अनेक तर्ककुतर्कांना व शंकाकुशंकांना आयती जागा सांपडेल. त्यामुळें दरबारच्या हितशत्रूंच्या हातीं एक नामी व उप-युक्त असें शस्त्र सांपडून, पुढें कोणत्याहि प्रसंगीं त्याचा उपयोग करून दर-बारला दहशत घालण्याच्या कामीं त्याचा त्यांना चांगलाच फायदा घेतां येईल. अशा रीतीनें डोक्यावर कायमची तलवार लोंबत ठेऊन घेण्यापेक्षां क्षणिक आळ पत्करणें बरें असें मला वाटतें." ह्मणून सप्टेंबर महिन्याच्या पहिल्या तारखेस ह्मणजे रसायनचिकित्सकाचा रिपोर्ट [illegible] दुसऱ्या दिवशीं महा-राजांनीं कर्नल यांना पुढीलप्रमाणें पत्र लिहिलें:—

"दिवाणांनीं मला असें सांगितलें आहे कीं, सरकारच्या रसायनचिकि-त्सकाकडे परीक्षा करण्यासाठीं ज्या रोट्या पाठविण्यांत आल्या होत्या, त्यांमध्यें वाळू व कांच सांपडली, ही मोठी भयंकर गोष्ट आहे, असें मला वाटत असल्यामुळें, या गोष्टीच्या अगदीं बुडाशीं जाणें फार जरूर आहे असें मला दिसतें. या बाबतींत आह्मीं तत्काळ उपाय योजना केली नाहीं तर, या प्रकरणाशीं संबंध असलेल्या लोकांना एकत्र बसून बचावाचा विचार करण्यास व खोटा पुरावा तयार करण्यास अवसर मिळेल.

"दरबारी मेजवानीच्या संधीचा फायदा घेऊन हा अत्याचार करण्यांत आल्यामुळें त्यापासून दरबारची बदनामी होईल, असें जे आपणांस वाटतें, तें खरोखरच आपल्या प्रेमळतेचें द्योतक आहे. परंतु अपराधी लोकांना सोडून

देण्यापेक्षां क्षणभर अशा प्रकारचा आळ पत्करणें श्रेयस्कर होईल, असें मला तरी निदान वाटतें. या सदयतेमुळें अशा प्रकारच्या गोष्टी पुनः करण्यास त्यांना चांगलेंच उत्तेजन मिळेल. आपणांस पसंत असेल तर या प्रकरणाची लागलींच चौकशी करण्यास मी पोलीसलोकांना सांगेन. ''

या बाबतींत कर्नल यांनीं पुण्यांतील आपल्या अधिकारी मित्रांचा सल्ला घेण्यासाठीं जीं पत्रें पाठविलीं होतीं, त्यांना उत्तर मिळेतोंपर्यंत या बाबतींत कांहींच करण्यांत येऊं नये, असें कर्नल रे यांना वाटल्यावरून एक दोन दिवस फुकट घालवावे लागले. तिसऱ्या दिवशीं महाराजांनीं आपले चीफ् पोलीस मि० पेंढारकर यांना या प्रकरणाची कसोसीनें चौकशी करण्यास हुकूम केला. या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं एक कार्यक्षम असा डिटेक्टिव्ह अधिकारी व चौकशीअंतीं जर खटला करण्यांत आला, तर तो चालविण्यासाठीं एक न्यायाधीशहि आपणास मिळावा ह्मणून महाराजांनीं गव्हर्नरसाहेबांना लिहिलें. मुंबई सरकारचा अत्यंत नांवाजलेला पोलीस अधिकारी मि०ब्रयुइन यांना दरबारच्या मदतीला नेक नामदार गव्हर्नरसाहेब यांनीं पाठविण्याचें ठरविलें. परंतु पोलिटिकल एजंटच्या सांगणीवरून ही मदत घेणें कांहीं काळपर्यंत पुढें ढकलावें लागलें.

* * * *

याकरितां एक तार महाराजांना लिहून देण्यांत येऊन, ती सरकारकडे पाठविणें त्यांना भाग पडलें. मात्र मुंबई खात्यांचे इनस्पेक्टर ग्यानॉन यांना कोल्हापुराला पाठविण्यांत येऊन सप्टेंबरच्या दुसऱ्या आठवड्यांत या प्रकरणाच्या चौकशीला प्रारंभ झाला. या मध्यंतरीच्या काळीं कर्नल हे स्तब्धच होते. संस्थानचे प्रमुख मुलकी अधिकारी मि० शिरगांवकर यांच्यावर कर्नल यांचा थोडा बहुत विश्वास असल्यानें ब्रिटिश अधिकारी येईतोंपर्यंत, या प्ररकणाच्या चौकशीचें काम यांच्यावर सोंपविण्यांत आलें. त्याचप्रमाणें कर्नल यांना तक्रारीला जागा राहूं नये ह्मणून दरबारनें या प्रकरणाची सर्व सूत्रें त्यांच्या हवालीं करून, शिरगांवकरांना पोलिटिकल एजंटच्या हुकुमाप्रमाणें वागण्यास हुकूम केला. ब्रिटिशअधिकारी येऊन दाखल होण्यापूर्वीं कर्नल यांनीं मि० फर्न्यांडिस यांना अटक करण्यास जेव्हां शिरगांवकरांना सांगितलें, तेव्हां त्यांनीं असें कळविलें कीं, अटक करण्यास पुरेसा पुरावा सांपडत नसल्यामुळें, ब्रिटिश पोलिस येऊन दाखल होईतोपर्यंत स्तब्ध राहणेंच अधिक श्रेयस्कर

होईल; नाहीं तर अटक करण्याच्या बाबतींत घाई केल्याबद्दल ते दोष देतील. मि० फन्र्यांडिस हे परमुलुखांत पळून जाऊं नयेत ह्मणून त्यांच्यावर नजर ठेवण्यांत आली तथापि फन्र्यांडिस यांना मोकळें ठेवणें इष्ट नाहीं, अशी कर्नल रे यांची समजूत होती. प्लेग मोहिमीसंबंधीं जी धमकीवजा निनांवी पत्रें येत असत, त्यांचे फन्र्यांडिस हेच लेखक आहेत, या आरोपावरून मि० फन्र्यांडिस यांना अटक करण्यांत यावी ह्मणून कर्नल यांनीं दिवाणाला कळविलें; परंतु यांच्या ह्मणण्याप्रमाणें वागणें श्रेयस्कर होणार नाहीं, असें दिवाणाला वाटल्यामुळें मि० फन्र्यांडिस यांना अटक करण्यांत आली नाहीं.

ब्रिटिशपोलीस मि० ग्यानॉन हे दाखल होतांच मि० फन्र्यांडिस यांना अटक करण्यांत यावी ह्मणून कर्नल यांनीं पुन: आग्रह धरिला; परंतु या अधिकाऱ्यानें देखील मि० फन्र्यांडिस यांच्याविरुद्ध पुरेसा पुरावा नसल्यामुळें, त्यांना अटक करण्याचें नाकारिलें. चौकशी जारीनें सुरू होऊन दोन दिवस झाल्यानंतरहि जेव्हां मि० फन्र्यांडिस यांच्याविरुद्ध कांहींच पुरावा मिळेना, तेव्हां कर्नल यांनीं चौकशी अमलदारांना असें कळविलें कीं, स्थानिक पोलीसलोकांवर, दरबारच्या अधिकारी लोकांवर व इतरांवर मि० फन्र्यांडिस यांचें पराकाष्ठेचें वजन असल्यामुळें, त्यांना अटकच करण्यांत यावी. अशाप्रकारें त्यांची मानखंडना झाली असें लोकांच्या निदर्शनास येईपर्यंत मि० फन्र्यांडिस यांच्याविरुद्ध कोणीहि ब्र देखील काढणार नाहीं व त्यांच्या विरुद्ध पुरावादेखील मिळणार नाहीं. अधिकारी लोक जेव्हां मि० फन्र्यांडिस यांना अटक करण्यास कबूल होईनात तेव्हां कर्नल यांचा दरबारावर रोष झाला. त्यांनीं अशी तक्रार केली कीं, आपला प्राण धोक्यांत असतांना देखील दरबार आपणांस मदत करीत नसून, ही सर्व गोष्ट थट्टेवरच नेत आहेत; ह्मणून बडोद्याच्या मल्हाररावमहाराजांविरुद्ध ज्याप्रमाणें एक कमिशन नेमण्यांत आलें होतें तद्वत् या बाबतींतहि कमिशन नेमावें ह्मणून सरकारला लिहिणें जरूर आहे; मि० फन्र्यांडिस यांना अटक करण्यास नाकबूल होऊन, या प्रकरणांत दरबारचें कांहीं तरी अंग असावें, या शंकेला दरबार जागा देत आहे; कायद्याचे बारीक नियम उराशीं बाळगून स्वस्थ बसण्यासारखा हा सामान्य प्रसंग नसून, ज्या उच्च अधिकाऱ्याविरुद्ध गुन्हा करण्यांत आला आहे, त्यांचा राजकीय दर्जा लक्षांत घेऊन गुन्हेगारांना कायद्याच्या तावडींत आणण्यासाठीं कायद्याच्या नियमांची थोडीबहुत ओढाताण केली तरी हरकत नाहीं; असें कर्नल यांचें ह्मणणें पडलें.

मि० फर्न्यांडिस यांना अटक करण्यास आपण नाकबूल झाल्यामुळें, कर्नल हे याप्रमाणें संतप्त झाले आहेत, असें आढळून आलें तेव्हां आपण माघार घेऊन मि० फर्न्यांडिस यांच्या अटकेला संमति देणेंच श्रेयस्कर आहे, असें त्यांनीं ठरविलें. व त्याप्रमाणें मि० फर्न्यांडिस यांना अटक करण्यांत आली.

चौकशीचें काम तसेंच पुढें चालू राहिलें. परंतु या चौकशींत कांहीं नवीन पुरावा निष्पन्न न झाल्यामुळें कर्नल यांना अशी शंका आली कीं, माजी दिवाण मि० मेहेरजीभाई यांच्या पक्षाचे संस्थानांतील कांहीं बडे अधिकारी यांच्या व कांहीं इतर लोकांच्या हातांतील मि० फर्न्यांडिस हे एक बाहुलें आहे. हे लोक आपल्याविरुद्ध झालेल्या कटाच्या बुडाशीं असून, आपला निकाल लाविल्यानंतर मेहेरजीभाईंना पुन: दिवाणच्या जाग्यावर आणण्यासाठीं महाराजांचें मन आपणांस सहज वळवितां येईल असें या लोकांना वाटत होतें, असेंहि कर्नल यांचें बोलणें सुरू झालें. ह्मणून या सर्व अधिकारी लोकांना डिस्मिस् करावें, पेन्शन द्यावें किंवा कोणत्या तरी इतर मार्गानें त्यांना कामावरून दूर करावें असा त्यांनीं आग्रह धरिला. केवळ संशयावरून हा मार्ग स्वीकारणें रास्त नव्हे, व विश्वसनीय असा पुरावा जर उपलब्ध होईल, तर या लोकांना डिस्मिस् करीन एवढेंच नव्हे तर त्यांची कोल्हापूर संस्थानांतून मी हद्दपारीहि करीन, असें महाराजांचें मत पडलें. परंतु केवळ संशयावर विसंबून राहून दरबारनें सुलतानशाहीस आरंभ करावयाचा तर याचें सर्व खापर महाराजांच्या राज्यपद्धतीवर फुटून वास्तविक ज्यांनीं या बाबतींत पुढाकार घेतला, ते मात्र अगदीं नामानिराळे झाले असते. या उत्तरानें पोलिटिकल एजंटचें समाधान न झाल्यामुळें, संस्थानच्या हद्दींतून या अधिकारी लोकांना हांकून लावावें ह्मणून त्यांनीं दरबारला एकसारखा टुमणा लाविला. शेवटीं याप्रीत्यर्थ पोलिटिकल एजंटकडून लेखी सल्ला मिळावा, अशी महाराजांनीं अट घातली. त्याप्रमाणें लेखी सल्ला मिळतांच, सहा महिन्याच्या रजेवर मि० कीर्तिकर यांना संस्थानाबाहेर जाण्यास हुकूम फर्माविण्यांत आला.

* * * *

दुसऱ्या दिवशीं मि० कीर्तिकर हे सावंतवाडीला निघून गेले, परंतु कोल्हापूर संस्थानांतून ते निघून गेल्यामुळें पोलिटिकल एजंटच्या अपेक्षेप्रमाणें कांहींच

फायदा झाला नाहीं. उलट मेजवानीची व्यवस्था करण्याचें काम ज्या बटलरावर सोंपविण्यांत आलें होतें, त्याच्याशीं स्नेह असलेल्या खताल नांवाच्या एका मनुष्यानें तारीख १८ सप्टेंबर रोजीं मि० ग्यानॉन यांच्याकडे जाऊन, त्यांना व मि० शिरगांवकर यांना, ज्या रोटींत विष कालविलें होतें, ती रोटी कर्नल रे यांचा माजी बटलर फिलीप्स यानें मजकडे दिली होती, असें कळविलें. फिलीप्सची जेव्हां साक्ष घेण्यांत आली, तेव्हां कर्नल रे यांनीं अशाप्रकारचें धोरण स्वीकारिलें कीं, त्यामुळें पुनः सर्वच पारडें फिरलें. फिलीप्सला गुंतविण्यासाठीं एका इस्माइल नांवाच्या मनुष्यानें मला पाठविलें होतें, असें खताल आतां सांगू लागला !

कर्नल रे यांचे बहुमोल प्राण हरण करण्याच्या हेतूनें आणखी एक नवीन प्रयत्न करण्यांत येणार असून, या कटांत संस्थानांतील कांहीं विश्वासुक मराठे अधिकारी व सरदारलोक ( श्रीमंत बा० सुद्धां ) सामील झाले आहेत, अशा अर्थाचें आणखी एक निनांवी पत्र कर्नल रे यांना या वेळीं मिळालें. पोलिटिकल एजंटची एक सारखी कुरकुर पाहून, व कर्नल रे यांच्या कल्पनासृष्टींतील नवीन कटाची बातमी ऐकून, आमचे तरुण महाराज हवालदील झाले असले तर आश्चर्य नव्हतें; परंतु याहि प्रसंगीं त्यांनीं प्रसंगावधान व धैर्य सोडलें नाहीं. या भानगडींचा पुरा तपास करण्यासाठीं मि० ब्रयुइन यांना पाठवावें अशी त्यांनीं मुंबई सरकाराकडे आग्रहाची विनंति केली. कर्नल रे व त्यांच्या पत्नी या विरुद्ध होत्या. पुढें पाहिजे त्या वेळीं, पाहिजे त्याच्यावर राड फेंकतां यावी ह्मणून या गोष्टी जेथल्या तेथें लोंबकळत ठेवण्याची त्यांची इच्छा होती. वस्तुस्थिति पूर्णपणें बाहेर येईतोंपर्यंत, तपास बंद ठेवणें अविचाराचें आहे, असें महाराजांना वाटलें. ह्मणून मि० ब्रयुइन यांची मदत घेण्याचा त्यांनीं आतां निश्चय केला. तसेंच, कज्जा कोर्टांत आला तर तो चालविण्यासाठीं एक ब्रिटिश न्यायाधीशहि त्यांनीं मागविला. या बाबतींत महाराजांनीं ता० ३० सप्टेंबर रोजीं मि० ई० यांना पुढीलप्रमाणें लिहिलें:—

"कर्नल रे यांचा सल्ला या बाबतींत मीं घेतला. तथापि त्यांचें मत माझ्याप्रमाणें नाहीं. ते ह्मणतात कीं, यामुळें माझ्या न्यायाधीशावर माझा विश्वास नाहीं, असें होईल. कदाचित् कांहीं जणांना तसें वाटेल. हें खरें; परंतु जजाला

दरबारनें किंवा दरबारांतील वजनदार पक्षानें पोलिटिकल एजंटच्या सांगणीवरून आपलासा करून घेऊन, मर्जीप्रमाणें निकाल देवविला, अशी वाच्यता होण्यापेक्षां वरीलप्रमाणें थोडा गैरसमज झाला तरी हरकत नाहीं, अशी माझी समजूत असल्यामुळें व या प्रकरणापासून उद्भवणारे महत्वाचे दुष्परिणाम लक्षांत घेतां, ब्रिटिश मुलुखांतील एक अनुभविक जज या कज्जाचा निर्णय करण्यासाठीं मिळावा म्हणून माझी विनंति सरकारपुढें जितक्या जोरानें मांडावी तितकी ती थोडीच आहे, असें मला वाटतें."

या कज्जाची चौकशी संस्थानच्या न्यायाधीशाकडूनच व्हावयाची असें जर अखेर महाराजांनीं ठरविलें असतें तर कज्जाचा निकाल कसाहि होवो, दरबारावर आळ आलाच असता. आरोपी निर्दोषी ठरले असते, तर खुद्द दरबारचाच या प्रकरणाशीं संबंध असल्यामुळें दरबारनेंच त्यांची मुक्तता करविली, असा कर्नल यांचा शब्द आला असता; उलट आरोपी दोषी ठरले असते, तर पोलिटिकल एजंटच्या वजनामुळें आरोपींना शिक्षा ठोठावण्यांत आली असा जनापवाद आला असता ! या परिस्थितींतून महाराजांनीं जो मार्ग काढला होता, तोच अत्यंत शहाणपणाचा होता.

* * *

या सुमारास मि० ब्रयुइनची मार्गप्रतीक्षा मोठ्या उत्सुकतेनें करण्यांत येत होती. परंतु मि० ब्रयुइनसारख्या पहिल्या प्रतीच्या गुप्तपोलीस अधिकाऱ्याकडून आपल्या प्रकरणाची चौकशी केली जावी, अशी कर्नलची इच्छा नसल्यामुळें, ब्रयुइनच्या आगमनापूर्वीच या प्रकरणाचा निकाल लावण्यासाठीं ते धडपड करूं लागले. मि० ब्रयुइन हे दाखल होईतोंपर्यंत आणखी मुदत मागण्यासाठीं सरकारी वकीलाला दरबारनें सूचना दिली होती. कर्नल याच्या उलट होते.

* * *

तारीख ६ आक्टोबर रोजीं कोर्टानें चौकशीचें काम हातीं घेतलें.

* * *

प्रथम मि० ब्रयुइन हे ज्या दिवशीं दाखल झाले त्याच दिवशीं या कज्जाची तारीख ठेवण्यांत आली होती. मि० ब्रयुइन यांना हा कज्जा चालवितां यावा म्हणून दहा दिवसांची मुदत मागण्यांत आली; व ती कोर्टानें मंजूरहि केली. आणखी मुदत वाढल्यामुळें कज्जाची तारीख ३० आक्टोबरपर्यंत पुढें वाढण्यांत आली.

त्या दिवशीं मि० ब्रयुइन यांनीं सरकारी वकीलाला फिर्याद परत घेण्यास सांगितलें. मि० ब्रयुइन यांचा सविस्तर रिपोर्ट तयार होण्यास आणखी कांहीं काळ लागला. याप्रमाणें आरोपी मोकळे होऊन, कज्जाचा जरी निकाल लागला तरी हें प्रकरण निकालांत टाकण्यासाठीं मुंबईसरकारचा हुकूम होईतोंपर्यंत आणखी कांहीं काळ लोटला. या दिनावधीचा फायदा घेऊन, महाराजांच्या मार्गांतील कांट्यांत भरच टाकण्यांत आली.

* * *

कर्नल डब्ल्यु. यांना दुखापत अगर ठार करण्यासाठीं बुद्धिपुरस्सर खरो-खरच कोणताहि कट झालेला नसून, मि० एफ्० यांचा सर्वस्वीं नाश करून त्यांची कोल्हापुरांतून उचलबांगडी करावी, ह्मणून हें प्रकरण उपस्थित करण्यांत आलें होतें, असें मि० ब्रयुइनच्या रिपोर्टावरून सिद्ध झालें. × × × × अर्था-तच या अहवालावर पोलिटिकल एजंटचें भिन्न मत पडून त्यांनीं स्वतःचें मत सरकाराला वेगळें कळविलें. या दोन बाजू सरकारापुढें असतांना लॉर्ड सँढर्स्ट-साहेबांची मुलाखत घेण्यासाठीं महाराज कित्येक महिनेपर्यंत प्रयत्न करीत होते; परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं एकदाचा तसा योग येऊन, महा-राजांची गव्हर्नरसाहेबांशीं चर्चा करण्याची पुष्कळ दिवसांची इच्छा पूर्ण झाली. खुद्द महाराजांनीं या मुलाखतीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे:—

" ७ तारखेला मी येथून मुंबईला निघालों, व पूर्वी ठरल्याप्रमाणें नेक नाम-दारांशीं औपचारिक रीतीनें भेट व परत भेट १० व ११ तारखेस झाली. १२ व्या तारखेस पुष्कळ दिवसांपासून घाटत असलेली खासगी मुलाखत होऊन, गव्हर्नरसाहेबांनीं माझें भाषण शांतपणानें ऐकून घेतलें, हें सांगण्यास मला मोठें समाधान वाटतें. त्यांचे पुष्कळ गैरसमज दूर करून, माझ्या राज्यकारभारा-विषयींच्या कित्येक बाबींवर निराळा प्रकाश पाडावा लागला. असें मला करावें लागलें याचें अर्थातच मला आश्चर्य वाटलें नाहीं. भाषणांत निघालेल्या कित्येक बाबींविषयीं मीं केलेल्या खुलाशावरून नामदारसाहेबांचें समाधान झालें असावें असें दिसतें. डॉ० सिंक्लेअर व मि० शिरगांवकर यांच्यासंबंधीं नेक नामदार साहेबांचा झालेला गैरसमज, त्यांनीं आजपर्यंत ज्या चांगल्या कामगिऱ्या केल्या व करीत आहेत, त्यांची व त्यांच्या कर्तबगारीची माहिती देऊन, मला दूर

करावा लागला. यानंतर पोलिटिकल एजंटसंबंधीं बोलण्याचें नाजूक व कठिण काम माझ्या आंगावर आलें. ह्यासंबंधीं मन मोकळें करून मला जें सांगावयाच होतें तें सर्व मीं सांगितलें. परंतु नेक नामदारसाहेबांवर त्याचा काय परिणाम झाला असावा, याची मला खातरी देतां येत नाहीं. मला जी माहिती उपलब्ध झाली आहे, तीवरून कर्नल डब्ल्यु० यांची प्रकृति बिघडत चालली असून त्यांचें वर्तन सर्वस्वीं दोषार्ह नाहीं, अशी राजधानींतील लोकांची समजूत झालेली आहे असें मला समजतें. परंतु त्यांच्या आजारीपणामुळें उद्भवणाऱ्या अडचणी दरबारानें कां भोगाव्यात ? किंवा संस्थानच्या कांहीं वरिष्ठ अधिकाऱ्यांवर भयंकर आरोप तसेच कां राहूं द्यावे ? किंवा इतर कित्येक बाबतींत दरबारनें स्वत:स कां त्रास करून घ्यावा ? या गोष्टींविषयीं स्पष्टपणें मला बोलावें लागलें. कर्नल डब्ल्यु० हे मार्च महिन्याच्या नवव्या तारखेस पुष्कळ दिवसांची रजा घेऊन जाणार आहेत व ते परत येणार नाहींत असें मला आश्वासन मिळालें आहे. नूतन गव्हर्नरसाहेबांशीं माझी ओळख करून देतां यावी ह्मणून नामदारसाहेबांनीं पुढील महिन्यांत मला मुंबईस येण्यास त्यांनीं सांगितलें आहे. परंतु मुंबईचा प्रवास विशेष खर्चाचा असतो व त्या सुमारास दुष्काळाला कोणतें स्वरूप प्राप्त होईल तें सांगतां येत नाहीं.

* * *

यामप्रमाणें या प्रकरणाचा निकाल लागला ह्मणून सर्व संकटांची समाप्ति झाली असें मात्र नाहीं. संस्थानला त्रास देण्याच्या कामीं दैवी व मानुषी आपदांचें जणू संगनमत होऊन, कोल्हापूर शहरांमध्यें प्लेगाचा प्रादुर्भाव झाला. यामुळें शहरांत अराजक चळवळीला आपले हात पाय लांब सोडण्यास आयतीच संधि प्राप्त झाली. याच सालीं अवर्षण झाल्यामुळें कोल्हापूर संस्थानच्या कित्येक भागांत दुष्काळानेंहि आपलें ठाणें दिलें. तारीख २५ नोव्हेंबर १८९९ रोजीं पन्हाळा येथून महाराजांनीं कर्नल रे यांना जें पत्र पाठविलें त्यावरून महाराजांच्या कार्यव्याप्तीची थोडीशी कल्पना होण्यासारखी आहे:—"या व भूधरगड पेठ्यांपैकीं कांहीं गांवांतील पिकांचें नुकसान झालें आहे, असें आढळून येतें. माझा येथें मुक्काम असल्यामुळें निरनिराळ्या खेडयांतील लोक थेट माझ्याकडे येऊन, आपलें ह्मणणें मला कळवूं शकतात, हें पाहून मला मोठा आनंद होतो. कोल्हापूरची हवा दूषित झाली असल्यामुळें त्यांना व मलाहि तेथें जावेसें वाटत नाहीं कारण तेथें गेल्यानें या

सांथीचा त्यांना संसर्ग होऊन, ती फैलावण्याचा संभव आहे. दुर्भिक्ष पडलेल्या प्रदेशाच्या आसपास फिरतीवर असणाऱ्या माझ्या जिल्हाधिकाऱ्यांनादेखील माझा येथील मुक्काम सोईस्कर झाला आहे. आपल्या सूचनेवरून टेलीफोनची जी व्यवस्था करण्यांत आली आहे,ती खरोखरच मोठी फायदेशीर गोष्ट झाली आहे.यामुळें कोल्हापुरांतील अधिकारी जणूं येथेंच आहेत, असें समजून त्यांच्याशीं आतां मला बोलतां येतें. या योजनेमुळें स्वारांची व घोडयांची आतां जरूरी भासत नाहीं, एवढेंच नसून प्लेगाच्या दिवसांत अत्यंत महत्त्वाची अशी वेळहि आतां वांचू लागली आहे. कोटीतीर्थांतील छावणी व प्लेग-इस्पितळ मी तेथें असतें वेळीं ज्याप्रमाणें पहात होतों तद्वत आतां प्रत्येक दिवशीं जाऊन मी पाहूं शकत नाहीं, हीच काय ती खेदाची गोष्ट आहे. तथापि वरचेवर कोल्हापुराला जाऊन व शहरांत फिरून सर्व व्यवस्थेंवर मी जातीनें नजर ठेवितों व जरूर त्या सूचना करितों. जुन्या व नव्या वाडयांत उंदीर पडून तेथीलहि हवा दूषित झाली आहे, ही गोष्ट शोचनीय आहे. या वाडयांची दूषित स्थिति नष्ट करण्यांत येत असून, लौकरच ते निवासयोग्य होतील. ज्या भागांत दुर्भिक्ष पडलें आहे त्या भागांत मी थोडे दिवस जाणार आहे. सध्यां या भागांतील लोक आपलीं पिकें गोळा करीत असून, शेतकी कामासाठीं मजूरदारांना अद्याप रोजगार मिळत आहे. ''

पन्हाळा येथील छावणीचे महाराजांना जे अनुभव आले, त्यांचें वर्णन महाराजांनीं पुढील पत्रांत केलें आहे. अशा स्थळीं राहाण्याचा ज्यांना प्रसंग आला असेल, त्यांचेंसुद्धां असेंच मत झाल्याखेरीज राहणार नाहीं:—

" मुंबईहून परत आल्यानंतर आपणांस पत्र पाठविण्याचें मला झालें नाहीं. पन्हाळा ही अत्यंत सुंदर आणि शांत जागा असून, येथें माझ्याकडून पुष्कळ काम होतें. सर्व शिलकी काम खलास करून, देखरेख करण्याचें काम माझ्या मनाप्रमाणें मला आतां करितां येऊं लागलें आहे. या किल्ल्यावर प्लेगाची देखील मात्रा चालं शकत नाहीं. कोल्हापुरामध्यें गेले चार महिने जरी प्लेगाचा कहर उसळला आहे, तरी या सांथीचा संसर्गदेखील येथें झाला नाहीं. ''

दुसऱ्या एका पत्रांत महाराज ह्मणतात:—

" कोल्हापुरांतील प्लेग देखील आतां आटोक्यांत आला आहे. रोजचें मृत्यूचें सरासरी प्रमाण फक्त ५-६ असतें. दुष्काळाची जाणीव अद्याप येथें भासत नसून; शिरोळ, रायबाग व कोंकण प्रदेशांत सुरु झालेल्या दुष्काळकामाकडे

लोकांचा ओढा दिसून येत नाहीं. इतर भागांतील दुष्काळाचा, पदार्थांच्या किंमतीवर अतिशय परिणाम झाला आहे. दर कोणत्या थराला जाऊन पोंचतील हें अद्याप मला सांगतां येणार नाहीं. कर्नल रे यांनीं आपला रिपोर्ट तयार करून, स्वतःच ते तो मुंबईला घेऊन गेले आहेत असें समजतें.''

एजन्सीमध्यें कर्नल रे यांच्यामागून येणाऱ्या गृहस्थांकडे देखील कांहीं लक्ष पुरविणें या वेळीं भाग होतें. मि० एफ्० यांनीं १८९९ सालच्या डिसेंबर महिन्याच्या ३१ तारखेस महाराजांना पुढील सूचना केली. ती शहाणपणाची होती, याबद्दल सर्वांचेंच एकमत होईल:—

" आपणाला तशी संधि मिळाली तर पोलिटिकल एजंट ह्मणून एक सिव्हिल सर्व्हिसमधील इसम पाठवावा, अशी आपण कां सूचना करीत नाहीं? दरबार व एजन्सी यांमध्यें अलीकडे जी घासाघीस झाली आहे, तिचें विस्मरण पाडण्यासाठीं व जनतेमध्यें विश्वास उत्पन्न करण्यासाठीं, संस्थानाला रेसिडेन्सीमध्यें अतिशय चांगला अधिकारी लाभला पाहिजे, ही गोष्ट अतिशय महत्त्वाची आहे.''

सुप्रसिद्ध प्राच्य—भाषा—कोविद मि० ए० एम्० टी० जॅक्सन आय्० सी० एस्० आणि त्यानंतर मि० ( पुढें नामदार सर डब्ल्यु० ) मॉरिसन् यांची कोल्हापूर रेसीडेन्सीमध्यें नेमणूक होऊन, अखेर ही सूचना यशस्वी झाली. या थोडेच दिवस काम केलेल्या अधिकाऱ्यांच्या व त्यांच्या मागून आलेल्या कर्नल सीली, कर्नल फेरीस, कर्नल वुडहाऊस, कर्नल मेरीवेदर इत्यादि अमलदारांच्या सहानुभूतीच्या धोरणामुळें या काळची स्मृति, जमिनींत पार गाडली गेली; व महाराज आणि पोलिटिकल एजंट यांच्यामध्यें पुनः सख्य उत्पन्न होऊन, समान उद्दिष्ट साधण्यासाठीं त्यांचें सहकार्य होऊं लागलें. १९०० सालच्या एप्रील महिन्यांत त्यावेळचे पोलिटिकल एजंट लिहितातः—" डोंगरी लोकांसंबंधीचे आपले तर्क खरे आहेत, यांत शंका नाहीं. चाऱ्याची निर्यात खुली राखण्याबद्दलचा आपला प्रत्येक शब्द मला मान्य आहे. रस्त्यांत कटकोळ येथील मामलेदारांची मला गांठ पडली. त्यांच्या सांगण्यावरून चालू सालीं या तालुक्यांतील लोकांची स्थिति इतकी वाईट नाहीं. तोरगल येथें अशाच प्रकारची हकीकत मीं ऐकली. आपल्या संस्थानांत दुष्काळकामाची तरतूद करण्याकडे आपण प्रत्यक्ष जें लक्ष पुरवीत आहां, त्याबद्दल व आपले प्रयत्न जे यशस्वी झाले आहेत त्याबद्दल, मीं आपलें अभिनंदन करणें अत्यंत जरूर आहे.

नूतन गव्हर्नरसाहेबांची ओळख करून घेण्यासाठीं मे महिन्यामध्यें महाबळेश्वराला जाण्याचा आपला विचार आहे काय ? ”

१९०० सालाच्या मे महिन्याच्या २६ व्या तारखेस ते पुन: लिहितात:— “ सोबत ठेवलेला दुष्काळ व प्लेग यांसंबंधीं रिपोर्ट व नकाशा पाहण्यासाठीं मला पाठविला, याबद्दल मी आपला फार आभारी आहें. त्यावरून आपली व्यवस्था अत्यंत चोख आहे असें दिसून येतें. १८९६–९७ च्या दरम्यान स्वस्त धान्याचें दुकान कसें चाललें ? या संबंधींचा प्रांताधिकाऱ्यांचा अभिप्राय विशेष मनोरंजक आहे. कारण दुष्काळच्या दिवसांत सरकारनें धान्याचा व्यापार केला, तर त्यापासून हितापेक्षां अनिहितच जास्त होतें, हें तत्त्व त्यांच्या मनावर पूर्णपणें बिंबलें आहे असें दिसून येतें. हें तत्त्व आतां सर्वमान्य झालें. आहे; परंतु साठ वर्षांपूर्वीं जनरल स्लीमननें असाच अनुभव स्पष्टपणें लिहून ठेवला असूनहि कित्येक वर्षें त्याकडे दुर्लक्ष करण्यांत आलें होतें. ”

दुष्काळाच्या चोख व्यवस्थेच्या पुराव्याबद्दल वाचकांनीं याच खासगी पत्रावर विसंबून राहण्याचें कारण नाहीं. ज्याला आपलीं जनावरें पोषणाचें सामर्थ्य नाहीं, त्यानें तीं संस्थानच्या थट्टींत पाठवावीं; तेथें तीं पाळलीं जातील व जेव्हां मालकाला जरूरी वाटेल तेव्हां त्यानें आपलीं जनावरें परत न्यावींत; असा हुकूम सोडल्याबद्दल **‘समर्थानें’** डिसेंबर महिन्याच्या २० व्या तारखेस महाराजांचें अभिनंदन केलें. स्वस्त दरानें गवत विकण्याचीसुद्धां तजवीज करण्यांत आली. जनावरें मोफत चारण्यासाठीं संस्थानचीं जंगलें खुलीं ठेवण्यांत आलीं. सरकारी साऱ्याची तगाई व सूट विस्तृत प्रमाणांत मंजूर करण्यांत आली. याप्रमाणें संस्थानांतील दुष्काळास तोंड देण्यांत येऊन, लोकांत समाधान उत्पन्न करण्यांत आलें.



# प्रकरण ८ वें.

# कोल्हापुरांतील बौद्धिक जागृति.





नेल रे यांच्या प्रयाणानंतर व मि० सीं० हे परत ब्रिटिश मुलुखांत गेल्यावर, संस्थानचीं कामें सुरळीतपणें चालूं लागलीं. महाराजांच्या हुकूमाची बरोबर अंमलबजावणी करून, महाराजांचें धोरण यशस्वी करून दाखविणाऱ्या मंत्रिमंडळाची निवड अगोदरच महाराजांनीं केलेली होती. हें मंत्रिमंडळ महाराजांना सर्वस्वीं समाधानकारक आहे, असें जरी वाटत नव्हतें, तरी राज्यकारभाराचा गाडा सुरळीतपणें चालण्यासारखी परिस्थिति जमली होती, यांत शंका नाहीं. या अवधींत महाराजांना दोन पुत्र व एक कन्या अशीं तीन अपत्यें होऊन, महाराजांचा कुटुंबविस्तार बराच झाला, व संस्थानच्या प्रजाजनांना त्यामुळें अत्यंत आनंद वाटला. संततीच्या बाबतींत कोल्हापूरचें राजघराणें यापूर्वींच्या कित्येक पिढ्या दुर्दैवग्रस्त झालें होतें. शिवाजीमहाराजांच्या सातारा येथील वंशजांच्या करुणास्पद इतिहासामुळें व १८४० ते ५० च्या दरम्यान सातारा येथील राजघराण्याची राजकीय सत्ता एकाएकीं नष्ट झाल्यामुळें, मराठा क्षत्रिय वर्गाचा हेवा करणारे मूठभर लोक खेरीज करून, अखिल महाराष्ट्रांतील जनतेला या घराण्याच्या भवितव्यतेविषयीं अत्यंत तीव्र चिंता वाटूं लागली होती. शिवाजीच्या घराण्याची दुसरी शाखा जरी कोल्हापूर येथें राज्य करीत होती, तरी या घराण्यावर गेल्या कांहीं वर्षांत अनेक आपत्ती कोसळल्या होत्या. त्यांपैकीं ज्यांच्या पश्चात् शाहुमहाराज कोल्हापूरच्या गादीवर बसले, असे महाराजांचे तीन तक्तारूढ झालेले पूर्वज निपुत्रिक वारले; ही गोष्ट कमी महत्त्वाची समजतां येणार नाहीं. मात्र या बाबतींत श्रीशाहुछत्रपतिमहाराज हे खरोखर मोठे भाग्यवान् होते. तारीख १० मार्च १८९४ इ० रोजीं महाराजांना श्रीराधाबाई ऊर्फ आक्कासाहेबमहाराज हें पहिलें अपत्य झालें. तारीख २३ मे १८९५ रोजीं महाराजांना आऊबाई ऊर्फ आक्कासाहेब नांवाची दुसरी मुलगी झाली; परंतु ती पुढें लौकरच मरण पावली. महाराजांचें तिसरें अपत्य म्हटलें म्हणजे पूर्वींचे युवराज व

हल्लींचे श्रीछत्रपति राजाराममहाराज हे होत. या महाराजांचा जन्म तारीख ३१ जुलै १८९७ शुक्रवार दिवशीं झाला. स्वाभाविकपणेंच या प्रसंगीं संस्थानच्या सर्व भागांत महोत्सव झाला; व त्यांत सर्वांनीं अंतःकरणपूर्वक भाग घेतला होता; भावी छत्रपतींच्या आईबापांचा प्रजाजनांनीं यावेळीं मोठा गौरव केला. या प्रसंगाला अनुसरून राजाराम कॉलेजहॉलमध्यें भरलेल्या नागरिक सभेंत एका ब्राह्मणशास्त्र्यानें ह्मटल्याप्रमाणें हिंदु लोक राजाला दैवी अंश समजतात व राजमाता आपल्या पतिसमवेत या परमेश्वरी शक्तीच्या मानवी अवताराला कारणीभूत होत असल्यामुळें, राजपुत्रप्राप्ति हें त्यांच्या वैभवशालित्वाचें मोठें चिन्ह गणलें जातें. आधुनिक विचारसरणीच्या माणसाला ही समजूत विलक्षण वाटण्याचा संभव आहे; परंतु अशा प्रकारची समजूत सामान्य जनतेची होती, व अद्यापहि आहे, यांत शंका नाहीं. छत्रपतींच्या गतदुर्भाग्याला दैवी रोषच कारणीभूत झाला होता व दैवी प्रसादामुळेंच आतां युवराजमहाराजांचा शुभ जन्म झाला, अशीहि लोकांची समजूत झालेली होती. संस्थानच्या वार्षिक अहवालांत या प्रसंगाचें पुढीलप्रमाणें वर्णन केलेलें आहे:—" गेल्या चाळीस वर्षांच्या अवधीनंतर तारीख ३१ जुलै १८९७ शुक्रवार रोजीं कोल्हापूरच्या राजघराण्यांत पहिला खास पुरुषवारस जन्मल्यामुळें, कोल्हापूरच्या घराण्याच्या इतिहासांत हा दिवस संस्मरणीय असा आहे. चार वर्षांपूर्वी महाराजांच्या राज्यारोहणसमयीं राजघराण्यांत जो आनंदी आनंद झाला होता, तितकाच आनंद या प्रसंगींहि झाला, हें योग्यच झालें. महाराजांचे हिंदी व यूरोपीयन मित्र या आनंदाचे समान भागीदार झाले, हें या प्रसंगीं महाराजांना मिळालेल्या मानपत्रावरून व त्यांना आलेल्या सहानुभूतिपर संदेशांवरून स्पष्ट होतें. महाराजांवरची निष्ठा व प्रेम व्यक्त करण्यास महाराजांचे प्रजाजन सदा आतुर असल्यामुळें, आपणांस झालेला आनंद योग्यप्रकारें व्यक्त करण्यास प्रस्तुतचें महागाईचें संकट त्यांनीं आड येऊं दिलें नाहीं.

" नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें चांगल्या वर्तणूकीच्या बारा कैद्यांना बंधमुक्त करून, कपडालत्ता व अन्न गरीब व गरजू लोकांना मुबलक वांटण्यांत आलें. "

महाराजांचें शेवटचें अपत्य ह्मटलें ह्मणजे महाराजांचे द्वितीय चिरंजीव राजकुमार शिवाजीमहाराज हे होत. यांचा जन्म तारीख १५ एप्रील १८९९ रोजीं सकाळीं ११ वाजतां झाला. खुद्द महाराजांना त्यांच्या बाल्यावस्थेंत ज्या

प्रमाणें बालग्रहाची व्यथा झाली होती, तद्वतच १८९८ सालच्या प्रारंभीं युवराजां-नाहि हीच व्यथा उत्पन्न झाली. या अपवादात्मक गोष्टी सोडून दिल्या तर महाराजांच्या कुटुंबांतील माणसें पूर्णपणें निरोगी होतीं असें ह्मणण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत नाहीं. सालोसाल ग्रंथिरोगाची सांथ उद्भवल्यामुळें व हल्लींपेक्षां त्या काळीं प्लेगाची सांथ लोकांस अधिक भयप्रद वाटत असल्यामुळें, महाराजांना आपल्या कुटुंबांतील माणसांसह पन्हाळा येथें वरचेवर राहाणें भाग पडत असें. पन्हाळा हा एक सुंदर डोंगरी किल्ला असून, त्यावर पुष्कळ राजघराण्यांनीं राज्यें केलीं होतीं. या किल्ल्याच्या ऐतिहासिक महत्त्वाचा एकाद्या आगंतुकाच्या मनावरहि परिणाम होण्यासारखा असल्यामुळें, सहाजिकपणेंच महाराजांच्या मनांत या किल्ल्यांत असते वेळीं आपल्या पूर्वजांबद्दल पराकाष्टेची आदरबुद्धि एकसारखी वाढतच गेली. यामुळें पुण्याच्या शिवाजी—चळवळीविषयीं प्रारंभीं महाराजांची पूर्ण साहानुभूति होती. श्रीयुत बाळ गंगाधर टिळक प्रभृतींचें एक शिष्टमंडळ महाराजांकडे गेलें होतें. व त्यानें महाराजांकडून शिवाजी—चळवळीला आपला आश्रय देण्याचें अभिवचन मिळविलें; परंतु श्रीयुत टिळकांच्या पुढारीपणाखालीं या चळवळीला लवकरच जें एक विशिष्ट प्रकारचें राजकीय स्वरूप प्राप्त झालें, त्यामुळें महाराजांना या चळवळीशीं असलेला आपला संबंध तोडावा लागला. तरीपण शिवाजीमहाराजांच्या खास वंशजांच्या मनांत त्या आपल्या तेजस्वी पूर्वजाविषयीं जो एक प्रकारचा अभिमान असावयास पाहिजे, तो पूर्णपणें वसत होताच. रत्नागिरी जिल्ह्यांतील मालवणच्या किल्यांतील शिवाजीमहाराजांच्या प्राचीन मूर्तीचें दर्शन घेण्यासाठीं १९०२ सालच्या मार्च महिन्यांत महाराजांनीं मालवणचा किल्ला प्रत्यक्ष जाऊन पाहिला. तेव्हां महाराजांच्या मनांत आपल्या घराण्याच्या मूळपुरुषाबद्दल इतकी आदरबुद्धि उत्पन्न झाली कीं, शिवाजी महाराजांच्या पालखीला महाराजांनीं आपला प्रत्यक्ष खांदा दिला. व १९०७ सालीं मालवणच्या सिंधुदुर्ग नांवाच्या किल्यांतील शिवाजीमहाराजांच्या मंदिराचा त्यांनीं जीर्णोद्धार केला. महाराजांनीं पन्हाळा येथें अलीकडे शिवाजीमहारा-जांचें जें एक देऊळ बांधिलें आहे, तें किल्ल्यांतील जुन्या राजवाड्याच्या समोरच बांधलेलें असून, बाहेर जाण्याच्या वेळीं प्रत्येक दिवशीं शिवाजी महाराजांचें दर्शन घेतां यावें ह्मणून, महाराजांनीं या देवालयाची अशी रचना केली होती. या गोष्टीवरून महाराजांच्या मनांत आपल्या स्वर्गस्थ पूर्वजाबद्दल

किती आदर वसत होता हें स्पष्ट होतें. कोल्हापुरांतील टाऊन हॉल नजीक नर्सरी गार्डनमधील लहान लहान इमारतींचा जो एक गुच्छ आहे त्यावरून महाराजांच्या या आदरबुद्धीची अधिकच साक्ष पटते.

राज्यकारभाराकडे आतां महाराजांचें लक्ष या वेळीं पूर्णपणें लागलेलें होतें. १८९९-१९०० सालांच्या दरम्यान प्लेगामध्यें दुष्काळाची भर पडल्यामुळें लोकांचें व दुष्काळपीडित जनावरांचें दुःखनिवारण कसें करावें, याची महाराजांना मोठी चिंता उत्पन्न झाली होती. या बाबतींत त्यांनीं केलेल्या उपाययोजनेचा मार्गेंच उल्लेख करण्यांत आलेला आहे.

सुमारें पाऊणलाख रुपये तगाई ह्मणून देण्यांत आले. लोकांच्या दुःख निवारणार्थ वडगांव, रुकडी व शिरोळ येथें नवीन तलाव बांधण्याच्या व जुने तलाव दुरुस्त करण्याच्या कामास सुरवात करण्यांत आली. याप्रीत्यर्थ चार लक्ष रुपये खर्च करण्यांत आले.

एक नवीन असिस्टंट सर्जन नेमून व दवाखान्यांत स्त्रियांचें नवीन खातें निर्माण करून मेडिकल खात्याची पुनर्घटना करण्यांत आली. स्त्रियांचें खातें श्री० कुमारी कृष्णाबाई केळावकर एल्. एम्. अॅन्ड एस्. या बाईच्या हवालीं करण्यांत आलें. मुंबई येथील ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें प्रशंसनीय रीतीनें अभ्यास-क्रम पुरा केल्यावर संस्थानच्या मदतीनें इंग्लंडांतील हॉस्पिटलांमध्यें अनुभव घेऊन आपल्या शिक्षणाची या बाईनीं पूर्तता केली होती. कोल्हापूर येथें 'अहल्याबाई आयुर्वेदिक रुग्णालय' व हातकणंगलें येथेंहि एक डिस्पेन्सरी सुरू करण्यांत आली. या दरम्यानच्या काळांत पी० डब्ल्यु० डी० च्या खात्यानेंहि चांगली कामगिरी केली. वर निर्दिष्ट केलेल्या तलावांखेरीज निपाणी—दाजीपूर रस्त्यावर तीन मोठे पूल बांधण्यांत आले, व शंभर मैल लांबीचे नवीन पक्के रस्ते तयार करण्यांत आले.

या काळांत महाराजांनीं आपल्या प्रजाजनांतील मागसलेल्या वर्गांच्या शिक्षणाला प्रोत्साहन देऊन सर्वांपेक्षांहि विशेष महत्वाची कामगिरी बजाविली. मागसलेल्या लोकांच्या शिक्षणाला महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षण अशी संज्ञा दिली तर ती अधिक यथार्थ होईल. हिंदी लोकांच्या एकदेशी शिक्षणांतील दोष महाराजांनीं इतरांपेक्षां पुष्कळ अगोदर ओळखिले होते. शिक्षण एकदेशी ह्मणण्याचें कारण शिक्षणाची कक्षा त्या काळीं एका लहानशा जातीपलीकडे

जात नव्हती हें होय. सामाजिक प्रगतीच्या असमतोलपणामुळें महाराष्ट्रांतील खरी जनता — ब्राह्मणेतर वर्ग — हतबुद्ध होऊन, तिला पराकाष्टेचा त्रास भोगावा लागत असे. शिक्षणामुळें ब्राह्मणांना जी एक नवीन सत्ता प्राप्त झाली, तिच्या जोरावर संस्थानच्या व हें संस्थान ज्या प्रांतांत आहे, त्या प्रांताच्या सर्व प्रकारच्या सरकारी नोकरींत ब्राह्मणांनीं आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें होतें; ही गोष्ट महाराजांच्या निदर्शनास येऊन चुकली होती. ब्राह्मणांनीं आतांपर्यंत जी अमर्यादित सत्ता बळकाविली होती, ती त्यांच्या हातून हिसकावून घेण्यास पाश्चात्य शिक्षण संपादण्यासाठीं ब्राह्मणेतरांचीं मनें वळविलीं पाहिजेत, याखेरीज दुसरा तरणोपाय नाहीं, अशी महाराजांची समजूत होती. महाराजांना जें कार्य करावयाचें होतें, त्या कार्याकडे सहानुभूतिपूर्वक पाहणारा अधिकारी वर्ग महाराजांना प्रथम निर्माण करावयाचा होता. महाराजांचें धोरण अक्षरश: अमलांत आणणारा असा खात्रीचा अधिकारी वर्ग असल्याखेरीज महाराजांचे सर्व प्रयत्न यशस्वी झाले नसते व त्यांचे विचार कृतींत केव्हांहि उतरले नसते. मि० सबनीस यांचा महाराजांशीं शिक्षक या नात्यानें संबंध आला हा या बाबतींतला महत्त्वाचा योगायोग होय. मागें सांगितल्याप्रमाणें हे आतां महाराजांचे मुख्य मंत्री ऊर्फ दिवाण झाले होते. मि० सबनीस हे कोणत्याहि अधिकारी पदावर आरूढ झालेले असले तरी ब्राह्मणेतर पक्षाच्या सर्व कार्यांत महाराज बहुश: यांचाच सल्ला घेत. महाराज वयांत येण्यापूर्वीं ब्राह्मण लोकांनीं मि० सबनीस यांच्यासारखा चाणाक्ष ब्राह्मणेतर राजकारणी पुरुष महाराजांच्या सान्निध्यांत राहिल्यामुळें जें अनर्थ उद्भवण्याचा संभव होता ते ओळखून, त्यांना महाराजांपासून दूर करण्यासाठीं शिकस्तीचे प्रयत्न केले. मि० टिळक ( त्या वेळीं हे मुंबई कायदेकौंसिलचे सभासद होते ), त्या काळचे कोल्हापूरचे सर न्यायाधीश मि० बी. एन्. जोशी व महाराजांच्या विश्वासांतील डॉक्टर धोंडोपंत बोरकर यांनीं मि० सबनीस हे स्वामिद्रोही असल्याचा प्रत्यक्ष पुरावा मिळाला आहे म्हणून त्यांना परत ब्रिटिश नोकरींत पाठवावें, अशी महाराजांना एकदां सल्ला दिली. मि० सबनीस यांच्याविषयीं जो असला पुरावा मिळाला असेल, तो त्यांनीं हजर करावा एवढेंच महाराजांनीं त्यांना उत्तर दिलें. अर्थातच तसा पुरावा हजर करणें अशक्य होतें. उलट या प्रयत्नामुळें मि० सबनीस यांच्यावर महाराजांचा विश्वास दृढतर होत गेला. पुण्याच्या डेक्कन असोसिएशनचे सेक्रेटरी मि० झस्के यांच्या सल्ल्यानें मि० विचारे एल्. सी. ई. व मिस्टर जाधव एम्. ए. एल्. एल्. बी.



रावबहादूर सर आर. व्ही. सबनीस, सी. आय. ई., दिवान, कोल्हापूर.



पन्हाळा येथील श्री शिवाजी महाराजांचा पुतळा.

अशा दोन नवीन ब्राह्मणेतर इसमांची संस्थानच्या नोकरींत भरती करण्यांत आली. मराठा व इतर ब्राह्मणेतर जातींपैकीं कांहीं पदवीधरांना संस्थानमध्यें मामलेदार व मुनसफ यांच्या जागा देण्यांत आल्या. महाराजांच्या कार्याचे चहाते परंतु पदवीनें विभूषित नसलेले असे कांहीं उत्साही इसम महाराजांच्या सान्निध्यांत असल्यामुळें महाराजांना त्यांचीहि पावलोंपावलीं मदत होत गेली. संस्थानांतील सुशिक्षित अधिकारी लोकांइतकाच महाराजांना त्यांचाहि उपयोग झाला. महाराजांचे धाकटे बंधु श्रीमंत बापूसाहेबमहाराज चीफ ऑफ कागल यांना अशा मदतगारांमध्यें अग्रस्थानचा मान दिला पाहिजे. महाराजांचे ते केवळ उजवा हात होते. सर्व कामांमध्यें सरळ-पणानें वागण्याचा त्यांचा बाणा असे. हातीं घेतलेलें कार्य पूर्णपणें पार पाडण्याची त्यांची हिय्या कोणत्याहि अडचणींना अगर संकटांना हार न जाण्याचा त्यांचा स्वभाव, इत्यादि गुणांमुळें श्रीमंत बापूसाहेबमहाराज हे प्रत्येक बाबतींत महाराजांचे दुय्यम सेनापतीच बनले. बापूसाहेब महाराज ब्राह्मणांविरुद्ध सुरू झालेल्या मोहिमेंत खरे सूत्रधार असून, त्यांनाच ब्रह्मद्वेषाची मुख्य बाधा झाली आहे, अशी सुद्धां कित्येकांची समजूत झाली होती. महाराजांनीं आपल्या एका मित्राला आपल्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें ब्राह्मणेतर वर्गाकरितां बापूसाहेब महाराजांनीं जी उत्कृष्ट काम-गिरी बजाविली होती, तिची जनतेकडून जशी चहा व्हावयास पाहिजे होती, तशी ती झाली नाहीं. ‘ याचें कारण माझ्या सहकारी मित्रांना त्यांनीं काय केलें हें लोकनिदर्शनास आणण्यास मी कधीं संधिच देत नाहीं, ’ असें महाराजांनीं एका ठिकाणीं उघडपणें ह्मटलें आहे. महाराजांचे मेहुणे मे० बाबासाहेब खान-वीलकर ऊर्फ मामासाहेब हे महाराजांच्या हाताखालचे दुसरे कसलेले योद्धे होत. यांच्या नांवाचा उल्लेख केल्याखेरीज महाराजांच्या सहाय्यकांच्या यादीची पूर्तता होणें शक्य नाहीं. श्रीमंत बाबासाहेब खानवीलकर हे जरी पाश्चात्य संस्कृतीनें विभूषित झाले नव्हते, तरी त्यांचें मागासलेल्या वर्गावर अनुपम प्रेम होतें, व हातीं घेतलेल्या कार्याविषयीं ते जी चिकाटी दाखवीत असत ती सामान्य लोकां-मध्यें क्वचितच आढळून येईल. महाराजांचा जो मोठा शिकारी मेळा होता, त्यांमध्यें महाराजांनीं श्रीमंत बाबासाहेबांना “ बुच्चा ” अशी संज्ञा दिली होती. एका वाघाची शिकार करण्यासाठीं सोडलेल्या कुत्र्यांपैकीं एकानें, गर्जनेसाठीं उघडलेल्या व्याघ्रमुखांत आपली मान खुपसून त्याची जीभ तोडली व आपल्या जीवाची आहुति देऊन त्यानें शिकार साधली. त्या कुत्र्याचें नांव बुच्चा असें होतें आणि त्यावरूनच बाबासाहेबांना हें सार्थ नांव देण्यांत आलें. हातीं

घेतलेलें कार्य सिद्धीस नेण्यासाठीं सर्वस्व अर्पण करण्याची तयारी, हेंच बाबासाहेबांच्या स्वभावाचें इंगित होय.

यापुढील मजल ह्मटली ह्मणजे ब्राह्मणेतर तरुण पिढीच्या शिक्षणाची तरतूद करणें ही होय. उपरिनिर्दिष्ट लोकांच्या सहाय्यानें महाराजांनीं हें कार्य हातीं घेतलें. १९०० सालच्या सुमारास महाराजांनीं आपल्या राजवाड्यांत कांहीं मराठा विद्यार्थ्यांची सोय लाविली होती. पहिल्या तुकडीची व्यवस्था सरदारी थाटानें ठेवण्यांत आली. अशा प्रकारच्या फाजील लाडामुळें मुलें बिघडल्याचें पुढें महाराजांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ह्मणून शाळेला जाण्यासाठीं त्यांना जे टांगे देण्यांत येत होते, त्यांऐवजीं बैलगाड्या देण्यास सुरवात झाली. तथापि राजवाड्यांतील वातावरणाचा मराठा मुलांच्या मनावर अनिष्ट परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. आपल्या धड्यापेक्षां सरदारी थाट मात्र ते अधिक जलद शिकले! असें होणें अगदीं स्वाभाविक होतें. मराठ्यांच्या मुलांना प्रोत्साहन देऊन, महाराज त्यांच्या शिक्षणासाठीं किती कळकळ बाळगीत आहेत हें त्यांच्या निदर्शनास आणावें व अननुभूतपूर्व शिक्षणक्रम शक्य तितका चित्तवेधक करावा असा महाराजांचा वरीलप्रमाणें विद्यार्थ्यांची बरदास्त ठेवण्यांत पहिला हेतु होता; परंतु या सदिच्छेला अनुभवाची आंच मिळालेली नव्हती. अशा मार्गानें इष्ट कार्य घडून येणार नाहीं असें पुढें लौकरच महाराजांच्या निदर्शनास आलें. हायस्कूल व कॉलेजमधील ब्राह्मण विद्यार्थ्यांकरितां एक वसतिगृह स्थापन करून कोल्हापुरांतील ब्राह्मणांनीं यापूर्वींच एक कित्ता घालून दिला होता. नेहमींप्रमाणें या संस्थेला त्यांनीं जातिविशिष्ट संज्ञा दिलेली नव्हती. ब्राह्मणांच्या अंतःस्थ उद्देशाची अंधुक कल्पना जरी महाराजांना आली असली तरी त्यांनीं या संस्थेला आपला आश्रय दिला. १८९६-९७ सालच्या वार्षिक अहवालांत या वसतिगृहासंबंधानें पुढीलप्रमाणें उल्लेख आलेला आहे:—

"कोल्हापुरामध्यें जसजसें दुर्भिक्ष वाढूं लागलें तसतसें खानावळीचे दर पांच रुपयांपासून सात रुपयांपर्यंत चढले. ह्मणून मध्यम स्थितींतील आईबापांना आपल्या मुलांना हायस्कुलांत व कॉलेजांत पाठविणें जड जाईल हा विचार मनांत येऊन अशा लोकांना कांहींतरी मदत व्हावी ह्मणून एक वसतिगृह स्थापन करण्यांत आलें आहे. त्या गृहांत प्रत्येक विद्यार्थ्याकरितां प्रत्येक महिन्याचा खर्च पांच रुपये आकारण्याचें ठरलेलें आहे. यासंबंधींची व्यवस्था करण्याचें काम एका कमिटी–



व्हिक्टोरिया मराठा वसतिगृह.

कडे सोंपविण्यांत आलें असून तिचे अध्यक्ष असिस्टंट जज रावसाहेब व्ही० बी० गोखले हे आहेत. गरीब विद्यार्थ्यांना सवलत मिळावी ह्मणून हायस्कूलमधील नादारीचें प्रमाण वाढविण्यांत आलें आहे."

ही संस्था फार दिवस टिकली नाहीं असें दिसतें; पाठशाळेंतील अध्ययन सुरू असतांना मुलांचें स्वातंत्र्य नियंत्रित करण्याची जरूरी नाहीं, अशी कदाचित् या मुलांची अगर त्यांच्या आईबापांची समजूत झाल्यामुळें ही संस्था लय पावली असावी. अशा प्रकारच्या सर्वसाधारण प्रयत्नांपासून मराठयासारख्या मागासलेल्या वर्गांना कांहींच फायदा झाला नाहीं, हें १९०० सालच्या सुमारास महाराजांच्या निदर्शनास आलें होतें. कुरणें राखून ठेवून, त्यांत जनावरें सोडण्याचा महाराजांना मोठा नाद असे. ह्मातारें, तरूण त्याचप्रमाणें अशक्त व सशक्त घोडयांना कुरणांत खुलें सोडण्याच्या पाश्चात्य पद्धतीमुळें अधिक तरुण व अधिक बळकट अशा घोडयांना कुरणांतील सर्व गवत सहज फस्त करितां येतें व तलावांतील सर्व पाणी स्वतःच पिऊन टाकून वृद्ध व अशक्त घोडयांना लत्ताप्रहार करून या 'सर्वसामान्य' कुरणांतून हांकून लावण्यांत येतें. अशा प्रकारची पद्धत आमच्या देशांतील जनावरांना देखील हितप्रद होत नाहीं. मग सर्व वर्गांकरितां ह्मणून अस्तित्वांत आलेल्या वसतिगृहापासून यापेक्षां निराळा अनुभव तरी कसा येणार? खुल्या व्यापाराच्या धोरणामुळें ब्राह्मणासारख्या अधिक समर्थ जातीला आधुनिक शैक्षणिक पद्धतीपासून आपला फायदा करून घेतां आला; परंतु याच पद्धतीमुळें केवळ नांवाला खुले असलेले प्रगतीचे दरवाजे मागसलेल्या वर्गांना पूर्वीप्रमाणें वस्तुतः बंदच राहिले. कित्येक शतकांच्या जुन्या इतिहासामुळें हिंदु समाजामध्यें जी परिस्थिति उत्पन्न झाली, तिचा हें अनिर्बद्ध धोरण अमलांत आणणाऱ्यांनीं विचार केला नाहीं. या इतिहासामुळें ब्राह्मणेतर हिंदु लोकांच्या मनांत स्वाभिमान-शून्यतेच्या कल्पना इतक्या भरून गेल्या होत्या कीं, ज्ञान संपादणें हें आपलें कर्तव्य नसून, परमेश्वरानें व निसर्गानेंहि तें आपणाकरितां निषिद्ध ठरविलें आहे; अशी त्यांची समजूत झालेली होती. १९१७ सालीं खामगांव येथें झालेल्या मराठा शिक्षणपरिषदेच्या अध्यक्षपदावरून महाराजांनीं हा प्रश्न पुढील प्रमाणें मांडला:—"या बाबतींत आमचा इतिहास अंधःकारांत निमग्न झाला आहे. ज्ञान संपादण्याचें काम जनतेच्या एका विशिष्ट जातीचा जन्मसिद्ध हक्क होऊन बसला. मनु व त्याच्या पश्चात् झालेल्या इतर धर्मप्रवर्तकांनीं त्या त्या काळच्या

परिस्थित्यनुरूप भिन्न भिन्न जातींच्या कर्तव्याची संगति घालण्यासाठीं अनेक कायदे करून खालच्या वर्गांना शिक्षणाचीं द्वारें बंद केलीं. वेद व आपले इतर धर्मग्रंथ वाचण्याला देखील त्यांना मनाई करण्यांत आली. हिंदुधर्माखेरीज कोणत्याहि धर्माची अशा अंधश्रद्धेनें व नादानपणानें वागल्याची प्रसिद्धि नाहीं."

आणखी एका प्रसंगीं महाराज ह्मणाले:—" पूर्वीं ज्ञान संपादण्याचें काम इतकें कठीण असें कीं साताऱ्च्या महाराजांना सुद्धां ( अर्थात् प्रतापसिंह महाराजांना ) मध्यरात्रीं आपले धडे तयार करावे लागत असत. मग इतरांची कथा काय ! "

याचा परिणाम असा झाला कीं, ब्रिटिश सरकारला व कित्येक हिंदी संस्थानिकांना आजपर्यंतच्या निष्क्रिय धोरणाची कांस न धरतां शिक्षणामध्यें मागसलेल्या जातींना स्वतंत्र रीतीनें मदत करून, सक्रिय धोरणाचें अवलंबन करणें भाग पडलें. ज्या सवलती देण्यांत येतील, त्यांचा पूर्णपणें फायदा घेण्याची पात्रता अगर तयारी मागसलेल्या वर्गांत जागृत न करितां अशा प्रकारच्या सवलती देऊन, संस्थानला खर्चांत घालणें केव्हांहि हिताचें झालें नसतें. महाराजांनीं आपल्या राजवाड्यांत जे मराठे विद्यार्थी ठेविले होते, त्यांच्या अनुभवानें महाराजांची अशी खात्री होऊन चुकली होती कीं, बाहेरून उपयुक्त प्रोत्साहन मिळण्यापूर्वीं विद्यार्थ्यांच्या अंगीं अशा सवलतींचा फायदा घेण्याची कांहीं अंशीं स्वाभाविक पात्रता असली पाहिजे. मृताला किंवा मृत्युशय्येवर पडून असलेल्याला पौष्टिक अन्नाचा कांहीं एक उपयोग होण्यासारखा नसतो; ह्मणून ज्या ज्या जातींना प्रोत्साहन देण्याचें त्यांच्या मनांत होतें, त्या त्या जाती त्यांच्याच पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं ठेवण्याचा त्यांचा निश्चय असे. आह्मी ज्या काळासंबंधीं येथें लिहीत आहोंत, त्यानंतर पुष्कळ वर्षांनीं जेव्हां अस्पृश्य वर्ग महाराजांना आपला पुढारी समजूं लागला, तेव्हां महाराजांनीं ही गोष्ट बिलकूल मान्य केली नाहीं. महार जातीचे एक पदवीधर मिस्टर अंबेडकर यांच्या अध्यक्षतेखालीं माणगांव ( संस्थान कागल ) येथें तारीख २१ मार्च १९२० रोजीं अस्पृश्य वर्गांची जी एक सभा झाली, तींत महाराज ह्मणाले:—" योग्य पुढारी निवडण्याच्या कामीं आमच्या हातून जे प्रमाद घडतात, तेच आमच्या कष्टमय स्थितीचें आद्यकारण होय, ही गोष्ट जमलेल्या लोकांच्या मनावर मला आदरपूर्वक बिंबवावयाची आहे. स्वार्थी लोक गोड शब्द बोलून प्रसिद्धि मिळविण्यासाठीं पुढारी होतात व ते अज्ञ जनतेला फसवितात. आह्मीं आमच्या जातीचेच पुढारी नेमले पाहिजेत. पशुपक्षीदेखील हीच गोष्ट

करितात. पशूला कधीं कोणी पक्ष्यांचा पुढारी करीत नाहीं, किंवा पक्षी कधीं पशूंचा पुढारी होऊं शकत नाहीं. गाई, बैल व मेंढरें यांचा पुढारीपणा मेंढपाळाकडे असल्यामुळेंच त्यांना अखेर कसाबखान्यांत पाठविलें जातें.''

ही तुलना सर्व ठिकाणीं लागूं पडेल असें जरी ह्मणतां येणार नाहीं, तरी अस्पृश्य लोकांच्या कार्याला स्वतःला वाहून घेण्यास जे अन्य जातीचे कित्येक पुढारी सरसावले, त्यांनीं ऐन वेळीं या लोकांना दगा दिला; व कांहीं अप्रामाणिक परंतु निधड्या छातीच्या पुढाऱ्यांनीं स्वतःचे मतलब साधण्यासाठीं अस्पृश्य वर्गांचा उपयोग करून घेण्याकरितां, ते त्यांचे पुढारी झाले होते, ही गोष्ट खोटी आहे असें नाहीं.

शिक्षणाच्या बाबतींत मागसलेल्या जातींना पाठिंबा देण्यासाठीं कांहीं ठराविक मार्गांचें अवलंबन केले पाहिजे, अशी आतां महाराजांची खात्री होऊन चुकली. डेक्कन असोसिएशनचे, महाराज आश्रयदाते झाले असून, डेक्कन असोसिएशननेंहि महाराजांच्या या उदार आश्रयाबद्दल या असोसिएशनचे महाराजांना अध्यक्ष नेमून त्यांचा गौरव केला. कै० रानडे व गोखले यांच्या सारख्या उदार मतवादी ब्राह्मण लोकांशीं महाराजांनीं या प्रश्नासंबंधीं चर्चा केली होती. यांना महाराजांचे या बाबतींतील विचार पसंत पडले. अशा बाबतींत यांच्या सारख्या खऱ्या ब्राह्मणाच्या सल्ल्यापासून महाराजांना जो फायदा घडत होता, तो उघड बोलून दाखविण्यास महाराज कधींहि हयगय करीत नसत. महाराजांचा आपल्या चारित्र्याच्या अगदीं प्रारंभींच यांच्याशीं संबंध घडला. ज्या दिशेनें महाराज आतां पुढें पाऊल टाकणार होते, त्याच दिशेनें रानड्या सारख्या ब्राह्मणांनीं आदरणीय कामगिरी केली होती, हें महाराज जाणून होते. १९१८ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत मुंबई येथें ब्राह्मणेतर समाजापुढें भाषण करितांना महाराज ह्मणाले:—"ज्यांच्या मृत्यूमुळें जनतेला अतिशय तळमळ लागून राहिली असे माझे मित्र न्यायमूर्ती रानडे व गोपाळराव गोखले यांनीं मागासलेल्या लोकांची सुधारणा करण्यासाठीं प्रयत्न केले होते. मागसलेल्या लोकांमध्यें शिक्षणप्रसार करण्यासाठीं महत्प्रयास केले पाहिजेत, ही गोष्ट प्रथम मीं यांच्यापासूनच शिकली.'' याप्रमाणें इतर जातींच्या शिक्षणासाठीं कांहीं ब्राह्मणपुढाऱ्यांनीं केलेल्या प्रयत्नांचा महाराज जरी गौरव करीत, तरी यशस्वी होण्यास हे प्रयत्न ज्या त्या जातींच्या नायकांनींच केले पाहिजेत

असें त्यांचें ठाम मत होतें. हल्लींच्या परिस्थितींत तें खरेंहि होतें, ही गोष्ट निर्विवाद आहे.

अशाप्रकारें मागसलेल्यांच्या उन्नतीकरितां प्रयत्न करण्याचें ठरवून त्याबद्दल सर्व प्रकारच्या शिक्षणप्रिय लोकांची महाराजांनीं सल्ला घेतली. त्या काळचे डायरेक्टर ऑफ् पब्लिक् इन्स्ट्रक्शन मि० जाईल्स् यांनीं १९०० सालीं पुढीलप्रमाणें लिहिलें:— "आपणांकडून मला जें पत्र आलें, त्याबद्दल मला अतिशय आनंद होत आहे. मराठे लोकांकरितां एक बोर्डिंग स्कूल स्थापन करण्याच्या कल्पनेविषयीं आपल्याशीं संभाषण करण्यास मला आनंद होईल, हें मी येथें नमूद करावयास पाहिजे असें नाहीं. शिक्षणाच्या बाबतींत मराठयांना पुढें आणण्याच्या कामीं कांहीं खास प्रयत्नांची अत्यंत जरूरी आहे, ही गोष्ट मला सर्वस्वीं मान्य आहे. त्यांचे आचार विचार उच्च शिक्षणाला अनुकूल असे नाहींत. ह्मणून ब्राह्मणसमाजाशीं त्यांची तुलना केली असतां ते मागें पडतात. मीं कोल्हापूर कॉलेज जेव्हां पाहिलें, तेव्हां मराठे उच्च शिक्षण चिकाटीनें संपादन करीत नाहींत असें मला आढळून आलें. अशी वस्तुस्थिति असल्यानें सहाजिकपणेंच शिक्षणखात्यांत नोकरी मिळण्यासाठीं यांच्याकडून माझ्याकडे अर्ज क्वचितच येतात. इतर खात्यांतहि हीच स्थिति आहे."

या काळीं महाराज फक्त मराठा जातीचाच विचार करीत नव्हते. निपाणीजवळ असलेल्या जैन लोकांच्या स्तवनिधी तीर्थानजिक कांहीं दिवसांनीं एक जैन परिषद् होणार आहे, अशी बातमी १९०१ च्या प्रारंभीं महाराजांच्या कानीं आली. जैन लोकांनीं जें कार्य हातीं घेतलें होतें, त्याविषयीं महाराजांच्या अंत:करणांत सहानुभूति आहे, असें जैनांना आश्वासन देण्यासाठीं महाराजांनीं आपल्या पदरीं असलेले एक जैन पदवीधर मि० पाटील यांना परिषदेस मुद्दाम पाठविलें. मि० पाटील हे त्या वेळीं रायबाग येथें महालकरी असून महाराजांची छावणीहि तेथेंच असल्यामुळें त्यांना आपलें काम सोडून जाववेना. माझ्याबद्दल कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं, तुह्मी परिषदेला जाऊन तिचें काम यशस्वी करा, असें सांगून महाराजांनीं त्यांची रवानगी केली. कोल्हापूर येथें जैन विद्यार्थ्यांकरितां एक वसतिगृह उघडण्याचें जैन परिषदेनें ठरविलें व त्याप्रमाणें १९०१ सालच्या एप्रील महिन्यांत वसतिगृह उघडण्यांत आलें. जैन जातींतील कांहीं प्रमुख लोकांमध्यें मतभेद उत्पन्न झाल्यामुळें या वसतिगृहाच्या

पुरस्कर्त्यांना महाराजांची तत्काल मदत घेतां आली नाहीं; परंतु पुढें थोडक्याच वर्षांनीं महाराजांची त्यांना चांगलीच मदत मिळाली. या दरम्यानच्या काळीं सम्राज्ञी व्हिक्टोरिया राणीसाहेब यांचा अंत झाला. व्हिक्टोरिया महाराज्ञीची कारकीर्द अत्यंत महत्वपूर्ण अशी झाली असल्यामुळें व या अमदानींतच हिंदु शास्त्रांच्या अनुज्ञेनें मराठा व तत्सम जातींना आजपर्यंत बंद असलेलीं शिक्षणाचीं द्वारें प्रथम खुलीं झाल्यामुळें मराठा वसतिगृह, या पुण्यश्लोक राज्ञीचें योग्य स्मारक होईल असें महाराजांना वाटलें, हें स्वाभाविकच होय. या गृहाचे सेक्रेटरी मेहेरबान ह्मैसाळकर यांच्या शब्दांतच सांगावयाचें ह्मणजे, " या अमदानींत हिंदी जनतेतील खालच्या वर्गांना विद्येचें महत्त्व समजूं लागलें. मुसलमान, जैन, शेणवी, प्रभु इत्यादि जातींचे पुढारी त्या त्या जातींत शिक्षण प्रसार व्हावा, ह्मणून संस्था स्थापन करीत आहेत. मराठे लोकांत याच कल्पनेचा त्वरित प्रसार झाल्यामुळें आमची हल्लींची संस्था जन्मास आली आहे. " माजी राज्ञींच्या नांवानें संबोधली जाणारी मराठा विद्यार्थ्यांची संस्था तारीख १८ एप्रील १९०१ रोजीं महाराजांच्या अध्यक्षतेखालीं सुरू करण्यांत आली. या संस्थेला महाराजांनीं मोठी कायमची देणगी दिली व ती वाढवीत वाढवीत लवकरच ४७,००० पर्यंत नेली. जुन्या इमारतीला नवीन विस्तृत इमारती जोडण्यांत आल्या. आज या इमारतींत शंभर विद्यार्थ्यांची सोय होण्यासारखी आहे. महाराजांनीं वार्षिक ५५० रुपयांची देणगी व वार्षिक २००० रुपयांचें जमिनीचें उत्पन्न या संस्थेला देऊन तिची आर्थिक स्थिति बळकट केली आहे. या व इतर वसतिगृहांचे फंड संस्थानच्या खजिन्यांत दरसाल दर शेंकडा ८ टक्के व्याजाच्या दरानें ठेविले आहेत. या संस्थेतील विद्यार्थ्यांना नादाऱ्याहि सढळ हातानें दिल्या जातात. "

तारीख २५ सप्टेंबर रोजीं कर्नल सिली यांनीं या संस्थेच्या नवीन इमारतीच्या पायाचा दगड बसविला; व तिचा मराठ्यांना विशेष उपयोग होईल, या गोष्टीवर जोर देऊन, कर्नलसाहेब ह्मणाले:—

" दोन उपदेशाच्या गोष्टी सांगण्यास मला परवानगी मिळेल तर मी कमेटीला असें आग्रहपूर्वक सांगेन कीं, कोल्हापुराला ज्ञानार्जनासाठीं जे मराठे विद्यार्थी येतात, त्यांची खाण्यापिण्याची कमी खर्चात सोय करूनच न थांबतां, कमेटीनें विद्यार्थ्यांच्या नैतिक ( कदाचित् धार्मिकहि ह्मणतां येईल ) अभ्युदया-

कडेहि लक्ष दिलें पाहिजे. अनैतिक अगर दुराचार-प्रवर्तक अशा गोष्टींपासून ही संस्था नेहमीं अलिप्त ठेविली पाहिजे. या बाबतींत संस्थेची भरभराट होणें, तिच्या व्यवस्थापकांवरच अवलंबून आहे.

" बौद्धिकशिक्षणाला जर नैतिक शिक्षणाची जोड मिळाली नाहीं, तर चांगले नागरिक कधींहि निपजणार नाहींत. दरबार बौद्धिक शिक्षणाची तरतूद करतें; नैतिक अगर धार्मिक शिक्षणाकडे तुह्मींच लक्ष पुरविलें पाहिजे. "

एकाच जातीच्या उन्नतीसाठीं प्रयत्न करून संस्थानची इतिकर्तव्यता होणार नाहीं, ही गोष्टहि कर्नल सीलीसाहेबांच्या लक्षांत आल्याखेरीज राहिली नाहीं. ते ह्मणाले:—" कोल्हापूर संस्थानांत फक्त मराठेच राहतात असें नाहीं, ही गोष्ट तुह्मीं विसरतां कामा नये. मराठा जातीच्या हितसंबंधाला चालन देण्यासाठीं तुह्मी शक्य ते प्रयत्न करीत असतांना, राष्ट्रपुरुषाचे याखेरीज इतर अवयव आहेत, ही गोष्ट तुह्मीं विसरतां कामा नये. वैयक्तिक हेतु साध्य करण्या-साठीं प्रयत्न करीत असतांना सामान्य जनतेचें कल्याण व अभ्युदय साध्य कर-ण्याकडे नेहमीं तुमचें लक्ष असलें पाहिजे. "

कर्नल फेरिस व मि० पीज एम्० पी० यांनीं १९०२ सालच्या मार्च महिन्यांत मराठा वसतिगृह जाऊन पाहिलें. व आपल्या प्रोत्साहनपर आणि सहानुभूतिपरिपूर्ण अशा उपदेशानें या पवित्र कार्याला त्यांनीं दुजोरा दिला. कर्नलसाहेबांनीं या संस्थेचा व या संस्थेच्या कार्याचा पुढील शब्दांत उल्लेख केला:—

" मराठ्यांच्या आकांक्षतेच्या वाढीचें दूरवर आलोचन करण्याची संधि माझ्या इतकी फारच थोडया इंग्लिश गृहस्थांना मिळाली असेल असें मला वाटतें. सुमारें तीस वर्षांपूर्वी मी कोल्हापुराला प्रथम आलों, तेव्हां ही जात मागस-लेली असून अशिक्षित होती. हें जरी मराठासंस्थान आहे, तरी खालच्या पेशाच्या नोकरीखेरीज मंत्रिपदावर किंवा इतर अधिकाराच्या जागांवर एकहि मराठा नव्हता. अशा प्रकारची जरी असमाधानकारक परिस्थिति होती, तरी त्याला त्या वेळीं कांहीं उपाय नव्हता. प्रगति ही आंतूनच होत असते, आणि त्या काळीं देखील तुह्मांमध्यें एक प्रकारची शक्ति उदय पावत होती. या शक्तीमुळें ही प्रगति एकाद्या दिवशीं पूर्णावस्थेला जाणारच होती. ती उदयो-न्मुख शक्ति ह्मणजे तुमचे महाराज व त्यांचे सहाध्यायी यांना त्या वेळीं दिलें

जात असलेलें शिक्षण हेंच होय. या तरुणांच्या प्रगतीवर समाजाची प्रगति अवलंबून होती. मराठा शिक्षणसंस्थेनें आपल्यासमोर जे उद्देश ठेविले आहेत, ते स्पृहणीय आहेत व मराठ्यांना आतां ज्या सवलती देण्यांत येत आहेत, त्यांचा जर ते फायदा घेणार नाहींत तर त्याचा दोष त्यांच्यावरच राहील; आणि इतःपर मराठे लोक अधोगतीला पोंचले आहेत, असें जर इतर जाती ह्मणूं लागल्या तर त्यांना दोष देतां येणार नाहीं."

ज्या शैक्षणिक ध्येयाचा या वसतिगृहानें मराठे लोकांत प्रसार करावयाचा होता, तें कर्नल साहेबांच्या मतें पुढीलप्रमाणें होतेंः—

"ज्ञातीची नैतिक उन्नति घडवून आणण्याचें साधन ह्मणून तुह्मीं प्रथम शिक्षण संपादन केलें पाहिजे. केवळ वैयक्तिक स्तोम माजविण्यासाठीं शिक्षण नाहीं, हें तुह्मी लक्षांत ठेवा. सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून स्वतंत्र बाण्यानें वागण्यास शिका. स्वतःकरितां नवीन मार्ग काढा व पुराणप्रियतेला फांटा द्या."

या विद्यार्थीगृहाचे जनक शाहुमहाराज जेव्हां स्वर्गस्थ झाले, तेव्हां या संस्थेत ऐंशी विद्यार्थी होते. यांपैकीं नऊ जण राजाराम कॉलेजमध्यें शिकत होते आणि बाकीचे कोल्हापुरांतील निरनिराळ्या हायस्कूलमध्यें शिकत होते.

जैन वसतीगृहाची स्थापना १९०१ सालच्या एप्रील महिन्यांत झाली, हें वर आलेंच आहे. १९०४ सालीं मराटा वसतिगृहासमोरील सुंदर चौफाळा माळा-वर जैनवसतिगृहाच्या मुख्य इमारतीच्या पायाचा दगड रोंवून महाराजांनीं या वसतिगृहाला चिरस्थाई स्वरूप आणिलें. ही जागा दक्षिण महाराष्ट्र जैनसभेला खुद्द महाराजांनीं बक्षिस दिली. ही नाक्याची जागा जैनांना देण्याचा महाराजांनीं जेव्हां निश्चय केला तेव्हां कांहीं दरबारी लोकांनीं कोणत्या ना कोणत्या तरी सबबी-वर विरोध करण्याचें कंकणच बांधिलें होतें. आपल्यापेक्षां जैनविद्यार्थीगृह अधिक ठळक जागेवर बांधलें जाणार याबद्दल मत्सर बुद्धीनें ते या विरोधाला प्रवृत्त झाले होते. या लोकांनीं ज्या अडचणी उपस्थित केल्या, त्या इतक्या होत्या कीं, त्यामुळें पायाचा दगड बसविण्याच्या समारंभाचा पहिला कार्यक्रम लांबणीवर टाकावा लागला. तथापि महाराजांनीं आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. ही जागा जैन लोकांना मिळें नये ह्मणून खुद्द रेसिडेंट साहेबांचाच प्रयत्न आहे, अशी

या कारस्थानी लोकांनीं कंडी पिकविल्यामुळें हें प्रकरण रेसिडेंट साहेबांच्या कानावर जाऊन आदळणार, असें महाराजांनीं भविष्य केलें व तारीख १६ जून १९०४ रोजीं त्या वेळचे कोल्हापूरचे रेसिडेंट यांना त्यांनीं पुढील सूचना लिहिली.

" जैन लोक आपल्या जातीच्या विद्यार्थ्यांकरितां एक वसतिगृह बांधीत आहेत हें ऐकून आपणांस आनंद वाटल्याखेरीज राहणार नाहीं. मराठा वसतिगृहासमोरील व वृद्ध डॉक्टर सिंक्लेअर यांच्या घरानजीकची जागा याकरितां त्यांना बक्षीस दिली आहे. येथील कांहीं लोकांकडून आपल्याकडे कदाचित् तक्रार येण्याचा संभव आहे; परंतु ती तक्रार निराधार आहे. एका विशिष्ट जातीचें वर्चस्व नष्ट होण्याचा संभव असल्यामुळें या जातीला प्रोत्साहन देणें मला अत्यंत इष्ट वाटतें, ह्मणूनच मी आज हें तुह्मांस लिहीत आहें. "

रेसिडेंटसाहेब त्या जागेवर इमारत बांधण्यास कधींच परवानगी देणार नाहींत व जेव्हां जेव्हां या रस्त्यावरून रेसिडेंटसाहेब जाऊं लागतील, तेव्हां स्वयंपाक गृहांतील धुरामुळें त्यांना त्रास होण्याचा संभव आहे; अशा जागेवर संडास बांधण्यास कधींच परवानगी मिळणार नाहीं, वगैरे कितीतरी अडचणी या लोकांकडून जैनलोकांपुढें मांडण्यांत येत होत्या. परंतु महाराजांच्या उदार विचारामुळें, या अडचणीचे काल्पनिक ढग आपोआपच विरघळून गेले. पुढच्याच वर्षी महाराजांनींच या नवीन इमारती उघडिल्या. या प्रसंगीं वसतिगृहाचे त्या काळचे चिटणीस मि० लट्ठे यांनीं केलेल्या भाषणास उत्तर देतांना, महाराज ह्मणाले:-

" अशा प्रकारच्या शिक्षण संस्था जन्मास येत आहेत, त्यावरून दयाळु ब्रिटिश सरकारच्या छत्राखालीं लोकसुधारणेचीं जीं जोरदार कारणें उत्पन्न झालीं आहेत, त्यांचेंच हें एक उदाहरण आहे असें स्पष्ट होतें. अतिप्राचीन काळापासून बौद्धिक व सामाजिक गुलामगिरीच्या पाशांत ब्राह्मणेतर वर्ग गुरफटून गेले आहेत. ते पाश तोडून टाकण्यास आतां सुरुवात झाली आहे, याचें हें सुचिन्ह आहे. हा ब्रिटिश राज्याचाच परिणाम होय. आमचा पाश्चात्य देशांशीं संबंध घडल्यामुळें जे सुपरिणाम घडत आहेत ते या जातीच्या स्वोन्नतिप्रीत्यर्थ चाललेल्या प्रयत्नांत जसे स्पष्टपणें दिसून येतात तसे ते इतर ठिकाणीं दिसून येत नाहींत. जनतेच्या अंत:स्थ जागृतीची समाधानकारक चिन्हें आम्हांस दिसून येत आहेत. क्षत्रिय, शेतकरी,

औद्योगिक व व्यापारी वर्ग या सर्वांना आपापल्या जातींमध्यें विद्येचा प्रसार करण्याचें महत्व समजून आलें आहे व त्याच हेतूनें देशाच्या निरनिराळया भागांत त्यांनीं संस्था स्थापन केल्या आहेत. या लहानशा शहरीं मराठ्यांच्या व जैनांच्या संस्था शेजारीं शेजारीं असल्याचें पाहून मला मोठें समाधान वाटतें. प्रेमविनिमयानें व सहकार्यानें हे वर्ग हातांत हात घालून उन्नतीचा पंथ आक्रमितील असा मला भरंवसा आहे. या संस्था उत्पन्न करण्याच्या श्रेयाचा जरी खरोखर मला भागिदार होतां येणार नाहीं, तरी या वर्गांना शक्य तें प्रोत्साहन देणें हें माझें नेहमींचें ब्रीद आहे. यांची प्रगति कशी होत आहे हें निरीक्षण करण्यांतच मला खरें सौख्य प्राप्त होतें. आतांपर्यंत आमच्या प्रयत्नाचे जे परिणाम दिसून आले, ते जरी अल्प असले, तरी अभिमानास्पद आहेत असें जर मीं ह्मटलें, तर त्याबद्दल आपण मला क्षमा कराल असा मला भरंवसा आहे. ''

आणखी महाराज ह्मणाले:—

" तुमचें मानपत्र मीं अत्यंत लक्षपूर्वक ऐकिलें. या संस्थेंतून आह्मी होतकरू डॉक्टर, वकील, इंजीनियर, राजकारणी पुरुषच केवळ नव्हे तर हल्लीं कुंठित झालेला प्राचीन इतिहास पुढें चालू करणारे बुद्धिमान् व्यापारी व कुशल शेतकरी देखील निर्माण करूं, अशी जी तुह्मीं उमेद दर्शविली आहे, ती पाहून मला विशेष समाधान वाटलें. यावरून तुमच्या आकांक्षांचें उद्दिष्ट बरोबर दिसून येतें. सध्यांच्या परिस्थितींत सर्व मागसलेल्या वर्गांप्रमाणें जीवनकलहांत तुह्मांला बराच अडथळा होतो व स्वोन्नतिप्रीत्यर्थ चाललेल्या प्रथम प्रयत्नांना बाह्य मदतीची आवश्यकता असते, या गोष्टी मी अगदीं जाणून आहें. स्वत:च्या पायावर उभें राहाण्याचें सामर्थ्य अंगीं येऊं लागतांच हा पांगूळगाडा फेंकून देण्याचा तुमचा हा अत्यंत प्रशंसनीय निश्चय अनुकरणीय असा आहे व या प्रयत्नांत तुह्मांला यश यावें असें मी अंत:करणपूर्वक इच्छितों. ''

जैन वसतिगृहाच्या सर्व इमारतींमध्यें शंभर विद्यार्थ्यांची सोय होण्यासारखी आहे. याखेरीज त्यास लागून एक लेक्चर हॉल व एक देवालय बांधविण्यांत आलें आहे. या सर्व इमारती बांधण्याचा खर्च पन्नास हजारांपेक्षांहि जास्त झाला. या रकमेचा बराचसा भाग मुंबई येथील एक दानशूर गृहस्थ शेठ माणिकचंद हिराचंद यांनीं दिला. शेठ माणिकचंदांविषयीं महाराजांच्या मनांत मोठा आदर असे. १९१४ सालीं शेठ माणिकचंदांचा अंत होईतोंपर्यंत शेठ

माणिकचंदांचें व महाराजांचें सख्य अविच्छिन्न होतें. १९०२ सालच्या आगष्ट महिन्यांत इंग्लंडहून परत आल्यावर चौपाटीवरील शेठ माणिकचंदांच्या बंगल्यांत महाराज उतरले व तेथूनच त्यांच्या स्नेहास प्रारंभ झाला. शेठजींचा सालस स्वभाव, साधेपणा, दानशूरपणा व अनाथांचे क्लेशनिवारणार्थ त्यांचे निर्हेतुक प्रयत्न पाहून महाराजांची व शेठजींची मैत्री कायमची झाली. हल्लीं वसतिगृहामध्यें ९० मुलें आहेत, यांपैकीं २० मुलें कॉलेजमध्यें शिकत आहेत. महाराजांनीं या वसतिगृहाकरितां कांहीं फंड देऊनहि ३५० रुपयांची वार्षिक देणगी दिली व संस्थानच्या विद्यालयामध्यें मराठा विद्यार्थ्यांना ज्या सवलती मिळतात त्या त्यांनाहि दिल्या.

यानंतर लिंगायत वसतिगृह अस्तित्वांत आलें. १९०७ सालीं आपल्या जातीमध्यें शिक्षणविषयक चळवळ सुरू करण्यासाठीं महाराजांनीं मिस्टर चौगुले यांचें मन वळविलें. मिस्टर चौगुले हे एक लिंगायत गृहस्थ असून, ते मुंबई विश्वविद्यालयाचे कायदेपंडित आहेत. या वेळीं हे गृहस्थ महाराजांच्या पदरीं असून, पुढें महाराजांनींच त्यांना सरन्यायाधीशपदाप्रत नेलें व याच हुद्यावर ते आजहि आरूढ आहेत. कर्नाटकामध्यें लिंगायत लोकांच्या पुढाऱ्यांनीं अगोदरच चांगली प्रगति केली होती. कोल्हापुरांतील लिंगायत लोकांना मदत करण्याकरितां वंटमूरीकर सरदेसाई व रावबहादूर आर्ताळ यांना महाराजांनीं बोलाविलें. या वरील गृहस्थांच्या आगमनानें १९०७ च्या जन महिन्यांत वीरशैव ( लिंगायत ) वसतिगृह रंकाळयाच्या पश्चिम कांठावर अस्तित्वांत आलें. या वसतिगृहांत ५० विद्यार्थ्यांची सोय होण्यासारखी आहे. १९०७ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत कोल्हापुरापासून आठ मैलांच्या अंतरावर असलेल्या सिद्धगिरी नांवाच्या तीर्थावर भरलेल्या लिंगायत परिषदेला महाराज हजर होते. मराठा व जैन वसतिगृहा-प्रमाणें या वसतिगृहालाहि देणगी व ग्रँट या रूपानें महाराजांनीं मुबलक साहाय्य केलें.

नेक नामदार लॉर्ड लॅमिंग्टन यांचें १९०४ सालच्या आक्टोबर महिन्यांत कोल्हापूर येथें आगमन झालें. त्यांनीं यांपैकीं कांहीं संस्था पाहून पुढील उद्गार काढिले:—

" ज्या वसतिगृहाकडे महाराजांचें पुष्कळच लक्ष वेधलें आहे, त्यांचा उल्लेख मागच्या भाषणांत आलेलाच आहे. मागसलेल्या वर्गांचें शिक्षण

मराठा वसतिगृहाचें ध्येय आहे. थोड्याच दिवसांपूर्वी मागसलेल्या वर्गांपैकीं एका वर्गाच्या हितासंबंधानें माझ्याकडे एक अर्ज आलेला होता. त्यामध्यें मागसलेल्या लोकांना कोणकोणत्या प्रकारच्या अडचणींना तोंड द्यावें लागतें हें विशद केलें होतें. जीविताला आवश्यक असलेल्या सामान्य उद्योग धंद्यांचीं व संस्थानांतील राज्यकारभाराचीं द्वारें ज्यांना बंद झालेलीं आहेत, अशा लोकांकरितां अधिक अनुकूल अशी परिस्थिति निर्माण करण्यासाठीं उच्च पदाच्या कोणत्याहि माणसानें प्रयत्न करणें यासारखें दुसरें पुण्यकारक कृत्य नसेल, असें मला वाटतें."

आणखी एका प्रसंगीं नामदारसाहेबांनीं अशाच प्रकारचे उद्गार काढिले होते:—

" शिक्षणाविषयीं महाराज पराकाष्टेची आस्था बाळगीत आहेत, त्याबद्दल महाराजांचें अभिनंदन करण्याची आज सकाळीं मला संधि मिळाली. कांहीं बाबतींत वाजवीपेक्षां अधिकच दातृत्व त्यांनीं दाखविलें आहे, असें मला वाटतें. महाराज अतिशय उदार आहेत; परंतु स्वतः झीज सोसण्यास तयार असल्याखेरीज मिळालेल्या मदतीचा लोक नीट रीतीनें कधींच उपयोग करीत नाहींत, ही गोष्ट मला माझ्या आयुष्यांत अनुभवास आली आहे. तथापि हा जर कदाचित महाराजांचा दोष समजला जाईल, तर हा दोष योग्य दिशेलाच आहे, हें कोणीहि कबूल करील."

संस्थानमधील मुसलमान जातीच्या लोकांच्या उन्नतीकरितां महाराज जे प्रयत्न करणार होते, त्यांना वरील उद्गार तंतोतंत लागू होते. सर सय्यद अहंमदांच्या दूरदर्शी नेतृत्वाखालीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील मुसलमान लोक गेलीं कित्येक वर्षें आपल्या ज्ञातींतील तरुण पिढीच्या मनांत इंग्रजी शिक्षणाबद्दल आवड उत्पन्न करीत होते. कोल्हापूर संस्थानांतील मुसलमानांची संख्या ३४,५०० असूनहि त्यांच्यावर हिंदुस्थानांतील या चळवळीचा परिणाम विशेष घडला नव्हता. या जातीला जागृत करण्याचे प्रयत्न महाराष्ट्रांतील मुसलमान लोकांकडून अल्प प्रमाणांत होत होते; परंतु ते यशस्वी झाले नाहींत. १९०२ सालीं महाराज जेव्हां विलायतेहून परत आले, तेव्हां कोल्हापूरच्या मुसलमान लोकांनीं महाराजांच्या स्वागताप्रीत्यर्थ एक मानपत्र दिलें. त्या प्रसंगीं महाराजांनीं उत्तरादाखल जें भाषण केलें त्यांत त्यांनीं या मागसलेल्या अतएव अवनत झालेल्या जातीमध्यें स्वतंत्र शैक्षणिक चळवळीची फार आवश्यकता आहे, असें सांगितलें. अशा प्रकारची संस्था जर ते सुरू करतील तर तिला

आपलें साहाय्य मिळेल, असेंहि महाराजांनीं आश्वासन दिलें; परंतु या वेळीं मुसलमान लोकांनीं या आश्वासनाचा मुळींच फायदा घेतला नाहीं. ह्मणून मुसलमान लोकांच्या उन्नतिप्रीत्यर्थ महाराजांचा पहिला प्रयत्न ह्मणजे मराठा वसतिगृहामध्यें अजमासें १० मुसलमान विद्यार्थ्यांना महाराजांनीं प्रवेश मिळवून दिला, हा होय. यावरून महाराजांचें लक्ष विशेषत: आपल्या जातीकडे असलें तरी ते शिक्षणाच्या बाबतींत स्वजातीय स्वार्थानें वेडावलेले अगर आकुंचित बुद्धीचे नव्हते हें सिद्ध होतें. ब्राह्मण लोक आपल्या संस्थांना व्यापक संज्ञा देऊनहि त्यांचा उपयोग ते आपल्या जातीपुरताच करीत होते; परंतु महाराजांच्या नेतृत्वाखालीं असलेले मराठे आपल्या जातीकरितां स्थापन केलेल्या संस्थेचा फायदा तत्सम सर्व जातींना व विशेष प्रसंगीं मुसलमान व ख्रिश्चन लोकांनाहि घेऊं देत असत. मि० युसफ अबदुल्ला या पदवीधराला संस्थानच्या नोकरींत घेण्यांत आलें. व त्यांच्या जातबंधूंच्या शिक्षणाला चालन देण्याचें काम त्यांच्यावर सोंपविण्यांत आलें. परंतु हे अगदींच तरुण आणि अननुभवी असल्यामुळें मुसलमान वसतिगृह मि० विचारे या मराठा गृहस्थांच्या ताब्यांत कांहीं काळ देण्यांत आलें. हें वसतिगृह १९०६ च्या नोव्हेंबर महिन्यांत सुरू करण्यांत आलें. कोल्हापुरांतील मुसलमान लोकांमध्यें ह्मणण्यासारखे भ्रातृप्रेम नाहीं, ह्मणून या मार्गानें ही संस्था महाराज भरभराटीस आणूं शकले नाहींत. महाराजांनीं जर कोठें आपलें दातृत्व उधळलें असेल तर तें येथेंच ! मुसलमान लोकांच्या इमारतीफंडाकरितां महाराजांनीं ५५०० रुपयांची देणगी दिली. १९०७ सालच्या जून महिन्यांत या इमारतीकरितां प्रशस्त जागा मोफत देण्यांत आली. वार्षिक २५० रुपायांची ग्रँट देण्याचें मंजूर करण्यांत आलें. व शेवटीं या संस्थेला वार्षिक ६७४५ रुपायांचें स्थावर उत्पन्न दिलें. महाराजांच्या अमर्यादित दातृत्वामुळेंच या संस्थेचा पाया भक्कम बसला आहे, हें दिसून येईल. या संस्थेची इमारत अद्यापि पुरी झालेली नाहीं. या इमारतींत ५० विद्यार्थ्यांची सोय होणाचा अंदाज आहे. महाराजांची ज्या वर्षीं इहलोकची यात्रा संपली, त्या वर्षीं ३२ विद्यार्थी या संस्थेचा फायदा घेत होते. यांपैकीं पांचजण राजाराम कॉलेजमध्यें शिक्षण घेत होते.

परोपकारबुद्धीनें सुरू केलेल्या या चळवळीमुळें संस्थानमधील सर्व ब्राह्मणेतर समाजांमध्यें एकप्रकारचें चैतन्य उत्पन्न झालें. मि० बारटके यांच्या नेतृत्वाखालीं



अस्पृश्य वर्गांतील विद्यार्थ्यांचें मिस् क्लार्क वसतिगृह.

कोल्हापुरामध्यें नामदेव ऊर्फ शिंपी जातीची एक परिषद् भरविण्यांत आली, मि० बारटक्के हे हल्लीं बडोदा संस्थानामध्यें नोकर असून, त्या वेळीं ते कोल्हापूरचे रहिवासी होते. या परिषदेमुळें नामदेव-वसतिगृह अस्तित्वांत आलें. यांत हल्लीं ३० विद्यार्थ्यांची सोय होते. ज्यांच्या ब्राह्मणत्वाबद्दल इतर ब्राह्मणलोक बऱ्याच शंका घेतात, अशा दैवज्ञ ब्राह्मणांनींहि आपलें एक वसतिगृह स्थापन केलें. १९२१ सालीं या वसतिगृहामध्यें २२ विद्यार्थ्यांची सोय झाली. सारस्वत अगर शेणवी लोकांच्या वसतिगृहाला महाराजांकडून ५००० रुपयांची देणगी मिळाली. याखेरीज या संस्थेच्या चरितार्थासाठीं एक लहानसें वर्षासन मिळालें. या सारस्वत लोकांच्या ब्राह्मणत्वाला ब्राह्मण संज्ञेच्या मक्तेवाल्या लोकांकडून पराकाष्टेचा विरोध होतो, हें येथें सांगण्याची जरूरी नाहीं. श्रीमती सरस्वतीबाई लाटकर या सारस्वत जातीच्या दानशूर स्त्रीनें इमारत-फंडाकरितां जी देणगी दिली होती, तींत महाराजांनीं १६०० रुपायांची भर घातली. यामध्यें ३० विद्यार्थ्यांची सोय होण्यासारखी आहे. कोल्हापुरांतील संख्येनें लहान परंतु उपयुक्त अशा प्रभु लोकांकरितां अशाच प्रकारची संस्था स्थापन करण्यांत येऊन, तींत ३० विद्यार्थ्यांची सोय करण्यांत आली आहे. या वसतिगृहाच्या इमारतीकरितां महाराजांनीं १५००० रुपायांची उदार देणगी दिली. ही संस्था रावबहादूर सर आर० व्हीं० सबनीस सी० आय० ई० यांच्या नांवानें संबोधली जात आहे. यांच्या कामगिरीचा महाराजांच्या चारित्र्याशीं बराच संबंध असून त्यांच्या नांवानें चाललेली ही संस्था त्यांच्या कार्याची आठवण लोकांना सदोदित देत राहील.

महाराजांच्या बौद्धिक जागृतिविषयक ज्या चळवळी झाल्या, त्यांमध्यें कोल्हापुरांतील अस्पृश्य गणलेल्या लोकांकरितां अस्तित्वांत आलेल्या, मिस् क्लार्क वसतिगृहाला प्रमुख स्थान दिलें पाहिजे. खुद्द या वर्गामध्यें आरंभीं आरंभीं पुढाकार घेऊन विश्वासानें काम करणारे लोक सांपडणें कठिण होतें. १९०८ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत कांहीं सुशिक्षित ब्राह्मणेतर त्या महिन्याच्या ९ व्या तारखेला जैनवसतिगृहांत गोळा झाले व अस्पृश्य वर्गामध्यें शिक्षणप्रसार करण्यासाठीं त्यांनीं संस्था स्थापन केली. संस्थानच्या व्हर्न्याक्युलर स्कूलमध्यें या जातीच्या लोकांकरितां अभ्यासक्रम इतका अपुरा असे कीं, या शाळेतून पास झालेल्या अस्पृश्य जातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी शाळेमध्यें प्रवेश मिळण्यास मोठी पंचाईत

पडे. ह्मणून दुय्यमप्रतीचें शिक्षण संपादण्यास पात्र होण्यासाठीं या मुलांकरितां एक क्लास काढावा लागला. खुद्द महाराज हे या कामीं मनापासून मदत करीत असत. इतरांपैकीं या संस्थेमध्यें अतिशय मन घालणारे रेसिडेंट कर्नल उडहाऊस साहेब व जैनांचे धर्मगुरु श्री जिनसेनस्वामी या दोघांच्या नांवांचा या कामीं उल्लेख करितां येण्यासारखा आहे. मुलांचा अभ्यास पुरा करवून घेतल्यानंतर त्यांना त्यांच्या शिक्षणासाठीं हायस्कूलमध्यें पाठविण्यांत आलें. व विद्यार्थ्यांच्या सोयीसाठीं या सोसायटीनें रविवारपेठमधील एकेश्वरी देवालयांत लहानसें वसतिगृह सुरू केलें. ही जागा महाराजांनीं याच कारणास्तव दिली होती. या वसतिगृहांत प्रथम सात विद्यार्थी होते. मिस् क्लार्क यांचें कोल्हापूरला आगमन व या बाईची अस्पृश्य वर्गांच्या चळवळीबद्दलची पराकाष्टेची आस्था, या गोष्टींमुळें महाराजांना ही संस्था यांच्या नांवानें संबोधणें इष्ट वाटलें. नंतर महाराजांनीं हल्लींची या संस्थेची जागा व इमारत संस्थेच्या स्वाधीन केली. १९१४ सालीं जुन्या इमारतीला जोडून जी सोइस्कर इमारत बांधण्यांत आली, तिच्या एकंदर खर्चाच्या अर्ध्याहून अधिक रक्कम महाराजांनींच दिली. महाराज जेव्हां स्वर्गवासी झाले तेव्हां हायस्कूलमधील २२ विद्यार्थी या वसतिगृहाचा फायदा घेत होते. हा महाराजांच्या दातृत्वाचा केवळ उगमच होता. पुढें या दातृत्वाला मोठ्या प्रवाहाचें स्वरूप प्राप्त झालें, हें आणखी एका प्रकरणीं वाचकाच्या निदर्शनास येईल.

स्वतःस आर्य क्षत्रिय ह्मणविणारे कारजगार अगर जिनगर यांच्यामध्यें लवकरच जागृति उत्पन्न झाली. या गोष्टीचा येथें उल्लेख करण्यासारखा आहे. या जागृतीमुळेंच या समाजानें पुढें बोर्डिंग हाउस व प्रिन्स राजाराम औद्योगिक शाळा स्थापन केल्या. भिक्षुकशाहीकडून ज्या अनेक हिंदुजातींचें अपरिमित नुकसान झालें त्यांपैकींच जिनगर ही जात होय. जिनगरांचा अपराध ह्मटला ह्मणजे ते हुशार असून ब्राह्मणेतरांपैकीं स्वतःच्या कौशल्यावर अवलंबून राहणारी त्यांची जात आहे, एवढाच! हे क्षत्रियकुलोत्पन्न असून मराठा सेनेच्या घोड्यांकरितां जिनें तयार करीत असत. याच धंद्याच्या मदतीनें त्यांनीं आपली जात नांवारूपाला आणिली. आपल्या कौशल्याच्या जोरावर या व इतर धंद्यांत मुबलक द्रव्य मिळवून त्यांनीं आपली सांपत्तिक स्थिति सुधारली. त्यामुळें, सर्व ब्राह्मणेतरांच्या कपाळांवर मारलेल्या शूद्रत्वाच्या डागांतून स्वतःचीं मुक्तता करून घेण्याची त्यांना जी इच्छा उत्पन्न झाली, ती योग्यच होती. परंतु पेशवे



सर सबनीस कायस्थ प्रभु विद्यार्थी वसतिगृह.



सर सबनीस कायस्थ प्रभु विद्यार्थीगृहाचा दिवाणखाना.

व त्यांचे सरदारलोक यांच्या प्रोत्साहनानें ब्राह्मणलोक प्रत्येक स्वाभिमानी हिंदू जातींचा ज्याप्रमाणें नेहमीं हटकून छळ करीत, तद्वतच या समाजाचीहि स्थिति झाली. त्यांच्यांत जसजसा स्वाभिमान जागृत होऊं लागला, तसतसा त्यांच्यावरील ब्राह्मणांचा जुलूमही वाढूं लागला. अखेरीस समाजव्यवस्थेंत त्यांचें ठिकाण अस्पृश्यांच्या बरोबरीचें ठरविण्यापर्यंतहि मजल गेली. त्यांची हजामत करण्यास कोणताहि हजाम तयार होईना, कोणताहि परीट त्यांचे कपडे धुण्यास तयार होईना, तेव्हां आपलया नांवाला जो कालिमा लागला आहे तो धुवून काढण्याकडे प्रथम जिनगरांचें लक्ष वेधलें. यासाठीं जी चळवळ सुरू झाली, तिला महाराजांकडून मनःपूर्वक पाठिंबा मिळाला. ब्राह्मणांच्या शिकवणीमुळें ज्या वेडसर समजुती दृढमूल झाल्या होत्या, त्या एका दिवसांत उपटून टाकणें शक्य नव्हतें. ह्मणून त्यांनीं आपल्या जुन्या औद्योगिक शिक्षणाच्या साह्यानेंच स्वतःची उन्नति घडवून आणणें हाच एक त्यांना अधिक श्रेयस्कर मार्ग होता. कोल्हापुरांतील जयसिंगराव टेकनिकल स्कूलमध्यें महाराजांनीं एका कुशल जिनगराला आधींच नेमिलें होतें. निपाणीचे मि० यमनाजीराव आंबले हे एका कारखान्याचे मालक असून सत्यशोधक पद्धतीचे ते एक समाज-सुधारक होते. यांना शाहुपुरी येथें धातु गाळण्याची भट्टी उघडण्यास महाराजांनीं प्रोत्साहन दिलें. शाहुपुरी ह्मणजे कोल्हापूरचीच एक नवीन पेठ आहे. हें शहर महाराजांनीं आपल्या अमदानीच्या प्रारंभींच वसविलें असून महाराजांच्या नांवावरूनच याला शाहुपुरी असें नांव पडलें आहे. या दोघांच्या मदतीनें १९२० सालच्या आगष्ट महिन्यांत कोल्हापूर येथें आर्य-क्षत्रिय ( जिनगर ) विद्यावर्धक-समाजाची एक परिषद भरविण्यांत आली. या परिषदेमुळेंच महाराजांनीं राजाराम औद्योगिक स्कूल व कारजकर विद्यार्थी वसतिगृह या दोन संस्था उघडविल्या. १९०३ सालींच हा समाज अस्तित्वांत आला. या समाजांत कांहीं पदवीधर व कांहीं कायदेपंडितहि निपजले. या संस्थांना महाराजांनीं जी मदत केली तीसंबंधानें टाईम्स ऑफ इंडिया पत्रानें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.

" महाराजांनीं मोठ्या उदार अंतःकरणानें यांना कोल्हापूरमध्यें एक विस्तीर्ण इमारत दिली आहे. या इमारतीची किंमत ३०,००० पेक्षांहि अधिक असून, या जातीच्या विद्यार्थ्यांकरितां ही इमारत, वसतिगृह, - या जातीच्या निरनिराळ्या कलाकौशल्याचें प्रदर्शनागर आणि औद्योगिक स्कूल अशा विविध

रीतीनें उपयोगांत येणार आहे. या वसतिगृहाच्या चरितार्थासाठीं महाराजांनीं कांहीं वर्षासन करून दिलें आहे; व याप्रीत्यर्थ जितका फंड गोळा झाला असेल तितकीच रक्कम स्वत: देण्याचें महाराजांनीं अभिवचन दिलें आहे. ”

महाराजांच्या नेतृत्वाखालीं अशा प्रकारच्या ज्या आतांपर्यंत चळवळी झाल्या, त्याहून या चळवळीचें जें एक विशिष्टत्व होतें, तें ह्मटलें ह्मणजे महाराजांनीं या चळवळीला औद्योगिक स्वरूप प्राप्त करून दिलें, हें होय. प्रगतीच्या या विशिष्ट अंगाकडे ब्राह्मणेतरांचें लक्ष लागावें ह्मणन हा प्रयत्न करण्याच्या आवश्यकतेची महाराजांना जाणीव उत्पन्न झाली. या वर्गाच्या मामुली शिक्षणाविषयीं महाराजांची तळमळ जरी कोणत्याहि प्रकारें कमी झालेली नव्हती, तरी पण शिक्षणविषयक एकांगी प्रयत्नांतील दोष निरीक्षण करण्यास पुरे इतकी महाराजांची दूर दृष्टीहि होती. १९१७ सालच्या डिसेंबर महिन्याच्या २७ तारखे रोजीं ते मराठा शिक्षण परिषदेला उद्देशून ह्मणाले:—

“ शिक्षणाच्या विविध अंगांकडे आमचें लक्ष वेधलें पाहिजे. आह्मी शेतकरी अगर केवळ शिपाईच होऊन भागणार नाहीं. व्यापार व उच्च प्रतीच्या उद्योगधंद्यांत आह्मीं लक्ष घातलें पाहिजे. या विसाव्या शतकांत कोणत्याहि राष्ट्राची उन्नति व्यापार-विषयक चळवळीवर अवलंबून असते. खरोखर उदीम व्यापार हा पाश्चात्य राष्ट्रांचा जणूं धर्मच आहे. मी येथें धर्म याचा अर्थ दूरदृष्टीचा स्वार्थ असा करितों. आह्मी व्यापार-विषयक चळवळींत पडलों नाहीं तर आमच्या सर्व चळवळी कमकुवत होऊन त्यांपासून कांहींच निष्पन्न होणार नाहीं. व्यापारविषयक चळवळीवर माझी मोठी श्रद्धा असल्यामुळें मी माझ्या दोन मुलांना व माझ्या जवळच्या आप्तांना या धंद्यांत घातलें आहे. त्यांना या धंद्यांत आवड उत्पन्न होत चालली आहे, इतकेंच केवळ नव्हें तर त्यांची या धंद्यांत प्रगतिहि होत आहे, हें बोलून दाखविण्यास मला मोठें समाधान वाटतें.”

युवराजांचे—हल्लींचे महाराज-नामाभिधान असलेलें औद्योगिक स्कूल उघडतांना महाराजांनीं जें भाषण केलें त्या वेळीं या विषयासंबंधीं महाराजांनीं आपले विचार अधिकच व्यक्त केले. औद्योगिक चळवळीवर महाराजांची श्रद्धा अतिशय असल्यामुळें जिनगर लोकांनीं तयार केलेले जिन्नस स्वत: वापरण्याची परिषदेला हमी देऊन औद्योगिक प्रगतीवरच देशाची खरी उन्नति अवलंबून आहे, असें त्यांनीं सांगितलें. आपलें ज्ञान आपल्या देशबांधवांपासून लपवून

ठेवणाऱ्या ब्राह्मणांच्या घातुक उदाहरणाचें अनुकरण करून हिंदुस्थानांतील कलाकुसरीचें काम करणाऱ्या लोकांनींहि आपल्या धंद्यांचें ज्ञान इतरांना देण्याच्या कामीं हयगय केली. यासंबंधानें महाराज ह्मणाले, " ज्ञानाचें खरें संरक्षण ह्मणजे तें गुप्त राखणें हें नव्हे. ही चूक करून ब्राह्मणांनीं आपली अवनति करून घेतली व ब्राह्मणेतरवर्ग अज्ञानांधःकारांत गुरफटून गेले. याच कारणास्तव औद्योगिक कलाहि लय पावल्या. "

भिन्नभिन्न जातींच्या विद्यार्थ्यांकरितां जीं पुष्कळ वसतिगृहें अस्तित्वांत आलीं, तीं व्यक्तिशः जरी फार मोठीं नसलीं तरी त्यांचा एकंदरींत कोल्हापुरावरच नव्हे, तर अखिल महाराष्ट्रावर विलक्षण परिणाम झाला. या संस्थांनीं जी कामगिरी बजाविली ती अद्याप जरी पूर्ण झालेली नसली तरी त्यामुळें महाराजांना मोठें समाधान वाटलें. या शैक्षणिक कार्याचे सामाजिक व धार्मिक चळवळींच्या क्षेत्रावर काय परिणाम घडले यांचें वर्णन पुढील कांहीं पानांत देण्यांत येईल; परंतु या संस्था सुरू करण्यांत महाराजांनीं जें धोरण स्वीकारिलें होतें, त्याचें तात्कालिक परिणाम काय घडले इकडे प्रथम लक्ष पुरविलें पाहिजे. संस्थानच्या निरनिराळया खात्यांतील पदवीधरांची उणीव दूर करणें व राज्यकारभारांतील एका विशिष्ट वर्गाच्या फाजील वर्चस्वाला आळा घालणें, हा महाराजांच्या धोरणाचा पहिला हेतु होता व या धोरणावर याच कारणास्तव टीका होत असे. संस्थानांतील नोकरी या टीकाकारांच्या मतें अगदींच क्षुद्र गोष्ट होती. मनुष्याच्या अगर समाजाच्या आकांक्षांचें नोकरी हें उच्चतम ध्येय नव्हे. मनुष्याच्या विकसित बुद्धीच्या भरारीसाठीं याहिपेक्षां अनेक विस्तृत क्षेत्रें उपलब्ध आहेत, या गोष्टी खऱ्या आहेत. उद्योग धंदे, व्यापार, शेती हे बुद्धिमान लोकांना योग्य मार्ग आहेत. मागसलेल्या वर्गांनीं आतांपर्यंत याच उच्च मार्गांचें अवलंबन केलें आहे. या गोष्टी सोडून देऊन नोकरी सारख्या क्षुद्र गोष्टींकडे त्यांनीं लक्ष कां पुरवावें ? मागसलेल्या वर्गांतील शिक्षण विषयक चळवळीच्या पुरस्कर्त्यांनीं या प्रश्नांत गर्भित असलेल्या तत्त्वांकडे मूळपासून कधींहि दुर्लक्ष केलें नाहीं, असें यावर उत्तर ह्मणून सांगतां येईल. दुसरें, राष्ट्राच्या राजकारण व राज्यकारभार विषयक गोष्टींत सामाजिक शक्ति समबल असावयास पाहिजे; अत्यंत महत्वाचें आहे; परंतु ही गोष्ट हे टीकाकार सहसा कबूल करणार नाहींत. उद्योग धंदा व व्यापार यापेक्षां संस्थानमधील नोकरी अतिशय कमी प्रतीची

आहे यांत शंका नाहीं; परंतु संस्थानांमधील नोकरी पतकरल्यानें जी सत्ता प्राप्त होते, ती व इतर जातींवर असलेलें एकाच जातीचें वर्चस्व नष्ट करण्याची सर्वमान्य आवश्यकता, लक्षांत घेतां संस्थानांमधील नोकरी पत्करणें वस्तुतः आहे त्यापेक्षांहि अधिक जरूरीचें आहे, असें दिसून येतें. शहाण्या राज्यकर्त्याचें पहिलें कर्तव्य तरी काय असतें? आपल्या खास नियंत्रणाखालीं असलेलीं यंत्रें समबल आहेत कीं नाहींत हें त्यानें पहावयास नको काय? संस्थानच्या राज्यकारभारांत जनतेच्या सर्व घटकांचें योग्य प्रमाण आहे कीं नाहीं, इकडे महाराजांचें प्रथमपासूनच लक्ष होतें. या बाबतींत महाराजांनीं स्वीकारिलेल्या धोरणामुळें, जी क्रांति घडून आली ती आंकडयांनीं विशद करून दाखवितां येण्यासारखी आहे. महाराजांच्या राज्यारोहणच्या वर्षीं ह्मणजे १८९४ सालीं जनरल खात्यांतील ७१ अधिकारी लोकांपैकीं ६० ब्राह्मण होतें. परंतु १९१२ सालीं ९५ अधिकारी लोकांपैकीं अवघे ३५ ब्राह्मण अधिकारी होते व बाकीचे ५९ ब्राह्मणेतर होते. याचप्रमाणें खासगी खात्यामध्यें १८९४ सालीं ४६ ब्राह्मण व ७ ब्राह्मणेतर होते. १९२२ सालीं ब्राह्मणांची संख्या ४३ असून ब्राह्मणेतरांची संख्या १०९ पर्यंत गेली. यांत एक अस्पृश्यही होता.

संस्थानच्या नोकरींत जातवारीचें तत्त्व अमलांत आणण्यास महाराजांना विशेष कठीण गेलें नसेल असें आतां एकाद्याला वाटण्याचा संभव आहे; परंतु वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट होती. कोल्हापुरांतील ब्राह्मण जातीचें मुखपत्र 'समर्थ' हें ब्राह्मणेतरांच्या नेमणूकी विरुद्ध इतकी कडक टीका करीत असें कीं, यावरून महाराजांना त्या काळीं विरोध किती होत होता हें सहज अजमावितां येईल. दरबारानें नेमलेल्या ब्राह्मणेतर पदवीधरांपैकीं कांहींजण स्वाभाविकपणेंच बाहेरून आलेले होते; ह्मणून ते राजाराम कॉलेजचे पदवीधर नव्हते अगर बाहेरून आलेले होते, एवढयाच सबबीवर त्यांच्यावर हल्ला चढविण्यांत येत असे. ता. २३ जानेवारी, १९०१ रोजीं 'समर्थ' पत्र ह्मणतें, "दरबारानें या बाबतींत या पूर्वींच चूक करून ठेविली आहे. यामुळें राजाराम कॉलेजच्या पदवीधरांमध्यें या बाबतींत तीव्र असंतोष पसरत चालला आहे." राजाराम कॉलेजाच्या पदवीधरांनीं सर्व मुंबई इलाखाभर किंवा बाहेर देखील हुद्याच्या जागा पटकाविल्या तर त्यांत यांच्या मतें कांहीं वावगें नव्हतें; किंबहुना ही गोष्ट सर्वांनीं अभिमान बाळगण्यासारखीच होती, असें हे टीकाकार समजत; परंतु कोल्हापुरांत मात्र कोणत्याहि

ब्राह्मणेतराला पाय ठेवूं द्यावयाचा नाहीं. यानंतर कांहीं दिवसांनीं जमखंडीच्या कारभाऱ्यानें एका जागेकरितां अर्ज मागविले व ब्राह्मणेतर अगोदर पसंत केले जातील, असें जाहीर केलें. 'हल्लींचे अल्पवयस्क ब्राह्मण चीफ सज्ञान झाल्यावर आपल्या संस्थानच्या नोकरींत ब्राह्मणेतर नेमल्याबद्दल त्यांना मोठी चीड उत्पन्न होईल,' असें या ब्राह्मणांच्या मुखपत्रानें भाकीत केलें. ब्राह्मण संस्थानामध्यें अशा प्रकारच्या नेमणूका करणें योग्य नव्हे, असेंच यापासून सरळ अनुमान निघतें. मात्र १९०२ सालीं कर्नल फेरीस हे कोल्हापूरचे रेसिडेंट झाले असतां, इतर बरोबरीच्या गोष्टी लक्षांत ठेवून, मराठा संस्थानांमध्यें इतरांपेक्षां मराठयांनाच अधिक पसंत करणें इष्ट आहे, असे यांनीं उद्गार काढल्याबद्दल याच पत्रानें त्यांच्यावर केवढा गहजब केला होता! 'समर्थ' पत्रानें एका प्रसंगीं काढलेल्या उद्गारावरून महाराजांनीं नेमलेले ब्राह्मणेतर हे नालायक होते या संबंधीवर या पत्राला महाराजांवर टीका करणें अशक्य झालें, हें सिद्ध होतें.

"त्यांपैकीं (नवीन अधिकारी) बहुतेक सर्व विश्वविद्यालयाचे पदवीधर असून अतिशय बुद्धिमान् आहेत. परंतु निरनिराळ्या वर्गांचें योग्य प्रमाण राखण्यांत आलें नाहीं. अलीकडे थोड्या वर्षांत ज्या गोष्टी घडल्या त्यांना ब्राह्मणेतरांचें फाजील वर्चस्वच कारणीभूत झालें असावें असें दिसतें." अशी या पत्राची तक्रार होती.

नवीन अधिकारी लोकांच्या कार्यक्षमतेबद्दल आतां वादच नव्हता. या दुष्ट ब्राह्मणेतरांना कोल्हापुरांत नवीनच जें वर्चस्व प्राप्त झालें होतें, तेंच ब्राह्मणांच्या डोळ्यांत सलत होतें. मागसलेल्या वर्गांनीं आपल्या उन्नतीसाठीं जे स्वतंत्रपणें प्रयत्न केले होते, त्यावर कदाचित् शिष्टाचाराला अनुसरून ब्राह्मणी पत्रांनीं टीका केली नसेल. ता १७ आगष्ट १९०४ रोजीं जैन-वसतिगृहाच्या पायाचा दगड बसविण्यासाठीं महाराजांना विनंति करितांना प्रस्तुतच्या लेखकानें जी विचारसरणी मांडली तीसंबंधीं हेंच पत्र ह्मणतें:—

"शिक्षणाविषयीं ज्यांना अतिशय कळकळ वाटत आहे, त्यांना ही विचार-सरणी खरोखर मननीय अशी आहे." या कबूलीवरून ब्राह्मणेतरांचें शिक्षण जरी ब्राह्मणांना पसंत होतें, तरी त्यापासून उद्भवणारे परिणाम मात्र त्यांना प्रिय नव्हते.

अशा प्रकारच्या कडक टीकेला यत्किंचितहि भीक न घालतां महाराजांनीं आपलें मुत्सद्दीपणाचें धोरण अव्याहत चालविलें. ता. २९ फेब्रुवारी १९०४ रोजीं महाराज आपल्या एका मित्राला लिहितातः—

" गेल्या वर्षी येथील मुलकी परीक्षेंत यशस्वी झालेल्या उमेदवारांपैकीं १/३ उमेदवार ब्राह्मणेतर होते व विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मटली ह्मणजे त्यांपैकीं एकानें पहिलें स्थान मिळविलें. ब्राह्मण परीक्षक असूनहि पुष्कळांनीं वरचे नंबर पटकाविले. अशाच प्रकारचा नियम जर ब्रिटिश मुलखांत करण्यांत येईल तर इतर जातींतील लायक इसम नेमून एका विशिष्ट जातीचें वर्चस्व मोडण्याच्या कामीं याचा चांगलाच उपयोग होईल, हें मी गेल्या वर्षीच्या अनुभवावरून सांगूं शकतों. "

महाराजांनीं वर ज्या हुकुमाचा उल्लेख केला आहे, तो हुकूम इंग्लंडमध्यें असतांना १९०२ सालच्या जुलै महिन्यांत महाराजांनीं काढला. मागसलेल्या वर्गाकरितां शेकडा ५० जागा राखून ठेवाव्या, असा या हुकुमाचा मथितार्थ होता. त्या काळीं ब्राह्मणांना हा नियम ह्मणजे मोठेंच अब्रह्मण्यं वाटलें. वास्तविक पाहिलें असतां ब्राह्मणेतरांनींच या बाबतींत तक्रार करावयास पाहिजे होती. कारण मागसलेले वर्ग हे पुढारलेल्या वर्गापेक्षां संख्येनें अधिक असल्यामुळें वरील नियम करून महाराजांनीं राखून ठेविलेल्या शेंकडा ५० जागांपेक्षांहि अधिक जागा त्यांच्यासाठीं राखून ठेवावयास पाहिजे होत्या.

आणखी थोड्या दिवसांनंतर इंग्लंडमधील आपल्या एका मित्राला महाराज लिहितातः—

" मागसलेल्या लोकांचा दर्जा वाढविण्यासाठीं मी प्रयत्न करीत आहें. आणि मराठा-शिक्षणसोसायटीनें आपली प्रगति अप्रतिहत चालविली आहे, हें पाहून मला आनंद होतो. यासारखीच येथें लौकरच जैनांची एक सोसायटी आह्मी स्थापन करणार आहोंत. यांना देखील मी मदत करणार आहें. ब्राह्मणांचीं कारस्थानें कधींहि बंद होणार नाहींत, असें मला वाटतें. धर्माचे बाबतींत उत्पन्न झालेल्या मतभेदाची ब्राह्मणांना विशेष दिक्कत वाटत नाहीं; परंतु मागसलेल्या वर्गांना पुढें आणण्याचें माझें धोरण मात्र पुष्कळ ब्राह्मणांना आवडत नाहीं, हीच गोष्ट खरी असावी. कालचक्राच्या फेऱ्यामुळें जी नवीन परिस्थिति उत्पन्न झाली आहे, तिला तोंड देणें, त्यांना प्राप्त आहे. जहागिरदारांच्या डोळ्यांवर

आतां जो नवीन प्रकाश पडत चालला आहे, त्याच्या मदतीनें त्यांना या परिस्थितीची ओळख पटेतोंपर्यंत कांहीं कालावधि लागेल. अशा बिकट परिस्थितींतून मार्ग काढणें मोठें कठिण काम आहे. ''

दरबारच्या वेदोक्त प्रकरणांतील धोरणाविरुद्ध सुशिक्षित ब्राह्मणांनीं जो कांगावा केला होता, त्याच्या बुडाशीं असलेल्या हेतूवर या पत्रामुळें चांगलाच प्रकाश पडतो. संस्थानांतील राजकीय सत्ता ब्राह्मणांच्या हातून निघून जात होती, यामुळेंच ब्राह्मण महाराजांवर खरोखर दांतओंठ खात होते. धार्मिकप्रकरण हें खरें कारण नव्हे. वेदोक्तप्रकरण हें फक्त एकमेकांची शक्ति अजमावण्याचा एक प्रसंग होता एवढेंच. १९०५ सालच्या जून महिन्यांत महाराज ह्मणतात:— " १८९४ सालीं ब्राह्मणेतर कारकुनांची संख्या १० होती, ती या सालीं ६० पर्यंत गेली; परंतु एकंदर कारकुनांची संख्या ५०० होती. ब्राह्मणी वर्चस्वाला आतां कोठें वेध लागला होता. या जातीला स्वार्थपरायणतेचें जें उपजत ज्ञान आहे, त्यामुळें ब्राह्मणांना भावी संकटाचीं अगोदर स्वप्नें पडूं लागलीं होतीं. वेदोक्त चळवळ व तज्जन्य गोष्टी यांच्या सहाय्यानें ब्राह्मणी वर्चस्वाचा डळमळीत डोलारा सांवरून धरून दुर्दैवगर्तेंत तो न पडूं देण्याबद्दलचा हा पहिला मोटा प्रयत्न होता. ''

महाराजांच्या कार्यावर कांहीं स्वार्थविशिष्ट हेतूनें टीका करणाऱ्यांचा प्रश्न क्षणभर बाजूस ठेविला तरी, महाराजांच्या कार्याच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वासंबंधीं गैरसमज उत्पन्न झाल्यामुळें कांहींजण महाराजांच्या कार्यावर टीका करितात. परंतु हा त्यांचा गैरसमज सहज दूर होण्यासारखा आहे. त्यांची अशी तक्रार आहे कीं, अशा प्रकारच्या जातिविशिष्ट चळवळी जातिभेद कायम करितात व त्यामुळें जातिभेद कायम होतात. हिंदी लोकांमध्यें ऐक्य नांदण्याची आवश्यकता आहे, याबद्दल महाराजांना खात्री होती. जातिभेद मोडून टाकण्याची महाराजांची फार इच्छा होती, हें महाराजांनीं आपल्या कृतीनें सिद्ध करून दाखविलें होतें. यासंबंधानें मुंबईस केलेल्या एका भाषणांत महाराज ह्मणाले:— "जपानमध्यें सामोराय ( त्या देशांतील क्षत्रिय वर्ग ) जातीनें जातिभेद मोडण्याच्या कामीं पुढाकार घेतला. सतराव्या शतकांतील थोर शिवाजी महाराजांच्या ध्येयाकडे आह्मीं विसाव्या शतकांतील लोकांनीं दृष्टि फेंकली पाहिजे. मीमांसा पाठशाळा सुरू केल्यापासून निरुपयोगी जुन्या ध्येयाचें पुनरुज्जीवन मात्र होईल,

ही मोठी खेदाची गोष्ट आहे. आधुनिक ध्येयाकडे हे ब्राह्मण पुढारी जितकें लक्ष पुरवितील तितकें तें थोडेंच आहे. महात्मा शिवाजीनें आह्मांला जें उदाहरण घालून दिलें आहे, तिकडे आह्मीं दुर्लक्ष करतां कामा नये. फलटणच्या निंबाळकर घराण्यापैकीं एकानें मुसलमानी धर्माची दीक्षा घेऊन एका मुसलमान स्त्रीचें पाणि-ग्रहण केलें होतें. त्याला या महात्म्यानें मराठी जातींत परत घेतलें. जिजाबाईसाहेब यांच्या संमतीनें या महात्म्यानें आपली मुलगी या निंबाळकराच्या मुलाला दिली. हिंदुस्थानला राष्ट्रीयत्व कसें आणून द्यावयाचें ह्याचें हें एक उत्कृष्ट व्यावहारिक उदाहरण आहे. या उदाहरणाचें अनुकरण करून त्याच्या पाउलावर पाऊल ठेवणें ह्मणजेच या थोर विभूतीविषयीं आपल्या ठायीं वसत असलेला आदर, पूज्यभाव व भक्ति व्यक्त करणें होय. जातिभेद ज्या त्वरेनें आह्मी मोडूं तितक्याच त्वरेनें आह्मी स्वराज्यास पात्र होऊं. या गोष्टीचें महत्व ज्या दिवशीं आह्मांस कळून येईल तो खरोखरच सुदिन होय. ''

मग अशा प्रकारचीं ज्यांचीं ध्येयें आहेत, त्यांनीं आह्मीं वर वर्णन केलेल्या जातिविशिष्ट चळवळींचें समर्थन तरी कां करावें ? या दोन परस्पर विरुद्ध गोष्टींचा मेळ तरी कसा घालावा ? महाराज हे व्यवहारचतुर असल्यामुळें त्यांनीं स्वतःच याबद्दलचीं कारणें पुढीलप्रमाणें दिलीं आहेतः—

" एका बाजूला पुढारलेल्या वर्गाचा प्रश्न व दुसऱ्या बाजूला मागसलेल्या लोकांचा प्रश्न अशी अलिकडे परिस्थिति उत्पन्न झाली आहे. जातिभेदामुळें हिंदुस्थानचें अपरिमित नुकसान झालें आहे, या गोष्टींची मला खात्री आहे. खिश्चन, मुसलमान, बौद्धधर्मानुयायी व इतर आह्मांला ह्मणजे मागसलेल्या वर्गांना सहानुभूतीनें व ममतेनें वागवितात. ह्मणून हे जरी भिन्न पंथाचे आहेत तरी ते आह्मांस प्रिय झालेले आहेत. इंग्लंडमध्यें धनिक वर्गाचे प्रतिनिधी मजूर वर्गाचें संरक्षण करूं शकत नाहींत. कारण भांडवलवाल्यांचे व मजूरपक्षाचे हितसंबंध परस्पर विरुद्ध असतात. हीच गोष्ट हिंदुस्थानची आहे. पुढारलेल्या वर्गाकडून मागस-लेल्या वर्गांच्या हितसंबंधाचें संरक्षण होणें अशक्य आहे."

कॉलेजला जोडून जें वसतिगृह होतें तें जरी सर्व वर्गांकरितां ह्मणून समजलें जात होतें तरी त्यांचें नेतृत्व पुढारलेल्या जातीकडेच होतें. हें बंद कां केलें याचा खुलासा करितांना महाराजांनीं आपलें मित्र मि० एम्. यांना लिहिलें:—

" येथें आल्यानंतर सर्व वर्गांकरितां ह्मणून गणलें गेलेलें वसतिगृह बंद केलें. कारण १० वर्षांच्या मुदतींत त्यांत एकही ब्राह्मणेतर नव्हता असें मला आढळून आलें. याप्रीत्यर्थ खर्च होणारी रकम मराठा वसतिगृह, लिंगायत, जैन, मुसलमान, शिंपी, महार, प्रभु, शेणवी या लोकांत मीं वांटून दिली. सोनार लोकांसाठीं आणखी एक वसतिगृह असावें असें मला वाटतें. "

कनिष्ट गणलेल्या वर्गांच्या शिक्षणाबद्दल ब्राह्मणांना थोडी जरी कळकळ असती, तरी आपल्या मागसलेल्या देशबांधवांना शिक्षणप्राप्ति होईल, अशा प्रकारें त्यांनीं आपल्या सार्वजनिक प्रयत्नांना दिशा लाविली असती. सरकारच्या मदती-खेरीज केवळ आपल्या प्रयत्नामुळें सामान्य जनता आपण साक्षर बनविली, असें ब्रह्मी बौद्ध भिक्षूंना आज अभिमानानें ह्मणतां येतें. तसाच अभिमान ब्राह्मणांना बाळगतां आला असता तर जातिविशिष्ट जागृति करण्याचें महाराजांसारख्यांना कारणच राहिलें नसतें. ब्राह्मणांनीं या बाबतींत कांहींच केलें नाहीं. दुसऱ्या जातींचें कसें काय चाललें आहे, याकडे दुर्लक्ष करून स्वतःचे हेतु साध्य करून घेण्याचे प्रयत्न करीत, हे ब्राह्मण एकलकोंडयाप्रमाणें आत्मसंतुष्ट होऊन स्वस्थ राहिले. याहीपेक्षां अतिशय वाईट गोष्ट म्हटली ह्मणजे आपल्या धर्म-बांधवांच्या स्वाभिमानाच्या रक्षेवर आपली जन्मश्रेष्ठता प्रस्थापित करण्याची त्यांना आसुरी लालसा उत्पन्न झाली.

या जातिविशिष्ट चळवळी खरोखरच जातिविशिष्ट होत्या काय ? या चळवळी जातिविशिष्ट मानल्या तर महाराज हे मराठा असून त्यांनीं जैन, लिंगायत, मुसलमान, नामदेव व दैवज्ञ आणि सारस्वत ब्राह्मणांना देखील कां मदत केली ? मराठा वसतिगृहामध्यें मुसलमानांची सोय कां लावण्यांत आली ? मुसलमानांची चळवळ बाल्यावस्थेत असतां तिचें स्वतः महाराजांनीं कां पोषण केलें ? अस्पृश्य वर्गांना मदत करण्याकरितां महाराजांच्या पुढारीपणाखालीं मराठे, जैन व इतर लोक कां गोळा झाले ? अशा कार्याला प्रवृत्त करणारी शक्ति जरी जातिविशिष्ट दिसत असली तरी राष्ट्रीय चारित्र्याचा खरा पाया घालणारी शक्ति ह्मणून तिचा सत्कार करणेंच अधिक योग्य आहे.



# प्रकरण ९ वें.

## दक्षिणेंतील क्षत्रिय.




हुमहाराजांच्या सार्वजनिक आयु:क्रमाचा पाया कसा घातला गेला, हें मागच्या प्रकरणांत सांगितलें आहे. मागसलेल्या वर्गांच्या शिक्षणाच्या या पायावर त्यांनीं राष्ट्रघटनेच्या ज्या सुंदर व मजबूत इमारतीची रचना योजिली, त्याचें एकेक थर कसकसे रचण्यांत आले, हें यापुढें क्रमश: दाखवावयाचें आहे; परंतु हें महाराजांचें महत्कार्य बरोबर समजण्यास, हिंदुसमाजाच्या घटनेच्या इतिहासाचें थोडेंसें पर्यालोचन करणें जरूरीचें आहे. राष्ट्रघटनेचा अथवा सामाजिक सुधारणेचा प्रश्न महाराजांच्या दृष्टीपुढें कोणत्या स्वरूपांत आला आणि त्यांच्या कारकीर्दीतील त्यांच्या चळवळींना विशिष्ट रंग कसा प्राप्त झाला, हें या समालोचनाच्या अभावीं समजणें शक्य नाहीं. वास्तविक पाहिलें असतां, कांहीं जातींचा स्वत:ला क्षत्रिय संबोधण्याचा हक्क जातिविशिष्ट मानतां कामा नये. पुष्कळांची अशी चुकीची समजूत झाली आहे कीं, **क्षत्रिय** ही संज्ञा जातिनिदर्शक आहे व यामुळेंच प्रस्तुतचा लढा उपस्थित झाला आहे. क्षत्रिय ही संज्ञा अगदीं प्रथम ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत उपयोगांत आल्याचें दिसून येतें. परंतु वैदिक काळीं क्षत्रिय संज्ञेचा जातिभेदाशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नव्हता. वैदिक काळीं अस्तित्वांत आलेल्या एखाद्या जातीशींहि क्षत्रिय ही संज्ञा लागं पडत नव्हती. जगदोत्पत्तीची कांहीं तरी कल्पना कल्पून, अथवा केवळ भिन्नभिन्न प्रकारच्या धंद्यांना अनुसरून जातिभेद निर्माण झाले, असें मानणें ह्मणजे कल्पना शक्तीला फाजील ताण देणें होय. हल्लीं समाजांत रूढ असलेल्या गोष्टींचा **पुरुषसूक्तांत** उल्लेख असल्याचें आढळून येत नाहीं व जातिभेदानुसार समाजाचें वर्गीकरण केल्याचेंहि त्यांत दिसून येत नाहीं. ऋग्वेद ग्रथित करणाऱ्या आर्यांना हल्लींसारख्या जातिभेदाची मुळींच कल्पना नव्हती. त्या काळीं सर्व आर्यलोक समान दर्जाचे असून, त्यांच्यामध्यें रोटीबेटीव्यवहार सर्रास चालूं होता; व ते आपा-

पले धंदे आपापल्या लायकीप्रमाणें व आवडीप्रमाणें बदलूं शकत असत. बौद्ध वाङ्मयाचा विशेष अभ्यास केलेले प्रोफेसर ऱ्हीस डेव्हिड्स ( Rhys Davids ) यांच्या ह्मणण्याप्रमाणें, "पहिले तीन वर्ग हे मूळचे एकच होत." बडेलोक व उपाध्याय वर्ग हे जन्मत: वैश्यच असून, ते आपल्या अंगच्या गुणांनीं उच्च दर्जाला चढत होते. गरीब लोकांचे बडे लोकांत व गरीब व बडे लोकांचे ब्राह्मण लोकांत पूर्वीपेक्षां थोडया कमी प्रमाणांत का होईना स्थित्यंतर होत असें. जातिभेदाच्या सिद्धांतानें भारलेल्या धर्मग्रंथांतदेखील न कळत राहून गेलेल्या गोष्टींचा या परिस्थितीसंबंधानें आधार सांपडतो. केवळ अपवाद ह्मणून जरी अशा गोष्टींची संभावना केली जाते, तरी एक गोष्ट स्पष्ट होते, ती ही कीं, अद्याप वर्णभेदांची रूपरेखा ठरलेली नव्हती. उच्च वर्णांचे सर्वच लोक गोरे नव्हते. कांहीं क्षत्रियांचे पूर्वज द्रवीड व कोलार जातीचे लोक होते. त्यांनीं आपलें स्वातंत्र्य बाहुबलाच्या जोरावर राखिलें होतें. याच वर्गांचे इतर लोक आपलें राजकीय महत्त्व वाढवून, उच्च दर्जाच्या लोकांत आपला शिरकाव करून घेत होते."

मॅक्स मुल्लर ( Max Mullar ) याहिपेक्षां स्पष्ट शब्दांत ह्मणतात:—

"वेदांच्या सूत्रांत 'जातिभेद,' ब्राह्मणांची अन्यायी आत्मप्रौढी व शूद्रांची अवनत स्थिति इत्यादि गोष्टींबद्दल मुळींच आधार सांपडत नाहीं." पुरुषसूक्तासंबंधीं लिहितांना दुसरे एक अधिकारी पुरुष मि० बार्नेट यांनीं याच विचारसरणीचा अनुवाद केला आहे. ते ह्मणतात:—

"ब्राह्मणांच्या जातिभेदाच्या सिद्धांताचा पहिला खुलासा यांत ( पुरुष-सूक्तांत ) सांपडतो. या सिद्धांताचे वेदकालीन समाजस्थितीशीं कितपत साम्य आहे, हा एक प्रश्न येथें उद्भवण्याचा संभव आहे. त्या वेळीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ग जातिभेदरूपी तटांनीं अलग झाले नव्हते. हे भेद केवळ सामाजिक असून, यांना धर्माचा अर्धवट पाठिंबा होता; परंतु अद्याप जातिभेद सर्वमान्य असा नव्हता. या भेदाच्या कक्षा स्थिर नसून, त्या सतत बदलत होत्या व या वर्गांचे व्यवहार जातिभेदाच्या सिद्धांताच्या नियमांनीं बद्ध झालेले नव्हते.

ज्या कारणांमुळें जातिभेद अभेद्य झाले, तीं कारणें प्राचीन असलीं तरी पहिला वेद ग्रथित झाल्यानंतर बऱ्याच कालानें अस्तित्वांत तीं आलीं असावींत.

हिंदुस्थानांतील सर्व लोक, निदान लढवय्ये लोक, जर सर्वस्वीं आर्यच असते तर क्षत्रिय व ब्राह्मण लोकांमध्यें पुढें जीं रणकंदनें माजून, उभय वर्गांमध्यें वैतुष्टय वाढलें, तीं या प्रमाणांत अस्तित्वांतच आलीं नसतीं; परंतु पराक्रमी असे लोक त्या वेळीं केवळ आर्यच नसून, इतर वंशांतनहि त्यांची उत्पत्ति झालेली होती. आर्यांचा पंजाब व संयुक्त प्रांतांत जम बसतो न बसतो तोंच, त्यांच्याहिपेक्षां अधिक अथवा त्यांच्या इतक्याच वीर्यवान् व धैर्यशील लोकांच्या हिंदुस्थानावर स्वाऱ्या झाल्या; परंतु या लोकांपैकीं सर्वच लोकांची बुद्धिमत्ता आर्य लोकांच्या तोडीची नव्हती. ग्रीक लोक प्रथम येऊन त्यांनीं आपल्या छोट्या वसाहती पंजाबमध्यें स्थापन केल्या. त्यांच्यामागून शकांच्या स्वाऱ्या झाल्या. यांनीं ग्रीक लोकांपेक्षांहि पुढें मजल नेऊन, हिंदुस्थानच्या सपाट प्रदेशांत विस्तीर्ण वसाहती निर्माण केल्या; व ते हिंदूलोकांमध्यें मिसळून गेले. हे लोक बहुतांशीं मंगोलियन लोकांचे वंशज होते. त्यांनीं हिंदुस्थानांत दोन अतिशय सुप्रसिद्ध क्षत्रिय घराणीं स्थापन केलीं; हीं घराणीं म्हटलीं म्हणजे नंद व मौर्य होत. शकांमागून युकी नांवाची दुसरी एक चीनमधून टोळी आली. या नवीन मानववंशांतूनच क्षत्रियश्रेष्ठ कनिष्क राजाचा जन्म झाला. काठेवाड व काठेवाडच्या आसपासच्या प्रदेशांत इराणी लोकांच्या टोळया आल्या. सौराष्ट्राचे मैत्रक नृपति इराणी वंशाचे होते. हिंदूकुशाच्या घाटांतून जे निरनिराळे लोक आले, त्यांना सामान्यपणें हूण अशी संज्ञा दिली जाते. विशेषतः रजपूत व गुर्जर लोकांची यामध्यें प्रामुख्यानें गणना करतां येईल. एवढेंच नव्हे, तर तिबेट व नेपाळच्या बाजूकडील हिमालयावरील घाटांतून लढवय्या लोकांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर एकसारख्या होतच होत्या. ज्या लच्छवी व सांख्य क्षत्रियांनीं महावीर व गौतमबुद्ध या दोन प्रख्यात धर्मसुधारकांना जन्म दिला, ते याच लोकांपैकीं होत. दक्षिण हिंदुस्थानामधील द्रविड लोकांमध्यें जातिभेद अगर वर्णभेदहि नव्हते; परंतु या लोकांमध्येंहि राजे व शूर लोक निपजले. आंध्र, केरल, चेर, चोल, पांड्य व यांहीपेक्षां पूर्वीं पुंद्र, मुतिब, पुलिंद, शबर हे अतिशय प्रबल असून, त्यांची गणना क्षत्रियांमध्यें करण्यास मुळींच हरकत दिसत नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील हिंदुसमाजाप्रमाणें त्यांच्या व्यवसायभेदांचें पर्यवसान जातिभेदांत झालें नाहीं. हे द्रविड क्षत्रिय एकाच जातीचे असले तरी यांचा उत्तर हिंदुस्थानांतील लोकांशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नव्हता, हेंहि येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. जे आर्य

लोक दक्षिणेंत गेले, त्यांना द्रविड लोक नेहमीं परके समजत असत. आजदेखील द्रविड लोकांपैकीं कानडी बोलणारे लोक मराठ्यांना 'आऱ्यार' ( आर्य ) या नांवानें ओळखतात, यावरून महाराष्ट्रीय लोक द्रविडेतर असून, जेव्हां ते दक्षिणेंत गेले तेव्हां द्रविड लोकांच्या दृष्टीनें ते परकेच समजले जात असत, एवढी गोष्ट निर्विवाद सिद्ध होते.

अगदीं अलीकडच्या काळांत आपण प्राचीन ऋग्वेदकालीन क्षत्रियांचे वंशज आहोंत, असें ह्मणून ब्राह्मणांशीं भांडणाऱ्या लोकांचें ह्मणणें वस्तुस्थितीहून कांहीं अशीं भिन्न आहे, हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. रामायण किंवा महाभारत काळच्या श्रीरामाशीं किंवा श्रीकृष्णाशीं आपला संबंध जोडूं पहाणाऱ्या हल्लींच्या क्षत्रियांच्या प्रयत्नांचें ऐतिहासिक दृष्टया सर्वस्वीं समर्थन करितां येणार नाहीं. कारण, व्यासवाल्मिकादिकांनीं वर्णिलेल्या ज्या क्षत्रियांशीं संबंध लावून हे प्रयत्न केले जातात त्यांच्या ऐतिहासिक सत्यतेबद्दलच शंका घेण्यास पुष्कळ जागा चिकित्सक मनुष्याला सांपडण्यासारखी आहे. दुसरें असें कीं, उदेपूरचे व जोधपूरचे रजपूत यांचा उगम चंद्रापासून व सूर्यापासून झाला आहे, असें गृहित धरूनच हल्लींचे क्षत्रिय आपणांस सूर्यवंशीय अगर सोमवंशीय असें समजतात; परंतु हे रजपूतदेखील प्राचीन आर्यांचे शुद्ध वंशज आहेत असें मानितां येत नाहीं. उलट असेंहि अनुमान काढितां येण्यासारिखें आहे कीं, ब्राह्मण व क्षत्रिय जर एकाच मानव-वंशाचे घटकावयव असते तर, क्षत्रियत्व सिद्ध करण्याचा पुढें विकोपास गेलेला लढा उपस्थितच झाला असता किंवा नसता याबद्दल शंका आहे. श्रीमहावीर व श्रीगौतमबुद्ध यांच्या उपदेशामुळें, अहिंसेच्या तत्त्वाचा हिंदुधर्मांत प्रवेश होऊन, पुढच्या कालांत जरी आहारभिन्नत्व अस्तित्वांत आलें तरी त्यामुळें पौराणिक काळच्या क्षत्रिय व ब्राह्मण यांच्यामध्यें अशा प्रकारची विषमता उत्पन्न झालेली नव्हती. पौराणिक कालांतहि एकादी व्यक्ति एकाच वेळीं अगर प्रसंगानुसार क्षत्रियांचीं व ब्राह्मणांचींहि कर्तव्यें करूं शकत असे. क्षत्रिय व ब्राह्मण यांच्यामध्यें यादवी माजल्यानंतरहि बराच काळपर्यंत या दोन्ही वर्णांच्या लोकांमध्यें रोटीबेटीव्यवहार सर्रास चालू होता. अशी वस्तुस्थिति असतांना, प्रस्तुतच्या युगांत क्षत्रिय नाहींत असें ब्राह्मणांनीं विधान करण्यासारखी परिस्थिति कशी निर्माण झाली ? परशुरामानें

एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली अगर ' नंदांतं क्षत्रियकुलम् ' अशा प्रकारचीं निरर्गल विधानें करण्याचें ब्राह्मणांना धाष्ट्र्य कसें झालें ? इत्यादि प्रश्न मनःचक्षुपुढें उभे राहतात. हिंदुसमाजरचनेमध्यें ब्राह्मणांना अग्रस्थान मिळाल्यानंतरहि पुष्कळ लढवय्या जातींनीं हिंदुत्वाचें संरक्षण केल्याचें इतिहास सांगतो. असें असूनहि, ब्राह्मणांखेरीज सर्व जनता शूद्रांच्या अवनत स्थितीला पोंचली आहे, असें ठासून सांगण्याचें धाष्ट्र्य ब्राह्मणांना झालें तरी कसें ? या प्रश्नाचें उत्तर हिंदुस्थानांतील क्षत्रियांच्या अगर लढवय्या जातींच्या इतिहासांत मिळण्यासारखें आहे. मीं वर सांगितल्याप्रमाणें क्षत्रिय हे केवळ आर्य नसून, ते बहुतांशीं आर्येतर वंशांतून निर्माण झालेले आहेत. यामुळेंच या वादाला इतकें तीव्र स्वरूप प्राप्त झालें असलें पाहिजे.

वेदकालीन आर्य लोकांनीं हिंदुस्थानांत पाय ठेवल्यानंतर, लौकरच त्यांचा बिहार व बिहारच्या आसपासच्या प्रदेशांतील राज्यकर्त्या वर्गाशीं संबंध आला. या आर्य लोकांमध्यें व तिबेटांतील आणि नेपाळांतील लोकांमध्यें बरेंच साम्य असावें असें दिसतें. या प्रदेशांतील आद्य रहिवासी दस्यु व नाग लोकांपेक्षां बिहारांतील या लढवय्या वर्गाची संस्कृति श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळें, त्यांना आर्यसमाजामध्यें समावेश करून घेणें भाग पडलें; व मूळच्या वैदिक संस्कृतीशीं विसंगत अशा गोष्टी आर्यांना ग्रहण कराव्या लागल्या. जैनधर्म, बुद्धधर्म व आतां स्मृतिशेष झालेले दुसरे लहानसहान धर्मपंथ, या आर्येतर लोकांच्या प्रतिभेमुळेंच प्रादुर्भूत झाले. याखेरीज वेदकालीन आर्यांना त्यांच्यापूर्वीं किंवा त्यांच्यानंतर हिंदुस्थानांत आलेल्या दुसऱ्याहि कित्येक पराक्रमी लोकांशीं सामना द्यावा लागला. मात्र आद्य रहिवाशांना ज्याप्रमाणें वागविणें शक्य होतें तद्वतच चीन, तुर्कस्थान, ग्रीस, इराण व इतर देशांतून आलेल्या लोकांना वागविणें अशक्य झालें. त्यामुळें कोणत्या ना कोणत्या तरी सबबीवर त्यांचा हिंदुधर्मांत अंतर्भाव करून घेणें ब्राह्मणांना भागच होतें. आपल्याहून भिन्न परंतु जोरदार संस्कृतीच्या व वंशाच्या लोकांचा याप्रमाणें हिंदुसमाज-व्यवस्थेंत समावेश करून घेणें आर्य लोकांना भाग पडल्यामुळें ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्यांतील लढा उत्पन्न झाला व कित्येक शतकेंपर्यंत तो अत्यंत निकरानें दोन्ही बाजूंकडून लढण्यांत आला.

मि० पार्जिटर यांनीं आपल्या लेखांत वशिष्ठ विश्वामित्र यांच्या कलहाचें हृद्गत स्पष्ट करून दाखविलें आहे. क्षत्रियांचा एकवीस वेळां निःपात केल्याची परशुरामाची प्रौढी व या उलट ब्राह्मणांचा एकवीस वेळां उच्छेद केल्याची, कृतवीर्याचा मुलगा सुभूम याची प्रौढी अशा परस्पर विरोधी गोष्टी पाहिल्या असतां, क्षत्रिय व ब्राह्मण यांच्यामधील लढा दीर्घकालिक असून, प्रत्येक पक्ष आपल्या प्रतिपक्षावर विजय संपादल्याची शेखी मिरवीत होता, हें स्पष्ट होतें. ब्राह्मण लोक विशेषतः धर्मगुरूंच्या डावपेचांच्याच शस्त्रांनीं लढत होते. या धर्मगुरूंच्या शस्त्रांचा प्रतिकार करण्याचें काम क्षत्रियांना कांहीं कमी सोपें होतें असें नाहीं. या कालीं ऋग्वेद पद्धतीचा सुलभ व सहजगम्य धर्ममार्ग मागें पडून, या दुर्वैदिक कर्मकांडाचें मायावी जाळें पसरलें. यामुळें पुराणांतील कल्पित गोष्टी व भानगडी अस्तित्वांत आणण्याला ब्राह्मणांना अवसर मिळाला. धर्मगुरूंच्या या प्रकारच्या सर्व शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन ब्राह्मणांनीं आपल्या बुद्धिमत्तेच्या बळावर, क्षत्रियांची आपलें क्षत्रियत्व प्रस्थापित करण्याची खटपट शतकानुशतकें विफल केली.

वैदिक धर्माच्या कक्षेतील जनक, आंगिरस, विश्वामित्र, भृगु, कण्व, वामदेव, भारद्वाज व इतर आणि त्याचप्रमाणें वैदिकधर्माच्या कक्षेबाहेरील जैन व बौद्धधर्माचे क्षत्रिय प्रचारक यांची स्वतंत्रवृत्ति व हिंदुसमाजावर भटशाहीचें वर्चस्व प्रस्थापूं पाहाणाऱ्या ब्राह्मणांच्या प्रयत्नांना त्यांचा स्वाभाविक विरोध इत्यादि गोष्टींमुळें, क्षत्रिय, ब्राह्मणांच्या डोळयांत सलूं लागले. वेदकालिन हिंदूसमाजांमध्यें क्षत्रियांनीं ब्राह्मणांपेक्षांहि श्रेष्ठ दर्जा व अग्रस्थान पटकाविलें होतें, ही गोष्ट ब्राह्मणांच्या हृदयांत शल्याप्रमाणें टोचूं लागल्यामुळें, ब्राह्मणांनीं आपल्या प्रतिपक्ष्याला अधोगतीस नेण्यासाठीं शक्य तेवढ्या मार्गांचें अवलंबन केलें. हेंहि ब्राह्मणांच्या क्षत्रिय द्वेषाचें कारण आहे. "अति प्राचीनकाळीं (आर्यकालीन समाजामध्यें) ज्या आर्यांनीं भरतखंड पादाक्रांत केलें होतें, त्यांच्या वंशजांनीं अग्रस्थान पटकाविलें असून, त्यांच्या खालोखाल याज्ञिकांचे वंशज असलेल्या ब्राह्मणांचा दर्जा होता; " हें वरील अवतरण ज्या ग्रंथकाराच्या लेखांतून घेतलें आहे, त्यांच्याच-डॉक्टर ऱ्हिस डेव्हिड्स-यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे "जगांतील इतर देशांप्रमाणें या दोन समाजांमध्येंहि अशा प्रकारचा स्वाभाविक श्रेष्ठ कनिष्ठ

संबंध होता " एवढेंच केवळ नव्हे, तर कांहीं वैश्य लोकांनादेखील धार्मिक बाबतींत श्रेष्ठ प्रतीचे हक्क होते आणि अशा वैश्यांचा दर्जा ब्राह्मणांपेक्षांहि उच्च. होता. प्रोफेसर हॅवेल आपल्या History of Aryan Rule नामक ग्रंथांत ह्मणतात:--

" ख्रिस्ती लोकांच्या इतिहासाप्रमाणें ब्राह्मण आणि बौद्ध यांच्या इतिहासावरून असें दिसतें कीं, कारागीर वर्गाचा धर्मप्रसाराच्या कामांत अतिशय निकटसंबंध होता, ही गोष्ट महत्वाची आहे. हिंदुस्थानांतील आर्य लोक आपल्या वसाहतीकरितां नवीन शहरें व खेडीं वसविण्याच्या वेळीं जे धार्मिक विधी करीत असत, ते करण्याचा अधिकार स्थपति अथवा मुख्य कारागीर याजकडे असे, असें शिल्पशास्त्रविषयक ग्रंथांवरून दिसून येतें. दक्षिण हिंदुस्थानांत सुतार, सोनार वगैरे काम करणाऱ्या लोकांना आज देखील आचार्य अशी संज्ञा आहे, अर्थात आचार्य ह्मणजे धर्मोपदेशक होय. " याच कारणांमुळें ब्राह्मण हे क्षत्रिय व वैश्य यांचा एकसारखा द्वेषा करीत आले आहेत. गूढ कर्म-कांडाची वाढ आणि क्षत्रिय जातींमधील यादवी, यामुळें ब्राह्मण लोकांचें कार्य सोपें झालें. क्षत्रियांतील हे अंतःस्थ कलह अशोक व चंद्रगुप्त यांच्या वेळेपर्यंत सतत चालू होते. त्यांच्यानंतर केव्हां केव्हां एखादा पराक्रमी क्षत्रिय इतर क्षत्रियांना आपल्या अधिकारांत आणून, एकछत्री राज्य स्थापन करी. तथापि सामान्यतः क्षत्रियांतील अंतःस्थ कलह चालूंच असत. यामुळें ब्राह्मणांचें काम आयतेंच सोपें झालें. या सर्व कारणांमुळेंहि जेव्हां एकादा क्षत्रियसमूह आपल्या ताब्यांत घेणें अशक्य होई, अशा वेळीं मनूनें ह्मटल्याप्रमाणें " आपल्या धर्मविधींची उपेक्षा केल्यामुळें अथवा ब्राह्मणांच्या उपदेशाप्रमाणें न वागल्यामुळें पतित होऊन शूद्रांच्या दर्जाला पोंचलेले " क्षत्रिय अशी संज्ञा देऊन, त्यांचें समाधान करण्याचा ब्राह्मणवर्ग प्रयत्न करीत असे. या प्रकारच्या पतित क्षत्रियांत पर्शियन आणि डार्ड लढवय्यांचा समावेश करितां येईल.

क्षत्रियांचे प्रतिस्पर्धी आज देखील नंद घराण्याच्या लयाबरोबरच क्षत्रिय नामशेष झाले असें प्रतिपादन करितात. चाणाक्य ब्राह्मण हा नंद घराण्याचा कट्टा शत्रु होता. नंदांच्या अंगांत मंगोलियन वंशाचें रक्त खेळत असून, ते जैन व बौद्ध पंथांचे चाहते होते हें कदाचित् ब्राह्मण चाणाक्याच्या नंदद्वेषाचें कारण असावें. नंदांमागून मौर्य आले. हेहि नंदांचेच वंशज होते. असें असूनहि नंदांना सोडून मौर्यांना हातीं धरण्याचें एक कारण चंद्रगुप्त मौर्य हा

शेवटच्या नंदनृपतीच्या हीन–कुलीन राणीचा पुत्र होता; हें असलें पाहिजे. अर्थातच चाणक्याला चंद्रगुप्ताच्या घराण्याचा शूद्रांत सहज समावेश करितां येण्यासारखा होता. अशा शूद्रवंशाची नंदसिंहासनावर स्थापना करून, क्षत्रियत्वाची प्रौढी मिरविणें त्यांना अशक्य करावें, असा चाणक्याचा बेत होता; परंतु नंदांप्रमाणेंच मौर्यांनाहि ब्राह्मणांच्या महत्वाकांक्षेची चीड आल्यावांचून राहिली नाहीं, असा पुढें अनुभव आला.

'रक्त हें पाण्यापेक्षां दाट असतें, अशी जी इंग्रजींत एक ह्मण आहे त्या ह्मणीप्रमाणें मौर्यघराण्याचा संस्थापक चंद्रगुप्त व मौर्यकुलमुगुटमणी सम्राट् अशोक यांच्यासारख्या मौर्य नृपतींनीं ब्राह्मण्यावर जबरदस्त प्रहार केले, ह्मणून 'नंदांतं क्षत्रियकुलम्' व मौर्य नृपति हे शूद्रांतील शूद्र आहेत, असें ब्राह्मण प्रतिपादूं लागले. उत्तर हिंदुस्थानांतील सम्राट्पद गुप्तांच्या हातीं गेल्यानंतर गुप्त हे ब्राह्मणांना अधिक अनकूल झाले; परंतु माळवा, गुजराथ, काठेवाड हे प्रांत अनार्य शकांच्या वर्चस्वाखालीं असून, ब्राह्मणी व इतर धर्मपंथांचा मिलाफ होऊन बनलेल्या हिंदुधर्माचा प्रसार शकांच्या कारकीर्दींत कित्येक शतकें बराच झाला.

या कालांतहि ह्मणजे इ० सनाच्या आठव्या शतकापर्यंत ही ब्राह्मणक्षत्रियांची परस्पर स्पर्धा चालूंच होती, परंतु या काळाच्या अखेरीस वैदिक धर्माचें पूर्ण रूपांतर होऊन, हल्लींच्या विकृत हिंदुधर्माचा पाया घालण्यांत आला व हिंदुसमाजव्यवस्थेंतील आपलें पहिलें स्थान क्षत्रियांनीं कायमचें गमाविलें. मात्र (नंदांतं क्षत्रियकुलम्) हा सिद्धांत बाजूस ठेवून, उत्तर हिंदुस्थानापुरतें तरी क्षत्रियांचें अस्तित्व ब्राह्मणांनीं मान्य केलें. क्षत्रियांच्या या पुनरुज्जीवनामुळें या दोन्ही पक्षांमधील प्रतिस्पर्धा कांहीं काळ विराम पावली. वादाच्या या निकालांत दोन पक्षांमधील कोणत्या पक्षानें विजय संपादिला, असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. व्हिन्सेंट् स्मिथच्या नांवाजलेल्या पुस्तकांतील पुढील विस्तृत अवतरणावरून या प्रश्नावर चांगला प्रकाश पडण्यासारखा आहे. रजपूत या शब्दावरून रक्त संबंधाचा बोध होत नाहीं. वीर्यवान् लोकांची जात किंवा पंथ किंवा संघ एवढाच या शब्दाचा खरा अर्थ आहे. रजपूत लोक हे स्वतःस राजवंशीय समजत असून, ब्राह्मण त्यांना प्राचीन धर्मग्रंथांतील क्षत्रियांचे वंशज समजूं लागले. या विस्तृत रजपूत जातींत निरनिराळ्या मानववंशांतील लोकांचा समावेश होतो.

यांपैकीं बऱ्याच जाती पांचव्या साहाव्या शतकांत हिंदुस्थानांत आलेल्या परक्य लोकांपासून उत्पन्न झाल्या आहेत, व पुष्कळ इतर जाती, हिंदुस्थानांतील आद्य रहिवाश्यांपासून उद्भवलेल्या आहेत. व हे ज्या वर्गांतून निघून रजपुतां समाविष्ट झाले, त्या वर्गांचे बहुतेक लोक आजहि अर्धवट हिंदु बनलेले किंव खालच्या वर्गांत गणलेले आहेत.

" राजपुतान्यांतील अगर राजस्थानांतील बहुतेक सर्व प्रख्यात रजपूत जार्त या टॉड यांनीं वर्णन केलेल्या सिथीयन लोकांपासून निर्माण झाल्या आहेत. हूण **गुर्जर, मैत्रक** इत्यादि, परक्या देशांतून आलेल्या जातींतील वरिष्ठ प्रतीच्या लोकांचा रजपूत जातींमध्यें प्रवेश शाला; आणि त्यापेक्षां कमी दर्जाचे लोव गुर्जर, अहीर, जाट इत्यादि कनिष्ठ प्रतीच्या जातींत आज दृष्टोत्पत्तीस येतात.

" मेवाडचे स्वाभिमानी आणि शूर शिसोदे, परिहार अथवा प्रतिहार चालुक्य ऊर्फ सोळंकी या जाती अशा प्रकारच्या ( परकीय असून, पुढें क्षत्रिय बनलेल्या ) आहेत. दक्षिणेंतील राष्ट्रकूट, राजपुतान्यांतील राठोड, बुंदेलखंडचे चंडेले व बुंदेले इत्यादि लोक आद्य हिंदूंतून वर चढून, रजपूत बनले आहेत. चंडेल हे वस्तुत: **गोंड** लोकांपासून झाले असून, त्यांचा व भाटांचा निकट संबंध असल्याचें दिसून येतें. या प्रश्नाची आपण छाननी करीत गेलों तर मारुतीच्या शेंपटाप्रमाणें हा विषय एकसारखा वाढतच जाईल. "

अर्वाचीन काळांतील रजपूत अंशत: तरी अनार्य व परकीय होते, याबद्दल वरील विवेचनावरून कांहीं शंका राहणार नाहीं. पांचव्या व सहाव्या शतकांत पुढें रजपूत बनलेले बरेच लोक हिंदुस्थानांत आले; परंतु अलेक्झांडर यानें हिंदुस्थानांत स्वारी करण्यापूर्वीं देखील हिंदुस्थानांत, आपणांस रजपूत म्हण- विणारे क्षत्रिय लोक अस्तित्वांत होते, हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. उदाहरणार्थ— " या जाती लष्करी पेशाच्या होत्या. या जातींवर राजांचें आधिपत्य असें; परंतु पुष्कळ बाबतींत या जाती कांहीं विशिष्ट लोकांच्या नेतृत्वाखालीं वागत असत. या क्षत्रिय जातींमध्यें अलेक्झांडरच्या काळच्या इतिहासकारांना पंजाबच्या उत्तरेस व रावी नदीच्या पूर्वेस, सिंधु व सतलज नद्यांच्या संगमाच्या नैर्ऋत्य दिशेला क्षत्रिय या नांवानें ते प्रसिद्ध होते. अगदीं अलीकडच्या काळांत उत्तर हिंदुस्थानामध्यें ज्या रजपूत लोकांनीं आपलें नांव इतिहासांत अजरामर करून ठेविलें, त्यांचेच ते पूर्वज होत. यांचीं नाणीं या प्रदेशांतील सर्व भागांत सांपडतात. या काळीं रजपूत लोक उदय पावले असावेत असा मानववंश- शास्त्रज्ञांचा तर्क आहे. "

अशा प्रकारें रजपूत लोकांनीं केवळ ब्राह्मण खेरीज करून इतर हिंदु समाजामध्यें अग्रस्थानाचा मान पटकाविला. आपले प्रतिस्पर्धी जे क्षत्रिय त्यांचा एक्वीस वेळा उच्छेद झाला, किंवा नंद हे क्षत्रिय जातीचे शेवटचे वंशज होत; असें जें स्वकपोलकल्पित गोष्टींवरून ब्राह्मण लोक प्रतिपादन करीत, तें इतःपर बाह्यतः तरी त्यांनीं सोडून दिल्यासारखें दिसत होतें; परंतु या लढयामध्यें ब्राह्मणांनीं जो एक विजय संपादिला तो हा कीं, क्षत्रिय लोक हे वेदकालीन क्षत्रियांचे केवळ नांवचे वंशज ठरले. या लढवय्या जातींमध्यें इतःपर बुद्धिमत्तेचें महत्व मुळींच राहिलें नाहीं. कारण गतकालीन क्षत्रियांच्या लष्करी पेशाचे बाबतींत जरी ते इतःपरहि खरे प्रतिनिधी होते, तरी त्यांच्या कर्तव्याला जी नवीन मर्यादा यापुढें घालण्यांत आली, तिनें त्यांच्या बुद्धीची वाढ अजिबात खुंटविली व त्यांना जवळ जवळ ब्राह्मणांच्या बुद्धीचे दास बनविलें.

आतां महाराष्ट्रांतील स्थितीचा थोडासा विचार करणें जरूर आहे. द्राविड वंशाच्या शूर लोकांच्या शेजारीं शेजारींच उत्तर हिंदुस्थानांतील क्षत्रिय लोक हे या द्वीपकल्पाच्या बऱ्याचशा भागांत कायमचा तळ देऊन राहूं लागल्यामुळें, परिस्थिति बरीच गुंतागुंतीची झाली. आर्यसमाजव्यवस्थेच्या कक्षेबाहेर द्राविड लोकांचें स्थान असावें, हें उघडच आहे. प्राचीनकाळच्या कण्व व संग राजांप्रमाणें अगर उज्जनी आणि जघोटी येथें ह्युएनत्संगनें पाहिलेल्या राजवंशाप्रमाणें म्हैसूरचे कदंब हे क्षत्रियाचा पेशा धारण करणारे ब्राह्मणच होत. ब्राह्मण कदंबांनीं आपली जी महती वाढविली होती, तिचे वांटेकरी कदाचित् इतर लढवय्या जातीहि होतील, या भीतीमुळें इतरांच्या क्षत्रियत्वाचा निषेध करण्याचें ब्राह्मणांना अवश्य वाटलें असावें.

या काळांतील दाक्षिणात्य क्षत्रियांनीं सर्व धर्मांशीं व पंथांशीं जे सहिष्णुतेचें धोरण ठेविलें होतें, तेंहि ब्राह्मणांना रुचलें नसावें. महाराष्ट्रांतील अनेक नृपती आपल्याच मताचे अनुयायी होते असें भिन्न धर्माचे आचार्य सारख्याच जोरानें प्रतिपादित असल्याचीं उदाहरणें महाराष्ट्राच्या इतिहासांत पुष्कळ सांपडतात. महाराष्ट्रांतील लोक जात्याच इतर प्रांतांतील लोकांपेक्षां अधिक शूर व काटक असल्यामुळें महाराष्ट्रांतील नृपतींनीं परस्पर विरोधी अशा पंथांनाहि सारखेंच पाठबळ देण्याचें उदार धोरण स्वीकारिलें असावें. त्यांच्या या परधर्मसहिष्णुतेमुळें महाराष्ट्रांतील

क्षत्रिय, ब्राह्मणांच्या मनांतून उतरले असले तरी त्यांत आश्चर्य नाहीं. क्षत्रियांचा नैतिक अध:पात झाल्यामुळेंच धर्माच्या बाबतींत त्यांच्या हातूनहि ढिलाई होत चालली असें ह्मणण्यास ब्राह्मण लोकांना यामुळें जागा मिळाली.

रजपूत जातीची संघटना झाल्यानंतर, मराठाराष्ट्र संस्थापक श्रीशिवाजी-महाराज यांनीं आपल्या मुत्सद्दीपणाच्या व तरवारीच्या जोरावर जें राज्य मिळविलें होतें, त्याच्या तक्तावर सर्व प्रकारच्या मानमरातबानें आरूढ होण्याचा त्यांचा कृतनिश्चय होईतोंपर्यंत, लढवय्या जातींच्या क्षत्रियत्वाबद्दलचा प्रश्न जोरानें उद्भवला नाहीं. श्रीशिवाजीमहाराजांच्या वेळीं जी क्रांति घडून आली तिचें श्रेय ब्राह्मणां-व्यतिरिक्त महाराष्ट्रांतील इतर कोणतीहि जात ज्याप्रमाणें आपणाकडे घेऊं शकत असेल, त्याप्रमाणें तें श्रेय शिवाजीमहाराजांच्या ब्राह्मण अनुयायांनाहि देतां येईल. श्रीशिवाजीमहाराजांना राजपद मिळण्याच्या बाबतींत ब्राह्मण लोकांनीं अंगमेहनत केली यांत शंका नाहीं; परंतु ज्या शिवाजीमहाराजांनीं हिंदुधर्माकरितां स्वातंत्र्य मिळविलें व ब्राह्मणांना आधिभौतिक व आध्यात्मिक गोष्टींबद्दलचे सर्व मानमरातब कोणत्याहि प्रकारचा दुजाभाव मनांत न आणतां दिले, त्याच शिवाजीमहाराजांच्या राज्यारोहणाच्या प्रसंगीं सर्व ब्राह्मण जातीनें महाराजांच्या क्षत्रियत्वाबद्दल शंका घेऊन करून विरोध केला; ही गोष्ट मात्र विलक्षण होय. त्या वेळच्या धार्मिक काळांत देखील शिवाजीमहाराजांपेक्षां अधिक धर्मशील असा मनुष्य सांपडणें खरोखरच अशक्य होतें; व आपल्या द्विजत्वाबद्दलची खात्री करून देण्यासारखा पुरावाहि महाराजांजवळ थोड थोडका होता असेंहि नाहीं. त्यांच्या आईकडून शिवाजी-महाराजांचा संबंध देवगिरीच्या यादव घराण्याशीं येत होता. याच यादव घराण्याला पुढें जाधव अशी संज्ञा प्राप्त झाली. बापाकडून शिवाजीमहाराजांचा उदेपूरच्या शिसोदे क्षत्रियांशीं संबंध जुळत होता. या दोन घराण्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल वादच नव्हता. वातापी( विजापूर जिल्ह्यांतील बदामी ) येथें राज्यस्थापना केल्यापासून ज्या चालुक्यांनीं महाराष्ट्रांत राज्य केलें, ते दक्षिण कोंकण प्रदेशावर राज्य करणारे बानावशीचे कदंब, स्थानिक मानववंशापासून उद्भवून चालुक्यांचा मोड करून, महाराष्ट्रावर राज्य करणारे राष्ट्रकूट व पुढें दोन शतकांनंतर पूर्वीच्या चालुक्यांचा मोड करून राज्य करणारे कल्याण येथील दुसरें चालुक्य घराणें, कोल्हापूरचे शिलाहार घराणें, दक्षिणेकडील पल्लव, माळव्याचे पवार, मौर्य घराण्याशीं आपला संबंध

जोडणारे मोरे हीं व यांसारखीं इतर घराणीं यांचा शिवाजीमहाराजांशीं संबंध होता. वरील शूर घराणीं हीं आर्य व आर्येतर क्षत्रियांमधूनच निर्माण झालीं होतीं यांत शंका नाहीं. या हिंदुधर्म-संरक्षकांना वेदोक्ताचा अधिकार नाकबूल करण्याचें धाडस जें ब्राह्मणांनीं केलें त्याचें समर्थन आर्येतर क्षत्रियसंबंध हें होतें, असें ह्मणतां येणार नाहीं. रजपूत लोक हे क्षत्रिय होते, याबद्दल या वेळीं वादच राहिला नव्हता. हिंदुस्थानांतील ब्राह्मणांनीं रजपूत लोकांचें क्षत्रियत्व कबूल करून व त्यांना क्षत्रियत्वाचे सर्व अधिकार बिनहरकत देऊन पुष्कळ शतकें आतां होऊन गेलीं होतीं. ब्राह्मणांनींच रजपूत लोकांच्या वंशावळीचा संबंध श्रीरामचंद्र व श्रीकृष्णापर्यंतसुद्धां नेऊन भिडविला होता. महाराष्ट्रांत मुसलमान लोकांचें प्राबल्य झालें असतांनादेखील शिवाजीमहाराजांच्या सभोंवतीं जीं शूर घराणीं गोळा झालीं होतीं, त्यांचें राजकीय महत्व व पौरुष उच्च प्रतीचें असल्यामुळें वेदोक्त पद्धतीच्या धर्मविधींना ते सर्वथैव पात्र होते. ज्या घाटगे घराण्यांत आमच्या चरित्रनायकांनीं जन्म घेतला, त्या घराण्यांतील पुरुषांनीं चौदाव्या शतकांत मोठी तरवार व बहादुरी गाजविली होती. ज्या भोंसले घराण्याला श्रीशिवाजी महाराजांनीं छत्रपति-पदानें भूषित केलें होतें, त्या घराण्यांतील पुरुष अहमदनगरच्या व विजापूरच्या दरबारीं ' नवीन राजे बनविणारे ' ह्मणून प्रख्यात होते. **मराठा** हा शब्द महारथी या शब्दापासून झालेला आहे; व महारथी या शब्दाचा अर्थ क्षत्रिय असा आहे. अशोकाच्या स्तंभावरील एका शिलालेखांत हल्लींच्या महाराष्ट्र देशांत **राष्ट्रिक** नांवाचे लोक राज्य करीत होते, असा उल्लेख आहे. **नानाघाटच्या** लेण्यांत आंध्र जातीच्या **शतकर्णी** नृपतीचा उल्लेख असून, **नागानिका** नांवाची त्याची राणी होती. ही राणी **राष्ट्रिक** राजाची मुलगी **महारथी** असल्याचाहि उल्लेख सांपडतो. हा शिलालेख इ० स० च्या एक दोन शतकांपूर्वी लिहिलेला असावा. प्रसिद्ध तामीळ विद्वान् बार्नेट यांनीं सांगितलेल्या एका दंतकथेवरून पंचद्रवीड, महाराष्ट्र व गुजराथ हे प्रांत महाराष्ट्री राजांच्या अमलाखालील देश होते, असें दिसून येतें. पुढील शतकांत आर्य लोकांनीं दक्षिणेंत जेव्हां आपला पगडा बसविला, तेव्हां आर्यांनीं महाराष्ट्रांतील द्राविडी भाषा नामशेष केल्या असाव्या. आंध्रानंतर महाराष्ट्रांत जे राज्यकर्ते नृपती होऊन गेले, त्यांत रठ्ठ व राष्ट्रकूट यांचेच संख्याधिक्य होतें. यावरून महाराष्ट्री ( अथवा मराठी ) लोकांचें क्षत्रियत्व इतिहासमान्य

होण्यासारखें होतें, हें उघड आहे. अशा प्रकारचा इतिहास व परिस्थिति असूनहि महाराष्ट्रांतील ब्राह्मणांनीं या वेळीं अशा प्रकारचें अविचारचें धोरण कां स्वीकारावें ? असा एक प्रश्न साहाजिकपणेंच उद्भवतो. सामान्यत: ब्राह्मणांचें क्षत्रियांशीं जे अनुदार वर्तन घडलें, त्याच्या कारणांची मीमांसा आम्हीं वर केलीच आहे. परंतु त्या काळच्या महाराष्ट्रांतील ब्राह्मण लोकांची मन:स्थिति कशा प्रकारची होती हें येथें समजून घेतल्याखेरीज या प्रश्नाच्या उत्तराची पूर्तता होणार नाहीं. वैदिक काळच्या ब्राह्मणांमध्यें दुसरें कांहीं दोष असले तरी समाजव्यवस्थेचा ब्राह्मणवर्ग हा एक घटक असून, बदलणाऱ्या परिस्थितीशीं तादात्म्य पावून तो प्रगमनशील झाला पाहिजे, हें तत्त्व त्यांना पूर्णपणें मान्य होतें. उत्तर हिंदुस्थानांतील यांच्या मागून आलेले ब्राह्मण जरी अधिकाधिक श्रद्धांध व कर्मठ होत गेले तरी ज्या असंख्य विजातीय लोकांशीं त्यांचा निकट संबंध घडला, त्या लोकांत मिळून मिसळून वागण्याची प्राचीन आर्यांची हातोटी त्यांनीं कधींहि सर्वस्वीं गमावली नाहीं; परंतु उत्तर हिंदुस्थानांत परकीय लोकांनीं आपला जसा जम बसविला होता, तसा जम महाराष्ट्रांत त्यांना बसवितां आला नाहीं. यामुळें महाराष्ट्रांतील ब्राह्मणांत परिस्थित्यनुरूप वागण्याची शक्ति कमी होत गेली. द्राविड लोक उत्तरेकडून आलेल्या लोकांहून सर्वस्वीं भिन्न असल्यामुळें सहजच तुटकपणानें रहात असत. या एकलकोंड्या रहाटीचा संसर्ग नवीन आलेल्या लोकांतील श्रेष्ठमन्य ब्राह्मणांना आपोआप लागला. मध्ययुगांत ( सुमारें ७ व्या शतकापासून १५ व्या शतकापर्यंत ) हिंदुधर्माचें वैदिक स्वरूप अगदींच नष्ट झालें. आणि ब्राह्मणेतर साधुसंतांच्या धर्मोपदेशामुळें महाराष्ट्रांतील जनतेंत धर्मजागृति उत्पन्न झाली. या धार्मिक जागृतीशीं ब्राह्मणांचा फारसा संबंध नव्हता, त्याचप्रमाणें खुद्द शिवाजीमहाराजांना स्फूर्ति देणारी देवता देखील आर्यसंस्कृतीच्या बाहेरचीच होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अशा प्रकारच्या परिस्थितीमुळें महाराष्ट्रांतील धार्मिकवृत्तीच्या ब्राह्मणांचा एक तुटक गट निर्माण होऊन, ते ब्राह्मणेतरांसंबंधीं उत्तरेकडे मुळींच न दिसणारा तिरस्कार दाखवूं लागले. शिवाजीमहाराज शूर असले तरी त्यांना यशस्वी करणारा गुरूपदेश रामदास व दादोजीसारख्या ब्राह्मण गुरूपासूनच त्यांना मिळाला, अशा दंतकथा पुढें प्रसृत झाल्या, याचें कारण तरी या परिस्थितींतच सांपडण्यासारखें आहे. शिवाजी महाराजांचा पराक्रम

इतका लोकोत्तर असूनहि ब्राह्मणांच्या मतें ते क्षत्रियपदाला योग्य नव्हते. गो-ब्राह्मणांच्या प्रतिपालनार्थ महाराजांनीं मोठा पराक्रम गाजविला. त्यांच्या ठायीं ब्राह्मणांविषयीं अपेक्षेबाहेर आदरबुद्धि वसत होती, हेंहि निर्विवाद आहे. याबद्दल ब्राह्मणांनीं कशा प्रकारची कृतज्ञता दाखविली, हें प्रसिद्धच आहे. त्यांच्या मतें शिवाजीनें आपलें वीर्यसर्वस्व ब्राह्मणांना अर्पण केलें, तें केवळ तो शूद्र ह्मणूनच होय ! नाहींतर त्याच्या हातून राज्यस्थापनेचें कार्य मुळींच उरकलें नसतें !

शिवाजीमहाराज स्वतःला राज्याभिषेक करवून घेण्याचा निश्चय करीतोंपर्यंत ब्राह्मण अशा प्रकारचें अनुदार धोरण स्वीकारतील, असें कोणाच्या ध्यानींमनींहि आलें नव्हतें. रा० राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या राधामाधवविलासचंपू नांवाच्या शहाजी महाराजांच्या वेळींच रचलेल्या संस्कृत काव्यांत शिवाजीचे जनक शहाजी हे शिसोदे क्षत्रिय घराण्याचे वंशज होते, असें वर्णन केलें आहे. शिवाजीचा एक वडील बंधु अल्पवयी वारला. त्याचा क्षत्रियाला उचित अशा धर्मविधींनीं अभिषेक केला होता. १६७४ सालीं रायगड येथें, शिवाजीमहाराज तक्तारूढ होण्यापूर्वी कितीतरी दिवस अगोदर हा समारंभ झाला होता. मराठी भाषेंतील पहिला कवि ज्ञानेश्वर यानें देवगिरीच्या यादवांचें महाराष्ट्रांतील क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ असल्याचें वर्णन केलें आहे. यावरून त्या वेळीं ब्राह्मणांनीं वेदोक्त राज्याभिषेकाला जो विरोध केला, त्याचें इंगित समजणें मोठें कठिण होतें. परंतु मराठा अनुयायांच्या साह्यानें शिवाजीमहाराजांना जें महत्त्व आलें, त्यामुळें हिंदुसमाजावरील ब्राह्मणी वर्चस्वावर गदा येऊन, आपलें महत्त्व कायमचें निघून जाईल, अशी ब्राह्मणांना भीति उत्पन्न झाली असावी. शिवाजीमहाराज आतां स्वतंत्र नृपपद धारण करीत असल्यामुळें त्यांची ही भीति दृढतर झाली असावी. शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं ब्राह्मणांनीं जें विचित्र धोरण स्वीकारिलें त्याचें कारण त्यांची ही असूया हेंच असलें पाहिजे. ज्या योद्ध्यांनीं शिवाजीमहाराजांना अनुपम साह्य केलें, त्यांनाहि आपल्या नायकाप्रमाणेंच स्वतःलाहि सामाजिक श्रेष्ठत्व प्राप्त व्हावें, अशी इच्छा झाली होती. प्रभू लोकांनीं आपलें क्षत्रियत्व प्रस्थापित करण्याचा याच वेळीं प्रयत्न चालविला होता, याबद्दल भरपूर ऐतिहासिक पुरावा आहे. कायस्थ प्रभू लोकांच्या या प्रयत्नामुळें ब्राह्मण लोक इतके चिडून गेले कीं, छत्रपतिमहाराजांचें यत्किंचितहि वांकडें करणें त्यांना शक्य नसलें तरी, वेदोक्तविधीचा हक्क प्रस्थापित करण्याच्या कामीं शिवाजीला पुढें करून प्रभू लोक आपला स्वार्थ साधीत आहेत,

असा ब्राह्मणांनीं त्यांच्यावर निकराचा हल्ला केला. शिवाजीमहाराजांची व्यक्तिविषयक इच्छा पूर्ण करण्याला ब्राह्मणांना जरी उत्सुकता नसली तरी त्यांच्यापैकीं कांहींजण तरी तयार झाले असते. पण ही शिवाजीची क्षत्रियत्वाकांक्षा प्रचंड स्वाभिमान जागृतीचें एक चिन्ह आहे, हें ब्राह्मणांनीं ओळखलें. असली समाजक्रांति ह्मणजे आपल्या श्रेष्ठतेची समाप्ति होय, असा त्यांनीं तत्काल अंदाज केला. यामुळेंच त्यांनीं वैदिक राज्याभिषेकाला जोराचा विरोध केला.

काशीच्या गागाभट्टाची हकीकत येथें देण्याची आवश्यकता नाहीं. उत्तरेकडील ब्राह्मण, क्षत्रियाचें महत्व जाणून होते; ह्मणून तिकडच्या या पंडिताला शिवाजीमहाराजांचा त्यांच्या दर्जाप्रमाणें गौरव करणें कठिण वाटलें नाहीं. शिवाजीमहाराजांच्या घराण्याचा शिसोद्यांशीं संबंध असल्याचें उदेपूरच्या राण्यांनीं कबूल केल्यामुळें गागाभट्टाचा मार्ग अगदींच निष्कंटक झाला; गागाभट्टाच्या हातून यथासांग व क्षत्रियोचित पद्धतीनें राज्याभिषेक झाला आणि दक्षिणेंतील ब्राह्मणांच्या कीर्तीवर आणखी एक अदूरदर्शित्वाचा, किंबहुना कृतघ्नतेचा, डाग पडला. तरीहि ब्राह्मणवर्ग जागा झाला नाहीं. स्वेतर ह्मणजे शूद्र असेंच ठरविण्याचा त्यांचा वेडा अट्टाहास १६७४ नंतरहि त्यांनीं अव्याहतपणें चालूंच ठेविला. श्रीशिवाजीमहाराजांचा राज्याभिषेक झाल्यावर लागलींच ( १६७७ ) सालीं त्यांनीं एक फर्मान काढिलें होतें; त्यांत असें प्रसिद्ध करण्यांत आलें होतें कीं, " ज्या जातींना वेदोक्त पद्धतीनें धार्मिक विधी करण्याचा हक्क असूनहि मुसलमान लोकांच्या राज्यामुळें अगर ब्राह्मणांच्या अरेरावीमुळें त्यांच्या हक्कांकडे दुर्लक्ष झालें असेल, तर त्यांनीं आपल्या हक्काचें पुनरुज्जीवन करून त्याप्रमाणें वागावें......लोभामुळें अगर मत्सरबुद्धीमुळें जर एकादा ब्राह्मण शास्त्राविरुद्ध प्रतिपादन करीत असेल, तर ज्या जातीवर अशा प्रकारचा जुलूम होत असेल, त्या जातीनें सरकारकडे दाद मागावी." उत्तरेकडून येणाऱ्या मुसलमान लोकांचा प्रतिकार करण्यासाठीं सर्व जातींनीं एक व्हावें, असा कळकळीचा उपदेश या फर्मानमध्यें केलेला आहे. यावरून अखिल महाराष्ट्रांतील जनतेच्या मनांत स्वाभिमानाची ज्योत प्रदीप्त होऊन ब्राह्मणांचें ब्राह्मणेतरांशीं जे अन्याय्य वर्तन घडत असे त्याचाहि प्रतिकार करण्याची त्यांना सहाजिकपणेंच इच्छा झाली होती असें दिसतें. या अंतःस्थ कलहामुळें दिल्लीहून चाल करून येणाऱ्या शत्रूंचा प्रतिकार करण्याच्या कामीं शिवाजीमहाराजांना एक नवीन विघ्न उपस्थित होतें कीं काय, अशी भीति उत्पन्न

झाली. म्हणजे ब्राह्मणांचा हा यत्न शिवाजीच्या राष्ट्रकार्यांत मोठें विघ्न उपस्थित करूं शकला हें उघड आहे. प्रगतीची लाट थोपवून धरण्याचा निरर्थक प्रयत्न करणाऱ्या महाराष्ट्रांतील भिक्षुकांना कोणत्याहि प्रकारचा खासगी फायदा न होतां उलट त्यांना गागाभट्टाच्या पदरीं पडलेल्या एक लक्ष रुपयांच्या दक्षणेला मात्र मुकावें लागलें ! ही नुकसान लक्षांत आल्यानंतर शिवाजीमहाराजांच्या घराण्यांत वेदोक्त पद्धतीनें विधी करण्याचें कबूल करून, कांहीं भिक्षुकांनीं आपल्या चुकीची उशीरा कां होईना दुरुस्ती केली. राजाराममहाराजांची धर्मपत्नी सुप्रसिद्ध ताराबाईसाहेब यांना जेव्हां आपला मुलगा शिवाजी याचा उपनयन-संस्कार करण्याची इच्छा झाली, तेव्हां रामचंद्रपंत आमात्य यानें शाहुमहाराजांची कारागृहवासांतून मुक्तता होईतोंपर्यंत हा उपनयन-संस्कार तहकूब करावा म्हणून ताराबाई साहेबांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. ब्राह्मणांच्या अशा प्रकारच्या हातचलाखीला बळी न पडण्याइतकी ताराबाई धूर्त होती. रामचंद्रपंतांच्या सल्लयाप्रमाणें न वागतां तिनें आपल्या मुलाचा उपनयनसंस्कार वेदोक्त रीतीनें करविला. शाहुमहाराज मृत्युशय्येवर पडले असतांना, आपल्या पश्चात् मराठा साम्राज्याच्या गादीवर आरूढ होण्यासाठीं, उदेपूरच्या राण्यानें आपला मुलगा दत्तक देण्यासाठीं साताऱ्याला पाठवावें अशी शाहुमहाराजांनीं उदेपूरच्या राण्याला विनंति करून आपला उदेपूरच्या शिसोदे घराण्याशीं असलेला आप्तसंबंध व्यक्त केला होता. शाहुमहाराज वारल्यानंतर ब्राह्मणी वर्चस्वाचा अतिरेक होऊन, सातारच्या छत्रपतींचा अपमान करण्याची एक नामी संधि नाना फडणवीस याला प्राप्त झाली. बाबूराव कृष्ण नांवाच्या आपल्या हस्तकाकडून दुसऱ्या शाहुमहाराजांच्या आईचें मन आपल्या मुलाचा उपनयन-संस्कार शूद्राला उचित अशा पद्धतीनें करण्यास वळवून, या दुष्ट कारस्थानांत बाबूरावास यश मिळाल्याबद्दल नानानें त्याचें अभिनंदन केलें. सातारच्या गादीचे शेवटचे छत्रपति प्रतापसिंहमहाराज यांचा, शेवटचा पेशवा दुसरा बाजीराव यानें अतिशय छळ केला व त्यांची अपरिमित मानखंडना केली. प्रतापसिंहमहाराज हे १८०८ सालीं जेव्हां गादीवर बसले तेव्हां त्यांना शूद्र लेखून त्यांचा उपनयन-संस्कार करण्यास मनाई करण्यांत आली. या नीच पेशव्यानें या दुर्दैवी अल्पवयस्क महाराजांना वासोटयाच्या किल्लयामध्यें कोंडून ठेवून, हा किल्ला इंग्लिश लोकांच्या हातीं लागला तर महाराजांचा वध करावा, अशी या किल्लयाच्या किल्लेदाराला

आज्ञा केली होती. या पेशव्यानें प्रतापसिंहांना साक्षरता प्राप्त न होण्याबद्द पराकाष्टेची दक्षता घेतली होती, म्हणून प्रतापसिंहाच्या आईनें पेशवे पक्षाचे लोव झोंपी गेल्यावर मध्यरात्रीं महाराजांना शिक्षण देण्याची व्यवस्था केली होती इंग्रजांनीं महाराजांना अशा प्रकारच्या तापदायक कारागृहवासांतून मुक्त करून पेशव्याला पदच्युत केल्याचा महाराजांच्या नांवानें जाहिरनामा काढिला. तेव्ह महाराजांनीं त्यावर मोठ्या आनंदानें सही केली, यांत बिलकूल आश्चर्य नाहीं!

१८१८ सालीं पेशवाईचा अंत झाल्यानंतर अर्थातच या लढ्याला मूठ-माती मिळावयास पाहिजे होती; परंतु दुर्दैवानें तसें घडलें नाहीं. पेशव्यानंत चित्पावन ब्राह्मणांमध्यें सांगलीचे चीफ आप्पासाहेब हे बडे प्रस्थ होते. यां पुण्याचे नातु व थत्ते नांवाचे एक शास्त्री यांना हाताशीं धरून मराठे, प्रभू यजुर्वेदी ब्राह्मण, पंचविध दैवज्ञ ब्राह्मण, आर्य क्षत्रिय किंवा जिनगर व इतर महत्त्वाकांक्षी हिंदू जातींना शूद्राच्या किंबहुना अस्पृश्यांच्या स्थितिप्रत पोंचविण्याचें पेशव्यांचें लोण पुढें पोंचविण्याच्या कामीं पुढाकार घेतला होता. ब्राह्मणांनं पेशवाईच्या ऐन अमदानींत या वादाचें बीज पेरून याच्या रोपड्याची जोपासन केली होती. याचीं मुळें पुढें इतकीं खोल गेलीं कीं, १९०२ सालीं कोल्हापूर-मध्यें जो वेदोक्तासंबंधींचा लढा उपस्थित झाला व आजहि महाराष्ट्रामध्यें ज्य गोष्टी घडत आहेत, त्या लक्षांत घेतां या सर्व गोष्टींशीं याच विषवृक्षाचा संबंध दिसून येतो. गतकालीं महाराष्ट्रामध्यें ज्या सामाजिक व राजकीय गोष्टी घडल्य व आजहि घडत आहेत, त्यांच्या अंतःस्थ प्रवाहांची ज्यांना यथार्थ कल्पन नाहीं, त्यांना आज हा वाद इतका क्षुद्र भासतो कीं, ते या वादांतील उभय-पक्षांचीहि वेड्यांत गणना करण्यास मार्गे पुढें पाहात नाहींत. राज्यकर्त्य महाराजांच्या क्षत्रियत्वाबद्दल शंका घेऊन ब्राह्मण लोक आपलें हंसें जगांत कसे करून घेतात, याची जर त्यांना थोडीशी कल्पना होईल व हिंदु समाज-व्यवस्थे-संबंधीं त्यांच्या ठायीं जर थोड्याशा उदार भावना वसत राहातील तर त्यांच्याहि मनाची स्थिति या वरवर पाहाणाऱ्या लोकांच्या मनःस्थितीप्रमाणेंच होईल यांत शंका नाहीं; परंतु बरेचसे ब्राह्मण असल्या साध्या गोष्टींकडे डोळे-झांक करून हल्लीं देखील आपण पेशवाईतच आहोंत, अशा भ्रांतीनें वागत आहेत. हल्लींच्या ब्राह्मणांनीं या वादाला कांहीं विशिष्ट हेतूनें राजकीय स्वरूप देऊन पुन्हां हा होमाग्नि प्रज्वलित केला आहे. महाराष्ट्रांतील व त्याचप्रमाणे

सर्व हिंदुस्थानांतील ब्राह्मणेतरांना आपल्या मानेवरची जातिभेदाची धोंड झुगारून देण्याचें मनोधैर्य अद्याप होत नाहीं, त्यामुळें हा वादग्रस्त प्रश्न अद्याप मिटलेला नाहीं.

१९०२ सालांतील कोल्हापुरांतील वेदोक्त प्रकरणाला सुरवात करण्यापूर्वीं पुण्यांतील भिक्षुक वर्ग या वादग्रस्त प्रकरणापासून आपला विशिष्ट फायदा करून घेण्याकरितां कसा टपून बसला होता, याचें आणखी थोडेंसें सविस्तर विवेचन येथें होणें जरूर दिसतें. १६७७ सालीं शिवाजीमहाराजांनीं जें फर्मान काढल्याचें आह्मीं वर निर्दिष्ट केलें आहे, त्यावरून महाराष्ट्रांतील जनतेला सामाजिक उन्नतावस्थेला पोंचण्याची जी आकांक्षा उत्पन्न झाली होती, ती तृप्त करण्यास भिक्षुक वर्ग तयार नव्हता हें स्पष्ट होतें. कित्येक शतकांच्या व विशेषत: मुसलमान आमदानींतील सामाजिक, राजकीय इत्यादि विविध कारणांचा ब्राह्मणेतर जनतेच्या आचारविचारावर परिणाम होऊन त्यांचा जीवनक्रम नि:सत्व झाला. **ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान** व **मुक्ताबाई** यांच्या सारख्या कांहीं थोडया उदारधी देशस्थ ब्राह्मणसाधुसंतांच्या व शेकडों ब्राह्मणेतरांच्या सदुपदेशामुळें-हे साधुसंतहि सद्धर्मप्रवर्तक प्राचीन क्षत्रियांनीं जो लोकप्रिय भागवत पंथ निर्माण केला होता, त्याचेंच फळ होय—जनतेंत राजकीय जागृति उत्पन्न होऊन, तिचें अविनाशी कार्य ह्मटलें ह्मणजे शिवाजीमहाराजांनीं उभारलेलें वैभवसंपन्न स्वराज्य होय. उलट शिवाजीमहाराजांनीं जे परिश्रम केले, त्यामुळेंहि या आध्यात्मिक चळवळींना अनकूल अशी परिस्थिति उत्पन्न झाली असेंहि ह्मटलें असतां तें वावगें होणार नाहीं. शिवाजीमहाराजांनीं राष्ट्राला जें स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें, त्याचें कारण केवळ लष्करी विजय असें ह्मणतां येणार नाहीं. या साधुसंतांच्या सदुपदेशानें सामान्य जनतेंत धर्मजागृति व ज्ञानलालसा उत्पन्न होऊन, जीं अनेक कार्यें घडलीं त्यांपैकींच शिवाजीमहाराजांचा दिग्विजय हें एक होतें असें ह्मणतां येईल. अशा प्रकारें जनतेंत जी विलक्षण जागृति उत्पन्न झाली होती, तीमुळें निरनिराळया जातीच केवळ नव्हे तर अखिल महाराष्ट्र खडबडून जागा होऊन व शिवाजीमहाराजांच्या नेतृत्वाखालीं लढण्यास सज्ज होऊन, आपला उत्कर्ष करून घेण्याची हीच काय ती नामी संधि आहे, असें मानूं लागला; आणि शिवाजीमहाराजांच्या स्वराज्याच्या कल्पनेचे प्रत्येक जण गोडवे गाऊं लागला. या साधुसंतांनीं

लोकोन्नतीचें जें व्रत चालविलें होतें, त्याला त्या काळच्या ब्राह्मणांनीं विरोध केला. प्रबुद्ध महाराष्ट्राच्या साहाय्यानें व आपल्या मुत्सद्दीपणाच्या जोरावर शिवाजीमहाराजांनीं जें राष्ट्रकार्य केलें होतें, त्याची सांगता, व्रतबंधांनीं करण्याची जेव्हां शिवाजीमहाराजांना इच्छा झाली तेव्हांहि ब्राह्मणांनीं त्यांना विरोध केला; परंतु हा विरोध केवळ धार्मिक संस्कारासंबंधीं असल्यामुळें त्यांत त्यांना यश आलें नाहीं. महाराष्ट्राला आतां जें नवीन स्वराज्य प्राप्त झालें होतें, त्याचा उपयोग सामाजिक व धार्मिक उन्नति घडवून आणण्याची इच्छा ज्यांना ज्यांना झाली त्या सर्वांचे—कदाचित् शिवाजीमहाराजच एकटे काय ते या गोष्टीला अपवाद ठरतील—प्रयत्न हाणून पाडण्याचा ब्राह्मणांनीं तिसरा प्रयत्न केला. महाराष्ट्रांतील प्रबुद्ध जनतेविरुद्ध ब्राह्मणांनीं जी मोहीम सुरू केली, तिला प्रथम प्रभू लोक बळी पडले. कारण, मराठे लोकांखेरीज महाराजांच्या ब्राह्मणेतर अनुयायांमध्यें स्वराज्याचा पूर्ण फायदा करून घेण्याची लालसा उत्पन्न झालेला वर्ग ह्मणजे प्रभूच होय. शिवाजीमहाराजांनीं ब्राह्मणांचा या आसुरी मोहिमेच्या नरडीला तिच्या गर्भावस्थेंतच नख लावण्याचा प्रयत्न केला; परंतु महाराजांच्या मरणानंतर एका पिढींतच ब्राह्मणांचें वर्चस्व माजून—हा काळ औरंगजेबच्या दक्षिणेंतील मोहिमेचा प्रतिकार करण्याच्या धामधुमींत गेला-ब्राह्मणांच्या कारवाईला पुनः अवसर मिळाला.

याप्रमाणें प्रभू जातीला हीनत्वाचा कलंक लावून या कारवाईच्या जीवनकलहाला सुरवात झाली. देशस्थ ब्राह्मण व कऱ्हाडे हे पेशव्यांची जात कमी लेखून, त्यांच्याशीं अन्नव्यवहार करण्यास तयार नव्हते. अगदीं आरंभींच्या पेशव्यांच्या अमदानींत देखील ते चित्पावनांना आपल्या बरोबरीचे समजत नसत. खुद्द पहिल्या बाजीरावाला नाशीक येथील गोदावरीच्या ब्राह्मण घाटावर स्नान करण्यास मज्जाव करण्यांत आला. हिंदुस्थानांतील कोणत्याहि धार्मिक पीठावर चित्पावनांना आजपर्यंत बसविण्यांत आलें नाहीं. चित्पावन लोक अगदीं परक्या जातीपासून उत्पन्न झाले आहेत, अशी जी प्रचलित समजूत आहे, ती खरी किंवा खोटी असो, तिचाच हा परिणाम होय. चित्पावन लोकांविषयीं इतर जातींच्या लोकांमध्यें जो तिरस्कार त्या वेळीं वसत होता, तो दर्शविण्याकरितांच या गोष्टींचा उल्लेख जरूर आहे. उलट चित्पावनांनीं प्राचीन हिंदुधर्माशीं आपलें तादात्म्य करूनच न राहतां महाराष्ट्रांतील राजकीय सत्ता आपल्या

हातीं केंद्रीभूत करण्याचा उपक्रम केला. खऱ्या क्षत्रिय लोकांप्रमाणें शिवाजी महाराजांनीं व त्यांच्या वंशजांनीं सामाजिक व धार्मिक बाबतींत पुढारीपणा स्वीकारिला होता. आपल्या प्रतिपक्षांना चीत करून, सामाजिक व धार्मिक बाबतींत स्वतःचा पुढारीपणा प्रस्थापित करण्यासाठीं, क्षत्रियांच्या हातून त्यांच्यासाठीं शिवाजीनें मिळविलेला पुढारीपणा हिसकावून घेण्याची ब्राह्मणांना अर्थातच आकांक्षा उत्पन्न झाली. राजकारणांत ब्राह्मण लोकांनीं आपली इष्ट कार्यसिद्धि कितपत करून घेतली, याचें येथें विवेचन करण्याची जरूरी नाहीं. समाजावरील आपली पकड अढळ राहावी या हेतूनेंच ते जनतेच्या सामाजिक व धार्मिक संघटणेंत मन घालीत असत, ही गोष्टच येथें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. छत्रपति हे मराठा राष्ट्राचे स्वाभाविक नेते असल्यामुळें त्यांचें हें जनतेंतील वजन कमी करावयाचें असेल तर त्यांच्यावर एकाच बाजूनें हल्ला न चढवितां, सर्व बाजूंनीं हल्ला चढविणें अवश्य होतें. महाराष्ट्रांतील जनतेचे नेते ह्मणून भोंसले घराण्याची परंपरा शाबूत राहिली असती तर ब्राह्मणांच्या राजकीय वर्चस्वाला बऱ्याच अंशीं धक्का पोंचला असता, यांत तिळमात्र शंका नाहीं. प्रभू लोकांसारख्या प्रगमनशील जातीविषयीं जनतेंत पराकाष्टेचा तिरस्कार उत्पन्न केला नसता तर या जातीचें महत्त्व ब्राह्मणांना तितकेंच जाचक झालें असतें. ह्या गोष्टी चित्पावनांच्या लक्षांत बरोबर आल्या होत्या. इतकेंच नव्हे तर चित्पावनखेरीज ब्राह्मणांना मराठा, प्रभू वगैरे ब्राह्मणेतरांप्रमाणेंच भरडून काढणें अवश्य आहे, असाहि त्यांनीं निश्चय केला होता. जे देशस्थ ब्राह्मण कोंकणांतील हिंदु लोकांचे धार्मिक विधी करीत असत, त्यांची वृत्ति काढून घेऊन चित्पावनांना देण्यासाठीं पेशव्यांनीं अनेक खटपटी केल्या.

सावंतवाडींतील चित्पावनांनीं कऱ्हाडे ब्राह्मणांच्या सामाजिक दर्जाला हीनत्व आणण्याचा प्रयत्न केला; परंतु सावंतवाडीच्या नृपतीनें या बाबतींत चित्पावनांना उत्तेजन दिलें नाहीं, ह्मणून मिरजेच्या प्रबल पटवर्धनांनीं ' ब्राह्मणप्रतिपालक ' ' समुद्रवलयांकितपृथ्वीपति ' पेशवे यांच्याकडे दाद मागितली. पहिल्या बाजीरावाच्या अमदानीपासून दैवज्ञ ब्राह्मणांचा जो पराकाष्टेचा छळ झाला, त्यावरून फक्त स्वतःलाच ब्राह्मण लेखून इतरांना शूद्रांच्या कळपांत खुपसण्याचे त्यांनीं कसे कसून प्रयत्न केले होते हें स्पष्ट होतें. आणखी एक दुर्दैवी जात ह्मणजे जिनगरांची होय. या जातीच्या लोकांना स्वाभिमान उत्पन्न

होऊन त्यांचा अभ्युदय होत असल्याचें चित्पावनांना न खपून त्यांनीं त्यांना अंत्यजावस्थेच्या गर्तेत लोटलें. ' तूं नाहीं तुझ्या बापानें शिव्या दिल्या असतील, ' या न्यायाचा उपयोग करून चित्पावन हे प्रत्येक जातीचा प्रसंगानुसार पिच्छा पुरवूं लागले. चित्पावनांना जें आतां नवीन राजकीय वर्चस्व प्राप्त झालें होतें, तें विस्तृत करण्यासाठीं, त्यांनीं जी आपली सत्ता सातारच्या गादीशीं द्रोह करून मिळविली होती, तिला नैतिक पाठिंबा प्राप्त करून घेण्यासाठीं, आपल्या आसुरी प्रयत्नांना दैवी प्रेरणेचें स्वरूप प्राप्त करून देण्यासाठीं व आपल्या विविध सत्तेचा पाया भरभक्कम घालण्यासाठीं त्यांचे हे सर्व प्रयत्न चालले होते.

महाराज प्रतापसिंह यांना पेशव्यांच्या अखेरीपर्यंत शूद्राप्रमाणें वागविण्यांत आल्यामुळें आणखी एकदां या प्रश्नाचा निर्णय करून घ्यावा, असें ठरवून प्रतापसिंहमहाराजांनीं चतुरसिंग भोंसले यांस उदेपुरास पाठविलें. सातारा येथील रेसिडेंटसाहेबाचें पत्र घेऊन, चतुरसिंगजीनें तेथील राण्यांची मुलाखत घेतली. या मुलाखतींत भोंसल्यांचा शिसोद्यांशीं रक्तसंबंध आहे, हें यापूर्वींच सिद्ध झालें असल्यामुळें या प्रश्नाची विशेष चर्चा करण्याची आवश्यकता नाहीं, असें राण्यानें सांगितलें. रजपूत लोकांचे सुप्रसिद्ध इतिहासकार टॉडसाहेब हे या सुमारास तेथें होते. क्षत्रियवंशाच्या या दोन शाखांमध्यें आप्तपणा होता, असें त्यांचेंहि मत पडलें. मात्र चतुरसिंगजींच्या प्रयत्नानें सांगलीचे संस्थानिक व त्यांचे ब्राह्मण हस्तक यांचे कोणत्याही प्रकारें समाधान न होतां, त्यांनीं मराठे व प्रभू जातींच्या लोकांविरुद्ध आपली तिरस्करणीय मोहीम तशीच चालू ठेवली. याचा असा परिणाम झाला कीं, महाराजांच्या नेतृत्वाखालीं सातारा येथें मराठा व प्रभू लोकांची एक धर्म-परिषद् भरून तींत धार्मिक बाबतींत दक्षिणी ब्राह्मणांवर बहिष्कार घालावा असें ठरलें. आपले धर्मविधी स्वतःच करण्यास तयार होऊन प्रभू लोकांनीं आपला बाणेदारपणा दाखविला. परंतु मराठा समाजानें प्रभू लोकांइतकें मनोधैर्य न दाखवितां, महाराष्ट्रांतील बेमुवर्त ब्राह्मणांऐवजीं गुजराथ व राजपुताना या प्रांतांतील ब्राह्मण आपले धार्मिक विधी करविण्यासाठीं आणण्याचा निश्चय केला. या प्रयत्नांमुळें ब्राह्मणांना थोडीशी दहशत बसली हें खरें; परंतु या ठरलेल्या दिशेनें सुसंघटित प्रयत्न झाल्याचें दिसून येत नाहीं. सातारच्या छत्रपतींनीं मात्र कोणत्याहि प्रकारची ढिलाई दाखविली नाहीं. त्यांनीं पंडित लोकांकडून ' सिद्धांतविजय ' नांवाचा ग्रंथ लिहून घेऊन, शास्त्रांच्या आधारें

ब्राह्मणांच्या ह्मणण्याचा फोलपणा विशद करून दाखविला व या ग्रंथाचा प्रसार उत्तरेकडील व दक्षिणेकडील शास्त्री लोकांमध्यें करविला. या ग्रंथांतील सिद्धांत बऱ्याच शास्त्री लोकांना पटले असावेत, असें दिसतें. छत्रपतिच केवळ नव्हे, तर त्यांचे आप्त **मोहिते, माहाडीक, माने, गुजर, घाटगे, शिर्के, पालकर, अहिराव, खानविलकर** व **जाधव** हीं घराणींहि क्षत्रिय असल्याचें त्यांनीं कबूल केलें. त्या वेळीं चौकशी अंतीं कोल्हापुरामध्यें वेदोक्त पद्धत प्रचलित होती असें आढळून आलें. याबद्दल ऐतिहासिक पुरावा भरपूर आहे. १८६० सालानंतर बाबासाहेबमहाराजांच्या कारकीर्दींत (१८३९ ते १८६३) रघुनाथ शास्त्री नांवाच्या-हा गुन्हेगार ठरून त्याला एकदां शिक्षाहि झालेली होती.-एका ब्राह्मणानें, राजवाड्यांत वेदोक्त पद्धतीनें धर्मविधी होत असल्यामुळे महाराजांना पुत्रसंतति होत नाहीं, असा महाराजांना बदसल्ला देऊन व महाराजांच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेऊन, महाराजांचें मन वळविलें. मानी प्रतापसिंह महाराज स्वर्गवासी झाल्यानंतर ब्रिटिश सरकारनें सातारचें राज्य नुक्तेंच खालसा केलें होतें. असा प्रकार झाल्यामुळें साताऱ्याचे महाराज ब्राह्मणांच्या शापाला बळी पडले, शिवाजी महाराजांचा वेदोक्त पद्धतीनें राज्याभिषेक झाल्यानंतर गागाभट्टावर दुर्दैव ओढवलें व साताऱ्यावर व सातारच्या उत्साही नृपतीवर वेदोक्ताच्या हट्टामुळेंच संकटपरंपरा ओढवली इत्यादि कल्पनांचा उपयोग करून, कोल्हापूरच्या छत्रपतींच्या मनावर या शास्त्र्यानें आपला पगडा बसविला व कोल्हापुरामध्यें प्रचलित असलेली वेदोक्त पद्धति बंद पाडली. बाबासाहेब महाराजांचा काळ झाल्यानंतर जो अल्पवयस्क नृपतींचा दीर्घकाळ गेला, त्या मुदतींत या प्रश्नाकडे कोणाचेंहि लक्ष वेधणें अशक्य झालें व पर्वते नांवाच्या इसमानें कोल्हापुरामध्यें जे चाळे सुरू केले, त्यांचा लोकांच्या मनावर पूर्ण पगडा बसला. ही स्थिती बदलून १९०१ सालच्या अखेरीला आमच्या चरित्र नायकांचें या प्रश्नाकडे लक्ष वेधलें. ही परिस्थिति कशी निर्माण झाली याचा पुढील प्रकरणीं विचार करूं.



## प्रकरण १० वें.

# कोल्हापुरांतील वेदोक्त प्रकरण.




तिशय प्रतिकूल परिस्थितींतहि महाराज जें उत्कृष्ट कार्य करीत होते, त्याचें महत्व मुंबई सरकार जाणून होतें, हें महाराजांचें सुदैव होय. या कार्याचें महत्व जाणूनच सम्राज्ञी व्हिक्टोरिआ राणीसाहेब यांनीं आपल्या ८१ व्या ( २४ मे १९०० ) वाढदिवसानिमित्त 'महाराज' ही पदवी कोल्हापूरच्या छत्रपतींना वंशपरंपरा धारण करण्याचा अधिकार दिला. महाराजांच्या या गौरवामुळें, कोल्हापुराच्या प्रजाजनांना इतका आनंद झाला कीं त्याच दिवशीं त्यांनीं महाराजांना एक मानपत्र देऊन, पंचगंगेच्या तीरावर आठ हजार गरीब लोकांना अन्नदान केलें. दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून कोल्हापुराचें नष्ट झालेलें वैभव परत मिळविण्याच्या कार्मी महाराजांनीं मिळविलेलें हें दुसरें यश होय. विशेषतः कोल्हापुराचें ( ८ व्या प्रकरणांत सांगितलेले ) दुर्दिन संपतात न संपतात तोंच महाराजांनीं जो हा विजय संपादिला, त्यामुळें महाराजांना व त्यांच्या प्रजाजनांना सारखेंच समाधान झालें.

जातिविशिष्ट शैक्षणिक चळवळीमुळें एका विशिष्ट दिशेनें ब्राह्मणेतरांमध्यें जी जागृति उत्पन्न होत चालली होती, तिच्या लाटा कोल्हापुरांतील ब्राह्मणेतरांच्या सर्व जीवनक्रमावर पसरल्याशिवाय राहिल्या नाहींत. संस्थानच्या नोकरींत आतां बऱ्याचशा ब्राह्मणेतरांचा भरणा झाल्यामुळें अर्थातच या लोकजागृतीला विशेष चालन मिळालें. १९०० सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या सुमारास कोल्हापूरच्या ब्राह्मणमय म्युनिसिपालटीनें, पंचगंगानदीचे सुव्यवस्थित असे घाट ब्राह्मणांकरितां राखून ठेविले आहेत, अशा अर्थाचे बोर्ड लाविले होते; परंतु एकादशीच्या दिवशीं मंगलस्नानाकरितां पंचगंगेच्या तीरीं ज्या ब्राह्मणेतरांच्या झुंडी जमल्या होत्या, त्यांनीं या म्युनिसिपालटीच्या अरेरावीला मुळींच भीक घातली नाहीं. ब्राह्मणां-

करितां खास राखून ठेविलेल्या ठिकाणीं प्रवेश करण्याचें या दिवशीं मराठ्यांनीं जें धाष्टर्य दाखविलें, त्याबद्दलचा ब्राह्मणांनीं केलेला निषेध समर्थ नांवाच्या एका वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्यांत आला; परंतु आतां पुराणप्रीयता मागें पडून नवमताचा उदय होत चालला होता, ह्मणून कोणींहि या वर्तमानपत्राच्या ओरडी-कडे लक्ष दिलें नाहीं.

स्वतंत्र मताच्या लोकांच्या व महाराजांच्या विचारांत जरी बरेंचसें साम्य होतें, तरी बऱ्याचशा बाबतींत महाराज जुन्या मताचेच कट्टे भक्त होते. आपल्या लहानपणापासून तों स्वर्गवासी होईतोंपर्यंत, महाराज दररोज देवपूजा नियमितपणें करीत असत. आपल्या पूर्वजांविषयीं त्यांच्या ठायीं पराकाष्टेची भक्ति होती. अतिशय दृढमूल झालेल्या वेडसर समजूतींना फांटा देण्याची महाराजांची तत्परता व त्याचप्रमाणें सदसद्‌बुद्धीच्या कसोटीला न उतरणाऱ्या अशा कांहीं धार्मिक गोष्टींना चिकटून राहाण्याची महाराजांची चिकाटी, अशा कांहीं परस्पर विरुद्ध गोष्टींची सांगड घालणें, महाराजांच्या जिवलग मित्रांनाहि कठीण जात असें. कोल्हापूरच्या आसपास जीं अनेक पवित्र क्षेत्रें आहेत त्या ठिकाणीं विवक्षित दिवशीं जाण्याचा महाराजांचा परिपाठ असे. सन १९०० सालच्या कार्तिक महिन्यांत महाराज पंचगंगा नदींत स्नान करण्याकरितां दररोज जात असत. श्रीमंत बापू-साहेबमहाराज, बाबासाहेब ऊर्फ मामासाहेब खानवीलकर व कांहीं इतर गृहस्थहि महाराजांच्या या परिवारांत असत. कांहीं मंत्र ह्मणून स्नानाला पावित्र्य आणण्या-साठीं एक ब्राह्मणहि महाराजांबरोबर असे. मंत्र ह्मणण्यापूर्वी ब्राह्मणानें स्नान करावयास पाहिजे असा जो नेहमींचा परिपाठ आहे, त्याकडे दुर्लक्ष करून पहाटेला कडक थंडीच्या वेळीं हा ब्राह्मण स्नान करण्याचें सहसा टाळीत असे, असें पुढें दृष्टोत्पत्तीस आलें. महाराजांना हा प्रकार समजून आल्यावर त्यांनीं याचें कारण त्याला विचारतांच तो ब्राह्मण ह्मणाला, "वैदिक मंत्र ह्मणते वेळींच स्नानाची आवश्यकता असते; परंतु शूद्रांना पौराणिक पद्धतीचा अनुग्रह करावयाचा असल्या-मुळें मला स्नान करण्याची जरूरी नाहीं." हा उद्धट ब्राह्मण दररोज सारी रात्र वेश्यांच्या संगतींत काढीत असे, असें पुढें महाराजांच्या परिवारांतील एका मनु-ष्याच्या नजरेस आलें. अशाप्रकारचा बाहेरख्याली मनुष्य स्नान करून शुद्ध होईतोंपर्यंत त्याचा स्पर्श देखील हिंदु लोक विटाळ समजतात. आपल्या भटजीनें आपणांस शूद्र लेखावें, त्यानें आपल्याशीं तिरस्कार बुद्धीनें वागावें व आपली

अशा प्रकारची विटंबना दुर्व्यसन कर्दमीं लोळणाऱ्या एका नीच ब्राह्मणाकडून व्हावी इत्यादि विचार तरुण महाराजांच्या व महाराजांच्या परिवारांतील लोकांच्या मनाला झोंबून आपण शूद्र नसून क्षत्रियाचे छावे आहोंत अशी त्यांना जाणीव उत्पन्न झाली. यावर तो ब्राह्मण ह्मणाला, "नाहीं, तुह्मांला तसा अधिकार मुळींच पोंचत नाहीं. सर्व शक्तिमान ब्राह्मणसमाज तुह्मी क्षत्रिय आहां असें जाहिर करीतों-पर्यंत मी तुमची किंमत शूद्रापेक्षां अधिक समजणार नाहीं. महाराजांनीं आपल्या नेह-मींच्या धिम्या स्वभावाला अनुसरून शांतपणानें उत्तर दिलें, कीं, "आह्मीं जरी तुझ्या दृष्टीनें शूद्र असलों तरी स्नान न करितां धार्मिक विधि करणें हें कोणत्याहि भटजीला शोभणारें नाहीं," तरी देखील या ब्राह्मणाला महाराजांचें ह्मणणें पटेना. महाराजांनीं त्या ब्राह्मणाची समजूत घालण्याची शिकस्त केली तरी, तो ब्राह्मण कांहीं केल्या पंचगंगेमध्यें स्नान करीना. ब्राह्मणाला शूद्रानें धर्मोपदेश करणें किंवा त्याचे दोष दाखविणें हें खरोखर शूद्राचें काम नव्हें, ह्मणून या पवित्र (?) ब्राह्मणानें कार्तिकमास संपेतोंपर्यंत आपल्या दैनिक क्रमांत कोणत्याहि प्रकारचा फरक केला नाहीं !

महाराजांच्या व महाराजांच्या सहचारी मित्रांच्या मनावर जो या गोष्टीचा विलक्षण परिणाम झाला त्यामुळें त्यांचें लक्ष सहजच या वेदोक्त प्रकरणाकडे वेधलें. महाराजांनीं या प्रकरणांत कांहीं दिवस प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं, परंतु कांहीं इतर गृहस्थांनीं नारायणभट्ट सेवेकरी नांवाच्या कोल्हापुरांतील एका विद्वान् भिक्षुकाचें मन वळवून १९०१ सालची श्रावणी वेदोक्त पद्धतीनें करविली. कोल्हापुरांतील ब्राह्मणवृंद या गोष्टीमुळें चिडून जाऊन त्यानें सेवेकऱ्यावर बहिष्कार घातला. भाद्रपद महिन्यामध्यें आपल्या मृत पूर्वजांना संतुष्ट करण्याकरितां श्राद्ध घालण्याची हिंदु लोकांमध्यें चाल आहे. या वेळीं महाराजांचा मुक्काम पन्हाळा येथें असल्यामुळें, यदाकदाचित् महाराजांची अनुज्ञा झाल्यास श्राद्धविधि वेदोक्तपद्धतीनें करावे लागतील, या भीतीनें राजोपाध्यानें पन्हाळयाला जाण्याचें टाळलें. ह्मणून आक्टोबर महिन्यांत महाराजांनीं राजवाड्यांतील धार्मिक विधी वेदोक्त पद्धतीनेंच करण्याबद्दल राजोपाध्याला लेखी समज दिली. यामुळें लवकरच उपस्थित होणाऱ्या लढ्याला तोंड देण्याची तयारी महाराज कडेकोट करीत होते. अन्यत्र ठिकाणचे मराठा संस्थानिक कोणत्या धार्मिक पद्धतीचा पुरस्कार करीत होते, यासंबंधीं माहिती मिळवून, ते या बाबतींत तज्ञांचा सल्लाहि घेत होते. विरूद्ध पक्षहि

कांहीं निद्रित नव्हता; ब्रह्मवृंदाच्या छत्राखालीं आपल्या मित्रगणांच्या मसलतीनें राजोपाध्येहि आपल्यापरीं तयारी करीत होते. मि० सावंत व मि० इंगळे हे या संबंधींची माहिती मिळविण्याकरितां उदेपूराला गेले. प्रतापसिंह-महाराजांच्या अमदानींत जो वेदोक्त प्रश्न उपस्थित झाला होता, त्या संबंधींची माहिती मिळविण्यासाठीं मि० ( पुढें रावबहादुर ) डोंगरे यांना सातारला पाठविण्यांत आलें. बडोदासंस्थानचे सयाजीरावमहाराज गायक्वाड यांनाहि थोड्या दिवसांपूर्वीं अशा प्रकारच्या प्रश्नाला तोंड देण्याचा प्रसंग आला असल्यामुळें त्यांच्याकडूनहि या संबंधींचा पुरावा मिळविण्याची व्यवस्था करण्यांत आली. सयाजीरावमहाराजांनीं १५ डिसेंबर १९०१ रोजीं कोल्हापुरांतील चळवळीसंबंधानें जें एक पत्र पाठविलें होतें, त्यांत ते ह्मणतात:—

"सातारा येथील माझ्या मनुष्याला लिहून त्याच्याजवळ कागदपत्र असतील तर ते आपल्या हवालीं करण्यास कळवितों. आपण विलायतेंत जाल, तेव्हां युरोपखंडांतील चित्तवेधक संस्था व स्थळें पाहण्याची संधि केव्हांहि दवडूं नये. अशा संस्थांचें निरीक्षण केल्याखेरीज पाश्चात्य देशांत ज्या निरनिराळ्या संस्कृती उपलब्ध आहेत, त्यांचें तुलनात्मक ज्ञान संपादितां येणार नाहीं. आपण ज्या कार्याला उदार अंत:करणानें चालून दिलें आहे, तें मी विसरलों नाहीं व पुढेंहि विसरणार नाहीं. आह्मांला थोडीशी अनुकूल परिस्थिति प्राप्त होण्याची मी वाट पाहात आहें. आपण आमच्या लोकांच्या कल्याणाचें कामीं जें लक्ष घालीत आहांत त्याबद्दल मी आपलें अभिनंदन करितों."

वेदोक्त प्रकरणाशीं ज्या दोन प्रमुख पक्षांचा प्रत्यक्ष संबंध होता, ते याप्रमाणें आपआपली तयारी करण्यांत निमग्न झाले असतां, कोल्हापूरचा ब्रह्मवृंद स्तब्ध न राहतां आपली अरेरावी गाजविण्याची संधि साधण्यासाठीं टपून बसला होता. या ब्रह्मवृंदानें मीं वर सांगितल्याप्रमाणें मि० सेवेकरी यांच्यावर बहिष्कार घातला. या ब्रह्मवृंदानें किंवा थोडें अधिक स्पष्ट सांगावयाचें ह्मणजे, प्रमुख चौदा ब्राह्मणांनीं, मि० सेवेकरी हा आतां बहिष्कृत झाल्यामुळें त्याची राजवाड्यांतील नोकरी कमी करावी, असाहि नायब खासगी कारभाऱ्याला हुकूम केला. परंतु हा हुकूम अन्यायाचा असून अनधिकारी लोकांकडून झाल्यामुळें याला खासगी कारभाऱ्यानें भीक घातली नाहीं. ब्रह्मवृंदाच्या अशा प्रकारच्या वर्तनाला इतर कारणेंहि होतीं. हा सेवेकरी वैदिक वाङ्मयामध्यें प्रवीण असल्यामुळें

याची प्रतिष्ठित ब्राह्मणांत गणना होत होती व त्याचप्रमाणें प्रामाणिकपणाबद्दल व निःस्वार्थीपणाबद्दल त्याची ख्यातीहि होती. आगष्ट महिन्यामध्यें जी वेदोक्त पद्धतीनें क्षत्रिय मराठ्यांची श्रावणी केली, ती ब्राह्मणांच्या दृष्टीनें त्याची अक्षम्य चूक होय. १९०१ सालापूर्वीं या पंडितासंबंधीं जी एक गोष्ट घडली होती, तिचा येथें उल्लेख केला असतां ती अस्थानीं होणार नाहीं. ऋग्वेदांतील गणांचें पठण केल्यानंतर पद्धतीप्रमाणें सांगता करण्याच्या दिवशीं कांहीं विशिष्ट प्रकारचा सभारंभ व्हावयाचा असतो. या वेळीं त्यानें आपल्या ब्राह्मण व मराठा यजमानांना आमंत्रण केलें होतें. त्या वेळीं मराठा मित्रांसमक्ष तूं वेद कां ह्मणालास असें जेव्हां ब्राह्मणांनीं त्याला विचारिलें, तेव्हां मराठे क्षत्रिय असल्यामुळें त्यांना वेद ऐकण्याचा अधिकार आहे, असें त्यानें ठांसून सांगितलें. या वैदिकानें जो खुलासा केला, तो मान्य समजून त्याच्या विरुद्ध त्या वेळीं कोणीं ब्रहि काढला नाहीं. यावरून मराठे हे क्षत्रिय आहेत, ही गोष्ट कोल्हा-पुरांतील ब्राह्मणांना मान्य आहे, अशी नारायणभट्टाची समजूत होऊन, क्षत्रिय घराण्यामध्यें वेदोक्त पद्धतीनें धर्मविधी करण्यास त्यानें सुरवात केली. परंतु आतां आपल्या वर्चस्वावर गदा येणार अशी ब्राह्मणांना धास्ती उत्पन्न झाली होती. अर्थातच पूर्वींचें सारें विचारौदार्य विसरून टाकून, महाराजांच्या इच्छेला विरोध करणें आपलें कर्तव्य आहे, असें त्यांनीं ठरविलें आणि नायब खासगी कारभाऱ्यामार्फत नारायणभट्टाचा अंबादेवीला स्पर्श न होऊं देण्या-बद्दल व राजवाड्यांतील धार्मिकविधींना मनाई करण्याबद्दल त्यांनीं महाराजांना अनुज्ञा केली. उपरिनिर्दिष्ट अनुज्ञा या ब्रह्मवृंदानें तारीख १३ आक्टोबर रोजीं नायब खासगी कारभाऱ्याकडे पाठविली. ती पोंचल्या वेळीं खुद्द राजो-पाध्ये हजर असून, त्यांनीं तिचा निषेध स्पष्ट शब्दांनीं केला होता. यामुळें नारायणभट्टाला व त्याच्या तर्फेच्या लोकांना नवरात्रांतील उत्सवाच्या प्रसंगीं धार्मिकविधी करण्यासाठीं खासगी कारभाऱ्यानें विडा दिला. त्यास अनुसरून दुसऱ्या दिवशीं नारायणभट्ट अंबाबाईची पूजा करण्यासाठीं देवालयांत गेला. त्याला कोणीं मज्जाव केला नाहीं. तथापि नारायणभट्टाच्या स्पर्शा-मुळें देवी भ्रष्ट झाली, अशी ब्राह्मणांनीं ओरड करून दुसऱ्या लोकांना देवीची पूजा करण्यास हरकत केली! नंतर हे ब्राह्मण महाराजांकडे जाऊन आमच्या अर्जाचा विचार करून काय तो हुकूम करावा, व देवीला शुद्ध करण्याची परवानगी

द्यावी, असें ते ह्मणूं लागले. हा प्रश्न अतिशय महत्वाचा असल्यामुळें महाराजांना सहाजिकपणें या प्रश्नाचा एकदम निकाल देतां येईना. एकाद्यावर बहिष्कार टाकण्याचा अधिकार या ब्राह्मणांना कितपत पोंचतो याचा प्रथम विचार करणें महाराजांना भाग होतें. दुसरें, या ब्राह्मणांचें कृत्य समर्थनीय होतें कीं काय, याचाहि विचार करणें महाराजांना प्राप्त होतें. ज्या ब्राह्मणांनीं सेवेकऱ्यावर बहिष्कार टाकिला, त्यांनीं तसें करण्यापूर्वी त्याचें ह्मणणें सविस्तर ऐकून घेऊन त्याला योग्य तो न्याय देण्यासाठीं सद्धेतूनें प्रयत्न केला होता कीं नाहीं, हेंहि महाराजांना पाहावयाचें होतें. हे दोन्ही पक्ष वर्दळीवर येऊन, शांतता-भंग होण्याचा संभव असल्यामुळें, या प्रश्नाचा निकाल लागे तोंपर्यंत कोणत्याहि पक्षानें अंबाबाईच्या देवालयांत प्रवेश करूं नये, असा उभय पक्षांना हुकूम करून महाराजांनीं चौकशी सुरू केली. हे ब्राह्मण नाराज होऊन त्यांनीं महाराजाविरुद्ध पोलिटिकल एजंटकडे तक्रार केली. पोलिटिकल एजंट कर्नल सीली यांच्या न्यायप्रियतेबद्दल खुद्द ब्राह्मणांनाहि शंका नव्हती. यांनीं ब्राह्मणांचें ह्मणणें लेखी घेऊन, धार्मिक बाबतींत आपणांस हात घालतां येत नाहीं, या बाबतींत महाराजांचा निकाल अखेरचा समजावा, असा आपला अभिप्राय दिला. बहिष्काराच्या शस्त्राचा उपयोग करण्यास तुह्मांला कसा अधिकार पोंचतो, अशी खासगी कारभाऱ्यानें जेव्हां या ब्राह्मणांना पृच्छा केली, तेव्हां ते ह्मणाले, 'अशी पृच्छा करण्याचें तुमचें काम नसून तुह्मीं आमच्या हुकुमाची अमलबजावणी करणें, हेंच तुमचें कर्तव्य आहे.' या ब्राह्मणांच्या उद्धटपणाला योग्य तेंच उत्तर मिळून, दरबारनें त्यांच्या अर्जाला कचऱ्याची टोपली दाखविली. अशा प्रकारें हे ब्राह्मण आपल्या स्वयंनिर्मित सत्तेची रेसभरहि पिच्छेहाट न होऊं देण्याबद्दल किती दक्ष आहेत, आपल्या सत्तेच्या क्षेत्रांत महाराजांचा देखील ते कसा प्रवेश होऊं देत नाहींत, हें दृष्टोत्पत्तीस येऊन चुकलें. ब्राह्मणांचा मुख्य धर्माधिकारी जो जगद्गुरु त्यालाहि या ब्रह्मवृंदांच्या अरेरावीमुळें कांहींच महत्त्व राहिलें नाहीं. यांच्या दृष्टीनें महाराज शूद्र असल्यामुळें त्यांनाहि ते महत्त्व देत नव्हते. अर्थातच सामाजिक व धार्मिक विषयांत या ब्राह्मणांची सत्ता सर्वश्रेष्ठ झाली. सामाजिक अगर धार्मिक भेद उत्पन्न होऊन, जेव्हां जेव्हां जातींच्या अगर व्यक्तीच्या नागरिकत्वाच्या हक्काला धक्का पोंचण्याचा संभव असतो, तेव्हां तेव्हां अशा बाबतींत राज्यकर्त्यांनीं दिलेला निकाल अखेरचा समजण्याची हिंदुस्थानांत पूर्वापार वहिवाट आहे, असें इति-

ह्यासावरून सिद्ध होतें. अतिशय प्राचीन धर्मशास्त्रांवरून असें दिसून येतें कीं, नृपति हाच अशा बाबतींत अखेरचा निकाल देण्यास सर्वथैव लायक आहे, ही गोष्ट सर्व हिंदूंना मान्य होती. ब्राह्मणी वर्चस्वाचा जेव्हां कळस झाला होता, तेव्हांदेखील ब्राह्मण हे नुसते सल्लागारच होते. सातारच्या अगर कोल्हापूरच्या छत्रपति महाराजांनीं धार्मिक बाबतींत दिलेले निकाल ब्राह्मणांना देखील मान्य करणें भाग झाले होते; याबद्दलचा सतराव्या व तदनंतरच्या शतकांच्या मराठयांच्या इतिहासांत भरपूर पुरावा सांपडतो. मि० तेलंग यांनीं मराठा ऐतिहासिक कागदपत्रांवरून जीं अनुमानें काढलीं आहेत, त्यांवरून ही गोष्ट स्पष्ट झाली आहे. अशा प्रकारचा इतिहासाचा आधार असूनहि सेवेकरीसारख्या सद्गृहस्थावर अरेरावी गाजविण्यास काय कारणें झालीं, याचा खुलासा करून घेण्याचा अधिकारदेखील महाराजांना पोंचत नाहीं, असें प्रतिपादण्यापर्यंत ब्राह्मणांनीं मजल नेली; शिवाय सेवेकरी हा ब्राह्मण असून त्याचा अपराध म्हटला म्हणजे त्यानें एका मराठयाच्या घरांत वेदोक्त पद्धतीनें श्रावणी केली, हाच होय. ब्राह्मणांचें मुखपत्र " समर्थ " त्यानेंहि महाराज आपला हेका असाच जर पुढें चालवितील तर त्यापासून बरेंच दुष्परिणाम घडून येतील, अशी महाराजांना धमकीहि दिली. या वादग्रस्त विषयामुळें जे प्रश्न उद्भवतील, यांचा निकाल ब्रह्मवृंदानें करावा व महाराजांनीं राजोपाध्यामार्फत या ब्रह्मवृंदांचें म्हणणें ऐकून घेऊन त्याप्रमाणें वागावें, असें या पत्रानें सुचविलें होतें. राजोपाध्यानें तर यापूर्वींच पन्हाळा येथें महाराजांचे धार्मिक विधी करण्याचें नाकारून आपलें अंतःकरण उघड केलें होतें. धार्मिक गोष्टीमुळें कोल्हापूरच्या लोकांमध्यें जर फूट उत्पन्न होईल तर अखिल महाराष्ट्रा-मध्यें खळबळ उडून जाईल अशीहि या पत्रानें दहशत घातली होती !

थोडया दिवसांनंतर कोजागरचा समारंभ राजोपाध्यानें करणें प्राप्त असतांना देखील त्यानें तो न केल्यामुळें सेवेकऱ्यानें हा समारंभ केला. महाराजांनींहि या प्रश्नाला तोंड देण्याचा आतां निश्चय केला. तारीख ७ आक्टोबर रोजीं राजवाडयांतील धार्मिक विधी वेदोक्त पद्धतीनें झाले पाहिजेत, व असे जर कोणी न करील तर त्याला दक्षणा मिळणार नाहीं, असा महाराजांनीं हुकूम सोडला. वेदोक्त चळवळीचा पुरस्कार करणारा व वेदोक्त चळवळीला विरोध करणारा असे दोन पक्ष मराठे लोकांमध्यें उत्पन्न करून ब्राह्मणांनीं महाराजांचा

हा हुकूम विफल करण्याचा बेत केला. भेद पाडून आपली अरेरावी गाजविण्याच्या ब्राह्मणांच्या या प्रयत्नांना विशेष यश आलें नाहीं. खुद्द राजघराण्यांतहि वेदोक्त चळवळीसंबंधीं मतभेद उत्पन्न झाला होता, अशी बातमी थोडा वेळ उठली होती. महाराजांची आजी श्रीसकवारबाईराणीसाहेब या राजघराण्यांतील अत्यंत सन्माननीय साध्वी असून नवरात्राच्या प्रारंभीं पुराणोक्त धार्मिक विधि करण्याचा यांनीं निश्चय केला होता, असें ह्मणतात. या बाईच्या धार्मिक समजूतींचा फायदा घेऊन शत्रुपक्षामध्यें फूट पाडण्याचा या ब्राह्मणांनीं घाट घातला, परंतु महाराजांच्या हुशारीमुळें त्यांत त्यांना यश आलें नाहीं. नंतर या भिक्षुकांनीं पोलिटिकल एजंटकडे धांव घेतली. पोलिटिकल एजंटना गोंजारून व प्रसंगीं भीतिहि दाखवून आपला डाव साधण्याचा या भिक्षुकांनीं प्रयत्न केला. या प्रकरणांत महाराज एकटे एका बाजूला व विरुद्ध पक्षाला महाराष्ट्रांतील सर्व ब्राह्मणवर्ग होता. परंतु ब्राह्मणांच्या या डावपेंचांमुळें न डगमगतां, राजघराण्यांतील वेदोक्तपद्धतीसंबंधींच्या इतिहासाचें संशोधन करण्याचें काम दरबारचे दोन प्रमुख अधिकारी मि० के० एन्० पंडीत व मि० व्ही० बी० गोखले यांच्यावर महाराजांनीं सोंपविलें. राजोपाध्याच्या साहाय्यानें हें संशोधन व्हावयाचें होतें. या योजनेमुळें ब्राह्मणांना पुन्हा कांहीं काळ आशा उत्पन्न झाली. परंतु महाराजांचें क्षत्रियत्व स्वयंसिद्ध आहे, असा जेव्हां या न्यायाधिशांनीं आपल अभिप्राय दिला तेव्हां ब्राह्मणांची आशा जागच्या जागींच जिरली, हें उघड आहे.

तारीख ८ नोव्हेंबर रोजीं राजवाड्यांतील धार्मिक विधी वेदोक्तपद्धतीनें करण्याबद्दल पुन्हां राजोपाध्याला कळविण्यांत आलें. परंतु याचा एवढाच परिणाम झाला कीं राजोपाध्यानें ब्राह्मणांच्या ह्मणण्याला पुष्टी देण्यासाठीं आणखी कांहीं आधार पाहावे ह्मणून चहूंकडे आपले हस्तक पाठविले. महाराज संस्थानच्या कामकाजामध्यें अगदीं निमग्न असून ख्रिस्तवासी सम्राट् सातवे एडवर्ड यांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं हजर राहाण्यासाठीं इंग्लंडला जाण्याच्या तयारींत होते. राजोपाध्यानें एकसारखी दिरंगाई चालविली होती. त्याचा हेतु एवढाच कीं कालहरणामुळें महाराजांचें मन बदलेल, अशी त्याला आशा वाटत होती. महाराज अशा डावपेचांना बळी पडणारे नव्हते, हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. १९०२ सालच्या मे महिन्याच्या पहिल्या तारखेस राजोपाध्याला आपल्या हुकुमाप्रमाणें त्यानें धार्मिक विधी न केल्याबद्दल, दिलेलें इनाम कां जप्त करूं नये, याचा त्यानें

खुलासा करावा व असें जर चार दिवसांत होणार नाहीं तर योग्य तो इलाज केला जाईल, अशा अर्थाची महाराजांनीं नोटीस दिली. आपण कोणतें धोरण स्वीकारावें याचा निश्चय करण्यासाठीं आणखी कांहीं दिवस मला मुदत मिळावी ह्मणून तारीख ५ मे १९०२ रोजीं राजोपाध्यानें प्रत्युतर दिलें. प्रस्तुत विषयाशीं विसंगत अशा गोष्टींचा गोंधळ माजवून आपली जबाबदारी टाळण्याचा राजोपाध्याचा हेतु स्पष्ट दिसत होता. राजोपाध्याचा पक्ष दुतर्फी डाव खेळत होता. महाराजांच्या क्षत्रियत्वाबद्दल वादच नाहीं; परंतु महाराज स्वतःबरोबर आपल्या आप्तजनांना व मित्रांना ओढीत असल्यामुळें हा प्रश्न बिकट झाला आहे; असें एकदां त्यांच्याकडून प्रतिपादण्यांत येई. दुसऱ्या बाजूनें महाराजांनीं आपल्या पुरताच हा प्रश्न न सोडवितां सर्व हिंदुसमाजाचा महाराजांनीं विचार करावा, असेंहि महाराजांना या पक्षाकडून प्रोत्साहन देण्यांत येई. "महाराज हा प्रश्न आपल्या पुरताच सोडवूं पाहात आहेत, असें कित्येक ह्मणत आहेत, परंतु असें करणें महाराजांना उचित नव्हे." महाराज या सल्ल्याची मख्खी पूर्णपणें ओळखून होते. आपल्या एका स्नेह्याला लिहिलेल्या पत्रांत महाराज ह्मणतातः—"प्रतिपक्षानें आपली बाजू तुह्मांपुढें मांडलीच आहे. व त्यांच्या ह्मणण्यामध्यें काय राम आहे, हें तुह्मांला कळून येईल. औरस पुत्रामध्यें व दत्तक पुत्रामध्यें कोणत्याहि प्रकारचा फरक कोणी मानीत नाहीं, हें प्रत्येकाला माहीत आहे. ज्या घाटगे घराण्यांतून मी दत्तक गेलों तें घराणें क्षत्रिय नाहीं, अशी यांची तक्रार आहे, परंतु त्यांचें हें ह्मणणें नाशाबीत करण्यास भरपूर पुरावा आहे.

"हें घराणें खऱ्या क्षत्रिय वंशापासून उत्पन्न झालें आहे, याबद्दल वादाला जागाच नाहीं. गतकालांत यांनीं ( ब्राह्मणांनीं ) माझ्या पूर्वजांना जातिबहिष्कृत करण्यापर्यंत मजल नेली होती. आज जीं पांच क्षत्रिय घराणीं अस्तित्वांत आहेत, त्यांत हेंहि घराणें आहे. दुसऱ्या मराठ्या घराण्यांना सांवरून धरण्याच्या प्रयत्नासंबंधीं ह्मणाल तर, माझा या गोष्टीशीं बिल्कूल संबंध नाहीं. मात्र मराठाघराणीं जर खरोखर क्षत्रिय असतील तर अशा घराण्यांना आपल्या क्षत्रियत्वाचा हक्क सांगण्यास हरकत आहे, असें मला वाटत नाहीं. प्रस्तुतचा प्रश्नाचा फक्त माझ्याशीं संबंध असून राजोपाध्याला किंवा दुसऱ्या कोणत्याहि ब्राह्मणाला कोणत्याहि इतर मराठा घराण्यामध्यें वैदिक पद्धतीनें विधि करण्यास मीं सांगितलें नाहीं."

महाराजांच्याविरुद्ध ज्या विचारसरणीचा अवलंब करण्यांत येत होता, त्याचें स्वरूप वरील विवेचनावरून दिसून येईल. महाराजापुरताच या प्रश्नाचा निकाल लावणें इष्ट नाहीं; असें एका बाजूनें प्रतिपादन करून अंत:स्थपणें महाराजांच्या मित्रांची दिशाभूल करण्यांत व त्यांना महाराजांच्या चळवळी-पासून परावृत्त करण्यांत त्यांचा काय डाव होता, हें स्पष्ट होतें. महाराज हा ब्राह्मणीकावा पूर्णपणें ओळखून होते, यांत शंका नाहीं. राजोपाध्याला वेदोक्त-पद्धतीनें धार्मिकविधी करण्याचा आग्रह करून राजोपाध्याचें इनाम गट्ट करण्याचा महाराजांचा हेतु होता, असाहि ज्यांनीं महाराजांवर आक्षेप घेतला त्यांनीं दोन महत्त्वाच्या गोष्टींकडे दुर्लक्ष केलें. धार्मिकविधींवर महाराजांची श्रद्धा अंत:करण-पूर्वक असून वैदिकधर्म हा त्यांच्या आत्म्याचें जीवन बनला होता. महाराजांची जवळ जवळ त्यांच्या अंतापर्यंत धर्मविधींवर पूर्ण श्रद्धा होती. महाराजांच्या एका हातावर शिवाचें चिन्ह गोंदलेलें असून, निदान त्याची ते रोज नियमितपणें पूजा करीत असत. इंग्लंडमध्यें असतांना देखील ते प्रत्येक दिवशीं सकाळीं स्नान करून शिवाची पूजा करण्यास कधींहि चुकत नसत. आपल्या पूर्व वयांत महाराज व त्यांचे बंधु हे उभयतां कागल येथील गैबी मशीद ऊर्फ दर्गा याचें नियमानें दर्शन घेत. कोल्हापूर व हुपरी येथील अंबादेवीचें दर्शन घेण्याचा महाराजांचा नित्य क्रम असे. महाराजांनीं आर्यसमाज धर्माची जेव्हां दीक्षा घेतली, तेव्हां त्यांना तुह्मी मूर्तिपूजा सोडण्यास तयार आहां काय, असें त्यांच्या एका मित्रानें विचारलें, तेव्हां ते ह्मणाले, 'माझी मूर्तिपजेवर पूर्ण श्रद्धा असल्यामुळें मी ती सोडण्यास तयार नाहीं.' महाराजांचा अशा प्रकारचा स्वभाव असतां, विनाकारण ते आपल्या उपाध्यायाच्या रोषास पात्र होतील, हें संभवनीय नव्हतें. राजोपाध्यानें या बाबतींत कांहीं तरी तडजोड करावी ह्मणून महाराजांनीं पराकाष्टेचे प्रयत्न केले; परंतु राजोपाध्याच्या पक्षानें एका-मागून एक असे अनेक अपराध करून महाराजांचा अपमान केला व जेव्हां तो आपला हेका सोडीनासा झाला तेव्हां महाराजांचा नाइलाजच झाला. इतर संस्थानिकांप्रमाणें आपणांस क्षत्रिय न समजतां स्वत:ची गणना शूद्रांत करून घेणें, हें महाराजांना मुळींच सहन झालें नाहीं. परंतु निर्वाणीचे उपाय योजण्यास आपणांस भाग पडूं नये, ह्मणून महाराजांनीं शक्य तेवढे प्रयत्न केले. राजोपाध्या हा आंग्लशिक्षणभूषित असून तरुण होता. इचलकरंजीचे जहागिरदार व प्रोफेसर

विजापूरकर यांच्यासारखे राजोपाध्याचे सल्लागारहि पाश्चात्य संस्कृतीनें विभूषित झाले होते. असें असूनहि प्रस्तुतसारख्या वादाच्या प्रसंगीं या पक्षद्वयांमध्यें तडजोड झाली नाहीं, हें आश्चर्य होय. प्राचीन काळीं ब्राह्मण लोक वेद गुप्त राखून शूद्रांचा त्यांना संपर्क होऊं देत नसत. त्या काळीं पवित्र वेदमंत्रापासून शूद्रांना अलिप्त ठेवण्यासाठीं ब्राह्मण लोक जी एवढी दक्षता घेत, ती कांहीं अंशीं क्षम्य तरी होती. परंतु आतां वेदाचें भाषांतर सर्व पाश्चात्य देशांतील भाषांमध्यें झालें असून खुद्द ब्राह्मणहि हिंदु व इतरे जनांनाहि वेद पढवीत असतांना राजोपाध्यानें व त्यांच्या मित्रांनीं जें धोरण या वेळीं स्वीकारिलें होतें, त्याचें बिलकूल समर्थन करतां येत नाहीं. राजोपाध्याला वरीलप्रमाणें केवळ लेखी समज देऊनच महाराज स्वस्थ बसले नाहींत. महाराज स्वत: व त्यांचे मित्रहि कित्येक महिने राजोपाध्याची समजूत घालण्याचा यत्न करीत होते. राजोपाध्याला वार्षिक, सुमारें ३०,००० रुपयांचें उत्पन्न मिळत असून त्यानें आपल्या मालकाची इमानें इतबारें नोकरी करण्यास कबूल व्हावें व असें जर त्याच्याकडून वर्तन न घडेल तर त्याला आपल्या सर्व उत्पन्नाला मुकावें लागेल, हें त्याला स्पष्टपणें समजावून देण्यांत आलें होतें. १९०२ सालीं पन्हाळ्याला असते वेळीं महाराजांनीं राजोपाध्याला बोलावून आणून कित्येक ब्राह्मणांच्या समक्ष त्याला पुष्कळ समजावून सांगितलें; इतकें करूनहि छत्रपति जरी क्षत्रिय असले तरी महाराज हे कागलच्या घाटगे घराण्यांत जन्मले असल्यामुळें त्यांची विनंति मान्य करितां येत नाहीं, असें उर्मट उत्तर देण्यास राजोपाध्याला कांहींच वाटलें नाहीं. घाटगे हे भोंसल्याप्रमाणेंच क्षत्रिय आहेत, हें आम्हीं वर स्पष्ट केलेंच आहे; ते क्षत्रिय नाहींत असें जरी क्षणभर मानिलें तरी महाराज हे भोंसले घराण्यांत दत्तक गेले असल्यामुळें अर्थातच हिंदुधर्मशास्त्राप्रमाणेंच महाराजांचा जन्म भोंसले घराण्यांत झाला, असें मानण्यास कोणतीच हरकत नव्हती. महाराजांचा क्षत्रियत्वाचा हक्क कोणत्या तरी सबबीवर ब्राह्मण लोक बुद्धिपुरस्सर नाकबूल करीत असल्यामुळें, वरील विचारसरणीचा त्यांच्या मनावर कांहीं परिणाम होण्यासारखा नव्हता. ज्या ऐतिहासिक कागदपत्रांवरून एक घराणें क्षत्रिय असल्याबद्दल सिद्ध झालें, त्याच कागदपत्रांवरून दुसरें घराणेंही क्षत्रिय आहे असें मानण्यास मुळींच हरकत नव्हती. महाराज हे छत्रपति असल्यामुळें त्यांना क्षत्रिय समजण्यास कै. टिळक हे तयार होते: परंतु टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें महाराजांचा

तक्तारूढ न होणारा द्वितीय चिरंजीव अर्थातच शूद्र ठरणार ! महाराजांवर तेवढाच जो हा अनुग्रह करण्यास तयार झाले, त्याचा जर महाराजांनीं स्वीकार केला असता तर, महाराजांची स्थिति काय झाली असती ? आपल्या प्रत्यक्ष नातलगांशीं त्यांचा कशा प्रकारचा संबंध राहिला असता? भोंसल्यांनीं कित्येक वर्षे वेदोक्त पद्धति सोडून दिली आहे असें जेव्हां प्रतिपादण्यांत आलें, तेव्हां जरूर तें प्रायश्चित्त मी भोगण्यास तयार आहें, असें महाराजांनीं सांगितलें. अशा प्रकारें ब्राह्मणांशीं शक्य तेवढें सलोख्यानें वागावें अशी महाराजांची इच्छा होती. राजोपाध्याच्या कांहीं मित्रांनीं राजोपाध्यानें आपला हेका सोडावा ह्मणून त्याला उपदेश केला, हें खरोखरच त्यांना भूषणावह आहे. क्षत्रियांच्या मदतीखेरीज ब्राह्मणत्व राहाणें अशक्य होतें; ह्मणून हिंदुसंस्थानिकांना क्षत्रिय न समजणें शहाणपणाचें होणार नाहीं, असेंही त्यांना सांगण्यात आलें. परंतु राजोपाध्याला व त्याच्या अदूरदृष्टी मित्रांना ही विचारसरणी पटली नाहीं. महाराजांच्या एका ब्राह्मण जहागिरदारानें कित्येक पिढयांचें वैर साधण्यासाठीं महाराजांविरुद्ध राजोपाध्याला चिथावून देण्याचा प्रयत्न केला, असें ह्मणण्याला जागा आहे. संस्थानच्या कॉलेजांतील एका ब्राह्मण अध्यापकानेंहि आपल्या हट्टीपणाची उपाध्येबुवांच्या अविचारीपणांत भर घातली. राजोपाध्याच्या आईचाहि या ब्राह्मणपक्षाच्या मसलतींत विशेष भाग होता, असें ह्मणतात. राजोपाध्याचें इनाम सरकारजमा करण्या इतकें मनोधैर्य महाराजांना होणार नाहीं अशी ब्राह्मणपक्षाची समजूत होती. महाराजांनीं या शेवटच्या मार्गाचें अवलंबन करण्यापूर्वी जेव्हां राजोपाध्याला एकसारख्या सूचना पाठविल्या, तेव्हां या सूचना महाराजांच्या मानसिक दौर्बल्याचेंच चिन्ह आहे, अशी त्यांची भलतीच समजूत झाली ! महाराज राजोपाध्यायाला जसजशी अधिकाधिक विनंति करीत तसतसा राजोपाध्या अधिकाधिक हट्टी होत गेला ! शेवटचा उपाय ज्या दिवशीं योजण्यांत आला, त्याच्या आदल्या रात्रीं महाराजांनीं आणखी एकवार प्रयत्न करून पाहावा ह्मणून मे० के० गायकवाड यांना राजोपाध्यायाची समजूत घालण्यासाठीं पाठविलें. त्यांनाहि त्यांत यश आलें नाहीं. महाराजांना आतां दुसरा मार्गच राहिला नाहीं. आपण एकदम माघार घेऊन व ब्राह्मणांच्या अरेरावीपुढें मान वांकवून त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागावें, किंवा खऱ्या क्षत्रियाप्रमाणें पाऊल पुढें टाकून गर्वानें फुगून गेलेल्या आपल्या प्रतिपक्ष्याची खोड मोडावी, यांपैकीं कोणता

तरी एक उपाय करण्याची जबाबदारी महाराजांवर येऊन पडली. महाराजांनीं दुसऱ्याच मार्गाचा तारीख ६ मे रोजीं स्वीकार केला.

आतां महाराजांचें इंग्लडला प्रयाण व्हावयाचें होतें. राजोपाध्याचें इनाम खालसा केल्यानंतर आठ दिवसांनीं ह्मणजे तारीख १४ मे हा दिवस कोल्हापुराहून इंग्लंडला जाण्यासाठीं निघण्याचा महाराजांनीं निश्चित केला होता. हा आठवडा कोल्हापुरामध्यें बराच धामधुमीचा गेला. महाराजांच्या प्रयाणसमयीं कोल्हापुरामध्यें जो हा प्रकार घडून आला त्यामुळें प्रत्येकाचें मन चिंतातुर झालें होतें. भूतकालीं छत्रपति घराण्याला विलायतेचा प्रवास सुखावह न झाल्याबद्दलची उदाहरणें घडलीं होतीं. लोकांच्या अशा प्रकारचा मनःस्थितीचा फायदा घेऊन, राजोपाध्याचें हित साधून घेण्याचा ब्राह्मणांनीं शेवटचा एक डाव टाकला. महाराजांचें विलायतेला प्रयाण होण्यापूर्वीं एक दोन दिवस अगोदर महाराजांच्या एका बड्या ब्राह्मण अधिकाऱ्यानें महाराजांचे पूर्वज, ह्मणजे त्यांचे जनक वडील श्री. आबासाहेब घाटगे व त्यांचे अजे श्रीराजाराम महाराज हे विलायतेचा प्रवास करीत असतांना त्यांच्यावर जें दुर्दैव ओढवलें होतें, त्याची महाराजांना आठवण करून दिली; आणि हा इतिहास लक्षांत घेऊन, महाराजांनीं विलायतेस जातांना ब्राह्मणांचे शाप डोक्यावर घेऊन निघूं नये, असें त्यांनीं सुचविलें. या ह्मणण्यास महाराजांनीं अगदीं शांतपणें उत्तर दिलें:-" माझे पूर्वज ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊन विलायतेला गेले असतांनाहि त्यांच्यावर दुर्दैव ओढवलें ह्मणून ब्राह्मणांच्या शापांपासून माझ्या घराण्याचा कांहीं फायदा होतो कीं काय, हें मला आतां पहावयाचें आहे. " याप्रमाणें हा डाव हुकला व महाराज विलायतेस गेले. तरीहि राजोपाध्ये पक्षाचे प्रयत्न चालूंच होते. तारीख २७ जून १९०२ रोजीं त्या वेळचें ॲक्टिंग चीफ जज्ज मि० आर० आर० शिरगांवकर लिहितात:—"ब्राह्मणांचें वर्तन नेहमींप्रमाणें उद्धट व त्रासदायक झाल्यामुळें त्यांच्याशीं सहनशीलतेनें वागणें अशक्य झालें आहे. ह्मणून महाराज, आपण शक्य तितक्या लौकर परत यावें." आपलें भावी धोरण ठरविण्यासाठीं ब्राह्मणांची गुप्त कारस्थानें व मसलती चालल्या. महाराजांच्या एका मित्रानें महाराजांना विलायतेस पाठविलेल्या पत्रांत या परिस्थितीचा पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहे:—

" रक्तानें माखललया हाताचीं बोटें घरांच्या भिंतींवर उठवून कांहीं बदमाष लोक महाराजांना त्रास देऊं पाहतात. हें पाहून मला मोठी दिलगिरी वाटते.

हें वाचून आपण चिंतातुर होणार नाहीं, अशी मला आशा आहे. माझा खून होणार अशी जी मला कित्येक पत्रांतून धमकी देण्यांत आली होती, तिचीच ही पुनरावृत्ति होय. हीं दोन्हीं कृत्येंहि एकाच मनुष्याचीं असावींत. आपण आडून मारलेले बाण वर्मी लागत आहेत, हें पाहून त्यांना कृतकृत्य वाटत असावें. असें करण्यांत त्यांचा हेतु उघड आहे. आपल्या मनावर या गोष्टींचा कांहींच परिणाम होणार नाहीं, ही गोष्ट जरी खरी आहे तरी या गोष्टींमुळें राजघराण्यांतील स्त्रियांना धास्ती वाटून त्यांचीं मनें आपल्या पक्षाकडे वळावींत व त्यांच्याकडून महाराजांचा अवमान करणाऱ्या जातीच्या रोषास पात्र होण्यापेक्षां महाराजांनीं आपले स्वत:चे हक्क आपण होऊन सोडून देण्याकडे महाराजांचें मन वळवावें अशी त्यांना उमेद आहे. दुर्दैव कोणाच्याहि प्रयत्नानें आपणांवर ओढवणार नाहीं. मग अशा लोकांची काय प्राज्ञा आहे ? ''

अशा प्रयत्नांना भीक न घालण्याला महाराजांना कोणीं सांगावयास पाहिजे होतें असें नाहीं. परंतु राजघराण्यांतील श्री सकवारबाईसाहेबासारख्या संकटांनीं पोळलेल्या श्रद्धाळू स्त्रियांच्या मनांत अशा दु:चिन्हांनीं भीति उत्पन्न करण्याचा ब्राह्मणांचा हेतु होता. महाराज कोल्हापुराला परत आल्यानंतर लागलीच, तारीख १४ सप्टेंबर रोजीं, महाराजांच्या दत्तक मातोश्री श्रीआनंदीबाईसाहेब या स्वर्गवासी झाल्या. त्यांची प्रकृति जात्याच अशक्त असून पुष्कळ दिवस त्या आजारीच होत्या; व त्याच आजारांत त्यांचा शेवट झाला. ब्राह्मणांवर शस्त्र उगारल्याबद्दल महाराजांना इतकीच शिक्षा करून विधाता थांबला नाहीं. कारण महाराजांनीं या मृत्यूची इशारत लक्षांत न घेतां वेदोक्त पद्धतीनें और्ध्वदैहिक विधि करण्याचा ज्या दिवशीं आग्रह धरिला त्याच दिवशीं रात्रीं जुन्या राजवाड्याचा कांहीं भाग अग्निमुखीं पडला ! महाराजांवर दैवी रोष झाल्याबद्दलचा पुरावा यापेक्षां अधिक काय हवा होता ? या वेळच्या आपल्या मन:स्थितीचें चित्र महाराजांनीं पुढीलप्रमाणें रेखाटिलें आहे:—

" आपल्या सहानुभूतीबद्दल मी आपला फार आभारी आहें. १४ तारखेचा दिवस मला किती तापदायक गेला, याची आपण कल्पनाच करावी. माझी आई त्याच दिवशीं सकाळीं वारली व त्या दिवशींचा दोनप्रहरानंतरचा काळ अंत्यसंस्कार करण्यांत गेला. हे संस्कार मूळचेच त्रासदायक असून, ब्राह्मणांच्या आक्षेपांमुळें व चितेजवळ अशा दु:खदायक प्रसंगींहि ब्राह्मणांनीं जी मला धमकी

दिली, त्यामुळें हे संस्कार करण्याचें काम अतिशय दुर्घट झालें. एवढ्यावरच भागलं नाहीं. मध्यरात्रींच्या सुमारास माझ्या जुन्या राजवाड्याला आग लागली, अशा आरोळ्या माझ्या कानीं पडून मी दचकून जागा झालों. ज्या ठिकाणीं अग्नीनें पेट घेतला होता, त्या ठिकाणीं एका बाजूला जुनें रिकार्ड ठेविलेलें असून दुसऱ्या बाजूला धान्याचें कोठार व इतर ज्वालाग्राही पदार्थांचीं कोठारें होतीं.

" कर्नेल फेरिस व मेजर बर्क हे लष्करी शिपायांसह वेळेवर मदतीला धांवून आले नसते तर आग विझविण्याचें काम अतिशय बिकट झालें असतें. माझ्यावर जी ही द्विविध आपत्ति ओढविली आहे, तीमुळें स्वाभाविकपणेंच ब्राह्मण जातीला आनंद झाला आहे. देवाच्या कोपामुळें असा प्रकार झाला असें या जातीचें ह्मणणें आहे. "

अशा गोष्टींची चर्चा करीत असतांना महाराज मि० सबनीस दिवाण-साहेबांना एकदां ह्मणाले कीं, ' मरणाची अगर याखेरीज दुसरी कोणती आपत्ति माझ्यावर किंवा माझ्या मित्रांवर ओढविली तरी मी डगमगणार नाहीं. परंतु आह्मांपैकीं कोणावर जर अशा प्रकारची आपत्ति आलीच तर आमच्या शापाचा हा परिणाम अशी बढाई मारण्याला व लोकांच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेण्याला मात्र ब्राह्मणांला संधि मिळेल याचें मला वाईट वाटतें. यांचें वर्चस्व नष्ट होईतोंपर्यंत आह्मांवर असले प्रसंग सहसा येऊं नयेत. कारण ते अशा प्रसंगाचा उपयोग आमचें कार्य हाणून पाडण्याकडे करतील. ' या इच्छेप्रमाणें पुढें बरींच वर्षें अशा प्रकारचें दुर्दैव महाराजांवर आलें नाहीं.

तारीख ९ सप्टेंबर रोजीं महाराज लिहितात:—" मी सुरक्षितपणें येथें येऊन पोंचल्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्याकरितां माझ्या प्रजाजनांची अहमहमिका चालली असल्यामुळें मला या आठवड्यांत सवड मुळींच नाहीं.

" कांहीं थोड्या असंतुष्ट लोकांनीं या उत्सवांत जरी मीठ टाकण्याचा प्रयत्न केला, तरी माझें स्वागत मोठ्या उल्हासानें करण्यांत आलें. माझ्या संस्थानांतील जागा भरण्यासंबंधीं जें मीं सरक्युलर काढलें आहे, त्यामुळें येथील व बाहेरील ब्राह्मण वर्गांत बराच असंतोष पसरला आहे.

"टिळकांचे दोन हस्तक माझ्या गैरहजरींत येथें येऊन मला प्रतिकूल असें वातावरण उत्पन्न करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला असें मला समजलें. परंतु अशा गोष्टींना माझ्याकडून आळा बसेल असें मला वाटत नाहीं.



नामदेव विद्यार्थी वसतिगृह.

" ना० हा साताऱ्याला जाऊन सातारच्या प्राचीन घराण्याच्या वंशजांना भीति घालून राजोपाध्याला अनुकूल अशी त्यांच्याकडून कबूली घेण्याचा त्यानें प्रयत्न केला. हा इसम त्याचा सावकार असल्यामुळें त्याला आपलें कार्य साध्य करून घेण्याची आशा होती, परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं असें मी ऐकतों. त्यांच्या मुलांशीं हीच युक्ति लढवून त्यानें आपल्या पक्षांत ओढलें, अशी हकीकत मीं ऐकली आहे. ही कितपत खरी आहे याची परीक्षा आपण करूं शकाल. सातारच्या प्राचीन घराण्यानें माझ्या पूर्वीच्या राजोपाध्याला अनुकूल असें मत दिलें होतें, असें कर्नल फेरिसनीं बोलल्याचें मला आठवतें. परंतु आतांची गोष्ट मुलाच्या ह्मणण्यासंबंधीं असून तिचा त्यांच्या वडिलांच्या अभिप्रायाशीं कांहीं एक संबंध नसावा. हे मुलगे पुण्याच्या ब्राह्मणांच्या कह्यांत जात आहेत, ही खेदाची गोष्ट आहे. मोठा प्रवास करून परत आल्यानंतर स्थानिक देवतेचें दर्शन घेण्याची वहिवाट आहे, परंतु मीं कांहीं तरी प्रायश्चित घेतल्याखेरीज मला तसें न करूं देण्याचा ब्राह्मणांचा मानस होता..

" सुशिक्षित मराठा समाजानें ही हकिगत ऐकली तेव्हां मराठ्यांनीं महाराजांना असें सांगितलें कीं प्रायश्चित्त न घेतां पुष्कळ ब्राह्मणांना देवालयांत आजपर्यंत प्रवेश करूं दिला आहे; ह्मणून आपणांस विरोध करण्याचें कोणासही कांहीं कारण नाहीं व जर ब्राह्मणांनीं आपला हेका चालविलाच तर मराठ्यांना जबरदस्ती करणें भाग पडेल. मला हा मार्ग योग्य दिसला नाहीं, ह्मणून थोडासा जरी विरोध होणार असें दिसून येईल तरी देवालयांत प्रवेश करावयाचा नाहीं, असा मीं निश्चय केला; परंतु मला कोणीहि आड आलें नाहीं. प्रायश्चित्त घेण्यास मला भाग पाडण्यासाठीं कांहीं वृद्ध मराठ्यांना यांनीं आपल्या पक्षांत ओढलें आहे. परंतु माझ्याकडून तसें करविणें फार कठीण आहे, असें त्यांना समजून येईल. "

सातारा येथील राजघराण्यानें जें धोरण स्वीकारिलें होतें असें वर ह्मटलें आहे, त्यासंबंधीं एका मित्रानें तारीख ११ सप्टेंबर १९०२ रोजीं महाराजांना पुढीलप्रमाणें कळविलें:—"माझ्या मतें सत्तारूढ असलेले सर्व लोक क्षत्रिय आहेत व इंग्लिश लोक हेच हिंदुस्थानांतील क्षत्रिय आहेत, व माझ्या हातीं सत्ता नसल्यामुळें मी खरा क्षत्रिय नव्हे व या प्रश्नाची मी काडी इतकी देखील पर्वा करीत नाहीं,

असें हा सरदार गेल्या मे महिन्यांत माझ्याशीं झालेल्या मुलाखतींत बोलला होता, ही गोष्ट येथें नमूद करणें इष्ट होईल." शिवाजीमहाराजांच्या या वंशजाचा हा कोण अधःपात !

या दरम्यानच्या काळांत वेदोक्त चळवळीविरुद्ध ब्राह्मणांची मोहिम तशीच चालू होती. तारीख ६ मे रोजीं झालेल्या हुकुमाची तपासणी करण्याबद्दलचा राजोपाध्यानें जो अर्ज केला होता, त्यासंबंधीं कौन्सिलनें तारीख २३ आगष्ट रोजीं विचार करून तो फेटाळन लाविला; त्यामुळें ब्राह्मणांच्या संतापाला सीमाच राहिली नाहीं. त्या वळीं महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रें बहुतेक ब्राह्मणांचींच असल्यामुळें यांच्यामधून त्यांच्या ओरडीचा प्रतिध्वनि प्रत्येक आठवड्याला उमटत असे. रंगभूमीवर देखील या चळवळीचा प्रवेश झाल्याखेरीज राहिला नाहीं. 'तुकाराम' नाटकांत शूद्रांच्या क्षत्रियत्वासंबंधींच्या हक्काची थट्टा करणारे कांहीं प्रसंग घुसडण्यांत आले होते. राजाराम कॉलेजमधील ब्राह्मणमुलें हे प्रसंग उघडपणें कॉलेजमध्यें ह्मणून दाखवीत असत. जेव्हां पुढें कॉलेजमधील या प्रकाराला आळा बसला, तेव्हां रंगभूमीवर या नाटकाचे प्रयोग करण्यांत येऊं लागले. राजोपाध्याच्या प्रकरणांत दरबारनें जो ठराव केला त्याविरुद्ध पोलिटिकल एजंटकडे अपील करण्यांत आलें. आपणाला अखेर या कामांत यशच येणार, अशी ब्राह्मण पक्षाला किती खात्री वाटत होती, यासंबंधीं महाराज ह्मणतातः—"ब्राह्मणसमाज माझ्यावर क्रुद्ध झाला आहे; सर्वांत वरिष्ठ कायदेमंडळ जें पार्लमेंट त्याच्याकडे या प्रकरणासंबंधानें ते दाद मागणार आहेत, असें लोक ह्मणतात. हल्लींच्या प्रधान मंडळाकडून त्यांचें कार्य साध्य न झाल्यास लिबरल पक्ष सत्तारूढ झाल्यानंतर आपलें कार्य करून घेण्याची त्यांना मोठी उमेद वाटत आहे."

महाराजांनीं यांच्या धमकावणीला व विनंतीला भीक न घातली व ब्रिटिश सरकारनेंहि यांत हात न घातला तर पुढें काय असा एक प्रश्न ब्राह्मणांपुढें होता. पुराणें चाळून ब्राह्मणांची अवज्ञा अगर आज्ञाभंग केल्यामुळें राजेलोकांना देवानें शासन केल्याबद्दलच्या कथा धुंडाळून काढून त्यांनीं या प्रश्नाचें उत्तर दिल. ब्राह्मणांनीं राज्याचा त्याग करतांच राजांचीं राज्यें नष्ट झालीं; वेदोक्त पद्धतीचा हट्ट धरल्यामुळें शिवाजी व त्याचा मुलगा हे अकालीं मृत्युमुखीं पडले; ज्या ब्राह्मणानें हा वेदोक्तविधि केला, त्याचाहि शेवट फार वाईट रीतीनें झाला. हे पुराणोक्त व दंतकथाश्रित इशारे महाराजांना पुरे नाहींत

काय ? असें ब्राह्मण लोक विचारूं लागले. परंतु महाराजांनीं अशा प्रकारच्या गोष्टी ऐकून आपला निश्चय यत्किंचित्‌हि ढळूं न देतां राजघराण्यांतील लोकांचे धार्मिकविधी वेदोक्त पद्धतीनें करण्यास जे ब्राह्मण तयार होणार नाहींत त्यांना दरबारांतून वेतन मिळणार नाहीं, असा हुकूम सोडला. यामुळें पुष्कळ जोशी वेदोक्त पद्धतीनें विधी करण्यास तयार झाले. हेरलें गांवांतील कांहीं ब्राह्मणांनीं वेदोक्त पद्धतीनें विधी केल्यामुळें कोल्हापूरच्या ब्राह्मणांनीं त्यांच्यावर बहिष्कार टाकला. वास्तविक पाहिलें असतां शहरांतील ब्राह्मणांनीं यापूर्वी खेड्यांतील ब्राह्मणांवर बहिष्कार टाकीपर्यंत मजल नेली नव्हती. त्या खेड्यांतील एका खोडसाळ कुलकर्ण्यानें चावडीमध्यें खेड्यांतील लोकांचा दरबार भरवून कोल्हापुरी ब्राह्मणांची बहिष्काराची आज्ञा, बादशहाच्या जाहिरनाम्याप्रमाणें गंभीर रीतीनें वाचून दाखविली ! या कृत्याबद्दल याचें वतन खालसा होऊन त्याला चांगलेंच प्रायःश्चित मिळालें.

लॉर्ड कर्झनचा दिल्लीदरबार, वर्षारंभाच्या दिवशीं भरला. महाराजांना आमंत्रण आल्यावरून या दरबारला ते हजर राहिले. बादशहाच्या अनुज्ञेनें नेक नामदार ड्यूक ऑफ कॅनॉट यांनीं महाराजांना या प्रसंगीं ' जी० सी० व्ही० ओ०' ही बहुमानाची पदवी दिली.

तारीख १९ फेब्रुवारी रोजीं कर्नल फेरिससाहेबांनीं राजोपाध्याच्या अपीलावर मुद्देसूद रीतीनें आपला निकाल दिला. महाराजांच्या कायदेशीर अधिकारांत व सत्तेंत हात घालण्याइतकी ही गोष्ट महत्वाची नाहीं, असा त्यांनीं आपला अभिप्राय दिला. १९०१ सालच्या आक्टोबर महिन्यापासून राजोपाध्याला नोटिसा देण्यांत आल्या होत्या; राजोपाध्यानें १८९७ सालीं कबूल केल्याप्रमाणें राजवाड्यांत उपाध्याय या नात्यानें विधी केले नाहींत; व असे धार्मिक विधी करणें आपलें कर्तव्य नव्हें, असें प्रतिपादण्याचा त्याचा निश्चय दिसत होता; इत्यादि गोष्टींचा उल्लेख करून कर्नल फेरीसनीं दोन मुख्य मुद्दे उपस्थित केले. ( १ ) महाराज अल्पवयस्क असतां ब्रिटिश सरकारनें कायम केलेलें उत्पन्न महाराजांना काढून घेतां येईल किंवा कसें ? ( २ ) महाराजांना हें उत्पन्न काढून घेतां येईल असें मानिलें तर राजोपाध्याला दिलेलें इनाम उपाध्या या नात्यानें काम करण्याच्या अटीवर दिलें होतें किंवा कसें ? या दोन प्रश्नांवर कर्नल फेरिससाहेबांनीं आपला अभिप्राय द्यावयाचा होता.

पहिल्या प्रश्नाला होकारार्थी उत्तर देतांना कर्नलसाहेबांनीं असें स्पष्ट केलें कीं, दरबारनें राजोपाध्ये हें पद अमान्य केलें तरच हा प्रश्न उद्भवूं शकेल. वास्तविक पाहिलें असतां, राजोपाध्याच्या पदाविषयीं कोणालाहि शंका नव्हती. कांहीं विशिष्ट प्रकारची नोकरी करण्यासाठीं हें इनाम दिलें गेलें असून ती नोकरी करण्यास राजोपाध्ये नाकबूल झाले होते, या सबबीवर हें इनाम सरकारजमा करण्यांत आलें. दुसऱ्या अधिक वादग्रस्त प्रश्नासंबंधीं राजोपाध्याचें असें ह्मणणें होतें कीं, हें इनाम बिनशर्त दिलेलें असून तें जातइनामाच्या स्वरूपाचें होतें. ज्या सनदान्वयें हें इनाम दिलें गेलें होतें त्या सनदांचा अर्थ राजोपाध्ये यांना अनुकूल होता कीं नाहीं, हें ठरविणें अर्थातच जरूर होतें.

प्रस्तुतचा लढा उपस्थित होईतोंपर्यंत या सनदेच्या अर्थाबद्दल कोणालाहि शंका आली नव्हती. १८८९ सालीं त्यानें महाराजांकडे जो एक अर्ज केला होता, त्यांत अर्जदाराच्या पूर्वजांनीं जें श्रेष्ठपद धारण केलें होतें, त्याबद्दल ही देणगी मिळाली आहे. हें श्रेष्ठपद ह्मटलें ह्मणजे कोल्हापुराच्या राजाचा पुरोहित अगर कुलगुरु हें होतें. असें राजोपाध्ये यांनेंच कबूल केलें होतें. मार्च १८७३ सालीं प्रस्तुतचा वादग्रस्त प्रश्न उपस्थित केलेल्या राजोपाध्याच्या वडील बंधूनें याच अर्थाची पुढीलप्रमाणें आपली कबूली दिली होती. आह्मी कुलगुरु असल्यामुळें कोणत्या तरी तऱ्हेनें आह्मांस उत्पन्न द्यावें ह्मणून ( पाटीलकी वतन वगैरे ) दरबारनें आह्मांस हें उत्पन्न दिलें आहे. या वतनाबद्दल नोकरीचा मोबदला घेण्याचा दरबारचा मानस नव्हता. येथें नोकरी याचा अर्थ पाटीलकीची नोकरी असा आहे. तात्पर्य त्या वेळीं कुलगुरु या नात्यानें काम करण्यास वरील उत्पन्न आपणांस दिलें गेलें असल्यामुळें पाटीलकीची नोकरी आपणाकडून घेण्यांत येऊं नये, अशी त्याची तक्रार होती. १८४७ सालीं अर्जदाराच्या एका पूर्वजानें, कुलगुरु या नात्यानें काम करण्यासाठीं हें इनाम आपणांस दिलें आहे, अशी आपली कबुली दिली होती. राजोपाध्ये या पदावरून असा अर्थ निष्पन्न होतो कीं, हें उपनांव धारण करणाऱ्या इसमानें राजोपाध्याचीं कर्तव्यें केलीं पाहिजेत. राजोपाध्याचें काम बजावीत असल्यामुळें पाटीलकीची नोकरी करण्याचें कारण नाहीं व त्याचप्रमाणें हें वतन खासगी स्वरूपाचें असल्यामुळें कुलगुरूचें काम करणें हें आपलें कर्तव्य नव्हे, अशा दोन्ही गोष्टीं एकाच वेळीं प्रतिपादन करणें त्याला अशक्य होतें.

राजोपाध्याचें इनाम कोणत्या स्वरूपाचें होतें, हें आतां स्पष्ट झालें असल्यामुळें महाराजांच्या दर्जानुरूप राजोपाध्यानें धर्मविधी करण्यास नाकारणें ह्मणजे स्वत:चें उत्पन्न सरकारजमा होणाऱ्या शिक्षेला स्वत:ला पात्र करून घेणें होय. याप्रमाणें कर्नल फेरिस यांनीं या प्रश्नाचा निर्णय दिला.

यावर राजोपाध्यानें मुंबई सरकारकडे अपील केलें. १९०३ सालच्या आक्टोबर महिन्यांत मुंबई सरकार या प्रश्नाचा निकाल देईतोंपर्यंत जो मध्यंतरींचा काळ गेला, त्या काळांत कोल्हापूर संस्थानमध्यें या वादग्रस्त प्रश्नाच्या विषारी ज्वाला चहूंकडे पसरल्या. संस्थानांतील कित्येक ब्राह्मणांना ज्या धार्मिक स्वरूपाची नोकरी बजाविण्यासाठीं देणग्या देण्यांत आल्या होत्या, त्या सर्व त्यांनीं महाराजांचें क्षत्रियत्व नाकबूल करितांच सरकारजमा करण्यांत येऊन त्यांची स्थिति राजोपाध्याप्रमाणेंच झाली. परंतु कित्येकांच्या बाबतींत इनामें जप्त करून त्यांना पुन्हां विचार करून आपल्या चुकीची दुरुस्ती करण्याची संधि देण्यांत आली होती. कोल्हापूर येथील श्री शंकराचार्यांचें पीठ ( मठ ) यांपैकीं हें एक होतें. पुढें या मठाचें उत्पन्न खुलें करण्यांत आलें. या मठाची सविस्तर हकीकत आणखी एका प्रकरणांत देण्यांत येईल. अखेर स्वामीच्या मनांत सारासार बुद्धि जागृत होऊन त्यानें छत्रपति घराण्याचें क्षत्रियत्व कबूल केलें. अपरिहार्य कारणांमुळें, ज्या ज्या ब्राह्मणांनीं महाराजांचे न्याय्य हक्क कबूल केले होते, त्या सर्वांवर बहिष्कार टाकून महाराजांच्या मार्गांत महाविघ्नें उपस्थित करण्याचें सत्र ब्रह्मवृंदानें चालविलेंच होतें. राजोपाध्याच्या कर्तव्याप्रमाणें जोशीराव नांवाच्या ब्राह्मण गृहस्थाला धार्मिक नोकरी करावी लागे. आतां जोशीराव हा ब्राह्मणांच्या रोषास पात्र झाला. जोशीराव हा वेदोक्त पद्धतीनें राजवाड्यांत धार्मिक विधी करीत असल्यामुळें, त्यानें केलेल्या या महापातकाबद्दल त्याला प्राय:श्चित देण्यासाठीं अंबाबाईला त्याचा स्पर्श न होऊं देण्याचा हुकूम या ब्रह्मवृंदानें खासगी कारभाऱ्याला केला. अशा दटावणीला मुळींच भीक न घातल्यामुळें ब्राह्मणांनीं आपल्या नेहमींच्या शस्त्राचा उपयोग केला. नृगराजानें एकदां चुकून एका ब्राह्मणाची गाय दुसऱ्या ब्राह्मणाला दिली या चुकीमुळें त्याच्या हातून जें पाप घडलें, त्याचें परिमार्जन करण्यासाठीं त्यानें जरी दहा लक्ष गाई दान केल्या तरी, ब्राह्मणांच्या न्यायप्रिय देवतांनीं त्याला नरककुंडांत लोटलें. ही कथा सांगून भागवतकारांनीं शेवटीं ब्राह्मणांचा उद्धटपणा ज्या राजांना सहन होत नाहीं, त्यांनीं

सहनशीलतेचे व नम्रतेचे धडे शिकावेत, असा उपदेश केला आहे. " शाप देऊन अगर प्रसंगीं प्रहार करून जरी ब्राह्मणांनीं अपराध केले तरी तुह्मीं त्यांच्याविषयीं मनांत क्रोध न आणितां त्यांच्याशीं नम्रतेनें वागावें. " असें या पवित्र ग्रंथात ह्मटलें आहे. कोल्हापूरच्या दिशाभूल झालेल्या ब्राह्मणांना अशा प्रकारच्या कथा महाराजांना सांगून त्यांना मोठी दहशत घालूं शकूं असें वाटत होतें. तारीख १६ आक्टोबर १९०३ रोजीं झालेल्या मुंबई सरकारच्या ठरावानें व १९०५ सालच्या मे महिन्यांत झालेल्या हिंदुस्थान सरकारच्या ठरावानें या प्रश्नाचा कायमचा निकाल लागला व या सर्व दहशती फुकट गेल्या. यामुळें ब्राह्मणांच्या विरोधाचा कांहीं काळपर्यंत कणाच मोडला. परंतु थोडा वेळ गेल्यानंतर या वादग्रस्त प्रश्नाला नवीन स्वरूप प्राप्त झालें. एक महिना लोटतो न लोटतो तोंच, कोल्हापुरांतील राजकारणी ब्राह्मण, ब्राह्मणांच्या हितसंबंधाचें नव्हे ! तर संस्थानांतील गरीब रयतेच्या हितसंबंधाचें संरक्षण करण्यासाठीं कोल्हापुरांत प्रतिनिधि संस्था अस्तित्वांत यावी, असें बोलूं लागले. परंतु त्यांच्या चळवळीचें हें स्वरूप व यापासून उद्भवलेल्या इतर गोष्टींचें सविस्तर विवरण आणखी एका प्रकरणांत देण्यांत येईल. कारण महाराजांच्या आयुष्यांतील तें एक नवीनच प्रकरण आहे. मात्र येथें धार्मिक चळवळींतून राजकीय चळवळ कशी उद्भवली याचें थोडेंसें दिग्दर्शन केलें तरी पुरें आहे, महाराज सदय अंतःकरणाचे असून त्यांच्या दुष्ट परंतु हुशार मंत्र्यांनीं महाराजांची दिशाभूल केली आहे. असें आतांपर्यंत ब्राह्मणांचें महाराजांविषयीं मत होतें. तें बदलून पहिल्या सामन्यांतच ब्राह्मणांचा पुरा निःपात झाल्यामुळें महाराज हे जुलमी झाले आहेत ह्मणून त्यांची सत्ता मर्यादित झाली पाहिजे, असे ब्राह्मण कांगावा करूं लागले. दरबारनें ब्राह्मणांच्या उद्दाम वृत्तीवर जे प्रहार केले होते, त्यांचा सूड उगविण्यासाठीं ब्राह्मणांनीं हें धोरण स्वीकारिलें होतें, अशी प्रामाणिक टीकाकारांची खात्री झाल्याखेरीज राहिली नसती. अगदीं खोटी गोष्ट देखील उचलून धरण्यासाठीं जें मनोधैर्य असावें लागतें, तें या ब्राह्मणांमध्यें नसल्यामुळें संस्थानांतील सर्व प्रजाजनांसाठीं निरपेक्ष बुद्धीनें झगडण्याचा त्यांनीं आतां जो आव आणिला तो पोकळच होता, हें त्यांच्या चळवळीच्या अखेरीस स्पष्टपणें ठरलें.





इंग्लंडांतील महाराजांचा परिवार व महाराज.



इंग्लंडांत असल्यावेळचे महाराज.

# प्रकरण ११ वें.

# महाराजांचें इंग्लंडला प्रयाण.





महाराज अशा प्रकारच्या बिकट परिस्थितींत असूनहि बादशहा सप्तम एड्वर्ड यांच्या राज्यारोहण समारंभाला हजर राहण्यासाठीं इंग्लंडला निघण्याची त्यांना तयारी करावी लागली. १९०१ सालच्या आक्टोबर महिन्याच्या प्रारंभींच महाराजांना सदर उत्सवाबद्दल आमंत्रण मिळालें होतें. आमंत्रण मिळतांच या समारंभाला हजर राहावें असा जरी महाराजांच्या मनांत पहिला विचार आला होता, तरी या प्रश्नाच्या साधकबाधक गोष्टींविषयीं कांहीं दिवस विचार करणें त्यांना भाग पडलें; परंतु महाराजांच्या मनांत ब्रिटिश सिंहासनाविषयीं जी निष्ठा वसत होती, तिची अखेर सरशी होऊन महाराजांनीं आपल्या अडचणींना न जुमानतां इंग्लंडला प्रयाण करण्याचा आपला निश्चय कायम केला. सदर प्रसंगीं मुंबई इलाख्यांतील संस्थानिक व जहागिरदार यांचा प्रतिनिधि या नात्यानें हजर राहाण्यासाठीं महाराजांना जें निमंत्रण आलें होतें, तें आपण स्वीकारिलें आहे, असें महाराजांनीं मुंबई इलाखाधिपतींना तारीख २४ आक्टोबर रोजीं कळविलें. महाराजांबरोबर जी मंडळी निघणार होती, तीमध्यें महाराजांचे बंधु श्रीमंत बापूसाहेब महाराज, मिस्टर सबनीस दिवाण, वगैरे गृहस्थ होते. मि० ( आतां रावबहादूर ) पारसनिस हेहि पुढें या मंडळींत येऊन दाखल झाले.

महाराजांच्या गैरहजरींत संस्थानच्या राज्यकारभाराविषयीं काय व्यवस्था करावी, या गोष्टीचा प्रथम विचार करणें महाराजांना भाग पडलें. ही गोष्ट खरोखरच सोपी नव्हती. संस्थानमधील महाराजांच्या अत्यंत विश्वासांतील माणसें श्रीमंत बापूसाहेब व मि० सबनीस यांना तर महाराज आपणांबरोबर नेत होतें. वेदोक्तप्रकरण तर अगदीं विकोपास गेलें होतें. कौन्सिलचा एक जुना सभासद ब्राह्मण गृहस्थ होता. त्याचे विचार कशा प्रकारचे होते हें सर्वांना माहित होतें. त्याचें राजोपाध्याशीं व त्याच्या पक्षाशीं सख्य होतें.

अशा प्रकारची परिस्थिति असूनहि राज्यकारभाराचीं सूत्रें ज्या कौन्सिलच्या हातीं देण्यास महाराज प्रथम तयार झाले, त्या कौन्सिलचे सभासद मि० पंडित, मि० शिरगांवकर व मि० मराठे असे तिघेही ब्राह्मणच होते. मार्च महिन्याच्या १५ व्या तारखेच्या सुमारास या व्यवस्थेला सरकारची मंजूरी मिळाली. परंतु मार्च महिन्याच्या शेवटीं शेवटीं वेदोक्त प्रकरणाला जें स्वरूप प्राप्त झालें, त्यामुळें महाराजांना आपला पहिला विचार बदलावा लागला. व आतां त्यांनीं मि० मराठे यांच्या ठिकाणीं मि० जाधवराव यांना कौन्सिलमध्यें घातलें.

तारीख १७ एप्रील ( १९०२ ) च्या महाराजांच्या पत्रावरून इंग्लंडच्या प्रयाणाविषयीं महाराजांच्या मनांत काय विचार चालले होते, याची थोडीबहुत कल्पना होते. हें पत्र मि० ( पुढें सर ) क्लॉडहिल यांना महाराजांनीं लिहिलें होतें. हे गृहस्थ प्रवासांत महाराजांबरोबर राहणार होते. या पत्रांतील मजकूर पुढीलप्रमाणें होता:—

" तारीख २८ चें पत्र वाचून मला आनंद झाला. माझ्याबरोबर कोण कोण मंडळी येणार याची यादी आतां आपणांस पोंचली असेल. प्रत्येक लहानसान गोष्टींविषयीं ज्या अर्थीं इतकी दक्षता घेतली जात आहे, त्या अर्थीं राहाण्याचें ठिकाण, वाहनें, नोकरचाकर इत्यादि गोष्टींत कांहींच न्यूनता पडणार नाहीं अशी मला खात्रीच वाटते. यूरोपियन लोकांच्या पद्धतीप्रमाणें राहाण्याचा आह्मी सर्वजण प्रयत्न करूं यांत शंका नाहीं. परंतु स्पष्टच सांगावयाचें ह्मणजे, ही गोष्ट आह्मांला इतकी जाचक व विलक्षण वाटेल कीं, आमच्या जन्मापासून आह्मांला ज्या संवयी जडल्या आहेत, त्या एकाएकीं सोडून देणें आह्मांला कठीणच जाईल.

" रात्रींच्या वेळीं काम करण्याचें मला सहसा कारण पडणार नाहीं. रात्रीं जागण्याची आह्मांला संवयहि नाहीं.

" शेतकीच्या जनावरांची व कोंबडीबदकांची पैदास, दूधदुभत्याची उत्पत्ति इत्यादि शेतकीचे धंदे लहान मोठया प्रमाणावर ज्या ठिकाणीं चालले आहेत, असें एखादें स्थळ पाहावें असें मला वाटतें; परंतु यासंबंधींचा कार्यक्रम मी तेथें आल्यावर ठरवूं.

" एकादी हिंदी भाषा जाणणाऱ्या अशा एका नोकराची मला जरूरी भासेल असें वाटतें; कारण त्याचा माझ्या कनिष्ट प्रतीच्या नोकरांना उपयोग

होईल. माझ्या पित्याचे वेळीं अशाच तऱ्हेच्या फुल्लर नांवाच्या एका इसमाला नेमण्यांत आलें होतें. तो नोकर लोकांना बरोबर घेऊन जात असे, व त्यांना तो घोडयांच्या शर्यती व प्रेक्षणीय स्थळें दाखवीत असे.

"इंग्लिश पद्धतीनें जेवण्याची संवय होण्यासाठीं कांहीं दिवस मीं येथें तसा प्रयत्न करावा असें मला वाटलें. परंतु हा विचार मला सोडून द्यावा लागला. येथें ब्राह्मण लोक आह्मांस तुच्छ लेखून शूद्र ह्मणत आहेत, हें आपणांस विदितच आहे आणि जर कदाचित् मीं इंग्लिश थाटाची जेवणाची पद्धत वगैरे स्वीकारली, तर त्यांना तें एक नवीन आयतेंच शस्त्र प्राप्त होईल. सध्यांच्या परिस्थितींत धार्मिक प्रश्नाची चर्चा अतिशय जोरानें चालली असतांना हें शस्त्र त्यांच्या हातीं मी देऊं इच्छीत नाहीं. या प्रश्नाचा शेवट कसा होणार हें मला समजत नाहीं."

ता० क०:—

"धार्मिक चळवळीची लाट माझ्याच वेळेला उत्पन्न व्हावी हें खरोखर दुर्दैव होय. माझ्या पित्याच्या वेळीं असा बिकट प्रसंग नव्हता. ते परत आल्या-नंतरहि त्यांना प्रायश्चित घ्यावें लागलें नाहीं. मी देखील असा प्रसंग येऊं देणार नाहीं, अशी मला उमेद आहे."

प्रवासांत महाराजांना मदत करण्याकरितां सरकारनें सर क्लॉड हिल आणि मि० म्याकूनेल यांची नेमणूक केली होती. त्यांचा महाराजांना इतका उपयोग झाला कीं, त्यांच्या मैत्रीचें पर्यवसान अन्योन्य प्रेमसंवर्धनांत झालें; व तें आमरण टिकलें. यानंतर पुष्कळ वर्षांनीं कोल्हापुराच्या पूर्वेला दोन मैलांच्या अंतरांवर असलेल्या इतिहासप्रसिद्ध त्र्यंबुली टेकडीवर महाराजांनीं जें एक सुंदर हवेशीर ठिकाण बांधलें, त्याला त्यांनीं सर क्लॉड हिलचें नांव दिलें.

तारीख १४ मे रोजीं इंग्लंडला जाण्याकरितां महाराजांनीं कोल्हापूर सोडलें. या प्रसंगीं महाराजांच्या प्रजाजनांकडून त्यांचा जो गौरव करण्यांत आला होता, तो या प्रसंगाला व महाराजांच्या उच्च पदाला साजेल असाच होता. सदर्न मराठा कंट्री येथील राजेरजवाडयांनीं याच्या मागच्या रविवारीं मिरज येथें महाराजांना मानपत्र दिलें; व त्यांनीं आपल्यातर्फे राजनिष्ठेचा संदेश सम्राटांना निवेदन करण्यासाठीं महाराजांना विनंति केली. महाराजांना निरोप देण्यासाठीं कोल्हापूरच्या लोकांच्या झुंडींच्या झुंडी स्टेशनावर लोटल्या. कोल्हापूरचें रेल्वे स्टेशन अगदीं फुलून गेलें होतें. पोलिटिकल एजंट कर्नल

फेरीससाहेब यांना देखील आपला डबा मोठ्या प्रयासानें गांठावा लागला. पोलिस लोकांच्या निष्काळजीपणामुळें जनसमुदाय त्यांच्या नियंत्रणाखालीं राहूं शकला नाहीं व त्यामुळें प्ल्याटफार्मवर गर्दी झाली, असें कर्नलसाहेबांच्या मनानें घेतल्यामुळें, दुसऱ्या स्टेशनवर गाडी थांबतांच चीफ् पोलीस ऑफीसर मि० पेंढारकर यांनीं आपणांस भेटावें, ह्मणून त्यांनीं त्यांना कळविलें. हें ऐकून महाराजांनीं गाडी सुटतांच मि० पेंढारकर यांना आपल्या सलूनमध्यें बोलाविलें; व खुद्द महाराजांनींच लोकांना हवें तसें वागूं देण्याबद्दल पोलीस लोकांना बजाविलें होतें असें सांगून तुह्मी मोकळे व्हा, असें महाराजांनीं त्यांना सांगितलें. खरोखर अशी वस्तुस्थिति नव्हती; परंतु यावरून महाराजांना लोकसमुदाय किती प्रिय होता व महाराजांच्या मित्रांच्या कल्पनेबाहेर महाराजांचा त्यांच्यावर किती विश्वास होता हें स्पष्ट होतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं महाराज मुंबईला पोंचलें व तारीख १७ रोजीं एस्० एस्० पेनिनशुलर बोटीनें ते विलायतेला निघाले. मार्गांत इटली आणि फ्रान्स या देशांना वळसा घालून तारीख २ जून रोजीं ते डोव्हरला पोंचले. ब्रिटिश सरकारनें कॅडेगॉन स्क्वेअर ( Cadogon Square ) येथें या मंडळीची राहण्याची सोय केली होती, तेथें ही मंडळी उतरली. डॉक्टर ( हल्लीं रावसाहेब ) टेंगसे हे या वेळीं अमेरिकेंत होते. लंडनमध्यें येऊन महाराजांना भेटण्यास त्यांना कळविण्यांत आलें. त्याप्रमाणें हे जूनच्या अखेरीला आले. बादशहाच्या आजारीपणामुळें राज्यारोहण समारंभ जो पुढें लोटण्यांत आला, त्यामुळें महाराजांचा ठरलेला कार्यक्रम बदलावा लागला. ह्मणून इंग्लंडमध्यें कांहीं दिवस राहून, आतां नवीन ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें आगष्ट महिन्यांत जो राज्यारोहण समारंभ होणार होता, तोंपर्यंत युरोपच्या दक्षिण भागांत प्रवास करण्याच्या हेतूनें महाराज निघाले. परंतु महाराज निघण्यापूर्वींच कॅंब्रीजच्या प्राचीन विश्वविद्यालयानें शिक्षण व संस्कृति यांविषयीं महाराजांच्या ठायीं वसत असलेल्या कळकळीबद्दल महाराजांना एल्० एल्० डी० ही बहुमानाची पदवी अर्पण करून महाराजांचा गौरव केला. ही गोष्ट इंग्लंडला महाराज पोंचल्यानंतर एका आठवड्यांतच ह्मणजे तारीख १० जून रोजीं घडली.

दोन दिवसांनंतर विंचेस्टर नांवाचें प्राचीन राजधानीचें शहर महाराजांनीं प्रत्यक्ष जाऊन पाहिलें. किंग ऑर्थर व किंग आल्फ्रेडच्या वेळचीं जुनीं

थडगीं पाहून महाराजांच्या मनावर अतिशय परिणाम झाला. विंचेस्टर येथील कॉलेजमध्यें महाराजांचा सत्कार करून त्या कॉलेजच्या प्रिन्सिपॉलनें लॅटिन भाषेंत जें भाषण केलें, त्याला उत्तरादाखल महाराजांनीं संस्कृतमध्यें सुंदर भाषण केलें. तारीख १६ जून रोजीं आल्डर शॉट येथें ३०,००० सैनिकांची जी कवाईत झाली, तिला महाराज हजर होते. युवराज देखील या वेळीं हजर होते. परंतु आजारीपणामुळें बादशहा या प्रसंगाला हजर राहूं शकले नाहींत. बादशाहांना जो विकार जडला होता, तो अतिशय विकोपाला गेल्यामुळें राज्यारोहण समारंभ पुढें लोटणें भाग पडलें. रॉयल एसिॲटिक सोसायटीनें तारीख १७ जून रोजीं महाराजांना मेजवानी दिली. तारीख २२ जून रोजीं महाराजांनीं लंडन येथील होमिओप्याथिक हॉस्पिटल जाऊन पाहिलें. तारीख २७ जून रोजीं महाराजांनीं ऑक्सफर्डला जाऊन बडोद्याचे युवराज कुमार फत्तेसिंगराव यांची भेट घेतली. मि० पीज एम्० पी० यांनीं तारीख ३० जून रोजीं महाराजांना मेजवानी दिली; त्या वेळीं त्यांच्या पुष्कळ मित्रांना महाराजांची ओळख झाली. तारीख २ जुलै रोजीं प्रिन्स ऑफ वेल्स यांचा पंक्तिलाभ महाराजांना मिळाला. शिंदे महाराज व आगाखान यांच्यासमवेत महाराजांनीं दोन दिवसांनंतर विंडसर कॅसल जाऊन पाहिला. तारीख ५ ते तारीख १० जुलैपर्यंत महाराज स्कॉटलंड येथील कार्लाइल शहरीं होते. या आठवड्यांत स्कॉटलंडच्या पठारांतील कांहींशी शिकार पाहाण्याची महाराजांना संधि मिळाली. इंग्लंडच्या रॉयल ॲग्रिकल्चरल सोसायटीच्या साधारण सभेला महाराज हजर होते. या सोसायटीचे प्रेसिडेंट प्रिन्स क्रिश्चन यांनीं एम्. आर. ए. एस्. ही पदवी देऊन महाराजांना विभूषित केलें.

तारीख १६ जुलै रोजीं सर उइलियम लीवार्नरनीं महाराजांना एक वनभोजन दिलें. त्यानंतर यूरोपच्या दक्षिण भागांत प्रवास करण्याकरितां महाराज निघाले. पारीस येथें इफेल टॉवर, नेपोलियनचें थडगें व इतर ऐतिहासिक स्थळें त्यांनीं पाहिलीं. मिलन ओलांडून तारीख २१ रोजीं ते व्हेनीसला आले. महाराजांनीं ज्या अनेक कुतूहलपूर्ण गोष्टी पाहिल्या त्यांपैकीं कांचेचा सुप्रसिद्ध कारखाना हा एक होय. तारीख २४ रोजीं महाराज फ्लोरेन्सला आले. सामान्य प्रवाशांपेक्षांहि विशेष प्रिय अशी महाराजांना येथें एक गोष्ट होती. येथेंच महाराजांचे आजे श्रीराजाराममहाराज हे आपल्या ऐन ज्वानींत स्वर्गवासी झाले. येथील एका

सुंदर बागेंत या तरुण राजपुत्राच्या स्मरणार्थ एक थडगें बांधण्यांत आलें आहे. या पुतळ्यावर फुलांच्या माळा घालून व या पुतळ्याच्या चरणीं धूप व कापूर जाळून महाराजांनीं व महाराजांबरोबर असलेल्या लोकांनीं या पुतळ्याची हिंदी पद्धतीनें पूजाअर्चा केली व अशा प्रकारें त्यांच्याविषयीं आपल्या ठायीं वसत असलेला आदर व्यक्त केला. फ्लोरेन्स येथें गरीब लोकांना जेवण घालून हिंदी पद्धतीनें ही यात्रा साजरी करण्यांत आली.

ही मंडळी तारीख २६ रोजीं नेपल्स येथें दाखल झाली. तेथें मौंट व्हेसुव्हिअस हा ज्वालामुखी पर्वत महाराजांच्या दृष्टीस पडला. महाराजांच्या परिवारांत असलेल्या लोकांच्या इच्छेविरुद्ध या पर्वताच्या माथ्यावरील ज्वलत् मुखांत महाराजांनीं डोकावून पाहिलें. ही सहल करून सर्व मंडळी या पर्वताच्या पायथ्याशीं आली; व तेथें यथेच्छ जेवण करण्यास त्यांनीं सुरवात केली. पर्वत चढूं लागण्यापूर्वींच जेवणाची तयारी करण्यास खानावळवाल्यास सांगितलें होतें. पानावर गोमांस न वाढण्याबद्दल महाराजांनीं नेहमींप्रमाणें खानावळवाल्यास बजाविलें होतें; परंतु भोजनप्रसंगीं जेव्हां बैलाची जीभ खाण्याचा मुख्य पदार्थ ह्मणून पानावर वाढण्यांत आला, तेव्हां महाराजांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. जेवणाची व्यवस्था करण्याचें काम मि० म्याकनेल यांच्याकडे सोंपविण्यांत आल्यामुळें त्यांना खानावळवाल्यांच्या निष्काळजीपणाची पराकाष्ठेची चीड आली. परंतु हा काय प्रकार आहे, हें त्या बिचाऱ्या स्वयंपाक्याला मुळींच समजेना. खानावळींतील नोकर लोक ह्मणाले, 'साहेब, आह्मीं आज्ञाभंग करणारे लोक नव्हेत. यांत गोमांस नसून फक्त जीभ मात्र आहे!' हें उत्तर ऐकून महाराजांना हंसूंच कोसळलें. त्याला जो इषारा देण्यांत आला होता, त्याचें मर्म त्याला मुळींच समजलें नाहीं!

तारीख २९ रोजीं रोमला महाराज पोंचले. प्राचीन काळीं द्वंद्वयुद्ध पाहाण्यासाठीं ९,००० प्रेक्षकांचा समावेश होण्यासारखा जो एक बडा आखाडा बांधला आहे, तो पाहून महाराजांच्या मनावर अतिशय परिणाम झाला. पुढें महाराजांनीं खासबाग येथें जो एक आखाडा तयार केला, त्याची कल्पना महाराजांना हें प्रेक्षकालय पाहूनच झाली. व्हॅटिकन ( Vatican ) हें ठिकाणदेखील महाराजांना आवडलें असावें. हें स्थळ पाहून या प्रवाससमयीं कोल्हापूरच्या

धर्मगुरूंनीं महाराजांविरुद्ध जो व्यूह रचला होता त्याची महाराजांना आठवण झाली असेल !

आगष्ट महिन्याच्या ९ व्या तारखेला जो राज्याभिषेक होणार होता, त्याला हजर राहण्यासाठीं महाराज आपल्या परिवारासह तारीख १ आगष्ट रोजीं लंडनला दाखल झाले. या ऐतिहासिक प्रसंगीं निरनिराळ्या प्रसंगांला अनुसरून महाराजांना जीं जीं कामें सांगण्यांत आलीं होतीं, तीं करून महाराज तारीख १४ आगष्ट रोजीं लंडनहून आपल्या राजधानीला येण्याकरितां निघाले. हा ऐतिहासिक प्रसंग इंग्लंडांतील लोकांना अनेक दृष्टीनें अपूर्व होता. हा ऐतिहासिक प्रसग महाराणी व्हिक्टोरियांच्या दीर्घकालिक अमदानीनंतर घडून आल्यामुळें व सातवे एडवर्ड बादशहांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं जगद्व्यापी साम्राज्याची स्पष्ट कल्पना जशी सर्व जगाला झाली, तशी यापूर्वीं कोणत्याहि दीर्घ अमदानीच्या इंग्लिश नृपतीच्या राज्यारोहणाच्या वेळीं झाली नसल्यामुळें हा प्रसंग विशेष संस्मरणीय असा होता.

महाराजांच्या विलायतेंतील प्रवासाविषयीं डॉ० टेंगसे यांनीं आह्मांस जी माहिती दिली आहे; ती वाचकांस मनोरंजक वाटेल अशी आशा आहे.

" हिंदी पद्धतीच्या स्वादिष्ट पदार्थांचे महाराज जरी भोक्ते नव्हते, तरी आपल्या परिवारांतील लोकांना त्यांना प्रिय असे हिंदी पद्धतीचें जेवण मिळावें ह्मणून महाराज विशेष काळजी घेत. आह्मांला हिंदी पद्धतीचे कांहीं पदार्थ मिळाले कीं नाहीं याची महाराज रोज चौकशी करीत. आमच्या प्रकृतीविषयीं महाराज सदा विचारपूस करीत असत; ही आह्मां सर्वांवर महाराजांची मोठी कृपात्र होती. दिवाणसाहेबांच्या व आमच्या सर्वांच्या प्रकृतीविषयीं ते विशेष काळजी घेत.

" कागलच्या चीफ साहेबांना अतिसाराची मोठी व्यथा उत्पन्न झाली. त्यांना होमिओपॅथिक पद्धतीनें ( Homeopathic ) औषध देण्याचें ठरलें व आह्मी नको नको ह्मणत असतांना देखील महाराज प्रत्येक दिवशीं रात्रीं दोन तीन तास चीफ साहेबांच्या शुश्रूषेसाठीं जागत बसत. "

मेहेरबान सबनीस दिवाण साहेबांनीं जी एक गोष्ट सांगितली आहे, तीवरून महाराज इंग्लंडमध्यें असते वेळीं महाराजांची शरीरयष्टी तेथील लोकांच्या नजरेंत कशी भरण्यासारखी होती हें स्पष्ट होतें. एका सामाजिक सम्मेलनाच्या वेळीं

इतरांप्रमाणें हस्तांदोलन करण्याच्या हेतूनें एक इंग्लिश स्त्री महाराजांविषयीं विचारपूस करीत होती. तिला या कामीं साहाय्य करण्याच्या हेतूनें दुसरी एक स्त्री पुढें येऊन मोठ्यानें ह्मणाली, " ती भव्याकृति तुह्मी ओळखूं शकत नाहीं काय ? ते पहा तेथें जे जे पहात आहेत त्या सर्वांचे जणूं ते स्वामीच आहेत, अशा पद्धतीनें महाराज चालले आहेत ! " हे शब्द ऐकून ती स्त्री लागलींच पुढें गेली आणि तिनें महाराजांशीं हस्तांदोलन केलें.

महाराजांच्या विलायतच्या प्रवासाशीं संबंध असलेली महत्वाची अशी गोष्ट ह्मटली ह्मणजे महाराजांनीं इंग्लंडहून पाठविलेला व तारीख २६ जुलैच्या कोल्हापूर संस्थानच्या गॅझेटमध्यें प्रसिद्ध झालेला ठराव होय. हा ठराव पुढील-प्रमाणें होता:—

" अलीकडे कोल्हापूर संस्थानमधील सर्व वर्गांच्या प्रजाजनांच्या शिक्षणाला उत्तेजन देण्याचे प्रयत्न करण्यांत आले आहेत. परंतु विशेष मागसलेल्या जातींत हे प्रयत्न अपेक्षेप्रमाणें फलद्रुप झाले नाहींत. या गोष्टीचा उल्लेख करतांना महाराजांना मोठा विषाद वाटत आहे. या गोष्टीचा पूर्णपणें विचार करून महाराजांचें असें मत झालें आहे कीं, या निराशेचें कारण उच्च शिक्षणाचीं पारितोषिकें विस्तृत रीतीनें विभागलीं जात नाहींत. ही परिस्थिति कांहीं अंशीं दूर करण्यासाठीं व संस्थानमध्यें महाराजांच्या प्रजाजनांना उच्च शिक्षण संपादण्यास उत्तेजन देण्यासाठीं या वर्गाकरितां आजपर्यंतच्या प्रमाणापेक्षां विस्तृत प्रमाणांत संस्थानच्या नोकरींत जागा राखून ठेवण्याचा महाराजांचा कृतनिश्चय झाला आहे.

" या धोरणाला अनुसरून या हुकुमाच्या तारखेपासून ज्या जागा मोकळया पडतील, त्यांपैकीं शेंकडा ५० जागा मागसलेल्या वर्गांतील उमेदवारांना देण्यांत येतील, अशी महाराजांची अनुज्ञा झाली आहे. ज्या ज्या ऑफिसांत मागसलेल्या लोकांचें प्रमाण हल्लीं शेंकडा ५० पेक्षां कमी आहे, त्या त्या ऑफिसांतील इत:पर मोकळी पडणारी जागा मागसलेल्या वर्गांतील इसमाला देण्यांत येईल.

" प्रत्येक खात्याच्या मुख्यांनीं या हुकुमानंतर भरलेल्या जागांचा तिमाही अहवाल सादर केला पाहिजे.

" या हुकुमाच्या अमलबजावणीसाठीं मागसलेले वर्ग ह्मणजे ब्राह्मण, प्रभु, शेणवी, पार्शी व इतर पुढारलेले वर्ग खेरीजकरून इतर सर्व जाती असें समजण्यांत येईल. "

सुमारें एकंदर ९,००,००० लोक संख्येमध्यें पुढारलेल्या वर्गांची लोक संख्या जास्तींत जास्त २६,००० होती. अर्थात अवशिष्ट लोकसंख्या ही मागसलेल्या वर्गांची होती. अशा अतिशय मोठ्या संख्येसाठीं शेंकडा ५० प्रमाणांत जागा राखून ठेवण्याची योजना किमान असून ब्राह्मणेतर वर्गांना असमाधानकारक अशी होती. न्यायाच्या दृष्टीनें पाहातां याहिपेक्षां मोठ्या प्रमाणांत या वर्गांकरितां जागा राखून ठेवणें युक्त होतें. वास्तविक पाहिलें असतां या ठरावानें ठरविलेलें प्रमाण अपुरें असल्यामुळें ब्राह्मणेतरांना या बाबतींत तक्रार करण्यास बरीच जागा होती. तथापि मागसलेल्या वर्गांच्या अपेक्षेपेक्षां त्यांचीं प्रगति थोडीशी धिमेपणानें व सावधगिरीनें झाली पाहिजे, असा महाराजांचा विचार असावा असें दिसतें. या ठरावामुळें या ठरावांत पुढारलेल्या जातींविषयीं जें औदार्य दाखविण्यांत आलें होतें त्याबद्दल त्यांनीं कृतज्ञ राहावयास पाहिजे होतें. परंतु याऐवजीं त्यांनीं या ठरावाचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें. " कोल्हापूरसंस्थानांतील ब्राह्मणांच्या सर्व प्रकारच्या जबाबदार आणि न्याय्य आकांक्षांना मूठमाती मिळाली. सर्व विचारी माणसांना जुन्या घराण्यांतील शुद्ध, उच्च मराठ्यांनासुद्धां वरील गोष्ट वाचून विषाद वाटत आहे. संस्थानांतील आद्य रहिवाशांमध्यें व जुन्या पिढीच्या प्रजाजनांमध्यें यामुळें असंतोष पसरेल. " " ब्राह्मणांचीं घरें धरणीकंप होऊन अगर विद्युत्पातानें जमीनदोस्त झालीं असतांना त्यांना जी भीति उत्पन्न झाली असती " त्याहिपेक्षां या ठरावानें ब्राह्मणांच्या मनांत अधिक भीति उत्पन्न झाली. याप्रमाणें ब्राह्मणांनीं जे वेडसर निरर्गल मनोविकार प्रगट केले, ते पाहून हंसूं आल्याखेरीज राहात नाहीं. या ठरावाचा स्पष्ट अर्थ असा होता कीं, मागसलेल्या वर्गांना उच्च शिक्षणाच्या बाबतींत उत्तेजन देण्याच्या हेतूनें संस्थानमधील हुद्यांच्या जागांपैकीं अर्ध्या जागा विशेषेंकरून मागसलेल्या वर्गांतील उमेदवारांना देण्यांत येतील. अर्थात उच्च शिक्षण मिळालेल्या उमेदवारांनाच पसंत करण्यांत येईल; असा या ठरावाचा अर्थ होता. आतांपर्यंत संस्थानच्या नोकरींत ज्या ब्राह्मणेतरांना प्रवेश मिळाला होता, त्यांनीं विश्वविद्यालयांतील शिक्षण संपादिलें असून त्यांची बुद्धिमत्ता उच्च

प्रतीची होती याबद्दल वाद नव्हता. तर मग ब्राह्मणेतरांना जें औदार्य दाखविण्यांत आलें, त्यामुळें जरूर अशा बौद्धिक गुणांकडे दुर्लक्ष करण्यांत आलें, अशी हांकाटी करण्याचें ब्राह्मणांना काय कारण होतें? अशा प्रकारच्या न्याय्य ठरावाविषयीं ब्राह्मणांनीं जें अकांड तांडव केलें त्यावरून संस्थानमधील आपलें वर्चस्व क्षय पावत आहे ह्मणून, ब्राह्मण किती घाबरट झाले होते हें मात्र स्पष्ट होतें. ब्राह्मणांच्या अभेद्य सत्तेवर ज्या ज्या गोष्टींमुळें गदा येण्याचा संभव होता त्या त्या गोष्टी मागसलेल्या जातींना किती जरी प्रिय असल्या तरी ब्राह्मणांना त्या अनर्थावह वाटत. संस्थानमधील नोकरींतील सत्तेचा योग्य अंश आपल्या पदरीं पडावा ह्मणून मागसलेल्या जातींनीं जी चळवळ चालविली होती तिचें स्वागत करण्यांतच शाहाणपणा होता; याची प्रचीति त्यांनीं आपल्या सारासार बुद्धीचा उपयोग केला असता तर त्यांना खास आली असती. महाराजांनीं या हुकुमांत ग्रथित केलेल्या धोरणाचा उपक्रम केल्यानंतर, सरकारी नोकऱ्या देण्याचे वेळीं जातवारीचें तत्त्व अमलांत यावें ह्मणून लोकांची मागणी एकसारखी वाढत आहे. महाराजांनीं जातवारीचें तत्त्व अमलांत आणिलें ह्मणून महाराजांवर जें वाक्प्रहार करण्यांत आले, तसे वाक्प्रहार जातवारी तत्त्वांच्या हल्लींच्या कट्टया द्वेष्टयांच्या हांतून सुद्धा आतां होणें शक्य नाहीं. आपल्या काळाच्या पुढें दूरवर नजर टाकून कार्य करणाऱ्यांचें नशीब नेहमीं अशाच प्रकारचें असतें. सामान्य प्रतीच्या माणसाच्या दृष्टीस गोचर न होणाऱ्या भावी परिस्थितीकडे महाराजांचें लक्ष जाऊन त्यांच्या दीर्घदृष्टीला समुद्राच्या हळूहळू पण खात्रीनें पुढें येणाऱ्या लाटांप्रमाणें मागसलेल्या वर्गांच्या जागृतीचीं चिन्हें स्पष्टपणें दिसूं लागलीं होतीं. लाटेला विरोध करून आपला शक्तिव्यय करावयाचा अगर तिचा ओघ नियोजित ठिकाणीं वळवावयाचा यापैकीं कोणती गोष्ट करणें या वेळीं महाराजांना युक्त होतें? मागसलेल्या वर्गांना-एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ९५ लोकांना-राज्यव्यवस्थेमध्यें योग्य स्थळ देणें हें योग्य कीं, ब्राह्मणांच्या मागण्या पूर्ण होईतोंपर्यंत त्यांना स्तब्ध राहण्यास सांगणें हें योग्य? असा प्रश्न त्यांच्यापुढें होता. जरूर अशा लायकीचे भरपूर लोक या वर्गांत नाहींत, ह्मणून टीकाकारांकडून बराच कांगावा केला जात असे. ही उणीव त्या वेळीं व आजहि कांहीं अंशीं खरी आहे; परंतु प्रस्थापित वर्चस्वाच्या जोरावर

सर्व अधिकाराच्या जागा व्यापून टाकणाऱ्या लोकांची तृप्ति होई-तोंपर्यंत मागसलेल्या वर्गांत जीं थोडीं लायक माणसें मिळण्यासारखीं होतीं, त्यांना तिष्ठत बसावें लागूं नये, असें प्रतिपादन करणाऱ्यांचें ह्मणणें यामुळें मुळींच खोटें पडत नव्हतें. संस्थानच्या नोकरींत ब्राह्मणांचें वर्चस्व माजलें असल्यामुळें मागसलेल्या जातींना स्वतःच्या प्रयत्नानें पुढें येणें केव्हांहि शक्य नाहीं. ह्मणून अधिकारांच्या जागांचा योग्य भाग त्यांना देण्याचें आश्वासन देऊन त्यांना सहाय्य करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें महाराजांच्या मनानें घेतलें होतें. शाळांतून व विश्वविद्यालयांतून बाहेर पडणाऱ्या ब्राह्मणेतरांतील सुशिक्षित तरूणांना प्रथम पसंती देण्याच्या धोरणाच्या यथायोग्य रीतीनें पुरस्कार केला तर यासारखा मागसलेल्या वर्गांना उच्च शिक्षण संपादण्याच्या कामीं उत्तेजन देणारा दुसरा यशस्वी उपाय सांपडण्यासारखा नव्हता. ध्येय गांठण्याच्या कामीं हें धोरण सर्वस्वीं बस्स होईल, असें कोणाचेंच ह्मणणें नव्हतें. शिक्षण व सार्वजनिक अधिकाराच्या जागा भरतांना ब्राह्मणेतर उमेदवारांना प्राधान्य देणें, या दोन्ही गोष्टी एकदम झाल्या पाहिजेत, याची जाणीव महाराजांना पूर्णपणें होती. ह्मणूनच १९०१ सालच्या प्रारंभीं विद्यार्थ्यांचें वसतिगृह सुरु केल्यानंतर लागलींच वरील हुकूम सोडण्यांत आला. महाराजांचे हे हेतु ब्राह्मणांना रुचण्यासारखे नव्हते. ह्मणून महाराजांना व महाराजांच्या सल्लागारांना ते शिव्या शाप देत सुटले. निदान या वेळीं सर उइलियम लीवॉर्नर (Sir William Lee Warner) यांनाहि महाराजांच्या सल्लागार मंडळांत ओढण्यांत आलें. या वेळीं हे लंडन येथें इंडिया ऑफीसमध्यें होते व महाराजांनीं हा हुकूम लंडनहूनच सोडला होता. हा शिव्याशापांचा वर्षाव कांहीं दिवस सुरु होता; परंतु पुढें थोड्याच दिवसांनंतर लोकांचे लक्ष छत्रपतिमहाराजांच्या प्रत्यागमनाकडे व त्यांचें योग्य असें स्वागत करण्याकडे वेधलें.

महाराज आगस्ट महिन्याच्या शेवटीं हिंदुस्थानांत दाखल झाले. महाराजांच्या तीन साडे तीन महिन्यांच्या गैरहजरींत कोल्हापुरांतील स्थिति अतिशय वाईट झाली असें ब्राह्मणांना स्वाभाविकपणें वाटलें. 'योग्यतेपेक्षां जातीला महत्त्व देणारा' असा ज्याविषयीं कांगावा केला जात होता अशा इंग्लंडहून सोडलेल्या महाराजांच्या हुकुमामुळें कोल्हापुरांत ब्राह्मणांच्या महत्त्वाकांक्षांना कायमची मूठमाती मिळाली, असें ब्राह्मणांचें ह्मणणें होतें. महाराजांच्या प्रत्यागमनाच्या समयीं महाराजांच्या कारभारी मंडळानें

राजोपाध्याचा तपासणी अर्ज फेटाळून लाविला; त्यावरून महाराज आपलें पूर्वीचें धोरण तसेंच पुढेंहि निश्चयानें चालविणार असें ब्राह्मणांनीं अनुमान काढिलें. तथापि विशाळगडच्या जहागिरदाराच्या अध्यक्षतेखालीं या जातीच्या पुढाऱ्यांनीं महाराजांच्या स्वागतप्रीत्यर्थ एक मानपत्र देण्याची चळवळ सुरू केली होती. या जहागिरदारानें राजोपाध्याच्या बेमुर्वत वर्तनाचा अगदीं आरंभापासून निषेध केला होता. दोन दिवसांनंतर ह्मणजे ४ आगस्ट रोजीं मराठयांनीं आपल्या जातीच्या लोकांची सभा भरवून आपल्या जातीतर्फे महाराजांचें स्वागत करण्याचा ठराव पास केला. मुसलमान व जैन लोकांनीं मराठयांचेंच अनुकरण केलें. ही सार्व जनिक बाब असूनहि यामध्यें जें जातिविशिष्टत्वाचें वारें शिरलें, यावरून ज्या त्या प्रसंगीं आपण सर्व जनतेचे प्रतिनिधी ह्मणून ब्राह्मण आजपर्यंत जे मिरवीत आले होते, त्या प्रवृत्तीला विरोध करण्याची ब्राह्मणेतरांमध्यें इच्छा उत्पन्न झाली होती हें सिद्ध होतें. ब्राह्मणांविरुद्ध ही जी प्रतिक्रिया सुरू झाली ती जातिविशिष्टत्व प्रस्थापित करण्याच्या नवीन युगाचा केवळ प्रारंभ होय. तारीख ३० आगस्ट रोजीं मुंबईच्या बंदरावर उतर-ल्यानंतर महाराजांनीं शेठ माणिकचंद यांच्या रत्नाकर पॅलेसमध्यें कांहीं तास मुक्काम केला. कोल्हापुरांतील सुंदर जैन वसतिगृह हें याच शेठ माणिकचंदांच्या औदार्याचें फळ होय. महाराजांना स्वागतपर अशीं पुष्कळ मानपत्रें मिळालीं व महाराजांचा पुष्कळ मान सन्मान होऊन, तारीख ३१ रोजीं सकाळीं ते कोल्हापुराला पोंचले. मिरज व कोल्हापूर यांच्या दरम्यान असलेल्या प्रत्येक स्टेशनावर संस्थानांतील प्रजा-जनांनीं महाराजांचें मोठया प्रेमानें स्वागत केलें. शेंकडा ५० प्रमाणांत जागा राखून ठेवण्याच्या ठरावाबद्दल हातकणंगल्याच्या म्युनिसिपालिटीनें महाराजांचें अभिनंदन प्रथम केलें. कोल्हापूरच्या स्टेशनला—यावेळीं तेथें पोलिसांचा विशेष बंदोबस्त होता—बडया दरबारचें स्वरूप प्राप्त झालें होतें. थोडया महिन्यांपूर्वी महाराजांच्या प्रयाणसमयीं स्टेशनच्या बाहेर लोकांची जशी चिकार गर्दी झाली होती तशीच या वेळींहि झाली होती. महाराज आपल्या सलूनमधून उतरतांच त्यांचा मोठया प्रेमानें जयजयकार करण्यांत आला. शहर म्युनिसिपालिटीनें महारा-जांना मानपत्र दिलें. या मानपत्राला योग्य असें उत्तर देऊन, महाराज सुंदर रीतीनें शृंगारलेल्या रस्त्यांतून व जयजयकार करणाऱ्या लोकांच्या गर्दीतून जुन्या राजवाडयाकडे निघाले. तेथें महाराजांनीं राजवाडयांतील देवता श्रीभवानी व नगरदेवता श्रीअंबाबाई यांना प्रणिपात केला. नंतर ते पंचगंगेच्या कांठा-

वरील आपल्या पूर्वजांच्या समाधींकडे निघाले. महाराज नवीन राजवाड्याला दाखल होईतोंपर्यंत पूर्ण चार तास लागले. महाराजांची ही प्रचंड मिरवणूक प्रजाजनांनीं केवळ स्वयंस्फूर्तीनें काढिली होती. "रविवारचा सकाळचा काळ कोल्हापुराच्या प्रजाजनांना सार्वजनिक महोत्सवाचा झाला. स्टेशनवर व महाराजांच्या बड्या मिरवणूकीच्या रस्त्यावर जी चिकार गर्दी झाली होती ती पाहून महाराजांना व इतरांना राज्यारोहण दिनाचें स्मरण झालें असेल!" ब्राह्मणांच्या मुखपत्रांतून महाराजांवर जी पराकाष्टेची टीका होत होती, त्याला कोल्हापुराच्या लोकांनीं जें प्रत्युत्तर दिलें तें समर्थ पत्राच्या या शब्दांतच ग्रंथित झालें आहे!

यानंतर त्याच आठवड्यांत निरनिराळ्या जातींनीं महाराजांचें दरबारी थाटानें स्वागत केलें. तारीख २ सप्टेंबर रोजीं मराठ्यांनीं प्रथम उपक्रम केला. आपलें उत्तमप्रकारें स्वागत केल्याबद्दल मराठ्यांचे आभार मानून मानपत्राला प्रत्युत्तरादाखल महाराज ह्मणाले:—

"या थोड्याशा अवधींत माझ्या मनावर जो कायमचा परिणाम झाला त्यामुळें माझी ब्रिटिश सिंहासनाविषयीं कृतज्ञता व सम्राट् सातवे एडवर्ड यांच्या विषयींचें माझें प्रेम व निष्ठा हीं द्विगुणित झालीं आहेत. बादशहांशीं प्रत्यक्ष मुलाखतीचा बहुमान मला मिळाला. बादशहांच्या दयाळु छत्राखालीं सुखसमृद्धीची वृद्धि होऊन भाग्यवान् इंग्लंडच्या अनुग्रहांचा फायदा अखिल ब्रिटिश साम्राज्याला मिळेल.

"मराठ्यांची अलीकडे जी प्रगति होत आहे, तिचें मीं मोठ्या उत्सुकतेनें निरीक्षण केलें आहे. आपली बौद्धिक जागृति करून घेण्याची या जातीला जी स्तुत्य स्फूर्ति उत्पन्न झाली आहे, तिचेंच मराठा शिक्षण संस्था, हें एक नामी फळ आहे यांत शंका नाहीं. इतिहासामध्यें गतकालीन मराठ्यांची प्रतापशालीं कृत्यें नमूद आहेत. करितां सभ्यगृहस्थहो! तुह्मी आंखलेल्या मार्गांनीं जर धिमेपणानें प्रगति कराल तर तुह्मांला पुढें उत्तम दिवस प्राप्त होतील याची मी आपणांस ग्वाही देतों."

ब्राह्मणमय राजाराम क्लबनें जें मानपत्र दिलें तें एका प्रकारें महत्त्वाचें होतें. अपेक्षेप्रमाणें या क्लबनें आपल्या जातिभेदभावविरहितत्वाची स्तुतिस्तोत्रें गाइलीं. ज्यांनीं अशाप्रकारच्या विचारसरणीचें अवलंबन केलें होतें, त्यांच्याच पक्षांत

महाराजांनीं तीच विचारसरणी मोठ्या शिताफीनें पुढील प्रमाणें परत कोंबली:—

" ज्ञानाच्या सामान्य झऱ्याचें पाणी आह्मी पीत असल्यामुळें, उदय पावलेल्या नवीन शैक्षणिक भ्रातृत्वाच्या जोरावर जुने जातीभेद लय पावत आहेत, असें जें आपण ह्मटलें, तें मला अतिशय पटलें. शिक्षणाचें महत्त्व समजून येऊन विस्तृत प्रमाणावर शिक्षणाचा प्रसार झाल्याखेरीज, अशा प्रकारचे भेदभाव नष्ट होणार नाहींत. आणि हाच हेतु साध्य करण्यासाठीं माझा सतत प्रयत्न आहे. निरनिराळ्या जातींच्या शैक्षणिक प्रगतींत जोंपर्यंत अशा प्रकारचें महदंतर आहे, तोंपर्यंत पुष्कळ दिवसांचे भेदभाव नष्ट करण्याचे सर्व औपचारिक प्रयत्न निष्फलच होणार; ह्मणून या दिशेनें मी ज्या उपायाचें अवलंबन केलें आहे, त्यांकडे अशाच दृष्टीनें आपण पाहाल, अशी माझी खात्री आहे. "

'जनतेच्या' मानपत्राला महाराजांनीं जें उत्तर दिलें त्यांत इंग्लंडमध्यें आपल्या झालेल्या स्वागताचा जो उल्लेख केला तो येथें उद्धृत करण्या-सारखा आहे:---

" इंग्लंडमध्यें माझें स्वागत खरोखर मोठ्या प्रेमानें करण्यांत आलें. इंग्लंडमध्यें मी ज्या ज्या ठिकाणीं गेलों त्या त्या ठिकाणीं माझ्याशीं लोकांकडून जें एकसारखें सभ्यपणाचें व प्रेमाचें वर्तन झालें, त्याबद्दलची माझी कृतज्ञता मला यथार्थ प्रकारें व्यक्त करितां येणार नाहीं, अशी मला शंका वाटते. केंब्रीजच्या नामांकित विश्वविद्यालयानें व तत्सदृश सुप्रसिद्ध संस्थांनीं माझा जो सन्मान केला त्याची महति मला अतिशय वाटते; परंतु तुह्मीं आपल्या मानपत्रांत ज्यांना यथार्ह महत्त्वाचें स्थान दिलें आहे, असे प्रख्यात मुत्सद्दि लॉर्ड जार्ज हॅमिल्टन यांनीं माझा जो मोठा सत्कार केला त्याचें महत्त्व मी अतिशय मानतों.

" या सत्काराचा जरी मला खरोखरच मोठा अभिमान वाटतो, तरी ज्यांच्या मृत्यूमुळें सर्वांना हळहळ वाटली असे माझे प्रिय वडील कोल्हापूरचे माजी रीजंटसाहेब यांची शेवटची इच्छा इंग्लंडला प्रयाण करून मला पूर्ण करितां आली, ही गोष्ट कोणत्याहि प्रकारें कमी आल्हाददायक नाहीं. तेथील पुष्कळशा सार्वजनिक संस्था मीं प्रत्यक्ष पाहिल्या व तेथील सार्वजनिक व राजकीय सभांना हजर राहाण्याची संधि मला मिळाली. या सर्व गोष्टींमुळें इंग्लिश लोकांविषयीं मला अतिशय आदर व कौतुक वाटतें. जेथें जेथें तुह्मी

दृष्टि फेंकाल तेथें तेथें, कडक शिस्त, व्यवहारयोग्य गुण, चोख प्रामाणिकपणा, सत्याची व न्यायाची आवड, स्वार्थत्यागपूर्वक सार्वजनिक कार्य करण्याची हौस, पराकाष्ठेची चिकाटी व परक्या लोकांशीं पराकाष्ठेचें दाक्षिण्य हे गुण दृष्टोत्पत्तीस आल्याखेरीज राहणार नाहींत. हे सद्गुण इंग्लिश गृहस्थांच्या सद्वर्तनाचे आधारस्तंभ असून, इंग्लंडनें जगांत जें विलक्षण यश संपादिलें आहे, त्याचे ते मर्मनिदर्शक होत. इंग्लंडमधील सार्वजनिक भव्य इमारती, सुंदर पटांगणें, व बागबगीचे, भूगत रेल्वे व बोगदे, भव्य पूल मोठमोठे कारखाने, गर्जना करणाऱ्या आगगाड्या व वाहनें, भव्य पदार्थ संग्रहालयांत गोळा करून ठेवलेली विपुल संपत्ति व कित्येक शतकांच्या कुबेरांनीं व हावर्ड विलबरफोर्स सारख्या गृहस्थांनीं संस्थापिलेल्या परोपकारी संस्थांनीं राष्ट्राला मेहेरनजर केलेल्या कलाकुसरींच्या कामांचा व इतर विस्मयजनक गोष्टींचा संग्रह हीं या सद्गुणांचीं दृश्यरूपें होत. माझ्या मनावर जे परिणाम घडले व माझ्या मनांत ज्या भावना उद्भूत झाल्या, त्यांचें वर्णन या छोट्याशा उत्तरांत मी अंशत:देखील करूं शकत नाहीं. इंग्लंडमध्यें मला आणखी थोडे दिवस राहतां आले असते तर बरें झालें असतें, असें मला वाटतें; परंतु माझ्या संस्थानांत डोकावूं पाहणाऱ्या दुष्काळाच्या व प्लेगाच्या भीतीनें मला अधिक दिवस तेथें राहतां आलें नाहीं, तथापि या दोन्ही आपदा क्षणिक कां होईना दूर झाल्या आहेत; व हल्लींच्या आनंदाच्या प्रसंगांना भविष्यकाळच्या चिंतेचें गालबोट लागलें नाहीं हें मी मोठें भाग्य समजतों.''

परंतु अशाच प्रकारच्या दुसऱ्या चिंताजनक गोष्टी महाराजांपुढें उभ्या होत्या. व त्यांना तोंड देणें महाराजांना भाग होते. या गोष्टींमुळेंहि महाराजांना कोल्हापुराला लवकर परत येणें भाग झालें. या गोष्टीचा जरी महाराजांनीं कोठें उल्लेख केला नाहीं, तरी ती महाराजांनीं उल्लेख केलेल्या कारणांइतकीच खरी होती, यांत शंका नाहीं.



## प्रकरण १२ वें.

# श्रीशंकराचार्य—मठ.



वेदोक्त प्रकरण ऐन रंगांत आलें असतांना, कोल्हापुरांतील श्रीशंकराचार्य—स्वामींच्या सुप्रसिद्ध मठाचें इनाम १९०३ सालच्या मार्च महिन्यांत जप्त करणें महाराजांना भाग पडलें. यामुळें स्वामीला दांतीं तृण धरण्यास लावून त्याजकडून आपलें क्षत्रियत्व कबूल करविण्यासाठीं महाराजांनीं या जालीम उपायाचें अवलंबन केलें, अशी सहाजिकपणें लोकांची समजूत झाली. परंतु वस्तुत: याहिपेक्षां अधिक महत्त्वाच्या एका प्रश्नाचा या प्रकरणांत निर्णय व्हावयाचा असून, दरबारच्या खंबीरपणाची व धैर्याची या प्रकरणांत परीक्षा व्हावयाची होती. या बाबतींत महाराजांनीं जे मार्ग स्वीकारिले होते, त्यांचें यथार्थ आकलन होण्यासाठीं मठाची मूलस्थिति व त्याचें हल्लींचें स्वरूप याचें थोडेसें विवेचन होणें जरूर आहे.

हिंदुस्थानांत् बुद्धधर्माचा लय होऊन पुनरुज्जीवित झालेल्या आधुनिक हिंदुधर्माचे पुढारीपण ब्राह्मणवर्गाचे हातीं येण्यापूर्वी, जातीजातींमध्यें, व्यक्ति व्यक्तींमध्ये आणि समाजामध्यें जे धार्मिक व सामाजिक तंटे उपस्थित होत, त्यांचा निर्णय नृपतीकडूनच होत असे. शंकराचार्य यांनीं ब्राह्मणांना अग्रस्थान देऊन, पौराणिक हिंदुधर्म जेव्हां प्रस्थापित केला, तेव्हां त्यांनीं चार मठांची स्थापना करून, सामाजिक सुव्यवस्था घडवून आणली असें ह्मणतात. त्या वेळीं घडवून आणिलेल्या समाज व्यवस्थेच्या यंत्राला गति देण्याचें कार्य शंकराचार्यांनीं या मठांकडे सोपविलें. या मठांवर आरूढ होणाऱ्या आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें सर्व धार्मिक प्रश्नांचा निकाल व्हावयाचा, अशी सर्व साधारण समजूत होती. या स्वामींच्या ताम्रपट अधिकारास मूळाधार मानलेल्या मठाम्नाय नामक पुस्तकांत असें ह्मटलें आहे कीं, ‘ पृथ्वीपति ’ ह्मणून नृपति जसा करभार घेतात, तद्वतच मठाधिपतींना धर्माच्या जोरावर करभार वसूल करितां येतो. याच ग्रंथांत पुढें

असें ह्मटलें आहे कीं, आचार्यांनीं केलेल्या शासनामुळें पापी देखील पापमुक्त होऊन स्वर्ग सौख्य अनुभवूं शकतात. स्वामीचा शासनाधिकार ह्मणजे दंड करून पैसा वसूल करणें होय. या हक्कांच्या समर्थनार्थ आद्य शंकराचार्यांनीं मनूचे व गौतमाचे आधार दिले आहेत. हे दोघे प्राचीन ऋषी असून, त्यांनीं नृपति व आचार्य हे दोघे सारखेच पाप्याला त्याच्या पापापासून मुक्त करूं शकतात, असें स्पष्ट लिहून ठेविलें आहे. परंतु धर्म, आचार आणि प्रायश्चित्त या संबंधींच्या सर्व प्रश्नांचा निर्णय करण्याचा अधिकार एकट्या आचार्यालाच आहे, असा सिद्धांत शंकराचार्यांनीं ठोकून दिला आहे. राजालाहि तोच अधिकार आहे हें आचार्यांच्या लक्षांत मुळींच राहिलें नाहीं! दक्षिणेकडे मलप्रभा व उत्तरेकडे हिमालय यांच्या दरम्यानचा प्रांत आपलें अधिकार क्षेत्र आहे, असें कोल्हापूर मठाचे स्वामी अद्यापि ह्मणतात. आठव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंतच्या काळांतील हिंदु नृपतींनीं सामाजिक व्यवस्थेमध्यें दुय्यम स्थान स्वीकारून जी घोडचूक केली व मुसलमान लोकांनीं हिंदुस्थान पादाक्रांत केल्यामुळें पुढें क्षत्रियांना जें दौर्बल्य प्राप्त झालें त्यामुळें, क्षत्रियांचें धार्मिक व सामाजिक अधिकारक्षेत्र आकुंचित होत गेलें आणि मठाम्नायांतील ब्राह्मणी अधिकाराला आरंभीं नसलेलें सत्यत्व प्राप्त झालें. शिवाजीच्या वेळीं मराठा क्षत्रियांचें जेव्हां पुनरुज्जीवन झालें, त्यावेळीं अशारीतीनें प्रस्थापित झालेल्या गोष्टी ढांसळून पाडण्याचे प्रयत्न करण्यांत आले; व या ब्राह्मणी मठांचें अधिकारक्षेत्र लौकरच संपुष्टांत येईल असेंहि कांहीं काळ भासत होतें. मराठा साम्राज्याचा ऱ्हास, पेशव्यांच्या अमलाखालीं ब्राह्मणी सत्तेचा उदय व पुढें ब्रिटिशांच्या हातून तिची झालेली समाप्ति, आणखी ब्रिटिशांची धार्मिक बाबतींतील तटस्थ वृत्ति, त्यामुळें अगोदरच प्रबळ झालेल्या या ब्राह्मणी संघटनेला अधिकच बळकटी प्राप्त झाली, व मठांचें महत्त्व वाढलें. थोरल्या शाहुमहाराजांच्या अमदानींत प्रभु लोकांसंबंधीं जो वाद उपस्थित झाला होता, त्याचा निर्णय करण्यासाठीं ब्राह्मणांनीं शाहुमहाराजांना विनंति केली होती. परंतु पेशव्याच्याठिकाणीं जेव्हां ब्रिटिश आले, तेव्हां पूर्वींची परिस्थिति पालटली. ही नवीन वरीष्ठ सत्ता जातिविशिष्ट प्रश्नांमध्यें हात घालण्यास तयार नसल्यामुळें, सांगलीकरांच्या नेतृत्वाखालीं ब्राह्मण मंडळी कोल्हापूरच्या छत्रपतीला बाजूस सारून ती कोल्हापूरच्या शंकराचार्यांकडे गेली. इंग्रज सरकारच्या तटस्थवृत्तीमुळें या बाबतींत व पुष्कळ इतर गोष्टींत ब्राह्मणांना अपूर्व संधि मिळाली. या नंतरच्या काळांत त्यांनीं या

संधीचा चांगलाच फायदा घेतला. ब्रिटिश न्यायकोर्टापुढें जेव्हां जातिविशिष्ट प्रश्न उद्भवत असत, तेव्हां ते प्रश्न सोडविण्यासाठीं त्यांना त्यांचे निर्णय लोकमान्य होऊं शकतील अशी हिंदी स्वरूपाची संस्था अवश्यच भासली असली पाहिजे. न्यायपीठावर आरूढ होणाऱ्या ब्रिटिश अधिकाऱ्यांना प्राचीनकाळीं हिंदुसमाजाची वाढ कशी झाली व फक्त राजशासनाची गोष्ट खेरीज करून, हरएक बाबतींत प्रत्येक जातीला पूर्ण स्वायत्तता कशी प्राप्त झाली होती, या गोष्टीचें ज्ञान नव्हतें. यामुळें ब्राह्मणी वाङ्मय हेंच काय तें वाङ्मय, ब्राह्मणांकडून शास्त्रांचें झालेलें विवरण तेंच प्रमाण, ब्राह्मणांनीं चालू केलेला कायदा तोच सर्वमान्य कायदा, व जातिविशिष्ट प्रश्नांत ब्राह्मणांनीं दिलेलें निर्णय तेच अखेरचे निर्णय, अशी त्यांची समजूत झाली. गेल्या शतकांत ब्रिटिश सरकारनें ग्रहण केलेल्या या समजुतीमुळें काय अनर्थ ओढवले, हें सविस्तर दाखविण्याचें हें स्थळ नव्हे. मात्र ज्या ब्राह्मणी संस्था मरणोन्मुख झाल्या होत्या, त्यांना पूर्वीं कधींहि प्राप्त न झालेली सत्ता यामुळें प्राप्त झाली एवढें येथें सांगितलें ह्मणजे पुरें होईल. प्राचीन काळीं हे मठ ह्मणजे केवळ विद्यापीठें होतीं. ब्राह्मणांचें वर्चस्व वृद्धिंगत झाल्यामुळें क्षत्रियांमध्यें जी मानसिक गुलामगिरी उत्पन्न झाली, तिचा फायदा घेऊन, या मठांचें हें मूळ स्वरूप बदलण्यास प्रारंभ झाला. ब्रिटिश न्यायाधीशांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन, न्याय खात्याशीं संबंध नसलेल्या गोष्टींत न्यायप्रवर्तक ह्मणून स्वतःचें बस्तान या मठाधिपतींनीं घट्ट बसविलें. भाविक हिंदु राजांनीं व इतरांनीं या मठांना बरींच उत्पन्नें दिलीं असल्यामुळें, हे स्वामी भाविक हिंदु समाजापुढें मोठ्या डामडौलानें मिरवून, नृपसत्तेचा डौल आणूं लागले. अतिशय सुशिक्षित ब्राह्मण देखील यांच्या गूढ सत्तेला बळकटी आणण्यासाठीं त्यांच्यापुढें न्याययाचना करीत. रानडे व टिळक यांच्या सारखे लोक देखील कोल्हापूर स्वामींच्या कोर्टांत स्वपक्षांचें समर्थन करण्यासाठीं एकावेळीं हजर झाले होते, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. जेव्हां कोल्हापुरामध्यें वेदोक्त प्रकरण उपस्थित झालें तेव्हां या मठाचें वैभव व सत्ता इतक्या जोरांत होती.

परंतु ही ह्या प्रश्नाची एक बाजू झाली. प्राचीनकाळीं हे मठ ह्मणजे खरोखरच विद्यार्जनाचीं मोठीं केंद्रें होतीं. परंतु वास्तविकपणें स्वामी, त्यांचें पूर्वींचें कुंटुंब, स्नेही व आश्रित यांच्या चैनीचीं हीं ठिकाणें आज बनलीं आहेत.

मिलवडीकर नांवाचे एक गृहस्थ १९०१ च्या सुमारास शंकराचार्य होते. मिलवडीकराच्या पूर्वी जे चार शंकराचार्य झाले, त्यांचा या शंकराचार्यांच्या घराण्याशीं अतिशय निकट संबंध होता. अशा प्रकारें मठाची बडी इस्टेट जणूं एका घराण्याची वडिलार्जित मिळकतच बनली होती. मिलवडीकर स्वामींचे एक बंधु व त्यांचा कारभारी यांच्यामध्यें तंटा उपस्थित होऊन कोल्हापूर दरबारला व बेळगांव कलेक्टरला, या भानगडीचा निकाल करावा अशी विनंति करण्यांत आली. दोघांनाहि या बाबतींत हात घालतां आला असता. मठाच्या इस्टेटीची उघडपणें नागवणूक चाललेली होती, असें पुढें लौकरच दृष्टोत्पत्तीस आलें. परंतु तटस्थ वृत्तीच्या धोरणामुळें — ' सार्वजनिक फंडाची अफरातफर करण्याची मुभा, अशी या धोरणाची यथार्थ व्याख्या करतां येईल — या तंट्याच्या निर्णयाचें काम बेळगांवच्या कलेक्टरकडून स्वामीवरच सोंपविण्यांत आलें. कोल्हापूर दरबारनें या प्रश्नाकडे निराळ्या दृष्टीनें पाहिलें. कारण या मठाचे विलासी स्वामी उपभोगीत असलेल्या उत्पन्नाचा बराचसा भाग कोल्हापूर दरबारकडूनच देणगीदाखल दिलेला होता. या मठाचें जमीनीचें उत्पन्न सालिना ५०,००० पेक्षां अधिक असूनहि या वेळीं हा मठ कर्जांत बुडून गेला होता. लोकांच्या अर्जांवरून करवीर दरबारनें केलेल्या चौकशीचे अंतीं अनेक विलक्षण गोष्टी उघडकीस आल्या. मठाच्या मालकीच्या जागा स्वामींच्या मुलांना घरें बांधण्याकरितां देण्यांत आल्या होत्या. ज्या सुतारानें या मुलांसाठीं घरें तयार केलीं, त्याला मजूरी ह्मणून मठांतील धर्मकार्यासाठीं लोकांनीं दिलेल्या जमिनी बक्षीस देण्यांत आल्या होत्या. पितळेचीं भांडीं, लुगडीं व इतर मौल्यवान् कपडे, मुलांचे खाण्याचे पदार्थ, स्त्रियांचे दागिने व मुलांचीं घड्याळें हे सर्व जिन्नस स्वामीच्या मुलांमुलींसाठीं व सुनांजांवयांसाठीं मठाच्या उत्पन्नांतूनच खरेदी केले जात असत. स्वामीच्या मुलींकरितां खरेदी केलेल्या सोन्याच्या बांगड्यांची किंमत, स्वामीच्या सुनांच्या गर्भाधानाप्रीत्यर्थ केलेला खर्च व या गर्भाधानापासून जन्मास आलेल्या मुलांच्या मौंजीबंधनाप्रीत्यर्थ झालेला खर्च इत्यादि खर्चाच्या बाबी मठाच्या जमाखर्चाच्या वहींत नमूद असत. मठांत खरेदी झालेल्या कोणत्याहि जिनसांची यादी कोठेंहि ठेवण्यांत येत नसे. ही रंगेल मुलें सोन्यारुप्याच्या मौल्यवान् वस्तू व रेशमी कपडे मठांतून नेहमीं लांबवीत असत. या वस्तू विकत घेऊन देण्याकरितां जेव्हां मठाच्या तिजोरींत पैसा

नसे, तेव्हां कर्ज काढूनहि त्यांची हौस पूर्ण करण्याची मठाची तयारी असे. स्वामीच्या एका मुलापाशीं तसलमात ह्मणून दिलेल्या ८,००० पेक्षांहि अधिक रकमेचा निकाला १८९५ सालीं 'नुकसान' या सदराखालीं करण्यांत आला ! या प्रासंगिक देणग्यांनीं स्वामीच्या नातलगांची तृप्ति होत नसे, ह्मणून या दानशूर स्वामीनें त्यांना मासिक नेमणुका करून दिल्या होत्या. ही उधळपट्टी कदाचित् उघडकीस येईल ह्मणून स्वामीच्या प्रत्येक मुलाचें अगर भावाचें आडनांव अगदीं भिन्न ठेवण्याची खबरदारी घेण्यांत येत असे. केव्हां केव्हां एकच मुलगा दोन भिन्न उपनांवें धारण करून दोन देणग्या उपटीत असे ! हीं उपनांवें केव्हां जोशी केव्हां भिलवडीकर केव्हां ज्योतिषि तर केव्हां बुवा व गोसावी अशीं असत. अशा प्रकारें या मठाच्या मोठ्या इस्टेटीचा पूर्णपणें उपभोग घेऊन हिंदु धर्माचा मुख्य गुरु व वेदांत तत्त्वज्ञानाचा प्रचारक भिलवडीकर स्वामी हा आतां वृद्ध झाला असल्यामुळें त्याच्या गादीवर कोणास बसवावें, हें ठरविण्याची वेळ समीप येत चालली होती; ह्मणून स्वामीनें मृत्युपत्र करण्याची गडबड करून आपल्या तीन मुलांना शंभर शंभर रुपयांचीं वर्षासनें करून दिलीं.

सन १९०० च्या सालअखेरीला या सर्व गोष्टी महाराजांच्या निदर्शनास आल्या. शक्य तितकें करून एकाएकी कडक मार्गाचें अवलंबन करण्याचा प्रसंग येऊं देऊं नये ह्मणून महाराजांनीं स्वामीला एकदां सूचना दिली. परंतु याचा कांहीं उपयोग न होतां उलट यामुळें दरबारापासून आपण स्वतंत्र आहों, असा हक्क प्रतिपादण्याचा स्वामीला मोह उत्पन्न झाला. यापूर्वीं कितीतरी दिवस अगोदर ह्मणजे १८६३ सालच्या आगस्ट महिन्यांत, संस्थानच्या देणग्या उपभोगणाऱ्या सर्व मठांच्या बाबतींत, अधिकारी शिष्यांची नेमणूक करण्याच्या अगोदर त्याला महाराजांची मंजुरी घेतली पाहिजे, असा कोल्हापूर दरबारनें ठराव केला होता. परंतु बहुतेक मठांच्या धर्मगुरूंची अशा बाबतींत नेहमींची वहिवाट ह्मणजे मरणोन्मुख स्वामी या धर्मादाय इस्टेटींतून आपल्या आप्तसोयऱ्यांना मिळणाऱ्या देणग्या तशाच कायम राहाव्या या अंत:स्थ हेतूनें आपल्या नातलगांपैकींच शिष्य नेमीत असत. शिष्याची निवड योग्य प्रकारें झाली आहे किंवा नाहीं, मठाच्या स्वामीनें मठासंबंधीं आपलीं कर्तव्यें प्रामाणिकपणानें केलीं आहेत किंवा नाहींत, हें पाहण्यासाठीं व यदाकदाचित् एखाद्या नालायक इसमाची निवड झाली असलीं तर ती रद्द करून, त्याच्या

ठिकाणीं लायक शिष्य नेमण्याचा न्यायकोर्टांना पूर्ण अधिकार आहे, हें तत्त्व सर्व हिंदी संस्थानांना मान्य झालें आहे. ब्राह्मणी नेतृत्वाखालीं असलेल्या म्हैसूर सरकारनें आपल्या संस्थानांतील मठांच्या नियंत्रणाच्या बाबतींत कोल्हापूर दरबारापेक्षांहि अतिशय कडक निर्बंध घातले आहेत. ब्रिटिश सरकार हें परकीय असल्यामुळें हिंदुस्थान सरकारनें या बाबतींतील आपले हक्क जरी गमाविले असले तरी ब्रिटिश न्यायकोर्टांनीं अशाच तऱ्हेचे हक्क प्रतिपादून त्याप्रमाणें अम्मलबजावणीहि केली आहे. हिंदुस्थानसरकार अशा बाबतींत मठांसारख्या धार्मिक संस्थांना मनमुराद वागूं देतें हें खरें आहे. तथापि या मठांच्या गादीवर आरूढ होणाऱ्या हिंदुस्वामींच्या बाबतींत यापेक्षां अधिक कडक धोरण स्वीकारण्यास हिंदी संस्थानिकांना कोणतीच हरकत दिसून येत नाहीं; म्हणून आपल्या संस्थानांतील शंकराचार्यांच्या गादीवर आरूढ होऊं पाहणाऱ्या शिष्याची जेव्हां भिलवडीकर स्वामीनें योजना केली, तेव्हां या बाबतींत हात घालण्याचा महाराजांनीं निश्चय केला.

कोल्हापुरास आपल्या योजना यशस्वी होणार नाहींत, हें लक्षांत घेऊनच भिलवडीकर स्वामी संकेश्वर मठांत जाऊन राहिला. व तेथून ब्रह्मनाळकर या नांवाच्या गृहस्थाशीं वाटाघाट सुरू करून, त्याला तारीख २३ फेब्रुआरी १९०३ रोजीं शिष्य केला. या निवडीला स्वामीनें महाराजांची मंजुरी मिळविली नव्हती. मात्र ब्रह्मनाळकराची शिष्यपदावर योजना करण्यापूर्वी त्यानें कांहीं पटवर्धन संस्थानिकांचा सल्ला घेतला होता. परंतु आपल्या संस्थानांत यापूर्वींच ब्राह्मणेतर धोरणाचा पुरस्कार करणाऱ्या "शूद्र" नृपतीचा सल्ला घेणें हें त्याला अतिशय वावडें वाटलें. निवडलेला शिष्य हा एक खंबीर दिलाचा ब्राह्मण असून त्यानें यापूर्वींच टिळकासारख्या पुढारी ब्राह्मणाची मर्जी संपादली होती. कोल्हापूर दरबारला हें एक प्रकारचें आव्हानच होतें. गादीवर लायक इसम बसविण्याची खबरदारी घेण्यासाठीं शिष्याची निवडणूक करण्याच्या बाबतींत हात घालण्याचा दरबारचा हक्क अशा प्रकारें उघडपणें अमान्य करण्यांत आला. महाराजांना ही बातमी समजतांच भिलवडीकराची ही शिष्ययोजना त्यांनीं नामंजूर केली. भिलवडीकरानें आतां अधिकारत्याग केला असल्यामुळें त्याचा मठाच्या इस्टेटीवर कोणत्याहि प्रकारचा हक्क राहिला नाहीं. अर्थातच योग्य प्रकारें नवीन स्वामीची योजना

होई तोंपर्यंत या मठाचें उत्पन्न जप्त करून ठेवावें लागलें. ही गोष्ट १९०३ सालच्या मार्च महिन्यांत घडली.

१९०३ सालच्या मे महिन्यांत महाराज आपल्या परिस्थितीचें पुढीलप्रमाणें वर्णन करितातः—

" मागच्या पत्रांत ब्राह्मणांसंबंधीं वर्णन देऊन मीं आपणास तसदी दिली नाहीं. आपण या बाबतींत जो तर्क केला आहे तो खरा असता तर मला आनंद झाला असता. वस्तुतः आणखी एक प्रश्न उपस्थित होऊन येथें बरीच खळबळ उडाली आहे. तो प्रश्न म्हटला म्हणजे नवीन जगद्गुरूला मीं मंजुरी दिली नाहीं, हा होय. या प्रकरणासंबंधीं सर्व हकीकत मी आपणांस लौकरच निवेदन करीन. त्यावरून त्याचें वर्तन दरबारशीं अत्यंत अपमानकारक असें घडलें आहे, असें आपणास दिसून येईल. जगद्गुरु हा मठाचा केवळ संरक्षक असल्यामुळें, त्याला मठाची इस्टेट गहाण घालतां अगर बक्षिस करून देतां येत नाहीं; असें असूनहि यानें या दोन्ही गोष्टी केल्या आहेत. अशा प्रकारच्या अनिष्ट गोष्टी घडूं नयेत म्हणून म्हैसूर दरबारनें ज्याप्रमाणें शृंगेरी स्वामीच्या निवडणुकीच्या बाबतींत—हे स्वामी या मठाच्या स्वामीपेक्षांहि अतिशय श्रेष्ठ समजले जातात—आपला अधिकार गाजविला, तद्वतच शंकराचार्यांच्या गादीवर आरूढ होऊं पाहाणाऱ्या व्यक्तीच्या निवडणुकीवर नियंत्रण ठेवणें दरबारला इष्ट वाटलें. हा स्वामी या बाबतींत स्वतः कांहींच करूं इच्छीत नाहीं असें मी ऐकतों; परंतु आपण मागें राहून सर्व महाराष्ट्रामध्यें चळवळ सुरू करून अप्रत्यक्षपणें माझ्यावर दडपण घालण्याचा त्याचा बेत दिसतो. पुण्याचे ना० हे अर्थातच पुढील दोन कारणांस्तव त्याला मदत करतील. पहिलें कारण हें आहे कीं, ते याचे धनको असून अर्थात त्याच्या ताब्यांतून गहाण असलेला गांव निघून जाईल, कारणे स्वामी हा केवळ ट्रस्टी या नात्यानें आपल्या इस्टेटीचा केवळ वहिवाटदार आहे ही गोष्ट ते जाणून आहेत. दुसरें कारण हें आहे कीं, ज्या धार्मिक सत्तेवर त्याचें अप्रत्यक्षपणें नियंत्रण आहे ती धार्मिक सत्ता त्याच्या हातांतून निघून जाईल. विशेषतः टिळक व नातूपक्षाच्या हातांतून धार्मिकसत्ता निघून जाण्याचा संभव असल्यामुळें प्रस्तुतच्या प्रकरणानें ब्राह्मण समाजामध्यें अधिक असंतोष पसरला आहे."

उपरिनिर्दिष्ट मार्गानें जगद्‌गुरु जात असतांना, महाराजांच्या पक्षाचा पुरस्कार केल्यामुळें ज्यांना आपल्या ज्ञातीकडून अतिशय त्रास सहन करावा लागत होता, अशा कांहीं ब्राह्मणांनीं वेदोक्ताचा प्रश्न निर्णयासाठीं मठाच्या स्वामीकडे पाठविला. ब्रह्मनाळकराची निवडणूक करण्याच्या बाबतींत इतर कांहीं गोष्टी कारणीभूत झाल्या असल्या तरी छत्रपति हे क्षत्रियत्वाच्या अधिकाराला पात्र नाहींत असें जें त्याचें मत होतें, तेंच यांत विशेष महत्त्वाचें कारण होतें. त्या काळीं समाजापुढें प्रामुख्यानें असलेल्या सामाजिक प्रश्नाविषयीं त्याचें अशा प्रकारचें धोरण पाहून महाराष्ट्रांतील ब्राह्मण–समाज त्याला डोक्यावर घेऊन नाचूं लागला. स्वामीच्या ताब्यांतून कोल्हापूरच्या मठाचें उत्पन्न जरी गेलें असलें तरी अद्यापि संकेश्वर मठाचें उत्पन्न स्वामीच्या ताब्यांत होतें; कारण हें उत्पन्न ब्रिटिश मुलखांत असून अशा प्रश्नाच्या बाबतींत ब्रिटिश सरकारचें वर्तन अतिशय निष्काळजीपणाचें होतें. तथापि या उत्पन्नापासून ब्रह्मनाळकराला कांहींच फायदा होण्यासारखा नव्हता. कारण त्याचा वृद्ध गुरु आपली जीवितयात्रा अद्याप कंठीतच होता. त्याचें सर्व लक्ष काय तें आपल्या नातलगांकडे होतें. मठाचें करवीर येथील उत्पन्न कमी झाल्यामुळें संकेश्वर येथील उत्पन्न आपल्या नातलगांला अतिशय अपुरें आहे असें त्याला आढळून आलें. त्याचा शिष्य वेदोक्ताशीं असलेल्या आपल्या विरोधी धोरणामुळें ब्राह्मण समाजास प्रिय झाला होता. ह्मणून ब्राह्मण समाजाच्या सहाय्यानें जनतेला पिळून काढून शक्य तितका पैसा या शिष्यानें महाराष्ट्रांतून गोळा करावा, असा गुरूचा आग्रह होता. या उपायानें गुरूचें द्विविध कार्य झालें. एक तर ब्रिटिश मुलखांतील उत्पन्नाचा दुरुपयोग करण्यास त्याला पूर्ण अवसर मिळाला व दुसरें आपला शिष्य जी बिदागी गोळा करील तिच्यांतून शिष्याचा खर्च भागून आपल्या उत्पन्नांत कांहींशी भर पडेल अशीहि त्याची अपेक्षा होती. पण ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. पुण्यामध्यें रा. टिळक यांनीं ब्रह्मनाळकराचें मोठ्या थाटानें स्वागत केलें. स्वागत, मिरवणूक, पादपूजा, प्रवचनें, देणग्या यांचा शिष्यावर सर्व महाराष्ट्रांत वर्षाव झाला. ब्राह्मणांचा वीर, शूद्र नृपतीच्या क्षत्रिय होण्याच्या पोकळ महत्त्वाकांक्षेचा कट्टा द्वेष्टा व ब्राह्मणी वर्चस्वाचा दिव्य अवतार समजला गेलेला ब्रह्मनाळकर जेथें जेथें जाई तेथें तेथें त्याची मोठ्या थाटानें मिरवणूक निघे. या दिग्विजयाचीं रसभरीत वर्णनपर पत्रें तो आपल्या गुरूला पाठवी. महाराज त्याचें उत्पन्न जप्त करू शकले खरे, परंतु

अशा देणग्या तुच्छ मानून आपलें वैभव वाढविण्याचें व आपली चैन चालविण्याचें सामर्थ्य आपणांत आहे हें सिद्ध करण्याची ब्रह्मनाळकराला उमेद होती. शिष्याच्या या दौऱ्यापासून आपणास कांहीं तरी प्राप्ति व्हावी एवढीच गुरूची अपेक्षा होती; परंतु गुरूच्या अपेक्षेप्रमाणें त्याला शिष्याकडून मदत झाली नाहीं; उलट ब्रह्मनाळकर आपल्या चोहोंकडे होत असलेल्या सन्मानामुळें फुगून जाऊन स्वतःला जगद्गुरु ह्मणवूं लागला. हें गुरूला आवडलें नाहीं. ब्रह्मनाळकर हा आपण मिळविलेल्या भिक्षेचा वांटा गुरूला देत राहिला असता तर या दोघांमध्यें वितुष्ट उद्भवण्याचा प्रसंग आला नसता. गुरूला आतां शिष्याच्या वाढत्या महत्त्वाबद्दल धास्ती उत्पन्न झाली व शिष्य गुरूवर त्याचा लोभीपणा पाहून क्रुद्ध झाला.

या वैतुष्ट्याचें खरें कारण ह्मटलें ह्मणजे कांचनाचा अभाव हें होय. अर्थातच या गुरूची दृष्टि कोल्हापुरांतील आपल्या जप्त झालेल्या इनामाकडे व उत्पन्न जप्त झाल्यापासून शिल्लक पडलेल्या रकमेकडे साहाजिकपणें वळली. वेदोक्ताचा अधिकार, हें उत्पन्न व ही शिल्लक मोबदला घेऊन, सहज विकतां येण्यासारखा होता. लागलीच यासंबंधीं वाटाघाट सुरू झाली.

स्वतःस साधु लेखणाऱ्या या दोन गुरूंचा चरितार्थ जोंपर्यंत यथास्थित चालला होता, तोंपर्यंत यांपैकीं कोणीहि कोल्हापूर दरबाराची व दरबारनें दिलेल्या उत्पन्नाची पर्वा करीत नव्हता. उदाहरणार्थ १९०३ सालच्या सप्टेंबर महिन्यांत मि० रार्शीकरांवरील बहिष्कारासंबंधीं वाद उत्पन्न झाला; आणि त्यामुळें दरबारला अंबाबाईच्या देवालयांत त्यांस मज्जाव करणें भाग पडलें; तेव्हां गुरूनें हें प्रकरण निर्णयासाठीं शिष्याकडेच पाठविलें. शिष्य कोल्हापूरच्या दरबारचा पक्ष केव्हांहि उचलून धरणार नाहीं अशी गुरूची इतकी खात्री असल्यामुळें, महाराज हे क्षत्रिय आहेत किंवा नाहींत या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं कोल्हापुराहून जे अर्ज आले होते, त्यांचीहि वासलात लावण्याचें काम त्यानें शिष्यावरच सोंपविलें. तथापि थोड्या दिवसांनंतर कोल्हापुराचें उत्पन्न स्वतः बळकावून आपली आर्थिक स्थिति सुधारण्याचा विचार गुरूच्या डोक्यांत डोकावूं लागला. वारा कोणत्या दिशेनें वाहतो, याबद्दल स्वतःची खात्री करून घेऊन, मठासंबंधीं दरबारचें धोरण दुराराध्य नसून कोल्हापूरच्या प्रश्नाचा निर्णय करण्याचा अधिकार तुह्मीं मला द्यावा, अशा अर्थाचें ता० ५ डिसेंबर १९०३ रोजीं गुरूनें ब्रह्मनाळकराला पत्र लिहिलें. गुरूचा निर्णय शिष्यालाहि

बंधनकारक आहे, अशा अर्थाचें पत्र तुह्मीं महाराजांना पाठवावें, असेंहि या पत्रांत नमूद होतें. या पत्रावरून १९०३ सालच्या अखेरीपासून स्वामी महाराजांशीं सख्य घडवून आणण्याचा प्रयत्न करीत होता, हें सिद्ध होतें. यानंतर सहा महिन्यांत या बाबतींत कांहींच प्रगति झाली नाहीं. कारण आपली सत्ता गमविण्याची ब्रह्मनाळकराची इच्छा नसल्यामुळें त्यानें समाधानकारक असें उत्तर गुरूला दिलें नाहीं. १९०४ च्या जून महिन्यांत गुरूला महाराजांची मुलाखत घेण्याची आवश्यकता भासूं लागली. विहीर आपणापाशीं येत नाहीं तर आपण विहिरीपाशीं गेलें पाहिजे अशी आतां गुरूची खात्री झाली. गुरूनें कोल्हापुरापासून दोन मैलांच्या अंतरावर कळंबें येथें येऊन मुक्काम केला. या महिन्याच्या १५ ते २२ तारखेच्या दरम्यान स्वामी व महाराज यांची तेथें मुलाखत झाली. या मुलाखतींत वेदोक्त प्रश्नासंबंधीं मन मोकळें करून उभयतांकडून चर्चा झाली. जप्त झालेलें उत्पन्न परत मिळविण्यासाठीं स्वामीकडून या बाबतींत अनुकूल निर्णय मिळेल, असें या चर्चेवरून उघड अनुमान निघत होतें.

महाराजांच्या सत्कारार्थ स्वामीनें महाराजांना पोषाख देऊन खऱ्या वेदोक्त पद्धतीनें आशीर्वाद दिला. यावरून महाराजांना क्षत्रियत्वाचे हक्क देण्याची स्वामीची कळकळीची व प्रामाणिक इच्छा होती, असेंहि कित्येकांचें ह्मणणें होतें, परंतु गुरूच्या विचारांना जर शिष्याचा पाठिंबा मिळाला नाहीं तर हा सर्व खटाटोप निरर्थकच होणार होता. शिष्याचें पुण्याच्या राजकारणी लोकांशीं सूत होतें हें तर सर्वांना माहितच होतें. स्वामीनें अशा प्रकारें सहज रीतीनें महाराजांना शरण जावें, ही गोष्ट त्यांना रुचण्यासारखी नव्हती. ह्मणून या मुलाखतींत ठरलेल्या गोष्टींला ब्रह्मनाळकराची संमति मिळाली पाहिजे, असें स्वामीला महाराजांनीं निक्षून कळविलें. अशा प्रकारें आपला हेतु अर्धवट स्थितींत ठेवून गुरूला संकेश्वर मठाला परत यावें लागलें. शिष्याला या गुप्त खलबताचा सुगावा लवकरच लागला. एके काळीं महाराजांचें क्षत्रियत्व दोघांनाहि अमान्य होतें, हें वर आलेंच आहे. परंतु आतां हें उत्पन्न हस्तगत करून घेण्याची दोघांनाहि जरूरी भासत असल्यामुळें, या आमिषासाठीं दोघांमध्यें जोराची अहमहमिका सुरू झाली. भोंसल्यांचें क्षत्रित्व कबूल करण्यास आपण तयार नाहीं, असा बहाणा करून प्रत्येक जण आपल्या मतलबाचा दुसऱ्याला सुगावा लागूं नये ह्मणून प्रयत्न करीत

होता. कोल्हापुराचे ब्राह्मण स्वामीला पूर्णपणें ओळखीत असल्यामुळें स्वामीचा मुक्काम कळंबें येथें असतांना त्यांचीं मनें वरींचशीं अस्वस्थ झालेलीं होतीं. वेदोक्त प्रकरणाच्या बाबतींत आपला अभिप्राय न देतां स्वामी परत गेल्यामुळें आतां ब्राह्मणांच्या जिवांत जीव आला. स्वामी आपलें इनाम परत मिळविण्यासाठीं स्वतंत्र खटपट करीत नसून वेदोक्त प्रकरणाच्या बाबतींत जीं उत्पन्नें जप्त झालीं होतीं, तीं ज्यांचीं त्यांस मिळेपर्यंत स्वामी वेदोक्ताचा विचारसुद्धां करणार नाहींत, अशी जी अफवा उठली होती, ती ऐकूनच ब्रह्मवृंद संतोष मानूं लागला. परंतु गुरु व गुरूची वेदोक्ताला सम्मति या दोहोंमध्यें खरोखर काय आड येत होतें, याचा गंधदेखील या ब्रह्मवृंदाला नव्हता !

श्रीयुत बाळ गंगाधर टिळक हे स्वामीशीं कांहीं गोष्टीचा खल करण्याच्या हेतूनें आगस्ट महिन्यांत संकेश्वराला येणार आहेत असें १९०४ च्या जुलै महिन्यांत स्वामीला कळविण्यांत आलें. या वेळेच्या परिस्थितीवरूनच टिळकांच्या संकेश्वराला जाण्याच्या हेतूची कल्पना केली पाहिजे. महाराजांना अनुकूल असा उपदेश गुरूला करण्याची आवश्यकता नव्हती ही गोष्ट ज्यांना त्याची ओळख होती, त्या सर्वांना व विशेषत: ब्रह्मनाळकर व त्याचे मित्र श्रीयुत टिळक यांना विदितच होती. यावरून टिळकांचा संकेश्वराला जाण्याचा हेतु संकेश्वर येथील स्वामीचें चलबिचल झालेलें मन स्थिर, करून धनलोभाविष्ट न होता त्यांनीं आपल्या विचारें वागावें, व गुरुशिष्यांमध्यें तडजोड घडवून आणावी हाच असावा, यांत शंका राहात नाहीं.

आपणास संकेश्वर येथें भेटावें ह्मणून भिलवडीकरानें ता. १ मे १९०५ रोजीं ब्रह्मनाळकराला विनंति केली. ब्रह्मनाळकराची अगोदर सम्मती मिळविल्याखेरीज वेदोक्ताच्या बाबतींत आपणास कांहींच करतां येणार नाहीं, अशी त्याची खातरी होऊन चुकली होती. ह्मणून वेदोक्ताचा निकाल करण्याचा आपणास अधिकार देण्यासाठीं ब्रह्मनाळकराचें मन वळवावें, असें भिलवडीकराच्या मनांत आल्यामुळेंच त्यानें हें पाचारण केलें असलें पाहिजे. या आमंत्रणपत्रांत, भिलवडीकर स्वामीनें शिष्याला लिहिलें कीं, उभयतांची भेट होऊन कोल्हापूर प्रकरणासंबंधीं पुढील धोरण ठरविणें जरूर आहे. पण स्वामीच्या या अनुज्ञेप्रमाणें ब्रह्मनाळकर स्वामीला न भेटतां, कोल्हापूरच्या ईशान्य दिशेच्या हद्दीवर आपला मुक्काम करून त्यानें कोल्हापूरच्या दरबाराशीं परभारें बोलणें सुरू केलें ! असें करण्याचें कारण

उघडच होतें. जप्त झालेल्या उत्पन्नाची बरीच मोठी रकम कोल्हापूरच्या खजिन्यांत पडून राहिली होती; म्हणून कोल्हापूरचें प्रकरण मिटविण्याचा अधिकार जर यानें गुरूला दिला असता, तर हा द्रव्यनिधि गुरूच्या हातांत पडून तो त्याच्या अगणित मुलांमुलींत विभागला गेला असता. स्वतःच हा सौदा करून व दरबारच्या सर्व अटी कबूल करून कोल्हापूरच्या मठाच्या विपुल इस्टेटीचा मालक बनणें, हाच काय तो ब्रह्मनाळकरापुढें सद्यःफलदायी मार्ग होता. या शिजत असलेल्या गोष्टीचा परिपाक तारीख १० जुलै १९०५ रोजीं दृष्टोत्पत्तीस आला. या दिवशीं भोंसले हे क्षत्रिय असून वेदोक्त विधी करण्याचे त्यांना पूर्ण अधिकार आहेत, असा ब्रह्मनाळकरानें आपला निर्णय दिला.

मठाची इस्टेट परत मिळवूं पाहाणाऱ्या या गुरुशिष्यांच्या मनावर आणखी ज्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा दाब पडला ती अद्याप सांगावयाची आहे. आतां अपरिहार्य गोष्टीला नमून वागणें भाग आहे, अशी त्यांची खातरी होऊन चुकली. राजोपाध्यानें हिंदुस्थान सरकारकडे जें अपील केलें होतें, त्याचा १९०५ सालच्या मे महिन्यांत करवीर दरबारचे वतीनें निकाल लागला. आतां-पर्यंत ज्या आशेच्या तंतूवर राजोपाध्याचा पक्ष जीव धरून राहिला होता, तो तंतूहि याप्रमाणें तुटला! आतांपर्यंत गुरुशिष्यांचें लक्ष राजोपाध्याच्या या शेवटच्या प्रयत्नाच्या परिणामाकडे लागून राहिलें असावें असें दिसतें व या निकालानंतर आपण विलंब लाविला तर तो हितप्रद होणार नाहीं अशी जेव्हां त्यांची खातरी झाली, तेव्हां कोल्हापूरच्या गोष्टीविषयीं आपल्या भावी धोर-णाचा विचार स्वामीच्या डोक्यांत आला. स्वामीच्या मनाची ज्यांनीं परीक्षा केली होती, त्यांच्या खात्रीलायक सांगण्यावरून असेंहि म्हणतात कीं, शिष्यानें वेदोक्ताला आपली संमति देण्यास हयगय करूं नये म्हणून शिल्लक पडलेल्या रकमेचा हिस्सा शिष्याला देण्यास देखील स्वामी तयार होता. राजोपाध्याची जागा महाराजांनीं जोशीरावाच्या घराण्याला दिली. व याबद्दल दरमहा २५० रुपयांची नेमणूक करून दिली. राजोपाध्याचा आतां सर्व बाजूंनीं मोड झाला असल्यामुळें यानंतरहि चिकाटी धरून राहिल्यापासून मनांत मांडे खाणाऱ्या या गुरुशिष्यांना फायदा होण्यासारखा नव्हता. ब्राह्मणांचा आतां भ्रम दूर होऊन राजोपाध्याचें व त्याच्या मित्राचें उत्पन्न परत मिळेतोंपर्यंत वेदोक्ताच्या प्रमाच्या अगर आपल्या उत्पन्नाच्या गुरुशिष्य आपल्या मनांत विचार देखील

आणणार नाहींत, अशी जी अफवा उठली होती, ती खरी मानून जे या गुरु-शिष्यांचीं स्तुतिस्तोत्रें गात होते, त्यांना देखील आपली समजूत अतिशय चुकीची होती, असें आतां समजून चुकलें. परंतु ब्रह्मनाळकरानें आतां आपला फांसा टाकला होता, त्याचा परिणाम काय होतो, हे पाहाणें त्याला भाग होतें.

कुरुंदवाडचे ( मोठी पाती ) चीफ श्रीमंत बाळासाहेब हे स्वामीच्या असमंजस धोरणाचा निषेध करीत होते, या गोष्टीचा येथें उल्लेख करणें भाग आहे. नाहींतर कांहीं उदारमनस्क ब्राह्मणांच्या बाबतींत अन्याय केल्यासारखें होईल. महाराज हे क्षत्रिय आहेत, हें त्यांनीं उघडपणें मान्य केलें, इतकेंच नव्हें तर गुरूला त्याच्या अविचारी कृत्यापासून परावृत्त करण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केला. १९०६ सालीं त्यांनीं महाराजांना पुढीलप्रमाणें लिहिलें:—" गुरुस्वामी मला बरेंच बोलले; परंतु त्यांना मीं स्पष्टपणें असें सांगितलें कीं, ' शिष्याचें कृत्य शास्त्रसंमत नाहीं, असें विद्वान व वजनदार शास्त्र्यांच्या जाहिरसभेंत त्यांनीं सिद्ध करीतोंपर्यंत मी तुमची आज्ञा मान्य करणार नाहीं.' परंतु शिष्यस्वामींनीं किंवा त्याच्या बंधूंनीं अगर हुदलीकरांनीं काय हकीगत घडली ती मला कळविली नाहीं. अद्यापि मी शिष्यस्वामींच्या पक्षालाच आहें. परंतु प्रत्येक गोष्ट योग्य प्रकारें व कायदेशीर रीतीनें झाली पाहिजे. नाहींतर अव्यवस्थित रीतीनें केलेल्या गोष्टी परिणामीं टिकूं शकत नाहींत. नवीन शिष्यस्वामी माझी संमति घेण्याकरितां आले होते, परंतु मीं त्यांला साफ नाहीं म्हणून सांगितलें. जोंपर्यंत माझें म्हणणें कायद्याच्या दृष्टीनें रास्त आहे, तोंपर्यंत महाराजांचा पक्ष न सोडण्याचा माझा कृतनिश्चय आहे. "

अशा प्रकारचे ब्राह्मण त्या काळीं दुर्मिळ होते ही गोष्ट येथें कबूल केली पाहिजे. त्यांच्यापैकीं बहुतेकजण उघडपणें वेदोक्ताच्या विरुद्ध होते अगर प्रच्छन्नपणें ते महाराजांच्या विरोधकाशीं सहानुभूति दर्शवीत होते. जे समंजस होते, त्यांना आपल्या बांधवांच्या मूर्खपणाचा निषेध करण्याचें धैर्य अगर वजनहि नव्हतें.

पुढें कांहीं दिवसांनीं ब्रह्मनाळकरानें आपल्या निवडणुकीच्या बाबतींत जो बेकायदेशीरपणा झाला होता, त्याबद्दल पूर्णपणें माफी मागितल्यामुळें, महाराजांनीं जप्त झालेलें उत्पन्न स्वामीला परत दिलें. यानंतर निदान कोल्हापुरांत तरी ब्रह्मनाळकर हा मठाचा कायदेशीर स्वामी ठरला. भिलवडीकराला आपल्या शिष्यापासून झालेला पराभव सहन होण्यासारखा नव्हता. त्यानें कांहीं दिवस वाट पाहून ब्रह्मनाळकराला मिळालेल्या उत्पन्नाचा निदान कांहीं अंश तरी स्वतःला मिळण्या-

बद्दलै प्रयत्न केला; परंतु या वेळेला देखील त्याला अपयश आलें. शूद्र नृपतीला त्याच्या पात्रतेपेक्षां अधिक योग्यता प्राप्त होऊं न देण्याच्या पवित्र (?) कार्यासाठीं आपल्या सर्वस्वावर पाणी सोडणारा तत्त्वनिष्ठ स्वामी ह्मणून स्वतःला ब्राह्मण समाजापुढें मिरविण्याचा त्यानें आतां घाट घातला! स्वामीनें जी ही उलटी गोलांटी घेतली, तीबद्दल ब्राह्मणांनीं जरी उघडपणें आपला आनंद व्यक्त केला नाहीं, तरी अंतःस्थ रीतीनें त्यांना ही गोष्ट प्रीयच झाली. कारण एवढेंच कीं, याचा उपयोग शत्रुपक्षाला जाऊन मिळालेल्या ब्रह्मनाळकर स्वामीला शासन करण्याच्या कामीं त्यांना होण्यासारखा होता. गुरूला कांहीं प्रमुख ब्राह्मणांचा व एका सुप्रसिद्ध संस्थानिकाचा पाठिंबा मिळाल्यामुळें त्यानें १९०५ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या १३ व्या तारखेला ब्रह्मनाळकराला दिलेले अधिकार रद्द करण्यांत आले आहेत, असें एक फर्मान काढलें. यावर ब्रह्मनाळकरानें असें उत्तर दिलें कीं, आपणास जगद्गुरु ह्मणून निवडल्यानंतर गुरूला कोणत्याहि प्रकारचा अधिकार राहिला नाहीं, ह्मणून हें फर्मान निरर्थक आहे. यानंतर ( १९०६ ) एप्रिल महिन्यांत या बेजबाबदार गुरूनें ब्रह्मनाळकरावर आज्ञाभंग केल्याचा आरोप करून त्याला अधिकारच्युत व जातिबहिष्कृत केलें. अशा प्रकारें हा लढा गुरूच्या मरणापर्यंत चालला. पुढें थोड्याच दिवसांनीं गुरु स्वर्गवासी झाला. आपल्या मरणानंतर हा वाद कदाचित् मिटेल या भीतीनें, गुरूनें आणखी एक शिष्य गादीचा वारस ठरविला. आज देखील ब्रिटिश हिंदुस्थानांतील न्यायकोर्टें या दोन शिष्यांपैकीं कायदेशीर वारस कोण हा निर्णय करीतच आहेत! शंकराचार्य मठासंबंधीं या वेळीं महाराजांना जो अनुभव आला, त्यावरून ब्राह्मणांच्या जाळयांतून ब्राह्मणेतर हिंदूंची मुक्तता करण्यासाठीं ब्राह्मणेतर वर्गांतून एक नवीन उपाध्याय वर्ग निर्माण केला पाहिजे अशी महाराजांची खात्री होऊन चुकली. तारीख २ फेब्रुआरी १९०४ रोजीं महाराज मुंबईंतील आपल्या एका मित्राला लिहितातः—" दैवज्ञ सोनारांप्रमाणेंच आमच्या जातीचेहि उपाध्ये असावेत असें आह्मांस वाटतें. शेणवी लोकांनींहि अशाच प्रकारची व्यवस्था केली आहे व या समाजाचे ब्राह्मणांच्या मदतीखेरीज चांगलें चाललें आहे; परंतु आमचे धार्मिक विधी करण्यासाठीं ब्राह्मणांचीं मनें वळवून कायमची तेढ उत्पन्न होण्याचा प्रसंग टाळावा, असें ह्मणणारेहि कांहींजण आह्मांमध्यें आहेत. सोनार व शेणवी लोकांप्रमाणें ब्राह्मणांचें जूं फेंकून देऊन सुस्थितीला पोंचलेल्या लिंगायत व जैन लोकांचींहि उदाहरणें आहेत. "

तारीख ३ मार्च १९०४ रोजीं महाराज आपल्या आणखी एका मित्राला लिहितातः—“ आमच्या जातीचेच उपाध्ये नेमून ब्राह्मणांचें जूं फेंकून द्यावें व शेणवी, जैन आणि सोनार लोकांप्रमाणें आपलाहि उद्धार करून घ्यावा, अशा विचाराचे कांहींजण आह्मांमध्यें आहेत. जगद्‌गुरूशीं सख्य घडवून आणण्याचा मी प्रयत्न करीत आहें; परंतु आह्मांला जे अधिकार आहेत, ते आह्मीं पंडित लोकांच्या मुठी दाबून मिळविले आहेत, असें या जगद्‌गुरूनें उघडपणें ह्मटलें आहे; ह्मणून या बाबतींत विशेष यश येईल असें मला वाटत नाहीं. ”

महाराजांच्या या मानसिक स्थितीची तुलना विरुद्ध पक्षांत याच वेळीं ज्या गोष्टी चालल्या होत्या, त्यांच्याशीं करण्यासारखी आहे. राजोपाध्या व जगद्‌गुरू यांच्याशीं महाराजांनीं जो सामना दिला, त्या सामन्यांत महाराजांनाच अखेर विजयश्रीनें माळ घालतांच, अखिल महाराष्ट्रांतील मराठा घराण्यांत वेदोक्त प्रकरणाविषयीं नेहमीं दिसून येणारे स्वाभाविक अगर वरपांगी औदासिन्य नष्ट होऊन, त्यांच्यामध्यें विलक्षण चैतन्य उत्पन्न झालें. मराठा व इतर वसतिगृहांमध्यें शिक्षण संपादणारे विद्यार्थी व ब्राह्मणेतर जागृतिरूपी विद्युच्छक्तीच्या प्रवाहानें व्यापून गेलेल्या कोल्हापूरच्या वातावरणांत राहाणारे लोक, या सर्वांमध्यें एक प्रकारचा विलक्षण उत्साह उत्पन्न झाला. हे लोक कोल्हापूरची हद्द सोडून परमुलुखांत जेथें जेथें ह्मणून जात असत तेथें तेथें ब्राह्मणेतर जागृतीचीं नवीन नवीन केंद्रें उत्पन्न होत; व याच केंद्रांपासून थोड्या वर्षांनंतर ब्राह्मणेतरांची चळवळ उत्पन्न झाली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कोल्हापुरांतील चळवळीचा कोल्हापूरच्या सरहद्दीवर असलेल्या ब्रिटिश मुलखांतील सुशिक्षित मराठ्यांवर लागलीच असा परिणाम झाला कीं, ते देखील महाराजांप्रमाणेंच वेदोक्ताचे अधिकार मागूं लागले. महाराज स्वतःचा प्रश्न स्वतःपुरता न सोडवितां ते त्यांत अधिकार नसलेल्या इतर मराठ्यांनाहि ओढूं पहात आहेत, असा महाराजांवर गिल्ला करून ब्राह्मण लोक महाराजांचा पक्ष लंगडा करूं पाहात होते. यावर महाराजांनीं असें उत्तर दिलें कीं, ‘आपला प्रश्न तर यथाशास्त्र सोडविलाच पाहिजे, शिवाय जे क्षत्रिय असतील त्यांच्याहि हक्कांकडे जरूर लक्ष पुरविलें पाहिजे.’ यासंबंधींची हकीकत मागें आलीच आहे. १९०६ सालच्या आगष्ट महिन्यांत ‘ समर्थ ’ आर्त स्वरानें ह्मणतोः— “ शिवाय प्रत्येक मराठा वेदोक्त पद्धतीनें विधी करण्याचा प्रयत्न करीत आहे. बेळगांवच्या मराठ्यांनीं

ठाण्याहून आणविलेल्या ब्राह्मणांच्या हातून आपली श्रावणी करविली. या अनिष्ट प्रकाराला एकाद्या स्वामीची सम्मति मिळाली तर काय प्रकार घडून येतील हें कोणाला सांगतां येणार नाहीं. करवीर पीठाच्या स्वामीची (ब्रह्मनाळकर) याला जर सम्मति मिळाली तर तो क्षत्रियाचा स्वामी होईल. अशा प्रकारें सर्व जातींचा गोंधळ उडून राष्ट्रीय प्रगतीच्या मार्गांत मोठी धोंड उत्पन्न होईल."

'समर्थ' पत्राच्या नेहमींच्या रडगाण्यांशीं आह्मांस कांहींच करावयाचें नाहीं. फक्त आह्मांस येथें एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, ब्राह्मणांच्या दुराग्रहामुळें ब्राह्मण व ब्राह्मणेतर या दोन समाजांमध्यें मोठी खिंड उत्पन्न होत चालली होती. ब्राह्मणांच्या कट्ट्या पुरस्कर्त्यांलादेखील ही गोष्ट पटल्याखेरीज राहणार नाहीं, वेदोक्त प्रकरणाच्या वेळीं ब्राह्मणेतरांना ब्राह्मणांच्या दुराग्रहाचा जो अनुभव आला, त्यामुळेंच सत्यशोधक, आर्यसमाज व क्षत्रिय जगद्गुरु या संबंधींच्या चळवळी क्रमशः उपस्थित झाल्या



## प्रकरण १३ वें.

# कांहीं किरकोळ बाबी.



महाराजांचा लहानपणापासून जनावरांकडे विशेष ओढा असे. त्यांचें संगोपन व पैदास करण्याच्या कामीं ते अतिशय लक्ष घालीत असत. महाराजांचे वडील जयसिंगराव आबासाहेब यांच्यापासून वरील गुण महाराजांच्या अंगीं उतरलेला होता. आबासाहेबांना कुत्रीं व घोडीं इतकीं प्रीय असत कीं, त्यांच्या नादीं लागून विद्यार्थी दशेंत त्यांचें अभ्यासाकडे दुर्लक्ष होत असें. तेव्हां शाळेंतील अभ्यासाचीं ठरलेलीं पुस्तकें बाजूस ठेवून त्यांना ज्या विषयांची आवड असे, त्या विषयांसंबंधींचीं पुस्तकें त्यांच्या हातीं देऊन, त्यांच्या शिक्षकांना त्यांचें लक्ष अभ्यासाकडे वळवावें लागें. आबासाहेबांच्या अंगीं जनावरांसंबंधीं जी इतकी आवड उत्पन्न झाली होती, तीमुळेंच त्यांना कोल्हापूरच्या राज्याला मुकावें लागलें, असेंहि कित्येकांचें मत आहे. कारण, असें ह्मणतात कीं,—या ह्मणण्याला काय आधार आहे हें मात्र आह्मांस सांगतां येत नाहीं—बाबासाहेबमहाराज हे आबासाहेबांनाच दत्तक घेणार होते; परंतु आपल्या द्वितीय भगिनीचा मुलगा श्रीराजाराममहाराज हा आबासाहेबांपेक्षांहि अधिक विद्याव्यासंगी असून त्याचा ओढा जनावरांकडे विशेष नव्हता, ह्मणून यालाच बाबासाहेबांनीं मागाहून पसंत केलें. आबासाहेब हे जन्मत:च कागलचे अधिपति होते व पसंत केलेला भाचा कागलकराहून छोटेखानी सरदाराचा मुलगा होता, हेंहि श्रीराजाराममहाराजांची निवड होण्याचें कारण असावें, असें आह्मांस वाटतें. कसेंहि असो, एवढी गोष्ट खरी कीं, आबासाहेबांची भक्ति जनावरांवर अतिशय असूनहि, त्यांच्या शिक्षकांनीं त्यांचें लक्ष वाङ्मयाकडे जें वळविलें, त्यामुळेंच आबासाहेबांची बुद्धि प्रगल्भ झाली, महाराज धारवाड येथें असतांना वडिलांचे गूण महाराजांच्या अंगीं कसे उतरत चालले होते, हें फ्रेजर साहेबांच्या शब्दांत यापूर्वींच सांगितलें आहे. जनावर जितकें भयंकर असें, तितकें तें महाराजांना अधिक प्रिय होई. एकदां

महाराजांचे मित्र नको ह्मणून आग्रह करीत असतांना देखील महाराजांनीं चिंचली येथील दऱ्यांखोऱ्यांतून वात्रट घोड्यांची एक जोडी भरधांव सोडली होती; याचा असा परिणाम झाला कीं, महाराजांसह त्यांची गाडी फड्यांत जाऊन पडली. गाड़ीघोड्यांना व खुद्द महाराजांना इतका मार लागला कीं, महाराजांच्या सोबत्यांना महाराजांच्या जीविताची चिंता वाटूं लागली. . जेव्हां ते महाराजांजवळ येऊन पोंचले तेव्हां महाराज उठून बसून आपल्या अंगांतील कांटे, शांतपणानें काढीत असल्याचें त्यांना आढळून आलें. महाराजांच्या अंगांत घुसलेले कांटे बाहेर काढण्यास डॉक्टर लोकांना पांच दिवस लागले ! यानंतर पुष्कळ वर्षांनीं दिल्ली येथें असतांना सर्कसमधील एका वाघिणीनें आपल्या संरक्षकाला ठार केल्याचें महाराजांना समजलें; महाराजांनीं लागलींच ती वाघीण त्या सर्कसीच्या मालकापासून घेऊन तिला कोल्हापूर येथें इतक्या चांगल्या रीतीनें माणसाळविलें कीं, जवळ माणूस असल्याशिवाय त्या वाघिणीला झोंपहि येईनाशी झाली ! तुह्मीं हें कसें केलें असें महाराजांना त्यांच्या एका मित्रानें विचारिलें असतां ते ह्मणाले ' सर्कशींतील लोक तिला भीति दाखवून आपल्या ताब्यांत ठेवूं पहात, परंतु मी तिच्याशीं प्रेमानें वागलों. प्रेमानेंच तिचा क्रूर स्वभाव मीं जिंकला. ' १९२१ सालीं दिल्ली येथें असतांना महाराजांच्या बंधूंचे जामात अक्कलकोटचे राजेसाहेब यांनीं महाराजांजवळ असलेला एक चांगला कुत्रा मागितला. अर्थातच ही गोष्ट मान्य करणें महाराजांना भाग होतें. एक दोन तासांनंतरच अक्कलकोटचे राजेसाहेब महाराजांच्या खोलींत जातांच महाराजांचा कुत्रा मऊ अशा सुंदर कोचावर बसलेला त्यांना दिसला व खुद्द महाराज अगदीं साध्या अशा खाटेवर पडून होते. राजेसाहेब विस्मयानें ह्मणाले, ' हें काय ! ' महाराजांनीं उत्तर केलें, ' माझ्या कुत्र्याला अशा रीतीनें वागविणें मला आवडतें. पाहिजे असेल तर तुह्मी हा न्या. यावर राजेसाहेब ह्मणाले, 'मला हा कुत्रा नको! अशा प्रकारें कुत्र्याला वागविण्याची माझी तयारी नसल्यामुळें या गरीब प्राण्याचें भाग्य हिरावून घेण्याची माझी इच्छा नाहीं ! ' जनावरांशीं त्यांचें वागणें किती प्रेमळपणाचें असें हें यावरून स्पष्ट दिसतें.

राज्यसूत्रें हातीं येतांच महाराजांचें लक्ष संस्थानच्या पॅडॉककडे वळलें. महाराज या बाबतींत स्वतः विशेष लक्ष घालीत असल्यामुळें, कोल्हापूरचें पॅडॉक

हें जनावरांची पैदास करण्याच्या बाबतींत नमुनेदार ठिकाण झालें. या पॅडॉकचें वर्णन पुढीलप्रमाणें करण्यांत आलें आहे:—

" संस्थानचें पॅडॉक शहरापासून सुमारें अडीच मैलांवर ईशान्य दिशेस आहे. या इमारतींत ७५ जनावरांची सोय होण्यासारखी आहे. यांतच शिंग्यांकरितां २७ खोल्या केल्या आहेत. सुपरिन्टेडंट व नोकर लोकांची राहाण्याची सोय येथें केली असून एक छोटेंसें रुग्णालयहि याला जोडलें आहे. पॅडॉकमध्यें नवा व जुना असे दोन विभाग केले आहेत. व यांत जनावरांना मोकळें सोडण्यांत येतें. येथें पाण्याची व चाऱ्याची रेलचेल आहे. आश्रयासाठीं त्यांच्याकरितां गवताच्या कांहीं झोंपड्या बांधल्या आहेत व त्यांना हवें तेव्हां पाणी पितां यावें ह्मणून पाण्याचीं पिंपेंहि ठेविलीं आहेत. घंटा वाजतांच तबेल्यांत धांवत कसें यावें हें येथील जनावरांना शिकविलें आहे. येथें नियमित वेळीं त्यांना चोळण्यांत येतें; व त्यांना त्यांचें ठरलेलें दाणापाणी करण्यांत येतें व इतर वेळीं स्वच्छंदानें फिरण्यास त्यांना मोकळें सोडण्यांत येतें. हल्लीं येथें २१ शिंग्या, १० शिंगरें, ९ घोड्या, १ टीजर, १ आस्ट्रेलियन घोडा व १ इराणी खेचर इतकीं जनावरें आहेत. संस्थानांत पैदास करण्याच्या कामीं उपयोगी पडणारे ४ घोडे आहेत. ( २ इंग्लिश, १ आस्ट्रेलियन, १ आरब ) या पॅडाकच्या शेजारींच या ४ घोड्यांकरितां एक नवीन झोंपडी लौकरच तयार होईल. १८९९ पासून १९०३ पर्यंतच्या ५ वर्षांत या पॅडॉकमध्यें ३६ शिंगरें व ३३ शिंग्या यांची पैदास झाली. प्रत्येक वर्षाचें सरासरीचें प्रमाण १४ पडतें."

१९०४ सालीं लॉर्ड लॅमिंगटन हे कोल्हापुराला आल्या वेळीं या पॅडॉकमधील उत्कृष्ट कार्य पाहून, त्यांनीं त्यांची वाहवा केली. महाराज शेतकींत जें लक्ष घालीत होते, त्याबद्दल त्यांनीं त्यांचें अभिनंदन केलें. संस्थानच्या अहवालावरून या गोष्टीची चांगलीच साक्ष पटते. आपल्या आमदानीच्या पहिल्याच वर्षीं महाराजांनीं आपल्या संस्थानांत बुंदांच्या झाडांची लागवड करण्याचा प्रयोग करून पाहिला. हा प्रयोग यशस्वी झाला तर घाटमाथ्यावरील नापीक प्रदेशांत राहणाऱ्या रयत लोकांचा त्यापासून कांहीं अंशीं फायदा होईल अशी महाराजांना आशा वाटत होती.

१८९५-९६ सालीं कोरफोडाच्या लागवडीसहि महाराजांनीं सुरवात केली. " अहवालाच्या सालीं १५ एकर जमिनींत बुंदांची लागवड करण्यांत आली.

यापासून २७५ पौंड बुंद मिळाला. याची किंमत २८७ रुपये ८ आणे झाली. गतसालीं १४ एकर जमिनींत बुंदाची लागवड करण्यांत आली होती. अहवालाच्या सालीं तुरुकवाड येथील १ एकर १० गुंठे जमीन बुंदाच्या लागवडीसाठीं हुजूर परवानगीनें घेण्यांत आली. येथील रोपें चांगल्या स्थितींत आहेत असें समजतें.

" कोरफडाची लागवड विस्तृत प्रमाणांत करण्यांत आली. कोरफड ही तंतुमय वनस्पति असून तिचा कुंपणाकडेहि चांगला उपयोग होण्यासारखा आहे, जंगल खात्याची हद्द ठरविण्याच्या कामींहि या कोरफडीचा चांगलाच उपयोग होतो. चालू व गतसालची मिळून कोरफडीची लागवड ३७ मैलांवर गेली आहे."

महाराज राळ तयार करण्याचा प्रयोगहि करून पहात होते. १८९९-१९०० सालच्या अहवालांत यासंबंधानें पुढीलप्रमाणें उल्लेख करण्यांत आला आहे:—" अखेरचा पाऊस न पडल्यामुळें, राळ तयार करण्याच्या कामीं उपयोगी पडणारें गंजन गवत चांगलें वाढलें नाहीं; ह्मणून राळ तयार करण्याचा प्रयोग विस्तृत प्रमाणावर करण्यांत आला नाहीं. हा प्रयोग दोन ठिकाणीं करण्यांत आला व २४ शेर राळ तयार करण्यांत आली. राळ गतसालापेक्षांहि अधिक निकोप पैदा करितां आली. प्रत्येक शेराला २ रु० ८ आणे किंमत येईल असें वाटतें; ह्मणून या धंद्याची वाढ होऊन तो किफायतशीर होईल, हें यावरून दिसून येणार आहे. "

शाहुमहाराजांचें उत्तम स्मारक बनलेल्या कोल्हापूर लगतच्या शाहूपुरीसंबंधीं दोन शब्द येथें लिहिले तर ते अनाठायीं होणार नाहीत, असें मला वाटतें. १९०५ सालीं ही नगरयोजना परिणत स्थितीला प्राप्त होऊन ती पूर्णपणें यशस्वी झाली. ही नगर योजना जरी १८९५ सालीं जन्मास आली, तरी १९०२ सालापर्यंत या गोष्टीकडे विशेषसें लक्ष पुरविलें गेलें नव्हतें. पुढच्या दोन वर्षांच्या अवधींत रेल्वे स्टेशननजीकच्या निर्जन प्रदेशावर कोल्हापूर संस्थानची सर्वांत महत्त्वाची पेठ वसली. गूळ, भुईमूग व इतर धान्यांचा व्यापार येथें मोठ्या प्रमाणांत होऊं लागल्यामुळें, त्यांना अतिशय चांगले दर येऊं लागले व त्यामुळें कोंकण प्रदेशांत उंसाची लागवड विस्तृत प्रमाणावर होऊन, त्या बाजूकडील रयत लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारली. श्रीशाहुमहाराजांच्या अमदानीच्या शेवटच्या सालीं ह्मणजे १९२१ सालीं कोल्हापूरच्या स्टेशनहून ह्मणजे शाहुपुरी पेठेंतून गूळ व

साखरेची निर्यात ( पैकीं साखरेची निर्यात मात्र अगदींच क्षुल्लक होती. ) सुमारें ४,७०,२२४ मण झाली. याची किंमत अदमासें ३०,००,००० झाली असती. १८९४-९५ सालीं या मालाची निर्यात अवघी ६,००,००० रु. किंमतीची होती. यावरून संस्थानांतील शेतकरी लोकांची सांपत्तिक स्थिति किती सुधारली हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

" पुन्हां कुरुंदवाडला गेलेला कालचा दिवस मला चांगला गेला. मीं परत येते वेळीं दोन समारंभ केले. एक शिरोळरोड स्टेशन नजीकच्या कापसाच्या गिरणीसंबंधीं व दुसरा नरसोबावाडी येथील धर्मशाळेसंबंधीं होता. ही सहल अतिशय आल्हाददायक झाली. "

ही वरील गोष्ट १९०५ सालीं घडली. शैक्षणिक व सामाजिक सुधारणे-साठीं झगडतांना हा काळ महाराजांना अतिशय धामधुमीचा गेला असतांनाहि, महाराजांचे नानाविध व्यवसाय कसे होते, हें यावरून चांगलेंच दृष्टोत्पत्तीस येणार असल्यामुळें मीं वरील उदाहरण दिलें आहे. अशाप्रकारच्या महाराजांच्या विविध विषय-व्यग्रतेचें वर्णन एकसारखें करतां येईल. परंतु तसें येथें करण्याची आवश्यकता दिसून येत नाहीं. तरी आणखी एक दोन गोष्टींचा येथें उल्लेख केल्याखेरीज माझ्यानें राहवत नाहीं. १९०६ सालच्या जानेवारी महिन्याच्या ६ तारखेस महाराज ह्मणतात:—"विक्रीकरितां मांडलेल्या पदार्थांमध्यें कांहीं ऐतिहासिक महत्वाचें असें आहे कीं काय, हें पाहाण्यासाठीं व हिरे, माणकें वगैरे नजरेखालीं घालण्यासाठीं माझ्या दिवाणांना मीं साताऱ्याला पाठविलें होतें. आण्णासाहेब स्वतः जवाहिर दाखविणार आहेत असें दिसतें. आण्णासाहेब येतील तर त्यांना प्रत्यक्ष पाहण्याची व त्यांच्या हकिकतीसंबंधानें त्यांच्याशीं बोलण्याची मला संधि मिळून, जरी मला अतिशय आनंद होण्यासारखा आहे तरी जर ते केवळ याच गोष्टीसाठीं येत असतील तर त्यांना तसदी देण्याची माझी इच्छा नाहीं. या कामांत आपण अतिशय लक्ष घालून व कार्य आपलेंच आहे, असें समजून करीत आहां, असें मला समजतें. या गुणाची चहा सर्व ठिकाणीं होत असते; तथापि हा सर्व खटाटोप निरर्थक होणार हें मी जाणून आहें. धाकट्या बंधूची दिशाभूल, गेल्या आठवड्यांत त्याच्यामागून आलेला वद्द व हुशार ××× करीत आहे, अशी मला शंका येते. मि० पी० एम्०

करून कर्ज घेऊन त्याच्याजवळ हे सर्व जिन्नस गहाण ठेवण्याचाहि विचार चालू आहे, असें मला समजतें. कसेंहि असो, या दोन बंधूंना या वृद्ध मनुष्यापासून व त्याच्या जातबांधवांपासून अलिप्त ठेवावें अशी माझी फार इच्छा आहे. बंगालमधून त्यांना कांहीं मदत होईल, अशा प्रकारचे वेडसर विचार त्यांच्या डोक्यांत घालण्यांत येत आहेत, असें म्हणतात. ही गोष्ट जितकी वेडसर तितकीच ती घातुकहि आहे. त्यांचे भाऊबंद व जातबांधवदेखील त्यांना मदत करीत नाहींत, असें असतां बाहेरचे लोक बोलण्यापलीकडे कांहीं करतील कीं काय, याची सहज कल्पना करितां येईल. या कुटुंबाचें शक्य तितकें अधिक हित व्हावें म्हणून आपण अंतःकरणपूर्वक खटपट करीत आहां हें मला माहीत असल्यामुळेंच मी आपणांस मोकळया मनानें लिहीत आहें. त्या वृद्ध मनुष्याच्या सहवासांत जे थोडे तास घातले त्या अवधींत त्याचा मला पराकाष्टेचा वीट आला; त्यावरून आपल्या अडचणीची मला चांगलीच कल्पना होते. माझी या कामीं आपणांला पूर्ण सहानुभूति आहे. अशा प्रकारच्या वाईट संगतीपासून या कुटुंबाला दूर ठेविलें तर ठीक होईल. जवाहिराची विक्री होत नसेल तर कर्जाची फेड होईतोंपर्यंत ते माझ्या ताब्यांत, ठेवावेत अशी मीं आपणांस विनंति केली तर ती आपणास मान्य होईल काय ? असें केलें तर सावकार व नोकर लोकांना जवाहिरांत अफरातफर करितां येणार नाहीं."

पुण्यामध्यें 'सुधारक' नांवाचें एक साप्ताहिक प्रसिद्ध होत असे. सुधारक पत्राचे उत्पादक कै० गोपाळराव आगरकर यांच्या संपादकत्त्वाखालीं हें पत्र महाराष्ट्रांत एकोणीसाव्या शतकाच्या प्रारंभीं अतिशय प्रभावी झालें होतें. महाराष्ट्रांतील ब्राह्मणांमध्यें गोपाळराव आगरकरांपेक्षां थोर असा पुण्यात्मा कधींच निपजला नाहीं. या पत्राचें पूर्व वैभव स्मृतिशेष होऊन, आतां याला आपली जीवितयात्रा कशी तरी कंठावी लागत असे. या पत्राला टिळकांच्या नेतृत्वाखालील केसरी प्रतिस्पर्धी झाल्यामुळें, या पत्राचे चहाते अर्थातच कमी झाले. आगरकराचें लोण पुढें चालविण्याची जबाबदारी ज्यांच्यावर येऊन पडली होती' त्यांच्यामध्यें काळाच्या गतीला अनुसरून पुढें पाऊल टाकण्याची हिंमत नसल्यामुळें, जो सुधारक इतका लोकप्रिय झाला होता, त्याला आतां अत्यंत अडचणीचे दिवस आले होते. आतां नवीन प्रश्न उपस्थित झाल्यामुळें, आगरकरांच्या अनुयायांनीं अगदीं नवीन परिस्थितीशीं तोंड देणें जरूर होतें. रानडे व

आगरकरांच्या काळीं ब्राह्मणेतर जनता निद्रित असल्यामुळें, ब्राह्मण व तत्सम साक्षर समाजांमधील परिस्थिति उदात्त तत्त्वरूपी निकषग्रावावर कसोटीस लाविल्यामुळें, जे प्रश्न उपस्थित होत होते, त्यांच्याकडेच या काळाच्या सुधारकांचें लक्ष वेधलें होतें. विधवाविवाह, विधवांना विद्रूप करण्याबद्दल त्यांच्यावर होत असलेली सक्ति, स्त्रीशिक्षण, प्रीतिविवाह व यांसारखेंच इतर प्रश्न त्या काळीं उपस्थित होत असल्यामुळें, त्या काळच्या सुधारक पंथाचे ब्राह्मण अनुयायी आपल्या उदात्त विचारांना साजेल अशा उत्साहानें हे प्रश्न सोडविण्यासाठीं झटत असत; परंतु त्या काळीं टिळक हे ज्या राजकीय जहाल तत्त्वांचे प्रचारक बनले होते, त्या तत्त्वांची जनतेला भुरळ पडल्यामुळें, सामान्य जनतेला हे प्रश्न विशेष महत्वाचे वाटले नाहींत. शिक्षित अगर अर्धवट शिकलेल्या या काळच्या ब्राह्मणांना सामाजिक सुधारणा किंवा हिंदी समाज-व्यवस्थेमध्यें पाश्चात्य तत्त्वांचा उपक्रम करणें म्हणजे इतर समाजांवरील स्वजाति-वर्चस्वाची इतिश्री करणें असें वाटत असल्यामुळें, या गोष्टी ते त्याज्य, अनुपयुक्त अगर मूर्खपणाच्या लेखीत असत. परकीय लोकांची अगोदर वाट लावा, म्हणजे सामाजिक दोष त्यानंतर दूर करतां येतील, असे फार तर ते म्हणत. जी नवीन सामा-जिक सुधारणेची चळवळ आतां धिमेपणानें पुढें पाऊल टाकीत होती, तिचें रहस्य समजून घेण्याइतका, या काळीं स्वत:स सुधारक म्हणविणाऱ्या लोकांमध्यें विचाराचा खंबीरपणा अगर दूरदृष्टि नव्हती. ब्राह्मणेतर समाजरूपी समुद्राच्या पृष्ठभागावर हिंदूंच्या सामाजिक अन्यायमूलक संस्थांमध्यें क्रांति घडवून आणण्याच्या उद्दे-शानें उत्पन्न होऊं पाहणाऱ्या वादळाला त्या वेळीं नुकताच प्रारंभ झाला होता. तरी या भावी वादळाच्या जोराची व दीर्घपरिणामी स्वरूपाची त्यांना जाणीव झाली असती, तर रानडे व आगरकरांसारख्या त्यांच्या आद्य गुरूंनीं सुरू केलेल्या सामाजिक चळवळीला अधिक ओजस्विता प्राप्त करून देऊन, ते ती यशस्वी राष्ट्रीय चळवळ करून दाखवूं शकले असते. याचा परिणाम असा झाला असता कीं, ज्या जहाल पक्षानें या सुधारकांना तोंडघशीं पाडले, त्या जहाल पक्षाला खात्रीनें शह बसल्याखेरीज राहिला नसता. व अपरिहार्य कारणांमुळें ब्राह्मणेतर चळवळीला आज जें ब्रह्मद्वेषाचें बाह्य स्वरूप येऊं पहात आहे, तें कधींच आलें नसतें; परंतु दुर्दैवेंकरून या संकेतार्थांतील गोष्टी घडून न आल्यामुळें आगरकरांच्या 'सुधारकाची' उपासमार होऊन तो मरणोन्मुख झाला होता. महाराजांच्या ठायीं रानडे व आगरकरांच्या बाण्याच्या लोकांच्या स्मृतीविषयीं मोठा आदर

असल्यामुळें त्यांनीं या मराठी पत्राला मदत करण्याचा विचार मनांत आणिला. १९०६ सालच्या जुलै महिन्यांत त्या वेळचे त्या पत्राचे संपादक मि० व्ही० आर० जोशी हे महाराजांच्या मदतीचा स्वीकार करतांना ह्मणतात:—

" सुधारकाच्या मदतीसाठीं आपण छत्रपति महाराजांकडून जी मदत पाठवली, तीबद्दल मी आपला फार आभारी आहें. या उपकाराबद्दल मी आपणाशीं स्वत: कृतज्ञ राहीन. या उदार देणगीबद्दल महाराजांचे आभार मानून मी हें पत्र पुरें करीत आहें. "

यानंतर कित्येक वर्षांनीं महाराजांनीं ब्राह्मणेतर वर्तमानपत्रांना मदत केल्या-बद्दल महाराजांवर गहजब करणाऱ्या अलीकडच्या काळच्या महाराजांच्या टीकाकारांनीं वरील गोष्ट लक्षांत ठेवून त्यांच्या कृतीकडे पहावें, ह्मणजे खुद्द ब्राह्मणांनीं चालवलेल्या परंतु महाराजांच्या मदतीची आवश्यकता भासत असलेल्या व उदात्त विचारानें प्रेरित झालेल्या वाङ्मयात्मक प्रयत्नांना उदार अंत:करणानें मदत करण्यामध्यें महाराजांच्या ठायीं ब्राह्मण-विरोधी धोरणापेक्षां उन्नतर असें कांहीं धोरण होतें, याची त्यांना खात्री पटल्याखेरीज राहाणार नाहीं.

कोल्हापूर व इतर संस्थानांनाच केवळ नव्हे, तर साऱ्या हिंदुस्थानाला अतिशय महत्त्वाच्या अशा एका प्रश्नाला या सुमारास त्या काळचे व्हाईसराय लॉर्ड कर्झन यांनीं चालन दिलें होतें. त्याचाहि येथें थोडासा उल्लेख करणें इष्ट आहे.

" साम्राज्य संरक्षणाच्या कार्याला प्रोत्साहन देण्यासाठीं मीं नमूद केलेल्या अटीवर आपल्या उत्पन्नापैकीं कांहीं ठराविक अंश खर्च करण्याची जबाबदारी संस्थानिकांनीं आपल्या शिरावर घेणें इष्ट आहे काय ? व तसें करणें इष्ट असल्यास खर्चाचें प्रमाण काय असावें ? " हा प्रश्न त्यांनीं संस्थानिकांपुढें मांडिला. हिंदी साम्राज्याच्या संरक्षणाप्रीत्यर्थ ब्रिटिश मुलखातील व हिंदी संस्थानांतील सैनिकांच्या संघाला मूर्तस्वरूप देण्याची कल्पना या प्रश्नाच्या बुडाशीं होती. १९०४ सालच्या एप्रील महिन्यांत लॉर्ड कर्झन साहेबांनीं या योजनेचा पुरस्कार केला. ही योजना ( Imperial Service Troops Scheme ) या नांवानें प्रसिद्ध होती. तथापि ही कल्पना अगदींच नवीन नव्हती. हैद्राबाद, म्हैसूर, काश्मीर, आल्वार, बिकानेर, भरतपूर, ग्वाल्हेर,

इंदूर, भोपाळ, भावनगर, जुनागड, पतीयाळा व इतर कांहीं संस्थानांमध्यें या योजनेचा यापूर्वीच उपक्रम केला गेला असल्यामुळें, त्या त्या संस्थानामध्यें या प्रकारचें सैन्य अगोदरच उभारण्यांत आलें होतें. परंतु १९०४ पर्यंत २३ पेक्षांही अधिक संस्थानांतील या प्रकारच्या सैन्याची संख्या १६,००० पेक्षां अधिक नव्हती. हिंदी संस्थानांनीं साम्राज्य संरक्षणाच्या कामीं सैन्याची मदत योग्य प्रमाणांत केली पाहिजे, असें जर ठरेल तर ही सैन्याची संख्या बरीच मोठी करितां येईल, हें उघड होतें. वास्तविक पाहिलें असतां, ज्या वेळीं संस्थानिक व सरकार यांच्यामध्यें तहनामे ठरले, त्या वेळीं त्यांच्या परराष्ट्रीय संबंधाच्या बाबतींत, खंडणीदाखल मुलूख तोडून दिल्याबद्दल किंवा अन्य तऱ्हेनें ज्या अटी त्यांच्यावर लादण्यांत आल्या होत्या, त्यांचा मोबदला ह्मणून, सैन्य पुरविण्याच्या सर्व जबाबदारींतून संस्थानिक लोक पूर्णपणें मुक्त झाले होते. ह्मणून एकमेकांच्या संमतीखेरीज या बाबतींत कांहींच करितां येण्यासारखें नव्हतें. या प्रश्नाशीं संबंध येणाऱ्या लोकांच्या विचारानें अंतःकरणपूर्वक शक्य तितका पुढाकार घेण्यास शाहू महाराज तयार होते. कांहीं अटींवर कोल्हापूरचें पायदळ दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांच्या हवालीं करून जी बचत होईल, तिच्या मदतीनें कोल्हापरमध्यें एक रिसाला उभारण्याची त्यांची इच्छा होती. १९०५ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत कर्नल फेरीस यांच्या अध्यक्षतेखालीं दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांची जी परिषद् झाली व तींत जो विचार ठरला त्यावरून ही योजना यशस्वी करण्यासाठीं कोल्हापूर दरबाराशीं त्यांचें या बाबतींत सहकार्य होईल, अशी आशा वाटूं लागली होती. परंतु यानंतर ज्या गोष्टी घडल्या त्यामुळें ही योजना जागच्या जागींच राहून अखेर १९१० सालीं ती निष्फळ ठरली. दक्षिण महाराष्ट्रांतील इतर संस्थानिकांशीं कोल्हापुराचे कशा प्रकारचे संबंध होते, याची यथार्थ कल्पना या पुस्तकांतील इतर प्रकरणांवरून वाचकांस होण्यासारखी आहे. प्रत्येकानें आपापल्या संस्थानांतील सैन्याचा खर्च सोसावा, व आपापल्या सैन्याचा सेनापति व्हावें, अशी या संस्थानिकांची इच्छा दिसली. ही योजना फलद्रूप होईल अशी श्रीमंत बापूसाहेब महाराजांची दृढ समजूत झाल्यामुळें ब्रिटिश लष्करी छावणीमध्यें त्यांनीं कित्येक महिने शिक्षण घेतलें. सरकारानें त्यांची या व इतर बाबतींतील कामें लक्षांत घेऊन १९०५ सालच्या जानेवारी महिन्याच्या पहिल्या तारखेला त्यांना सी० आय० ई० ही पदवी बहाल केली. या

नंतर कांहीं दिवसांनीं त्यांना सी० एस्० आय्० ही पदवी मिळाली. १८६२ च्या तहनाम्याच्या बाबतींत कोल्हापूरच्या मांडलिक जहागिदारांचा उल्लेख आला आहे. यांपैकीं कित्येकजण दरबारावर आपणास शक्य असेल त्या मार्गांनीं कुरघोडी करण्यास झटत होते. त्यांच्या ठायीं कोल्हापूर दरबाराविषयीं बेपर्वाई वाढत जाण्यास कोणती परिस्थिति कारणीभूत झाली, तिचें दिग्दर्शन मागें आलेंच आहे. इचलकरंजीच्या घोरपड्यांचा पेशव्यांच्या घराण्याशीं रक्तसंबंध घडून आल्यामुळें ते कोल्हापूरच्या दरबाराशीं सदा वैरभावानें वागत असत व जहागिरदारांच्या चळवळींत पुढाकार घेत. इचलकरंजीचे हल्लींचे जहागिरदार मेहेरबान बाबासाहेब हे सुसंस्कृत व विद्यासंपन्न आहेत, परंतु कोल्हापूरचा मांडलिक या नात्यानें स्वत:चा दर्जा वाजवीपेक्षां जास्त आहे अशा कल्पनेनें ते आरंभापासून वागत असून कोल्हापूर दरबाराशीं मांडलिक या नात्यानें वागण्याचे प्रसंग ते शक्य तितके करून टाळीत असत. १९०२ सालच्या दिल्ली दरबाराच्या वेळीं महाराजांच्या दरबारांतील एक जहागीरदार या नात्यानें आपल्या दर्जाला योग्य असें स्थळ मंडित करून हजर होणें त्यांना भाग होतें. परंतु त्या वेळीं बाबासाहेब हे मुंबई कायदेकौन्सिलचे सभासद असल्यामुळें, इतरांप्रमाणें त्यांनाहि स्वतंत्र आमंत्रण मिळालें होतें, ह्मणून छत्रपतींचा संबंध न ठेवितां, स्वतंत्र रीतीनें दरबारला हजर रहाण्याची त्यांची इच्छा होती. महाराजांच्या दिल्ली येथील क्यँपामध्यें त्यांच्याकरितां राखून ठेविलेल्या जागेंत इतर मांडलिकांच्या तंबूलगत आपले तंबू देखील ठोकण्यास ते कबूल होईनात. त्यामुळें कांहीं कठोर मार्गाचें अवलंबन करून त्यांना योग्य ठिकाणीं बसविणें भाग पडलें.

मांडलिकांच्या या उद्दाम वृत्तीचें कर्नल ऱ्हीवूज यांनीं आणखी एक उदाहरण दिलें आहे. मी तें येथें त्यांच्या शब्दांतच देत आहें:—

"मांडलिकांच्या इस्टेटीच्या व्यवस्थेसंबंधींच्या हकीकतीसंबंधीं प्रथम मला हें सांगावयाचें आहे कीं, 'किरकोळ जमा' किंवा 'किरकोळ खर्च' या सदराखालीं त्यांनीं सादर केलेल्या हिशेबपत्रकांत नमूद केलेल्या रकमा फार मोठ्या आहेत. विशाळगडच्या बाबतींत कर्ज व ठेव या सदराखालीं १०,००० पेक्षां अधिक रकम नमूद केली गेली आहे. हिशेबपत्रकांत जमा व खर्च या दोन्ही सदरांखालीं उसनवार व तसलमात अगर कर्ज व ठेव ह्मणून मोठमोठ्या रकमा दर्शविण्याची जी वहिवाट आहे, ती आक्षेपार्ह आहे. कारण, तपासणीच्या

वेळीं संस्थानच्या अगर विवक्षित गोष्टीच्या सांपत्तिक स्थितीची यथार्थ कल्पना यामुळें होऊं शकत नाहीं. संस्थानच्या कारभाराच्या वार्षिक तपासणीच्या वेळीं दाखविल्या जाणाऱ्या रकमेचा तपशीलवार खर्च नमूद न करण्यासारखें विशाळगड व इचलकरंजीसारख्या छोटेखानी जहागिरदारांच्या बाबतींत कोणतेंच कारण दिसून येत नाहीं. रीजंटसाहेबांनीं ठरविल्याप्रमाणें कलकत्ता येथील प्रदर्शनाला आपल्या मुलाला न पाठवून विशाळगडच्या बाईनें मोठें गैरवर्तन केलें आहे. रीजन्सीची परवानगी घेतल्याखेरीज तिनें आपल्या मुलाला औंधला नेऊन हुकुमाचा अवमान केला. गेल्या हिंवाळयांत ही बाई कोल्हापुरास आली असतां ही गोष्ट मीं काढली. परंतु, या बाबतींतील तिच्या अनपेक्षित वर्तनाचा ती योग्य खुलासा करूं शकली नाहीं. बाईच्या या वर्तनामुळें तिच्या मुलाचें जितकें नुकसान झालें, तितकें कोणाचेंहि झालें नसेल. आबासाहेबासारख्या उत्कृष्ट प्रवासप्रिय मनुष्याच्या सहवासांत राहून, उत्तर हिंदुस्थानांत प्रवास करून व कलकत्ता प्रदर्शनाला हजर राहून जो फायदा झाला असता, त्याला यामुळें तिच्या मुलाला मुकावें लागलें. विशाळगडचे पूर्वींचे कारभारी मरण पावले आहेत. नाहींतर त्यांचें वर्तन व कारभार असमाधानकारक असल्यामुळें त्यांला कामावरून दूर करण्यासाठीं मीं खटपट केली असती.''

जहागिरदारांचे कोल्हापूर दरबाराशीं जे संबंध आले, त्यांचा इतिहास पाहिला तर त्यांत अशा प्रकारच्या पुष्कळ गोष्टी सांपडण्यासारख्या आहेत; व दरबारच्या मार्गांतील हे कांटे बोंथट करून त्यांचा उपयोग राज्यकारभार सुयंत्रितपणें चालविण्याच्या कामीं करितां येत नसला तरी ते निदान जाचक होऊं नयेत, यांकडे महाराजांचें सर्व लक्ष वेधलें. त्यांना ओंजारून गोंजारून खूष ठेवण्याचे प्रयत्न महाराज कित्येक दिवसपर्यंत करीत होते. उदाहरणार्थ १८९५ सालच्या डिसेंबर महिन्यांत मलकापूरच्या नागरिकांनीं दिलेल्या मानपत्राला महाराजांनीं जें उत्तर दिलें, त्यांत त्यांनीं जहागिरदारांपैकीं दोघां अतिशय चढेल वृत्तीच्या जहागिरदारांसंबंधीं अतिशय प्रेमाचे उद्गार काढिले. ते ह्मणाले:—

“ आपल्या पूर्वजांनीं माझ्या पूर्वजांना जी मदत केली व कोल्हापूर व प्रतिनिधी यांच्यामध्यें जे पूर्वापार निकट संबंध आले आहेत, त्यांचा उल्लेख, आबासाहेब, तुह्मी यथायोग्य केला आहे. हल्लींच्या काळीं युद्धक्षेत्रांत नव्हे तर सुराज्य कारभाराच्या क्षेत्रांत या ऋणानुबंधानें आपल्या प्राचीन कीर्तीपुढें मजल

मारावी, असें बोलून मी आपल्या इच्छेचीच पुनरुक्ति करीत आहें. या बाबतींत इचलकरंजीच्या जहागिरदारांप्रमाणें आपणहि दक्षिण महाराष्ट्रांतील जहागिरदारांच्या तरुण पिढीला उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें आहे." परंतु यांनीं व यांच्या पूर्वजांनीं दरबाराशीं जें धोरण स्वीकारिलें होतें, त्यापासून त्यांना हें मधुर भाषण परावृत्त करूं शकलें नाहीं.

१८६२ च्या तहनाम्यान्वयें ( कलम ७ ) असें ठरलें होतें कीं, दरबारच्या कोर्टांनीं फर्माविलेल्या फांशीच्या शिक्षेची अमलबजावणी होण्यापूर्वी सरकारला ही गोष्ट जाहिर करावी. याच तहनाम्याच्या ८ व्या कलमांत असें सांगितलें आहे कीं, पोलीटिकल एजंटच्या अद्याप कांहीं अंशीं नजरेखालीं असणाऱ्या उच्च दर्जाच्या कांहीं जहागिरदारांनीं शक्य तितकें करून महाराजांच्या सरकाराशीं सलोख्यानें वागावें व या सरदारांच्या हद्दींतील फांशीची शिक्षा अगर सात वर्षांपेक्षां अधिक मुदतीची कैद होण्यासारखे फौजदारी कज्जे सरकारला निवेदन करण्यासाठीं पोलिटिकल एजंटपुढें चौकशीकरितां पाठवावेत. या कलमांत असेंहि म्हटलें आहे कीं, या सरदारांवर जी ही देखरेख ठेवण्यांत येणार आहे, तिचा उद्देश महाराजांच्या स्वामित्वाच्या हक्कामध्यें हात घालणें हा नसून, राज्यकारभार सुरळीत चालावा व प्राचीन काळीं तंटे उपस्थित होऊन रक्तपातापर्यंत व बंडाळी माजण्यापर्यंत जी मजल येऊन ठेपत असे ती टळावी, हा होय. कलम ७ नें दरबारच्या अधिकाराला जो प्रतिबंध घातला होता तो १८९५ सालच्या नंबर १७५७ नें दूर करण्यांत आला.

परंतु कलम ८ अन्वयें अवशिष्ट बाबतींत जहागिरदारांवर अधिकार चालविण्याचा हक्क जो ब्रिटिश सरकारनें आपल्यापाशीं ठेविला होता, तो पुढें १९०३ पर्यंत तसाच चालूं होता, एवढेंच केवळ नव्हे; तर या कलमांत ७ वर्षांपेक्षां अधिक शिक्षा अगर फांशीची शिक्षा होण्यासारखे गुन्हेच चौकशीकरितां पोलिटिकल एजंटकडे पाठवावयाचे, एवढीच या कलमाची व्याप्ति राहिली होती. परंतु या तहनाम्यांत सेशन्स कोर्टला किंवा हायकोर्टला अपील ऐकण्याचे व फेरतपासणीचे जे अधिकार आहेत, ते या जहागिरीचे बाबतींत कोणीं वापरावयाचे, या प्रश्नाचा खुलासा झाला नव्हता. चालत आलेल्या वहिवाटीवरून व दरबारच्या स्वामित्वाच्या हक्कांना कोणत्याहि प्रकारें बाध न आणणाऱ्या तहनाम्याच्या हेतूवरून, १८६२ सालच्या तहानें देखील हे अधिकार दरबारकडेच ठेविले होते, हें

स्पष्ट होतें. १८८३ व १८८६ सालच्या सुमारास देखील सरकारच्या कांहीं ठरावांमध्यें बावडा व इचलकरंजीच्या जहागिरदारांच्या बाबतींत " रीजंट इन कौन्सिल हें अपील ऐकण्याचें व फेर तपासणी करण्याचें मुख्य कोर्ट आहे, " असा उल्लेख आलेला आहे. परंतु दरबाराप्रमाणेंच जहागिरींतील सेशन कज्जे चालविणाऱ्या पोलिटिकल एजंटसाहेबांनादेखील, जहागिरींच्या हद्दींत उपस्थित होणाऱ्या फौजदारी बाबींची फेरतपासणी करण्याचा हक्क होता, असें दिसून येतें. एकाच वेळीं निरनिराळ्या कोर्टांना फेरतपासणीचे अधिकार देण्याची पद्धत जरी सामान्य मनुष्याला विलक्षण वाटणारी असली तरी खालसा मुलुखांतील फौजदारी कज्जाच्या बाबतींत ही गोष्ट नेहेमींच्या वहिवाटींतील असल्यामुळें, कोणत्याहि माहितगाराला ती विलक्षण वाटणार नाहीं. अवशिष्ट अधिकारदेखील सरकारानें दरबारला परत द्यावे ह्मणून महाराज राज्यारूढ झाल्यापासून खटपट करीत होते. १८९५ सालीं महाराज लिहितातः—

" तहनाम्यांतील याच कलमाप्रमाणें, कोणत्याहि जहागिरदाराच्या हद्दींतील सात वर्षांपेक्षां अधिक शिक्षा होणारे कज्जे चौकशीसाठीं पोलिटिकल एजंटकडे पाठवावे लागतात. त्या काळीं चांगले पदवीधर अधिकारी नसल्यामुळें व हा तह धामधुमीच्या काळानंतर लवकरच झाल्यामुळें हें कलम घालण्यांत आलें असावें असें मला वाटतें. व खुद्द या तहांत नमूद केल्याप्रमाणें हें कलम ' राजाच्या स्वामित्वाच्या हक्काला कोणत्याहि प्रकारें बाध आणण्यासाठीं नसून, राज्यकारभार सुरळीत चालण्यासाठीं व प्राचीन काळीं तंटे उपस्थित होऊन बंडाळीचे व रक्तपाताचे प्रसंग वारंवार उपस्थित न व्हावे ह्मणून, घालण्यांत आलें होते. अलिकडे सरकारनें मेहेरनजर करून माझ्यावरील विश्वासाचें दृश्य चिन्ह ह्मणून जीवदान देण्याचे अगर फांशीची शिक्षा सांगण्याचे अधिकार मला दिले आहेत. पूर्वींचा धामधुमीचा काळ नष्ट झाला व माझे अधिकारी कार्यक्षम आहेत, याहि गोष्टी याला कारणीभूत झाल्या असाव्यात असें मला वाटतें. ह्मणून जहागिरदारासंबंधीं फौजदारी बाबींतील अवशिष्ट अधिकार मला सरकारकडून परत मिळावेत अशी जर मीं विनंति केली, तर ती अयोग्य ठरणार नाहीं, असा मला भरंवसा वाटतो. " १९०३ सालच्या जून महिन्यांत हे कित्येक वर्षांचे परिश्रम फलद्रुप झाले. त्या काळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड नॉर्थकोट यांनीं सरकारचा ठराव पुढील शब्दांत महाराजांना श्रुत केलाः—

"आपला सुव्यवस्थित राज्यकारभार लक्षांत आणून, १८६२ सालीं त्या काळच्या कोल्हापूरच्या महाराजांना मान्य असलेल्या तहनाम्यांतील ८ व्या कलमान्वयें, मांडलिक जहागिरदारासंबंधीं जे अवशिष्ट अधिकार मुंबई सरकारनें आपल्यापाशीं राखून ठेविले होते, त्या अधिकारांची अमलबजावणी, जोंपर्यंत आपल्या कोर्टाच्या निःपक्षपातीपणाबद्दल व कार्यक्षमतेबद्दल सरकारला शंका राहणार नाहीं तोंपर्यंत, न करण्याचा माझ्या सरकारनें निश्चय केला आहे. हें आपणांस कळविण्यास मला मोठा आनंद होत आहे. म्हणून खालीं नमूद केलेल्या बाबीखेरीज मांडलिक जहागिरींसंबंधींचे अवशिष्ट अधिकार यापुढें महाराजांच्या कोर्टांना देण्यांत येतील.

" माझ्या सरकारनें पुढील बाबी आपल्यापाशीं राखून ठेविल्या आहेत:—

" निर्णयासाठीं आपल्या कोर्टांत पाठवावेत म्हणून ज्या ज्या कज्ज्यासंबंधीं पोलिटिकल एजंट लेखी विनंती करतील ते - व मांडलिक जहागिरींतील अशा स्वरूपाचे परंतु सात वर्षांपेक्षां अधिक कैदेची अगर फांशीची शिक्षा सांगण्यासारखे कज्जे पूर्वीप्रमाणें पोलिटिकल एजंटच्या कोर्टांत चालतील; मात्र हे कज्जे महाराजांच्या कोर्टामार्फत कमिट होऊन यावयाचे आहेत.

" मांडलिक जहागिरदार अधिकारारूढ होतांना त्यांना जे अधिकार दिलेले असतात, त्यांच्यामध्यें ढवळाढवळ केल्याचा कोणत्याहि प्रकारचा आरोप, अधिकारदान-थैल्यांत नमूद असलेल्या गोष्टींविषयीं पूर्ण आदर ठेवून, महाराजांच्या कोर्टांनीं आपणांवर येऊं देतां कामा नये. "

महाराज आपल्या विरुद्ध चाललेल्या अनेक गोष्टींशीं तोंड देतांना व संस्थानांतील कांहीं जहागिरदारांनीं महाराजांविरुद्ध आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें असतांनाहि, हा खलिता मुंबई सरकारानें पाठविला, एवढयाच गोष्टीवरून महाराजांना व महाराजांच्या मित्रांना हा एक मोठा संस्मरणीय विजय संपादल्यासारखें वाटलें. लॉर्ड नॉर्थकोट यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे, या खलित्यानें ' संस्थानला प्राचीन दर्जा प्राप्त करून देण्याच्या मार्गांत बरीच मजल मारली आहे. ' हें संस्थान कित्येक पिढया दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें, संस्थानचा पूर्वीचा दर्जा नष्ट झाला होता. महाराजांच्या उद्दिष्टाचा बराच भाग

आतां साध्य झाला होता; परंतु यानंतर लागलीच या खलित्यान्वयें फेर तपासणी करण्यासंबंधीं व अपील ऐकण्यासंबंधीं दरबारला कोणते ठराविक अधिकार प्राप्त झाले, यासंबंधीं प्रश्न उपस्थित झाला. यापुढें हे अधिकार महाराजांना प्राप्त झाले, अशा समजुतीनें पोलिटिकल एजंट वागूं लागले; म्हणून खलित्याची अमलबजावणी करण्यासाठीं ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं मंजूर केलेल्या शब्दांत एक जाहिरनामा काढून तो स्टेट ग्याझेटमध्यें प्रसिद्ध केला. यानंतर कित्येक महिने सरकारला देखील ही गोष्ट मान्य झाली असावी, असें वाटत होतें. पुढें आक्टोबर महिन्यामध्यें कांहीं कारणामुळें, दरबारनें केलेल्या या खलित्याच्या अर्थव्याप्तीबद्दल सरकारनें शंका उपस्थित केली. या बाबतींत बराच पत्रव्यवहार होऊन अखेर या प्रश्नाचा निकाल १९०४ सालीं झाला. जहागिरदारांची मुख्य तक्रार, अधिकारदान-थैलीसंबंधानें खलित्यांत जो उल्लेख आलेला होता त्यासंबंधीं होती. या खलित्यान्वयें हायकोर्टचे फेरतपासणीचे अधिकार खुद्द जहागिरदारांनाच राहिले होते, असें त्यांच्याकडून प्रतिपादण्यांत येऊं लागलें. याचा परिणाम असा झाला कीं, क्रिमिनल प्रोसिजर कोडान्वयें हायकोर्ट या नात्यानें पोलिटिकल एजंट आतांपर्यंत जी तपासणी करीत होते, ती यापुढें बंद झाली; आणि जहागिरदारांच्या म्हणण्याप्रमाणें, कोल्हापूर दरबारला तो हक्क नसल्यामुळें, अर्थातच जहागिरदारांचीं छोटीं कोर्टें हींच हायकोर्टाच्या दर्जाला पोचलीं! कोल्हापूर दरबारचा अधिकार वाढविण्यासाठीं, मुंबईसरकारनें १९०३ जूनमध्यें लिहिलेल्या या थैलीचा हा झालेला परिणाम विलक्षण होय, यांत शंका नाहीं.

१९०५ सालच्या जानेवारी महिन्याच्या दुसऱ्या तारखेस दरबार भरवून महाराजांनीं जें जाहिर भाषण केलें, त्यांत सरकारच्या संमतीनें या बाबतींतील निर्णय झालेल्या गोष्टी ग्रथित झाल्या होत्या. या जाहीरनाम्यांत पुढील मजकूर होता:—

" आमचे मांडलिक जहागिरदार व सरदार आणि सभ्य गृहस्थ हो! १९०३ सालच्या जून महिन्याच्या १७ व्या तारखेच्या खलित्यान्वयें नामदार लॉर्ड नॉर्थकोट यांनीं आमच्या मांडलिक जहागिरदारांविषयींचे अवशिष्ट सर्व

अधिकार आह्मांला परत दिले; ही गोष्ट तुह्मांपैकीं पुष्कळांना माहितच आहे. यापूर्वी हे अधिकार पोलिटिकल एजंटांना होते, ह्मणून क्रिमिनल प्रोसिजर कोडान्वयें हायकोर्टाला जे फौजदारी अधिकार असतात, ते चालविण्याचा आमचा हक्क आहे. तथापि आमचे कांहीं मांडलिक जहागिरदार विद्येनें व बुद्धिमत्तेनें अधिकारदान-थलीच्या अर्थव्याप्तीपेक्षां कांहींशा अधिक अधिकारस्वातंत्र्याला पात्र झाले आहेत, असें वाटल्यावरून, त्यांच्याशीं उदार बुद्धीनें वागण्याचा आमचा इरादा आहे. ह्मणून त्यांचे वरिष्ठ सरकार व त्यांच्या सत्तेचें उगमस्थान या नात्यानें अधिकारदान-थैलीच्या आधारें त्यांना प्राप्त न झालेले सर्व अवशिष्ट अधिकार आह्मांलाआहेत. तथापि त्यांना अधिकारसूत्रें प्राप्त झाल्यापासून अपील अर्ज दाखल करून घेणें, त्यांच्या कोर्टांनीं केलेल्या ठरावांची तपासणी करणें, अहवाल मागविणें, त्यांच्या खालच्या कोर्टांतील न्यायाधीशांची नेमणूक करण, त्यांच्या कोर्टांतील कज्ज्यांचे वर्ग करणें व अशा प्रकारचे हक्क, जे कायद्यानें हायकोर्टाला आहेत, त्यांची अमलबजावणी करण्याचे प्रसंग सहसा आजपर्यंत आले नाहींत. ही गोष्ट लक्षांत घेऊन व विशाळगड, बावडा, कागल, ( मोठीपाती ) व इचलकरंजीचे जहागिरदार आपल्या बुद्धिमत्तन व उच्च शिक्षणानें खालच्या कोर्टावर जी नेहमीं बारीक नजर ठेवावी लागते, तींतून त्यांना कांहीं अंशीं मुक्त करण्यास पात्र झाले आहेत, व अशा प्रकारची बारीक नजर न ठेवल्यापासून त्यांच्या हद्दींतील लोकांना अन्याय झाल्याचे दिसून आलें नाहीं, या गोष्टीकडे लक्ष पुरवून, आमच्या सत्तेचा उपयोग करण्याचा प्रसंग न येईतोंपर्यंत, ते आजपर्यंत अनु-भवीत असलेली उपरिनिर्दिष्ट सवलत अशीच पुढें त्यांच्या पुरती चालू ठेवण्याचा आमचा हेतु जाहिर करितों. त्यांच्या सुयंत्रित कारभाराविषयीं आह्मी जो हा विश्वास दाखवीत आहोंत, त्याचा ते दुरुपयोग करणार नाहींत अशी आमची खात्री आहे. १८६२ च्या तहनाम्यान्वयें, मांडलिक जहागिरदारांसंबंधीं जे अधिकार दिलेले नव्हते, ते अधिकार आह्मांस परत देऊन आमच्या संस्थानच्या सुधारलेल्या राज्यकारभाराचे गुण उदारबुद्धीनें मुंबई सरकारनें जाणले, त्याबद्दलच्या आमच्या कृतज्ञतेच्या भावना या प्रसंगीं व्यक्त करण्यासहि आह्मांस मोठा आनंद होतो. लॉर्ड नॉर्थकोर्टच्या शब्दांतच सांगावयाचें ह्मणजे, " कोल्हापूर संस्थानला पूर्वीचा दर्जा प्राप्त करून देण्याच्या कामीं या गोष्टीनें मोठी मजल मारली आहे, असें आह्मीहि समजतों. "

या खलित्यामुळें जो परिस्थितींत बदल झाला त्यावरून, संस्थानची न्याय पद्धति वरिष्ठ सत्तेच्या मतें चांगली ठरली. व त्यामुळेंच १८६२ च्या तहान्वयें कोल्हापूरच्या राज्यावर ज्या कडक अटी लादण्यांत आल्या होत्या, त्या शिथिल करण्यांत आल्या. या गोष्टीपुरता महाराजांचा विजय कोल्हापूरच्या इतिहासांत खरोखरच संस्मरणीय असा होईल.

परंतु अशा विजयांना कोल्हापूरचे ब्राह्मण थोडीच भीक घालणार होते. आतां ते नवीन शस्त्रें निर्माण करून त्यांच्या मदतीनें यश संपादण्याच्या उद्योगास लागले. त्यांत त्यांना कितपत यशःप्राप्ति झाली, हें पुढील प्रकरणावरून दिसून येईल.



# प्रकरण १४ वें.

## बेगडी लोकशाही.



ल्हापूर येथील ब्राह्मणसमाज आंग्लविद्या-विभूषित असल्यामुळें त्याला आपल्यावर जो अन्याय होत आहे असें वाटत होते, तो नाहीसा करण्यासाठीं त्यांच्याकडून जर सुसंघटित असे प्रयत्न झाले नसते, तर तें एक मोठें आश्चर्य झालें असतें. या दिशेनें जी चळवळ करण्यांत आली, ती थोड्याशा उशीरानें करण्यांत आली यांत शंका नाहीं. १९०६ सालीं सार्वजनिक कार्यासाठीं म्हणून जो उत्साह ते दाखवीत होते, त्यांचा थोडासा अंश जरी त्यांच्या अंगीं खरोखर असता, तर ही लोकप्रतिनिधि सभा भरविण्याचा प्रयत्न इतक्या उशीरा झाला नसता महत्त्वाच्या जागा एका मागून एक अशा त्यांच्या, हातांतून निघून गेल्यामुळें, त्यांचें हृदय पराजयाच्या खदिराग्नीनें होरपळून गेलें होतें. बुद्धिमत्तचा ठेवा काय तो आपल्या- पाशींच आहे, अशी जी ब्राह्मणांना मोठी घमेंड वाटत होती, ती महाराजांनीं आपल्या बुद्धिप्रकर्षानें जागच्या जागींच जिरविली होती; तशांतच ब्राह्मणेतर पदवीधरांवर चोहोंकडे आतां कृपादृष्टि दाखविली जात असल्यामुळें, व पुढें कोणत्याहि प्रकारें आपलें वर्चस्व पुनः प्रस्थापित करण्याची ब्राह्मणांना आशा न राहिल्यामुळें १९०२ सालच्या सुमारासच त्यांनीं ही सामन्याची तयारी करावयास पाहिजे होती. राजोपाध्यांचें इनाम जप्त करून राजोपाध्याच्या पाठीशीं असलेल्या ब्राह्मण समाजाला जवळ जवळ उघड रीतीनें या सुमारास आव्हानच करण्यांत आलें; हें मागील प्रकरणांवरून वाचकांस दिसून आलेंच असेल. छत्रपतींपेक्षां ज्या ब्राह्मण समाजाविषयीं राजोपाध्याच्या ठायीं अधिक आदर वसत होता, तो ब्राह्मणसमाज भोंसले घराण्याला वेदोक्ताचे अधिकार देण्यास तयार नव्हता, या मुद्यावर राजोपाध्यानें छत्रपतींशीं उघड रीतीनें सामना दिला होता. राजोपाध्याच्या अशा प्रकारच्या धोरणामध्यें एक प्रकारचें धाष्टर्य होतें, यांत

शंका नाहीं; परंतु ज्या देवतेचा राजोपाध्या एकनिष्ठ उपासक बनला होता, त्या देवतेनें त्याला ऐन वेळीं दगा दिला. आपलें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं सुसंघटित प्रयत्न करण्याची कल्पना ब्राह्मणांना नवीन नव्हती. या आज्ञाभंग करणाऱ्या नोकराचें संरक्षण त्याच्या अवमानित धन्याच्या प्रकोपापासून करण्याचा उपाय ठरविण्यासाठीं इनामदार लोकांची एक सभा भरवावी, अशी ब्राह्मणांच्या मुखपत्रानें १९०२ सालच्या जून महिन्यांत सूचना केली होती; परंतु या जाळ्यांत सांपडण्याइतके कोल्हापूरचे इनामदार दुधखुळे नव्हते; पुढें १९०५ सालच्या मे महिन्यांत राजोपाध्याचें अपील व्हाइसरॉयसाहेबांकडून नामंजूर होईतोंपर्यंत जिकडे तिकडे सामसूम होतें. या मुदतींत ब्राह्मणी वर्तमानपत्रकारांनींहि कोणत्याहि प्रकारची हालचाल दाखविली नाहीं; परंतु ब्रिटिश सरकारच्या सहाय्यानें यश संपादण्याच्या राजोपाध्याच्या आशेचा व्हाइसरायांच्या निकालानें पूर्ण बींमोड झाला. तेव्हां पुढें एक महिन्याच्या अवधींतच ‘ समर्थ ’ खडबडून जागा झाला व प्रतिनिधी सभेच्या कल्पनेची चर्चा जूनच्या ९ तारखेस सुरू झाली. आतां कोठें ब्राह्मण लढाईला तोंड देण्यास सज्ज झाले एका उत्साही ब्राह्मण वकिलानें जनतेच्या पुढाऱ्यांना कोल्हापूर येथें जमण्यास निमंत्रण केलें. सतराव्या शतकांतील व्हिग लोकांप्रमाणें ब्राह्मणांच्या शब्दकोशांत ‘ जनता ’ या शब्दाची व्याप्ति लेखक व त्याचे मित्र अर्थात् त्याचे जातबांधव अशी होती. आपल्या होरक्याच्या पराजयामुळें ब्राह्मणांची मानखंडना झाली; परंतु ‘ गतं न शोच्यम् ’ या वृत्तीनें वागण्याचा त्यांचा विलक्षण स्वभाव असल्यामुळें झालेला प्रकार ते पार विसरून जाऊन, एक वर्षहि लोटलें, तरी लोकप्रतिनिधी जमलेच नाहींत ! वेदोक्त प्रकरणांत ब्राह्मणांचा पुरस्कार करून, प्रसिद्धीस आलेले राजाराम कॉलेजमधील अध्यापक मि० विजापूरकर हे तरुण विद्यार्थ्यांवर देखरेख करण्यास गैरलायक ठरून, नोकरींतून मोकळे झाले होते. कोल्हापुरांत सार्वजनिक चळवळ करणाऱ्या मंडळींत आतां त्यांची भर पडल्यामुळें कोल्हापुरांतील आळतेकर नांवाच्या एका ब्राह्मण वकीलाला मोठा उत्साह येऊन, आपलें पूर्वीचें कार्य १९०६ सालीं त्यानें पुन्हां आपल्या हातीं घेतलें. आणि त्याच्या सुदैवानें त्याला पूर्वीपेक्षां या खेपेस अधिक यश प्राप्त झालें.

१९०४ सालच्या एप्रील महिन्यांत कोल्हापूरची म्युनसिपालिटी बंद ठेवण्यांत आल्यामुळें असंतुष्ट लोकांच्या हातीं एक नवीन शस्त्र मिळालें. आतां

पर्यंत ते ज्या अन्यायाविरुद्ध ओरड करीत होते, त्याचा संबंध फक्त या जातीपुरताच होता. कोल्हापुरांतील इतर समाजांना याचा कोणत्याहि प्रकारचा संबंध नव्हता; परंतु दरबारच्या या कृत्यामुळे सार्वजनिक अन्यायाबद्दल एक ओरड करण्यास त्यांना संधि मिळाली. पैशाची भयंकर अफरातफर होऊन म्युनिसिपालिटीकडून रस्त्यांची डागडुजी करणें व दिवाबत्ती करणें आणि नळ-तोट्यांची चांगली व्यवस्था ठेवणें, अशा प्रकारची म्युनिसिपालिटीची आद्य कर्तव्येंदेखील पार पडेनाशीं झाल्यामुळें, दरबारला म्युनिसिपालिटी बंद करावी लागली. म्युनिसिपालिटीच्या उत्पन्नाची कोठें गफलत झाली, हें पहाण्यासाठीं महाराजांनीं एक खास अधिकारी नेमिला. म्युनिसिपालिटीच्या कारभाराची पाहणी करून उपाय सुचविण्याची कामगिरी यांच्यावर सोंपविण्यांत आली होती. म्युनिसिपालिटी बंद ठेवण्यासाठीं जो हुकूम सोडण्यांत आला होता, त्यामध्यें जरी याचा उल्लेख आला नव्हता, तरी म्युनिसिपालिटीमध्यें ब्राह्मणांचा गट निर्माण होऊन जें पक्षपाती वातावरण उत्पन्न झालें, तें एक महाराजांच्या या कडक उपायावलंबनाच्या कारणांपैकीं कारण असावें. असें असेल तर म्युनिसिपालिटीमध्यें ब्राह्मणेतरांची नेमणूक करणें हाच योग्य उपाय असें कोणी ह्मणेल, परंतु संस्थानच्या नोकरीखेरीज कोल्हापुरांत सुशिक्षित ब्राह्मणेतर या वेळीं एकहि नव्हता, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां अशा प्रकारचा उपाय करण्याची सोयच नव्हती, असें दिसून येईल. या हुकुमामुळें ब्राह्मणांना ओरड करण्यास चांगलीच संधि मिळाली, हें मात्र खरें! व या संधीचा शक्य तितका उपयोग करून घेण्यास ते उद्युक्त झाले होते.

कै० नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनीं या संस्थानांतच जन्म घेतला होता. राजाराम कॉलेजांत त्यांनीं शिक्षण संपादिलें होतें. १९०४ सालच्या जून महिन्याच्या प्रारंभीं कोल्हापुरांतील एका संमेलनाला ते हजर राहिले. त्यांचे कोल्हापुरांतील मित्र ज्या विविध हेतूनें प्रेरित झाले होते, त्यांचा अंश देखील या थोर पुरुषावर लादणें योग्य होणार नाहीं. परंतु ब्राह्मणांच्या कंपूंतील सूत्रें हलविणाऱ्या लोकांशीं त्यांचा फार जुना संबंध असल्यामुळें हे लोक त्यांच्या बाळपणाचे सोबतीहि होते. त्यांच्यावर या लोकांचें साहजिकपणेंच वजन पडणें शक्य झालें. आह्मांला उपलब्ध असलेल्या माहितीवरून त्यांचा कल अमूकच बाजूस होता असें ह्मणतां येत नाहीं; तरी त्यांच्या कोल्हापूर येथील मित्रांना त्यांच्या वजनाचा आपल्या कामीं उपयोग होईल अशी आशा वाटत होती; यांत शंका

नाहीं. याविरुद्ध पक्षाच्या कंपूंत जे विचार चालले होते त्यांची प्रतिक्रिया महाराजांच्या व महाराजांच्या मित्रांच्या मनावर झाल्याखेरीज राहिली नाहीं. उपरिनिर्दिष्ट संमेलनाच्या वेळीं मि० गोखले यांनीं आपल्या गैरहजेरींत अकरा वर्षांपूर्वींचा उत्साह व आशावादीपणा लोकांमध्यें दिसून येत नाहीं, याबद्दल विषाद व्यक्त केला. ह्मणून कोणतें तरी उद्दिष्ट साध्य करून घेण्यासाठीं कोणत्याहि प्रकारच्या अडचणींना न जुमानतां आळस सांडून, उद्योगास लागा, असा त्यांनीं स्वाभाविकपणेंच उपदेश केला. चांगल्या ध्येयाला हा उपदेश खरोखरच नामी होता. परंतु मि० गोखले यांच्या मित्रांनीं यांच्या ह्मणण्याचा विपरीत अर्थ करून, हा उदारधी राष्ट्रभक्त आपल्याच अनुदार व मत्सरी पक्षाला येऊन मिळाला अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली व यानंतर कांहीं महिन्यांनीं ते सर्व हतबुद्ध झाल्यामुळें कांहीं तरी हातपाय हालविणें, जेव्हां त्यांना अपरिहार्य झालें, तेव्हां त्यांच्या या निंद्य मोहिमेंत मि० गोखल्यांचें साह्य होईल, अशी त्यांना आशा होती. १९०६ सालच्या आक्टोबर महिन्यांतील पहिल्या सभेचें अध्यक्षस्थान ते स्वीकारतील अशी त्यांना आशा होती, परंतु तीहि व्यर्थच गेली. तरीसुद्धां त्यांची सर्वस्वीं निराशा झाली नाहीं. १९०६ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या १४ व्या तारखेस ' समर्थ ' पत्र ह्मणतें, " नामदार गोखले यांनीं मि० जॉन मोर्ले यांच्या कानांवर हकीकत घातलीच आहे. आह्मी नेकीनें वागूं या. आमच्या गोष्टीला सफेती चढविण्याचा मोह आह्मीं आपणांस होऊं न दिला, ह्मणजे **आमची फत्तेंच होणार** " नामदार गोखल्यांकडून यांच्या या प्रखर आशावादीपणाला कितपत सहाय्य मिळालें होतें, हें मी सांगूं शकत नाहीं, परंतु तुमच्या हकीकतीला सफेती चढवूं नका व तसें केलें असतां तुमची फत्तेंच होईल, असें त्यांनीं त्यांना आश्वासन दिलें असलें तर, त्यांत कोणालाहि आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं; मात्र गोखल्याच्या या उपदेशाप्रमाणें ब्राह्मणपक्ष मुळींच कधीं वागला नाहीं, आणि बहुधा याच कारणामुळें, गोखल्यांनीं पुनः कधींहि कोल्हापूरच्या दिशेला तोंडहि केलें नाहीं !

परंतु टिळकांचे पुण्यांतील जहाल अनुयायी हे गोखल्यांचे प्रतिस्पर्धी असून, त्यांच्यामध्यें व कोल्हापूरच्या ब्राह्मणांमध्यें बरेंच साम्य असल्यामुळें, त्यांनीं कोल्हापूरच्या आपल्या समानशील बंधूंशीं तादात्म्य केलें. गोखले जसे कोल्हापुरी गृहस्थ होते, तसे टिळक नव्हते. कोल्हापूरच्या लोकांशीं व संस्थानाशीं

गोखले यांचा निकट संबंध आला असूनहि संस्थानच्या खाचखळग्यांत ते कधींच सांपडले नाहींत; परंतु टिळक हे गेल्या कित्येक वर्षांपासून ब्राह्मणांच्या बोटींत बसून त्यांच्याबरोबर वाहात चालले होते. सुप्रसिद्ध बाबामहाराजांच्या इस्टेटीचे मि० टिळक हे प्रमुख पंच असून, शिवाजी चळवळीचेहि ते आद्य प्रवर्तक असल्यामुळें, कोल्हापुरांतील उलाढालीशीं अर्थात्‌च त्यांचा निकट संबंध आला. १८९५ सालीं कोल्हापुरास शिवाजी क्लबाची स्थापना होऊन, पुढें लवकरच शिवाजीच्या मदतीसाठीं उभारण्यांत येणाऱ्या नवीन राष्ट्रीय सेनेला पैशाचा पुरवठा करण्याकरितां चोऱ्या व दरवडे घालून तो प्रसिद्धीस आला. या क्लबाच्या टोळीच्या या दुष्ट कृत्याला टिळक यांनीं बुद्धिपुरःसर अगर प्रत्यक्षपणें प्रोत्साहन दिलें, असें विधान करणें योग्य होणार नाहीं; परंतु टिळक हे या क्लबाचे आराध्य दैवत बनले होते यांत शंका नाहीं. राजकीय ध्येय साध्य करण्यासाठीं कोणत्याहि मार्गाचें अवलंबन करणें श्रेयस्कर होईल व शिवाजीमहाराजांनीं अफझुलखानाचा जो वध केला त्याला सामान्य नीतितत्त्वाची कसोटी लागूं पडत नसल्यामुळें, तो अनीतिमूलक होता असें ह्मणतां येणार नाहीं. अशा घातुक विचारसरणीचे टिळक हे प्रचारक बनल्यामुळें, १८९७ सालीं त्यांना शिक्षा झाली. शिवाजीक्लबानें जे मार्ग स्वीकारिले होते, त्यांस ही टिळकांचीं तत्त्वें स्पष्टपणें पाठिंबा देणारीं होतीं. टिळकांचा व या लोकांचा निकट संबंध आला होता, हीहि गोष्ट पुढें उघडकीस आली. ज्यांच्यावर अराजक गुन्हे केल्याचे आरोप आले होते, अशा कोल्हापुरांतील कांहीं तरुण लोकांच्या मध्यभागीं टिळक बसले आहेत, असा एक फोटो याच सुमारास आढळून आला. १९०६ सालच्या आक्टोबर महिन्याच्या बाराव्या तारखेस महाराज लिहितातः—

" शिवाजी चळवळ येथें एकदां सुरू झाली होती. ती जरी दाबून टाकण्यांत आली होती तरी ती पुन्हां उमटली व आज देखील टिळक हे ज्या पक्षाचे पुढारी आहेत, त्या पक्षाशीं संबंध असलेल्या कांहीं बदमाष लोकांशीं कित्येक चोऱ्यांचा व दरवड्यांचा संबंध पोंचतो. आह्मांला जो एक फोटो सांपडला आहे, त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. या फोटोंत टिळक मध्यभागीं असून त्यांच्यासभोंवार इतर दरोडेखोर आहेत."

या फोटोचा अर्थ काय होता, हें सांगणें कठीण आहे; परंतु यामुळें जबरदस्त शंकेला अवसर मिळाला, ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. या गुन्हेगार लोकांच्या टोळीच्या बदमाष प्रवृत्तीचें टिळकांना ज्ञान नसल्यामुळें, त्यांनीं यांच्यामध्यें मध्यस्थान स्वीकारिलें असावें, असा तर्क करतां येण्यासारखा आहे; तरीसुद्धां अराजक तरुण लोक टिळकांना आपल्या गुरुस्थानीं मानीत असून, या लोकांचा त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध होता, हें अनुमान नाकबूल करतां येणार नाहीं.

टिळक हे बाबामहाराजांच्या इस्टेटीचे ट्रस्टी असल्यामुळें, कोल्हापुरांतील उलाढालींशीं त्यांचा अधिकच संबंध आला. महाराजांवर आपलें मोठें वजन आहे, अशी त्यांना प्रारंभापासून घमेंड होती. १८९५ सालीं महाराजांनीं जो मार्ग स्वीकारिला होता, त्यापासून त्यांना परावृत्त करण्याची जबाबदारी त्यांनीं स्वतः आपल्या अंगावर कशी घेतली होती, हें आह्मीं मागेंच सांगितलें आहे. बाबामहाराजांची इस्टेट ही कोल्हापूर संस्थानची देणगी असून, या इस्टेटीचा बराचसा भाग कोल्हापूरच्या हद्दींत होता. संस्थानांमध्यें प्रचलित असलेल्या कायद्यानुसार बाबामहाराजांना वारस ह्मणून, त्यांची स्त्री ताईमहाराज यांजकडून जो दत्तक घेवविला जाणार होता, त्याला दरबारची मंजुरी मिळविणें जरूर होतें. या ट्रस्टींपैकीं मि० नागपूरकर हे एक असून, त्यांच्या मदतीनें मयताच्या घराण्याच्या कोल्हापूर येथील शाखेंतून बाळामहाराजांना दत्तक घेण्याची ताईमहाराजांची इच्छा होती; व पुढें त्यांनीं ही इच्छा अमलांतहि आणली. पण आपल्या एका हस्तकाला या इस्टेटीचा वारस करण्याची टिळकांची इच्छा होती. त्यामुळें टिळक व त्यांच्या पक्षाचे दोन ट्रस्टी आणि ताईमहाराज व मि० नागपूरकर यांच्यामध्यें लढा उपस्थित झाला. या लढ्याच्या विविध अंगांची येथें सविस्तर चर्चा करण्याची जरूरी नाहीं; परंतु या वादामध्यें महाराजांना कां पडावें लागलें याची संक्षिप्त माहिती येथें देणें जरूर आहे. कोल्हापुरांतील वादाचा अखेरचा निकाल असा झाला कीं, कोल्हापूर शाखेंतील बाळामहाराजांचें दत्तकविधान कोल्हापूर संस्थाननें मंजूर केलें; परंतु विरुद्धपक्षाच्या जगन्नाथ महाराजांचें दत्तकविधान प्रिव्ही कौन्सिलनें कायम केलें. अशा प्रकारें या इस्टेटीचे दोन विभाग झाले. ब्रिटिश मुलुखांतील वादाचा निर्णय मि० टिळकांच्या व त्यांच्या साक्षीदारांच्या तोंडी पुराव्यावरून झाला असें दिसतें. या साक्षीदारांनीं १९०१ सालच्या जून महिन्याच्या २३ तारखेस औरंगाबाद येथें झालेल्या जगन्नाथ

महाराजांच्या दत्तकविधानाचें समर्थन केलें. भिन्न क्षेत्रांतील दोन श्रेष्ठ न्यायपीठांनीं एकाच वादाचे परस्पर विरुद्ध असे निकाल दिले असतांना, आपल्या विचारांना, व मन:स्थितीला यांपैकीं जो पटेल तो खरा मानल्याखेरीज सामान्य वाचकांना गत्यंतरच नाहीं. तथापि महाराजांपुढें जो स्पष्ट पुरावा आला, त्याचा येथें उल्लेख करण्यास हरकत दिसत नाहीं. या पुराव्यावरून व या वादाची परिस्थिति लक्षांत घेऊन, दरबारनें जो निर्णय दिला, तो सर्वथैव योग्य होता असें मला वाटतें. दरबारची अगोदर मंजूरी मिळविल्याखेरीज जगन्नाथमहाराजांचें दत्तकविधान कोल्हापुरामध्यें कायदेशीर ठरणें अशक्य होतें, ही गोष्ट उघड आहे. जें दत्तकविधान औरंगाबाद येथें झालें, असें सांगण्यांत येतें तें दत्तकविधान होण्यापूर्वी नऊ दिवस अगोदर ह्मणजे १९०६ सालच्या जून महिन्याच्या १८ व्या तारखेस टिळकांनीं मि० सबनीस दिवाणसाहेबांना एक पत्र लिहून, लौकरच सादर करण्यांत येणाऱ्या अर्जावरून दिनावधि न लावितां एकदम परवानगी मिळवून देण्याची व्यवस्था करावी, ह्मणून विनंति केली होती. या पत्राला एक ताजें केलम घालण्यांत आलें असून, त्यांत टिळक ह्मणतात कीं, आह्मी इतक्या लौकर दत्तक घेणार, ही गोष्ट बाहेर पडूं नये, अशी आमची इच्छा आहे. ही मंजूरी केवळ ‘ औपचारिक ’ आहे, असेंहि टिळकांचें ह्मणणें होतें; परंतु मुलगा पसंत करितांच दत्तकविधान करितां यावें, ह्मणून मंजूरी आपल्या हातांत पाहिजे, ही गोष्ट जर त्यांना स्पष्टपणें कबूल होती, तर परवानगीच्या ‘ औपचारिकपणाचा ’ अर्थ टिळक ह्मणत त्याहून अगदीं वेगळा होता असें स्पष्ट दिसतें. त्यांच्या समजुतीप्रमाणें खरोखर मंजूरी महत्त्वाची होती व ही मंजूरी जून २७ तारखेनंतर कांहीं दिवसपर्यंत लांबणीवर पडल्यामुळें, औरंगाबाद येथें मंजुरीपूर्वी ज्या, ज्या गोष्टी घडल्या असतील त्या सर्व अर्थातच कोल्हापुरामध्यें बेकायदेशीर ठरल्या. टिळक हे या कामाविषयीं जी इतकी घाई करीत होते व आपली हालचाल गुप्त राखण्यासाठीं ते इतकी खबरदारी घेत होते, तिचें रहस्य समजणें कठीण आहे. जूनच्या २७ तारखेस जें दत्तकविधान झालें असें सांगण्यांत येतें, त्यापूर्वी जो प्रकार घडला, त्यावरून या गोष्टींवर कांहींसा प्रकाश पडतो. तारीख २९ मे १९०१ रोजीं टिळक व इतर ट्रस्टी यांनीं मिळून असें ठरविलें कीं, ( औरंगाबाद ) बाबरें घराण्यांत जर कांहीं मुलें असतील, तर त्यांचें वय, शिक्षण, वर्तणूक, घराण्याची स्थिति व जन्मपत्रिका यांसंबंधीं माहिती मिळवावी. त्यांनीं ही माहिती

मिळविण्यासाठीं मि० नागपूरकर यांची योजनाहि केली होती. ( वरील व पुढील उतारे पुण्यांत चाललेल्या दिवाणी दाव्याच्या फाईलामधून घेतले आहेत. ) तथापि १९०१ सालच्या जून महिन्याच्या १८ व्या तारखेस " श्रीताईमहाराजांनीं अशी सूचना केली की, मि० बाळ गंगाधर टिळक व मि० गणेश श्रीकृष्ण खापर्डे या उभयतांनीं बाबरेला जाऊन मुलें पसंत करावींत व त्या घराण्यासंबंधीं काय तें ठरवून त्यांनीं परत यावें." यावर ट्रस्टींचें असें मत पडलें कीं, "श्रीताईमहाराजांनीं जाऊन मुलें पहावींत व तीं पसंत करावींत." या शेऱ्यावर तीन ट्रस्टींच्या सह्या असून, त्याला मि० नागपूरकर यांनीं एक कलम जोडून, नमूद केलेल्या कांहीं गोष्टींची दुरुस्ती केलेली आहे. ते ह्मणतातः--

" या गोष्टीसंबंधानें कै० श्रीबाबामहाराजांनीं आपल्या मरणापूर्वीं मृत्युपत्र करीत असतांना, मि० बाळ गंगाधर यांना स्पष्ट असें सांगितलें कीं, दत्तक मुलगा घेण्याची जरूरी भासली तर श्रीघराण्यापैकींच मुलगा दत्तक घ्यावा, बाहेरचा मुलगा दत्तक घेऊं नये. मि० टिळक हे ह्या गोष्टीला कबूल झाले; परंतु या गोष्टीचा विचार झालेला नाहीं. आणखी श्रीताईमहाराजांनीं श्रीबाळामहाराजांना आपण पसंत केलें आहे; ह्मणून त्यांना दत्तक घ्यावें अशी इच्छा प्रदर्शित केली. ही गोष्ट करारांत नमूद झालेली नाहीं, कारण सदर तिघांना ही गोष्ट नापसंत होती. मि० टिळकांनीं मला जसें सांगितलें तसें मीं लिहिलें आहे. माझी सही घालतांना खुलासा लिहिण्याची मला जरूरी वाटली. भोर येथील घराणें श्रींच्या घराण्यापैकीं नाहीं हें मीं पंचांना कळविलें नाहीं."

"टिळकांचें असें ह्मणणें होतें कीं, या कलमांतील मजकूर खोटा असून, बाबामहाराजांनीं " टिळकांच्या सांगण्यावरून मृत्युपत्रांतून हे शब्द मुद्दाम गाळले" टिळकांच्या या विधानानेंच नागपूरकरांच्या ह्मणण्याला पुष्टी येते, ही गोष्ट टिळकांसारख्या चाणाक्ष व अनुभविक मनुष्याच्या लक्षांत कशी आली नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. मुलगा विवक्षित घराण्यांतून दत्तक घ्यावा, अशी बाबामहाराजांनीं आपली इच्छा प्रदर्शित केली होती, एवढेंच नागपूरकरांचें ह्मणणें होतें. ही गोष्ट मृत्युपत्रांत नमूद न करण्याविषयीं मीं बाबामहाराजांना सांगितलें; ह्मणून त्यांनीं ती गाळली ही गोष्ट टिळक कबूल करतात. तेव्हां नागपूरकरांचें ह्मणणें बरोबर होतें हें टिळकांच्याच कबुलीवरून स्पष्ट होतें. टिळकांच्या सांगण्यावरून वरील अट मृत्युपत्रांत नमूद करून न ठेवतांहि ती गोष्ट ट्रस्टी लोक अमलांत आणतील

अशी मयताची समजूत झाल्यामुळें, व टिळकांच्या आश्वासनावर विश्वास ठेवून बाबामहाराजांनीं मृत्युपत्राच्या खडर्यांतून ते शब्द वगळले असावेत, हें उघड आहे. या बैठकीनंतर नागपूरकरांनीं हें कलम घातलें असें जें सांगण्यांत येतें, त्याची सत्यता पटत नाहीं; कारण नागपूरकर या बैठकीला हजर असून, हकीकतीच्या पत्रकावर त्यांनीं सही केलेली नाहीं. वास्तविक पाहिलें असतां भिन्नमतनिदर्शक कलम नागपूरकरांनीं जर मागाहून घातलें असतें, तर त्यांची मूळ पत्रकावर सही असावयास पाहिजे होती. याच दिवशीं कोल्हापूरच्या दिवाणांना टिळकांनीं जें पत्र लिहिलें आहे, त्यावरून यांतील पंचांचें मत ताईमहाराजांना मान्य नव्हतें आणि त्यांनीं ताईमहाराजांना फक्त मुलें पाहून पसंत करण्यास सांगितलें, असें स्पष्ट दिसून येतें. औरंगाबादेला टिळकांच्या बरोबर जेव्हां त्या गेल्या—पूर्वी ठरल्याप्रमाणें नागपूरकरांच्या ऐवजीं टिळक हे स्वतः गेले ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.—तेव्हां तेथील किंवा अन्य ठिकाणचीं मुलें पाहून पसंत करण्याकरितांच, दत्तक घेण्याकरितां नव्हे, आपण जात आहों, अशी त्यांची समजूत झालेली होती; परंतु टिळकांची समजूत निराळ्या प्रकारची होती. ज्या दिवशीं दत्तकपत्र झालें, त्याच दिवशीं दत्तकविधान झाल्याबद्दलचा दाखला औरंगाबाद येथील कांहीं शास्त्र्यांकडून घेण्यांत आला. या दाखल्यांत नमूद असलेला मुलगा ज्योतिषशास्त्राप्रमाणें दत्तकास लायक आहे, ही गोष्ट शाबीत करण्यासाठीं हा दाखला घेण्यांत आला असावा असें मानल्याखेरीज या दाखल्याच्या आवश्यकतेचा खुलासा होऊं शकत नाहीं. या दाखल्यांतील शेवटचें एकच वाक्य वगळलें तर हीच समजूत खरी ठरूं पाहतें. हें दत्तकपत्र लिहून पूर्ण झाल्यानंतरहि त्याच दिवशीं ताईमहाराज दत्तक मुलाच्या जनक बापास लिहितात कीं, "या मुलाखेरीज दुसऱ्या कोणालाहि मी दत्तक घेणार नाहीं. यावरून दत्तक आपण घेतला नाहीं, अशी त्यांची अद्याप समजूत होती, हें स्पष्ट आहे. औरंगाबादेहून पुण्याला परत आल्यानंतर औरंगाबाद येथें झालेली हकीकत डिस्ट्रिक्ट जजाच्या कानावर ताईमहाराजांनीं घातली. ह्या बाई घरीं आल्यानंतर त्यांच्याकडून जें पत्र पाठविण्यांत आलें त्यांत देखील हे कागद 'प्रास्ताविक' आहेत असें नमूद झालेलें आहे. ट्रस्टी ऑफिसांत टिळकांनीं औरंगाबादच्या प्रवासाचा जो हिशेब दिला आहे, तोहि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. यांत १५ रुपये आणि कांहीं आणे पै, एवढाच खर्च दत्तकाप्रीत्यर्थ दाखविण्यांत आला आहे. 'कांहीं लोकांसमक्ष व दत्तक मुलाची अखेरची निवड करण्यासाठीं जी (ब्राह्मणांची) सभा (ठरावाच्या वेळीं) झाली होती, त्या वेळीं धर्मादाय' ह्मणून ही रकम खर्च लिहि-

ण्यांत आली होती. ( कंस व जाडी अक्षरें आह्मीं घातलेली आहेत ) हें वाक्य जसेंच्या तसेंच पाहिलें तर टिळक जें दत्तकविधान झालें ह्मणत होते, त्याबद्दल एक पैदेखील खर्च करण्यांत आली नव्हती, असें ह्मणण्यास मुबलक जागा होती. पण हें टिप्पण कोर्टांत आल्या वेळीं वर असलेले शब्द काळया शाईनें खोडून काढून त्यांच्यावर निराळया शाईंत "त्याचें तोंडी दानप्रतिग्रहण करण्यासाठीं" असे शब्द घालण्यांत आले होते. त्याचें ह्मणजे अर्थात "त्या मुलाचें" दुसऱ्या दिवशीं (२८ तारखेस) "**दत्तक मुलाची अखेरची निवड झाल्याबद्दल, परत आल्यावर देवाला प्रसाद वांटण्यासाठीं,**" ३ रुपये खर्च घातला आहे. या लेखांवरून व वस्तुस्थितीवरून औरंगाबादचें दत्तकविधान खरें होतें, असें ह्मणणें धाडसाचें होतें, एवढी गोष्ट निर्विवाद आहे. या गोष्टीसंबंधीं या ठिकाणीं अधिक चर्चा करावयास पाहिजे असें नाहीं.

अशा परिस्थितींत जगन्नाथमहाराजांच्या दत्तकविधानाला मंजूरी मिळविण्यासाठीं टिळकांनीं महाराजांना विनंति केली. यानंतर एक महिन्यानें त्यांनीं कोल्हापुराला येऊन महाराजांची मुलाखत घेतली; परंतु ताईमहाराजहि कांहीं स्वस्थ बसून राहिल्या नव्हत्या. तारीख १० जुलै रोजीं, बाळामहाराजांच्या दत्तकविधानाला मंजूरी मिळविण्यासाठीं त्यांनीं दरबारला अर्ज केला होता. ही मंजूरी देण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत नाहीं, असा दरबारनें निकाल दिला. यानंतर थोडया दिवसांनीं हें दत्तकविधान झालें. वर जी हकीकत दिली आहे, तीवरून टिळकांचें दरबाराशीं वैतुष्टय कसें घडून आलें, व याचा परिणाम पुढें त्यांचे दरबारशीं जे संबंध आले, त्यांच्यावर कसा घडून आला, हें समजण्यासारखें आहे. आह्मी ज्या काळाचा ( १९०६ ) आतां विचार करीत आहोंत त्या काळीं हें प्रकरण ऐन रंगांत आलें असून, टिळकांवर दिवाणी व फौजदारी कज्जे चालू होते. त्यामुळें टिळकांचें मन महाराजांविषयीं अधिकच कलुषित झालें असलें पाहिजे, हें सांगावयास नकोच.

या वेळीं देशांतील राजकीय परिस्थिति मोठी आणीबाणीची होती. १९०६ सालच्या आगष्ट महिन्यांत महाराजांनीं या परिस्थितीचें पुढीलप्रमाणें संक्षिप्त वर्णन केलें आहे:—

"टिळकांचें साहाय्य असलेल्या बंगालच्या पुढाऱ्यांच्या चिथावणीनें बंगालमध्यें असंतोष पसरला आहे यांत शंका नाहीं. टिळक येथें नुकतेंच येऊन

गेले. बंगालची फाळणी हें नुसतें निमित्त आहे. हा असंतोष या भागांत जरी विशेष पसरला नाहीं तरी टिळककंपू वाईट मार्गांनीं ही गोष्ट साध्य करूं पाहात आहे, हें आपणांस विदित आहेच. यांच्याच प्रयत्नामुळें उपरिनिर्दिष्ट चोऱ्या घडून आल्या. ही चळवळ फक्त याच वर्गात आहे. सामान्य जनतेला याचा संपर्कसुद्धां लागलेला नाहीं; परंतु योग्य वेळीं जर पुरेशी दक्षता घेतली नाहीं तर हा असंतोष सामान्य लोकांमध्यें सुद्धां पसरण्याचा संभव आहे. शेतकरी वर्ग ( याविषयीं ) पूर्णपणें बेफिकीर आहे. वकील, वर्तमानपत्रकार, शिक्षित व्यापारी व दुःखाची गोष्ट ही कीं, शाळेचीं मुलें यांच्यामध्यें सुद्धां हें वारें शिरलें आहे. ''

विद्यार्थ्यांच्या चळवळीच्या ठिणग्या कोल्हापुरापर्यंत येऊन पोंचल्या होत्या. राजारामशिक्षणसंस्थेंतील कित्येक मुलांना हांकून लावल्याचा व कॉलेज-मधून मि० विजापूरकरांना दूर केल्याचा उल्लेख मागें आलेलाच आहे. कॉले-जच्या विद्यार्थ्यांनीं वाचनालयाच्या भिंती चित्रविचित्र केल्याबद्दल प्रिन्सिपाल साहेबांनीं विद्यार्थी दशेला उचित अशा तऱ्हेनें त्यांना शासन केलें; परंतु वर्तमानपत्रांतून त्यांच्यावर भडिमार करण्यांत आला. मि० विजापूरकरांनीं बंगालच्या पद्धतीवर ' समर्थ-विद्यालय ' नांवाचें एक राष्ट्रीय स्कूल काढलें होतें. त्यासंबंधीं आक्टोबरच्या ५ तारखेस महाराज लिहितात:—

" ज्या शिवाजी चळवळीच्या नांवानें कित्येक दरोडे घालण्यांत येत आहेत व तरुण लोक अराजक व राजद्रोही बनविले जात आहेत, ती चळ-वळ येथें सुरू झाल्यामुळें व नवीनच येथें एक राष्ट्रीय विद्यालय अस्तित्वांत आल्यामुळें मला मोठी चिंता उत्पन्न झाली आहे. ''

या विद्यालयाचीं सूत्रें टिळकांच्या हातीं होतीं, हें मीं येथें निराळें सांगाव-यास पाहिजे असें नाहीं; कारण ते या शाळेच्या प्रमुख चालकांपैकीं एक होते.

संस्थानांतील अशा प्रकारच्या प्रक्षुब्ध वातावरणांत कोल्हापुरांतील ब्राह्म-णांनीं प्रतिनिधी सभेची चर्चा सुरू केली. या सभेला योग्य प्रतिनिधित्व प्राप्त करून देण्यासाठीं तिच्या चालकांनीं संस्थानांतील ब्राह्मणेतर जातींच्या पुढाऱ्यांची या कामीं सहानुभूति मिळवावयास पाहिजे होती; परंतु ते ब्राह्मणांशीं सहकार्य करण्यास तयार झाले असते काय ? कित्येक ब्राह्मणांच्या लक्षांत ही गोष्ट येऊन

त्यांना ही योजना ह्मणजे महंमदाचें मनोराज्य वाटलें. सप्टेंबरच्या १५ तारखेचा ' समर्थ ' ह्मणतोः—

" कोल्हापूर प्रतिनिधिसभेची कल्पना आह्मांस प्रिय नाहीं असें नाहीं; परंतु आह्मीं अनेकदां ह्मटल्याप्रमाणें त्याला निरनिराळया जातींतील सुशिक्षित लोकांचें पाठबळ मिळाल्याखेरीज कोल्हापूरच्या हल्लींच्या प्रक्षुब्ध वातावरणांत ही कल्पना यशस्वी होण्याचा अगदींच थोडा संभव आहे. "

या प्रतिनिधिसभेच्या चळवळीचे पुरस्कर्ते नेहमीं राष्ट्रीयत्वाच्या अगर विश्वबंधुत्वाच्या गोष्टी बोलत असत व त्यांच्या भाषणांत पक्षभेदविरहितत्वाची छटा सर्वदा दिसून येई; तरी व्यक्तिस्वार्थ अगर जातिस्वार्थ साधण्यापलीकडे त्यांनीं आजपर्यंत कांहींच केलें नव्हतें. यापूर्वीं कित्येक वर्षें ब्राह्मणेतरांना अगदीं न्याय्य वाटत असलेल्या महाराजांच्या धोरणाला यांनीं विरोध केला होता. हिंदी संस्थानांसारख्या अनियंत्रित राजपद्धतीवर विधायक टीका केल्यापासून व या टीकेला लोकमताचें पाठबळ देण्यासाठीं एकादी संस्था स्थापन केल्यापासून, जे सुपरिणाम घडून येण्यासारखे आहेत, त्याकडे सुशिक्षित ब्राह्मणेतरांचें दुर्लक्ष होतें असें नाहीं; तथापि ब्राह्मणांच्या मतलबावरील झिरझिरीत पडद्यांतून त्यांचें हृद्गत ज्यानें ओळखलें नाहीं असा एकहि ब्राह्मणेतर कोल्हापुरांत नव्हता हें खरें आहे. महाराजांविषयीं व त्यांच्या ब्राह्मणेतरानुकूल राज्यपद्धतीविषयीं या लोकांची नेहमींची वागणूक कशी होती ? रयतेच्या दुःखाचा कळवळा यांना एकदम कसा आला ? जनता जर यांच्यावर विश्वसून राहिली, तर त्याचा दुरुपयोग दरबारच्याविरुद्ध मोहिम सुरू करण्याकडे केला जाईल काय ? वेदोक्ताच्या लढयांत ब्राह्मणांचा पराजय होऊन संस्थानांतील हुद्यांवर ब्राह्मणेतरांच्या नेमणुका होऊं लागल्यामुळें त्यांच्या कर्मकहाणीला सुरवात झाली व यानंतर लागलींच प्रतिनिधिसभेची कल्पना निघाली. या दोहोंमध्यें कार्यकारणसंबंध दिसून येत नाहीं काय ? अशा प्रकारचे प्रश्न ब्राह्मणेतरांच्या मनांत साहाजिक उद्भवले. अर्थातच या चळवळीला त्यांचा मुळींच पाठिंबा मिळाला नाहीं. तारीख ४ आक्टोबर रोजीं महाराज आपल्या एका मित्राला लिहितातः-

" अराजकतेचा फैलाव करण्याचा ब्राह्मणांच्या दुष्ट प्रयत्नाविरुद्ध भाषण करण्याचें धैर्य माझ्या संस्थानांतील मागसलेल्या वर्गांत आहे, हें पाहून मला मोठा आनंद होतो. "

या अनुभवावरून महाराजांच्या मनांत अशाच प्रकारचा आणखी एक विचार आला. ब्राह्मणांशीं यशस्वी रीतीनें सामना देण्याचा उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे आपलें सामर्थ्य योग्य प्रकारें एकवटलें पाहिजे, अशी महाराजांच्या एका मित्रानें सूचना केली. तारीख २१ आक्टोबर रोजीं महाराज पुढील पत्रांत या सूचनेचा उल्लेख करितात:—

" मराठा सरदारांचा एक संघ स्थापन करण्याची आपली कल्पना मला अतिशय पटते, व यासाठीं मी अतिशय मेहनत घेत आहें. मुधोळ, जत व अक्कल्कोट आमच्या प्रयत्नांत जर सामील होतील तर खरोखरच फार बरें होईल. परंतु मुधोळखेरीज बाकी संस्थानिक सर्व अल्पवयस्क असल्यामुळें व त्यांचा कारभार बऱ्याच दिवसांपासून ब्राह्मणांच्या हातीं असल्यामुळें या लोकांविरुद्ध जाण्याचें धैर्य त्यांच्यामध्यें आहे किंवा नाहीं, हें मला माहित नाहीं. माझे मराठा मांडलिक जहागिरदार जरी सज्ञान आहेत व ब्राह्मणांपासून अलिप्त रहाण्याचा जरी मी त्यांना उपदेश करीत आहें, तरी त्यांचे ब्राह्मणांशिवाय चालत नाहीं, असें झालें आहे. "

ज्या अपजयामुळें मराठ्यांचें अतिशय नुकसान झालें आहे व आजहि होत आहे, त्याचें आद्य कारण मराठ्यांमध्यें सामुदायिक रीतीनें कार्य करण्याचा अभाव आहे हें होय. पेशव्यांचें व भोंसल्याचें जेव्हां युद्ध जुंपलें तेव्हां शिंद्यानें व गायकवाडानें पेशव्यांचा पक्ष उचलिला. ब्रिटिश व पेशवे जेव्हां हातघाईवर आले तेव्हां हे सगळे स्तब्ध राहिले. ब्रिटिशांचें व भोंसल्यांचें युद्ध सुरू झालें तरी देखील मराठा साम्राज्याचे हे दोन आधारस्तंभ बेफिकीर होते. शिंद्याला दांतीं तृण धरण्याचा जेव्हां प्रसंग आला, तेव्हां होळकर बेपर्वाईनें बाजूस राहिला. तद्वतच आमचे चरित्रनायक ब्राह्मणांचें वर्चस्व हाणून पाडीत होते, तेव्हां इतर सुप्रसिद्ध मराठे सरदार, आपणहि दैवी रोषास पात्र होऊं या भीतीनें ह्मणा अगर कोल्हापूरचा उन्मार्गी ब्रह्मद्वेष्टा जें कार्य करीत होता त्यासंबंधीं बेपर्वाई दाखविण्याचा आंव आणून ह्मणा, बाजूस राहिले! सभोंवार समुद्र प्रक्षुब्ध होऊन, त्याच्या पर्वतप्राय लाटा उसळत होत्या तरी खुद्द महाराजांच्या कित्येक सरदारांवर त्यांचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं असें दिसून आलें. त्यांच्या बौद्धिक दुर्बलतेचें व नैतिक भ्याडपणाचें कारण ओळखण्यास महाराजांना कित्येक दिवस लागले. सुशिक्षित मराठे व इतर ब्राह्मणेतर-सुशिक्षित तरुण पिढी-मात्र दर-

बारचा पक्ष उचलून त्याला मदत करीत होते. वर सांगितलेल्या प्रकारच्या ब्राह्मणेतरांच्या सभा, 'ब्राह्मण हे आपले प्रतिनिधी नव्हेत' हें सिद्ध करण्यासाठीं सर्व संस्थानभर भरत होत्या. शाहुपूरींतील वखारींत आक्टोबरच्या २ तारखेस झालेल्या सभेवर या निषेधात्मक सभेचा परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. या वेळीं हजर असलेल्या लोकांची संख्या इतकी थोडी होती कीं, ती या सभेचें प्रतिनिधित्व सिद्ध करण्यास देखील ती पुरेशी नव्हती. या सभेच्या आणखी एका अंगाचें वर्णन महाराजांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे:–

"लोकांचें योग्य प्रतिनिधित्व राखून प्रामाणिक रीतीनें ही चळवळ करण्यांत आली असती तर त्याचें मला कांहींच वाटलें नसतें. परंतु हे पुढारी आपली नजर केवळ कागल व कोल्हापूर यांच्यावरच ठेवून इतर मांडलीक जहागिरदार व सदर्न मराठा संस्थानांपैकीं एकाचाहि संबंध मनांत न आणतां, हे प्रयत्न करीत असल्यामुळें, त्यांचा खरा हेतु काय आहे हें उघड होतें. मागसलेल्या जातींना पुढें आणण्याचे आमचे प्रयत्न त्यांना आवडत नाहींत हें उघड आहे. शिवाजी चळवळीच्या नांवावर केल्या जाणाऱ्या चोऱ्यासंबंधींचीं कारस्थानें आह्मीं उघडकीस आणल्यामुळें अर्थातच आह्मी त्यांना अप्रीय होऊन ते आमचा द्वेष करूं लागले. कोल्हापूर व दक्षिण महाराष्ट्राकरितां इंपीरियल सर्व्हिस ट्रुप्स सुरु करण्याच्या कामीं आह्मीं जो भाग घेतला, तो ह्यांच्या रोषाचें ताजें निमित्त झालें आहे. इतर ब्राह्मणी मांडलिक संस्थानांमध्यें असंतोष इतका माजला आहे कीं, कित्येक ब्राह्मणेतरांना तीं संस्थानें सोडून बाहेर जावें लागलें; परंतु त्यांच्याविषयीं एक शब्दहि काढला जात नाहीं. या एकाच गोष्टीवरून ही चळवळ कोणत्या हेतूनें प्रेरित झाली आहे, हें उघड होईल."

या सभेंत पास झालेल्या ठरावांचा येथें उल्लेख करण्याची जरूरी नाहीं. कोल्हापुरांतील व कोल्हापुराच्या बाहेरील ब्राह्मणसमाज महाराजांच्या ज्या अन्यायांसंबंधीं एकसारखें अकांडतांडव करीत होता, ते ठरावांतून मुद्दाम वगळण्यांत आलें. राजोपाध्याचें उत्पन्न काढून घेतलें, इस्टेट सरकारजमा केली, मठांचें इनाम जप्त करून, पुढें ब्राह्मणांनीं बहिष्कार टाकलेल्या स्वामीला तें परत दिलें, बहिष्कृत वेदोक्त ब्राह्मणांचा अंबाबाईच्या देवालयाला विटाळ

झाला, शेंकडा ५० जागा ब्राह्मणेतरांकरितां राखून ठेवण्याचा हुकूम काढला, "कारण न दाखवितां" मि० विजापूरकरसारख्या लोकांची उचलबांगडी केली, यांसारख्या शेंकडों गोष्टी ब्राह्मणांच्या मतें महाराजांवर एकसारखे हल्ले चढविण्यास कारण झाल्या होत्या; पण त्या जेथल्या तेथेंच सोडण्यांत आल्या ! या प्रचलित अन्यायां(?)संबंधीं सभेंत एक अवाक्षरहि काढण्यांत आलें नाहीं. मुंबईसरकार व कोल्हापुरांतील राजकीय अधिकारी हे महाराजांना मदत करीत आल्याबद्दल वर्तमानपत्रांतून त्यांच्यावर कित्येकदां टीकास्त्र सोडण्यांत आलें होतें तरी, या गोष्टींचाहि या सभेनें उल्लेख केला नाहीं. ब्राह्मणांना चिरडून टाकण्यासाठीं ब्रिटिश सरकारचें, ज्यांत 'अश्लाघ्य सहकार्य' झालें होतें, असें 'कावेबाजपणाचे आघात कोल्हापूरच्या "जनतेवर"—या शब्दाची ब्राह्मणी व्याख्या मागें आलीच आहे.—होत असल्यामुळें त्यांचा प्रतिकार करण्याच्या इच्छेनें ही चळवळ अस्तित्वांत आल्यामुळेंच ब्राह्मणेतरांमध्यें प्रतिकार करण्याची बुद्धि जागृत झाली. या गाऱ्हाण्यांना रजा देऊन, या सभेनें आपली कित्येक वर्षांची बडबड निरर्थक होती, हें उघडपणें नसलें तरी अंतस्थ रीतीनें कबूल केलें. महाराजांना, आपल्या ब्राह्मणेतरानुकूल धोरणाचें महत्व व मागसलेल्या लोकांना, महाराजांनीं मोठ्या धैर्यानें अंगीकृत केलेल्या कार्याच्या सत्यतेचीं साक्ष पटण्यास दुसऱ्या पुराव्याची जरुरी नव्हती.

या सभेची बैठक पुन्हां कधींच झाली नाहीं ! या चळवळीचें संशययुक्त स्वरूप सिद्ध करण्यास ही एकच गोष्ट पुरी आहे. औद्योगिक व शेतकी विषयक शिक्षण अधिक देण्याची आवश्यकता, सामान्य जनतेंत शिक्षण प्रसार, कोल्हापूरची बंद ठेवलेली म्युनिसिपालिटी, दरबारावर काम चालविण्याचा नागरिकांचा हक्क इत्यादि ठरावांत नमूद असलेल्या गोष्टी १९०६ सालच्या अखेरीनंतर देखील पूर्ववत् चर्चाविषय होण्यास पात्रच होत्या. यानंतरच्या काळांत ब्राह्मण पुढारी स्वस्थ बसून होते असेंहि नाहीं; परंतु या सार्वजनिक विषयाचा त्यांनीं यापुढें क्षणभर देखील विचार केला नाहीं. १९०६ सालीं ते जे या गोष्टी विसरले, ते १९१८ पर्यंत त्यांना पुन्हां त्यांची आठवण देखील झाली नाहीं ! मात्र १९१८ नंतर संस्थानांतील कुलकर्ण्यांच्या सत्तेवर महाराजांकडून घाला घालण्यांत आला. या गोष्टीनें ब्राह्मणांच्या हितसंबधांना जबरदस्त धक्का पोंचल्यामुळेंच कोल्हापुरांतच केवळ नव्हे, तर महाराष्ट्रांतील सर्व ब्राह्मण जनतेंत कोल्हापूरच्या सार्वजनिक विषयाबद्दलच्या कळकळीला पुन्हां ऊत आला.

या सभेच्या बैठकीच्या सुमारासच, ह्मणजे सप्टेंबर महिन्याच्या २७ तारखेस, शाहुछत्रपति स्पिनिंग आणि वीव्हिंग मिलचा महाराजांनीं पाया घातला. कोल्हापुरांतील एका गृहस्थाच्या प्रोत्साहनानें प्रारंभीं ही मिल समायिक भांडवलावर स्थापिलेले होती; परंतु बरींच स्थित्यंतरें होऊन, या मिलचें दिवाळें निघाल्यानंतर त्याची न्याय कोर्टांत परिसमाप्ति होऊन, अखेर ती दरबारच्या ताब्यांत गेली. या मिलच्या मध्यंतरींच्या काळांतील अवनत स्थितीला जे गृहस्थ कारणीभूत झाले होते, त्यांचें चारित्र्य येथें सांगण्याची जरूरी नाहीं. या गिरणीला भांडवलाची मदत करून व कारखान्याकरितां जागा व तलाव मोफत देऊन व या कारखान्याच्या चालकांना कांहीं वर्षांचा मक्ता देऊन, महाराजांनीं या कारखान्याला चांगली मदत केली होती; इतक्याच गोष्टींचा येथें उल्लेख केला असतां बस्स होईल. या कंपनीला अपयश येण्याचें कारण अव्यवस्था हेंच होय. आज हा कारखाना दरबारच्या देखरेखेखालीं मोठ्या भरभराटीला चढला असून, त्याच्या योगानें संस्थानच्या एकंदर सांपत्तिक स्थितींत चांगलीच भर पडली आहे. याप्रमाणेंच शिरोळरोड येथील जिनिंग फ्यॅक्टरीला व रायबाग येथें एका ब्राह्मण तज्ज्ञानें चालविलेल्या हातमागाच्या कारखान्याला महाराजांनीं मदत केली होती. हातमागाच्या बाबतींत लागणारें सर्व भांडवल खुद्द महाराजांनीं पुरविलें होतें. या कारखान्याला मदत व्हावी ह्मणून, रायबाग येथें रंगाचा कारखाना काढतां येईल कीं नाहीं हें पाहाण्यासाठीं एक रसायनशास्त्रज्ञ देखील पाठविण्यांत आला होता. शिरोळ येथील कारखाना खासगी असून, तो आज देखील उत्तम स्थितींत आहे; परंतु हातमागाचा धंदा मात्र कित्येक वर्षे प्रयत्न करून नंतर बंद ठेवावा लागला.

चहाची लागवड करण्याच्या कामीं महाराजांचें लक्ष पूर्वीप्रमाणेंच होतें. १९०४ सालच्या आक्टोबर महिन्याच्या २४ तारखेस महाराज लिहितात:—

" आज सकाळीं मी पन्हाळयाला गेलों होतों. व तेथें लागवड केलेल्या चहाची स्थिति उत्तम आहे हें पाहून मला आनंद झाला. आमचा प्रयत्न यशस्वी होईल असें मला वाटतें. ह्मणून यापेक्षांहि अधिक विस्तृत लागवड करावी असें मला वाटतें. करितां माझ्यासाठीं ह्मणून आपण दहा मण चहाचें बीं विकत घ्याल, तर मजवर आपले उपकार होतील. "



श्री शाहु स्पिनिंग अँड वीव्हिंग मिल.

१९०६-७ सालच्या अहवालांत पुढील हकीकत आहे:—

“ हिंदुस्थानचे नेक नामदार व्हाइसराय व गव्हर्नरजनरल यांची मुलाखत घेण्यासाठीं १९०६ सालच्या आगष्ट महिन्याच्या २७ तारखेस महाराज सिमल्याला जाण्याकरितां कोल्हापुराहून निघाले. रस्त्यांत इंदूर येथें मुक्काम करून व आपले जामात देवासचे राजेसाहेब तुकोजीराव पवार महाराज यांचा बडा पाहुणचार उपभोगित देवासला कांहीं दिवस राहून, महाराज सिमल्याला निघाले. तेथें ते १९०६ सालच्या सप्टेंबर महिन्याच्या ५ तारखेस पोंचले. तेथें थोडे दिवस मुक्काम करून या अवधींत हिंदुस्थानचे व्हाइसराय व गव्हर्नरजनरल यांची खास मुलाखत घेण्याचा महाराजांना सुयोग आला. महाराज ९ वे तारखेस आपल्या परिवारासह सिमल्याहून निघाले व ते १६ व्या तारखेस कोल्हापुराला पोंचले. महाराजांनीं कारणपरत्वें मुंबईला व संस्थानांतील निरनिराळ्या ठिकाणीं बऱ्याच सफरी केल्या. भूधरगड पेट्यांतील शेलाप येथें महाराज गेले होते, त्यावरून शेतकीच्या धंद्यांत महाराज फार लक्ष घालतात याची साक्ष पटते. चहाची व तुतीच्या झाडांची लागवड करण्याचे अल्प प्रमाणांत प्रयोग करून पाहाण्यासाठीं महाराजांनीं हें स्थळ पसंत केलें आहे. ”



## प्रकरण १५ वें.

## १९०७ तें १९११.




ल्हापूरच्या पश्चिमेस सुमारें ३० मैलांच्या अंतरावर दाजीपूर नजीक भोगावती नदीला बांध घालून, जमिनीला पाण्याचा पुरवठा करण्याची एक मोठी योजना तयार करण्याचा १९०७ सालच्या प्रारंभीं महाराजांनीं आपला निश्चय केला. पांच वर्षांपूर्वी विलायतेंत प्रवास करीत असतांना ही कल्पना महाराजांना सुचली असावी असें दिसतें. हिंदुस्थानांतील लोकांनीं अनुकरण करण्यासारख्या दूरदर्शित्वानें व आस्थेनें ब्रिटिश लोक संपत्तीच्या व शक्तीच्या प्रत्येक साधनाचा उपयोग करीत आहेत, या गोष्टींचा महाराजांच्या मनावर फार परिणाम झाला होता, असें महाराज वारंवार ह्मणत असत. घाटमाथ्यावर विपुल वृष्टि होते परंतु मोठमोठ्या नद्यांच्या रूपानें हें पाणी समुद्रांत जाऊन पडतें. अशा प्रकारें एकीकडे हें पाणी आह्मी निरुपयोगी होऊं देतों, व दुसरीकडे, पूर्वेकडील देशांतील सुपीक काळी जमीन पाण्याला सदा हपापलेली असते. यूरोपीयन लोकांमध्यें व आह्मांमध्यें कोणत्या गोष्टींत महदंतर आहे, हें यावरून दिसून येईल, असें ते ह्मणत. १९०७ सालच्या एप्रील महिन्यांत जागेची पहाणी करण्यास सुरवात झाली. याप्रीत्यर्थ एका स्वतंत्र इंजिनीयरची नेमणूक झाली होती. पुढच्या वर्षी मार्च महिन्यांत लॉर्ड सिडेनहॅम हे कोल्हापुरास आल्या वेळीं त्यांनीं ही योजना पाहून आपला सल्ला द्यावा ह्मणून त्यांना तेथें नेण्यांत आले. बंधारा बांधण्याच्या कामाला महाराणी आईसाहेबांच्या हस्तें १९०९ सालीं सुरवात झाली. व हा तलाव त्यांच्या नांवानेंच संबोधला जात आहे. १९०९-१० सालचा अहवाल ह्मणतोः—
"श्रीमहाराणी लक्ष्मीबाई—तलावासंबंधींच्या कामाला १९०९ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत सुरवात झाली. हें काम कांहीं अंशीं मक्ते देऊन व कांहीं अंशीं महाराजांचे बंधु सीनीयर कागलचे जहागिरदार यांच्या खास देखरेखीखालीं खात्यामार्फत होत आहे. ते तलावाच्या कामाचे डायरेक्टर ह्मणून दरबारला मदत करीत आहेत. असिस्टंट इंजिनीयर मि० गुप्ते व सुपरव्हाइझर मि० मितर यांना डायरेक्टरच्या हाताखालीं दिलें आहे."

या वर्षी पाया खोदण्याचें काम मोठ्या त्वरेनें चाललें, व बंधाऱ्याच्या जागेंतील अतिशय खोल अशा भागांतसुद्धां चांगल्या खडकांचा माग लागून, ते उघडे करण्यांत आले. ज्या ठिकाणीं खडक लागले, त्या ठिकाणीं बांधकाम चालू आहे. दगडांच्या खाणी सुरू करणें, छोटासा रेल तयार करणें, चुना कांड-ण्याच्या गिरण्या बांधणें, सोईस्कर अशा ठिकाणीं कँकर, वाळू इत्यादिकांचा निर-निराळ्या अंतरावर सांठा करून ठेवणें इत्यादि या कामाला आवश्यक अशा सुर-वातीच्या गोष्टी करण्यांत हें वर्ष गेलें. हंगामांत या कामावर निरनिराळ्या ठिकाणीं मिळून २,००० लोक काम करीत होते. १९१० सालच्या मार्च महि-न्याच्या अखेरीपर्यंत ६६,००० रुपये याप्रीत्यर्थ खर्च झाले.

" पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटचे मुंबई सरकारचे मुख्य इंजीनियर व सेक्रेटरी मि० ए० हील, सी० आय् ई० यांनीं थोडेंसें बांधकाम झाल्यावर या तलावाची जागा जाऊन पाहिली. पाया भक्कम असून चोख माल वापरून बांधकाम समाधान-कारक होत आहे, हें पाहून त्यांना फार आनंद झाला. "

१९१०-११ सालीं ही योजना किफायतशीर होईल किंवा नाहीं, याबद्दल प्रश्न निघून त्याचा निर्णय करण्याच्या कामीं महाराजांना बरेच परिश्रम करावे लागले. करवीर व आळतें तालुक्यांतील सुपीक जमीन लागेतोंपर्यंत डोंगराळ प्रदेशांतून कित्येक मैलपर्यंत कालवा काढल्यापासून फायदा होईल किंवा नाहीं, हा हि त्यापैकींच एक प्रश्न होता. नदीच्या उजव्या तीराकडे पाण्याचा ओघ वळवून, खास कोल्हापूरच्या हद्दींत नसलेल्या प्रदेशांतून कालवा काढणें हा दुसरा मार्ग होता; परंतु महाराजांचा उत्साह अडचणींना भीक घालणारा नव्हता. १९११ सालच्या जानेवारी महिन्यांत महाराज सर जार्ज क्लार्क ( पुढें लॉर्ड सिडेनहॅम ) यांना ह्मणतात:—

"आमच्या योजनेसाठीं दोन कालवे आह्मांस हवे होते; परंतु हा माझा विचार आतां बदलला असून, भोगावती व दूधगंगा यांच्या कांठांवरील दोन भिन्न दरींतून, मला हे दोन्ही कालवे काढावयाचे आहेत. या बंधाऱ्यांतील पाणी जर आह्मांस पुरेनासें झालें, तर भोगावतीच्यावर दूधगंगेला आणखी एक छोटासा बंधारा बांधण्याचा माझा विचार आहे. ही माझी दुसरी योजना आहे. आपली संमति गृहीत धरून, दुसऱ्या दरीची देखील सहजासहजीं पाहाणी करावी, ह्मणून मीं मि० हँकेल यांना विचारलें आहे. "

"प्रथम दूधगंगा दरीचा विचार करण्याची माझी इच्छा आहे, ह्मणून आपण मेहेरबानीनें मि० हॅंकेल यांना तसें करण्यास सांगाल, तर मजवर उपकार होतील."

"हल्लींच्या बंधाऱ्याच्या टिकाऊपणाबद्दल मला थोडीशी शंका येते, कारण येथें २०० इंचांपेक्षां जास्त पाऊस पडतो. या बाबतींत मि० हील यांचा सल्ला घेण्यासाठीं मी माझ्या एक्झिक्यूटिव्ह इंजीनियरला पाठवीत आहें."

१९११ सालच्या मार्च महिन्यांत महाराज आपल्या गोंधळलेल्या मन:स्थितीचें पुढील प्रमाणें वर्णन करितात:—

" एक अनुभविक इंजीनियर मिळण्याबद्दल सहा महिन्यांमागें मीं विचारिलें होतें. त्या वेळीं कोणीच मिळण्यासारखा नव्हता; परंतु आतां ह्मैसुरांतील मार्कन्वी बंधारा बांधलेले मि० दलाल हे मिळण्यासारखे आहेत. त्यांचें व आमचें अद्याप कांहीं ठरलेलें नाहीं. मि० हील यांचा सल्ला न घेतां मीं जर तसें केलें, तर माझ्यावर कृतघ्नपणाचा दोष येईल. मि० दलाल हे प्रत्येक गोष्टीला नांवें ठेवीत आहेत. (अ) वाळू धुतलेली असली तरी चुना पाण्यानें घट्ट होण्यासारखा नाहीं. (क) दगड आकारानें लहान आहेत, ( ड ) मार्कन्वी येथील बंधाऱ्यांत वापरलेला चुना विरघळणारा नव्हता; परंतु हा विरघळण्यासारखा आहे, ( ई ) चुनखडी हलक्या प्रतीची असल्यामुळें, ती लांकडांऐवजीं कोळशानें भाजून काढिली पाहिजे, लांकडानें भाजलें तर तें फार खर्चाचें होतें, ( फ ) चुना कसदार करण्यासाठीं वाळू ऐवजीं सुरकी वापरावी, असें त्यांचें मत आहे.

त्यांच्या मतें पाया कच्चा आहे, ह्मणून तो अधिक विस्तृत करावा. मि० हील व मि० गोडबोले ह्यांना बांधकामाचें उपकरण पसंत पडलें. त्यांच्या ह्मणण्यांत थोडीशी अतिशयोक्ति आहे, असें मला-अजाण मनुष्याला दिसतें. मि० हील यांच्या ह्मणण्याप्रमाणें करणें योग्य आहे असें, मला वाटतें. यामुळें मला मोठी चिंता उत्पन्न झाली आहे. मीं हें काम कशाला सुरू केलें ह्मणून, मला पश्चात्ताप होत आहे."

दोन दिवसांनंतरच महाराज आपल्या अडचणींचें पुढीलप्रमाणें अधिक विस्तृत वर्णन करितात:—

" हें पाठबंधाऱ्याचें काम मला मोठें त्रासदायक झालें आहे. दोन वैद्यांचें जसें एकमत होत नाहीं, त्याचप्रमाणें दोन इंजीनियरांचेंहि एकमत

कधींच होत नाहीं. मी पुष्कळ इंजीनियर लोकांचा सल्ला घेत आहें, ह्मणूनच मला धास्ती उत्पन्न झाली आहे. मीं पुष्कळ अयशस्वी योजना पाहिल्या आहेत. उदाहरणार्थ भावनगरकडे पाहा! त्यांनीं तेथें जें बंदर तयार केलें, त्याप्रीत्यर्थ कित्येक लक्ष रुपये खर्च करण्यांत आले; परंतु तेथें एकहि जहाज आल्याचें कोणाच्या दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं. काठेवाडांत पुष्कळ तलाव असूनहि त्यांच्यामध्यें पाणी कधींच नसतें. त्या संस्थानिकांच्या चुकीमुळें हा प्रकार झाला असें मला वाटतें. अशा प्रकारच्या प्रमादाची पुनरावृत्ति माझ्या हातून होऊं नये, असें मला वाटतें. मी अज्ञ असल्यामुळें, सारासार विचार, बुद्धि व प्रयत्न यांच्या सहाय्यानें असलें अपयश टाळावें अशी माझी इच्छा आहे. जर मि० राइट यांची बेळगांवाहून बदली झाली, तर अगदीं भिन्न मताच्या मनुष्याला मला घ्यावें लागेल. आपली बदली झाली तर हीच अडचण उपस्थित होईल. भिन्न मतांच्या कित्येक डॉक्टरांच्या शुश्रुषेखालीं असलेल्या रोग्या प्रमाणें माझ्या बंधाऱ्याची स्थिति होईल."

या वर्षाच्या कामाच्या प्रगतीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

"वर्ष अखेरपर्यंत २,००,००० घनफूट बांधकाम करण्यांत आलें. कामास सुरवात झाल्यापासून एकंदर बांधकाम ४,२३,२०० घनफूट झालें. तलाव बांधण्याच्या कामीं वर्षअखेरपर्यंत खर्च झालेली रक्कम ६८,२९९ होती. या कामाच्या सर्व शाखा-उपशाखांमध्यें ३००० गवंडी व मजूर काम करीत होते."

संस्थानची सांपत्तिक स्थिति लक्षांत घेतां, हें काम बरेंच मोठें होतें. शक्य तितक्या त्वरेनें हें काम जरी करण्यांत येत होतें, तरी हें काम १९१५-१६ पर्यंत लांबत गेलें.

"या वर्षीं (१९१५–१६) खर्च १,९९,१६७ पर्यंत गेला. गेल्या वर्षीं हा खर्च २,०७,९६८ पर्यंत गेला होता. कामाला सुरवात केल्यापासून खर्च झालेली एकंदर रक्कम ८,९३,२४३ पर्यंत गेली.

"अहवालाच्या वर्षीं बांधकाम ७,६१,००० घनफूट झालें. मागच्या वर्षीं ९,१२,२७७ घनफूट काम झालें होतें. आतांपर्यंतचें सर्व बांधकाम ३२,१५,५८९ घनफूट झालें. कामावर असलेल्या लोकांची संख्या मागच्या वर्षाइतकीच ह्मणजे ३,००० होती.

"या वर्षी तलावाचा चार्ज मि० बी० पी० जगताप, एल्० सी० ई०, एम्० आर० एस्० आय्० एक्झिक्यूटिव्ह इंजीनियर यांच्याकडे होता."

यापुढील वर्षी महायुद्धाचें दडपण असूनहि या कामाची प्रगति पुढील प्रमाणें झाली:—

"या वर्षी खर्च झालेली रक्कम १,८३,७०४ पर्यंत गेली व कामाच्या सुरवातीपासून झालेला एकंदर खर्च १३,०२,१६६ पर्यंत गेला.

"या वर्षी ५,०९,३०० घनफूट काम झालें. याच्या पूर्वीच्या सालीं हेंच काम ६,००,००० घनफूट झालें होतें. सुरवातीपासून एकंदर बांधकाम ४३,२४,९०० घनफूट झालें. कामावरील सर्व गवंडी व मजूरदार लोकांची एकंदर संख्या, २०६० होती."

पुढील वर्षी ह्मणजे १९१६–१७ सालीं पुढील माहिती मिळते:—

"या वर्षी मेहेरबान पिराजीराव बापूसाहेब घाटगे, सी० एस्० आय०, सी० आ० ई० कागलचे ( मोठी पाती ) जहागिरदार यांच्या देखरेखेखालीं राधानगरी तलावाचें काम कांहीं दिवस चाललें. एक एक्झिक्यूटिव्ह इंजीनियर, ४ सुपरवायझर, १० कारकून व ४ नगदी कारकून अशी या वर्षी एस्टॅब्लिशमेंट होती.

"या वर्षी ३३,९६४ रुपये खर्च आला. व कामाच्या सुरवातीपासून १३,३६,१३० रुपये खर्च झाला.

"या वर्षी ६१,१२८ घनफूट बांधकाम झालें. अगदीं आरंभापासून ४३,८६,०२८ घनफूट काम झालें. कांहीं महिने काम बंद ठेवल्यामुळें या वर्षी झालेलें काम मागच्या वर्षापेक्षां फारच कमी होतें."

सांपत्तिक व इतर अडचणींमुळें हें तात्पुरतें बंद ठेवलेलें काम तसेंच भिजत पडलें. त्यामुळें योजना अद्याप पुरी झालेली नाहीं. कै० महाराजांनीं सुरू केलेलें हें काम अर्धवट राहिल्यामुळें, तें पूर्ण करण्याची जबाबदारी हल्लींच्या महाराजांवर येऊन पडली आहे. शक्य तितक्या चांगल्या तऱ्हेनें ते ही जबाबदारी पार पाडतील हें सांगावयास नकोच.

या सुमारास कोल्हापुरांतील राजकारणाला कोणतें स्वरूप प्राप्त झालें, याची हकीकत पुढील प्रकरणीं संगतवार देतां येईल. याची व्याप्ति १९०७ पासून १९११ पर्यंत आहे. त्या महत्त्वाच्या प्रकरणांत राजकीय दृष्ट्या कमी

महत्त्वाच्या व या वर्षांतील इतर किरकोळ गोष्टी गोंवण्यापेक्षां प्रस्तुतच्या प्रकर-णींच त्यांचें विवेचन करण्याचें मीं ठरविलें आहे.

१९०८ सालांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे महाराजांच्या एकुलत्या एक कन्या श्रीराधाबाई ऊर्फ आक्कासाहेबमहाराज यांचा देवासच्या राजेसाहेबांशीं झालेला विवाह, ही होय. यांचा जन्म १८९४ सालच्या मार्च महिन्यांत झाला असल्यामुळें, देवासचे महाराज श्रीतुकोजीराव यांच्याशीं १९०४ सालीं जेव्हां त्यांचा वाङ्‍निश्चय ठरला, त्या वेळीं त्यांचें वय अवघें १० वर्षांचें होतें. पुढील वर्षींच लग्नसमारंभ पार पाडावयाचा अशी वरपक्षाची इच्छा होती; परंतु छत्रपति महाराजांनीं मि० फ्रेजर यांना लिहिल्याप्रमाणें आपल्या मुलीचें लग्न इतक्या लौकर व्हावें, ही गोष्ट त्यांना आवडली नाहीं. देवास येथील राजकीय अधिकारी मि० जार्डीन हे देखील कर्नल फेरिस यांना पाठविलेल्या आपल्या एका पत्रांत यासंबंधीं असाच उल्लेख करितात. त्या-वरून बालविवाह टाळण्याबद्दल महाराज किती आग्रह करीत होते, हें दिसून येतें. मि० जार्डीन ह्मणतात:---

" विवाहाचा काल निश्चित करण्यासंबंधीं ह्मणाल तर, हा समारंभ पुढील वर्षीं होईल तर देवासला तें अधिक पसंत झालें असतें. हा समारंभ पुढें लोटण्यांत महाराजांचा जो शहाणपणा आहे, त्याची जाणीव मि० बेले यांना पूर्ण असून, राजेसाहेब या गोष्टीचा जसजसा अधिक विचार करतील, तसतसें त्यांचेंदेखील असेंच मत होईल. व आतां वाङ्‍निश्चय निःशंक रीतीनें ठरला तरी तेवढयानें राजेसाहेबांचें समाधान होईल, अशी त्यांना खातरी वाटते. वधूची योग्य अशी व्यवस्था करण्यासारखे राजेसाहेब वयस्क होई-तोंपर्यंत वधू तिच्या आईबापांच्या स्वाधीन ठेवून, तिच्या शिक्षणाची जबाबदारी त्यांच्यावरच सोंपविण्यांत यावी. या पत्रांतील मजकूर महाराजांना निवेदन करून, महाराजांची कन्या व देवासचे राजेसाहेब यांच्या दरम्यान झालेल्या ( उभय पक्षाला ) बंधनकारक अशा वाङ्‍निश्चयाची पूर्तता निदर्शक व सोबत जोडलेल्या अटींची मान्यता द्योतक, असें एक पत्र पद्धतशीर रीतीनें महाराजांनीं पाठ-वावें असें त्यांना आपण कळवावें ह्मणून मी आपणाला त्याप्रमाणें लिहीत आहें."

समारंभ घाईनें करण्याचें साफ नाकारून महाराजांनीं बालविवाहाचे दोष टाळले, व आपल्या समजूतीप्रमाणें आपल्या मुलीचें शिक्षण होईल, अशी व्यवस्था

केली. श्रीआबासाहेब महाराजांचें शिक्षण ह्मटलें ह्मणजे नेहमींचा वाङ्मयात्मक अभ्यास व संभाषण करण्यास पुरेसें इंग्लिश भाषेचें ज्ञान, अतिप्राचीन काळापासून मराठा क्षत्रिय वर्गाला आनुवंशिक असलेलें अश्वारोहण व शिकार आणि महाराज आपल्या सर्व मुलांना अत्यंत आस्थेपूर्वक पढवीत असलेली संसारिक व्यवस्था इत्यादि विषयांचें ज्ञान हें होय. मुलीच्या शिक्षणाबद्दल महाराजांच्या समजुती कशा प्रकारच्या होत्या, हें त्यांच्या पुढील पत्रावरून कळण्यासारखें आहे. ते ह्मणतात:---

" आमच्या मुलींना कोणत्या प्रकारचें शिक्षण धोक्याचें होणार नाहीं, यासंबंधीं मला जें वाटतें, तें बोलून दाखविल्याबद्दल, आपण कृपा करून मला क्षमा करा. यूरोपीयन दाईच्या देखरेखेखालीं सर्व शिक्षण झालें तर त्यांना आपल्या वयाच्या व बरोबरीच्या, अगर वयानें लहान अशा नातलगाशीं कसें वागावें, याचें ज्ञान नसतें. विशेषतः आह्मांमध्यें एकत्र कुटुंबाची पद्धत असल्यामुळें, या गोष्टीकडे काळजीपूर्वक लक्ष पुरवावें लागतें. आमच्या सर्व धार्मिक गोष्टी स्त्रियावर सोंपविलेल्या असतात; ह्मणून अशा गोष्टींचें त्यांना ज्ञान नसलें तर त्यामुळें त्या अप्रीय होतात. मीं कांहीं तरुण मुलें पाहिलीं, त्यामध्यें × × × महाराजांचे मुलगे व बारा वर्षांचा त्यांचा एक बंधु होता. हिंदी चालीरीतीच्या आपल्या नातलगांशीं वागण्याचें व हिंदूंच्या सामान्य धार्मिक आचारांचें ज्ञान त्यांना मुळींच नव्हतें. अशा प्रकारचें ज्ञान त्यांना देण्यासाठीं त्यांच्या आईबापांनीं शिकस्त केली होती; परंतु तें सर्व पोपटपंची होतें. कुटुंबांत राहून व त्यांत मिळून मिसळून वागूनच अशा गोष्टी शिकावयाच्या असतात. कुटुंबांत राहूनच मनुष्य वाढला तर, त्याच्या प्रौढपणीं त्याच्या हातून चुका घडत नाहींत; कारण लहानपणापासून त्याचा त्याला अभ्यास घडतो. आमच्या हिंदी कौटुंबिक शिक्षणाला धात्रीच्या सहाय्यानें ( प्रत्येक दिवशीं ) कांहीं तास इंग्रजी शिक्षणाची जोड दिली, तर तें उत्कृष्ट होईल असें मला वाटतें. हिंदी शैक्षणिक पद्धत व बालविवाह या गोष्टीद्वयामुळें आपल्या पतींच्या इच्छेप्रमाणें आपला स्वभाव मुलींना बनवितां येतो.

" केव्हां केव्हां बडोद्याचे युवराज तरुण फत्तेसिंगमहाराजांसारखे पाश्चात्य पद्धतीनें शिक्षण मिळालेले पती, आपल्या बायकांना पाश्चात्य कल्पनेप्रमाणें वागविण्याचें सोडून देऊन, त्यांना पडद्यामध्यें कोंडून ठेवितात. फत्तेसिंगमहाराजां-

संबंधानें कांहींजण असें ह्मणतात कीं, आपल्या मुलीच्या लग्नांत विघ्नें येऊं नयेत ह्मणून त्यांना असें करावें लागलें. ''

आक्कासाहेब महाराजांचा विवाह होण्यापूर्वी महाराजांचे भावी जामात कोल्हापुराला पुष्कळदां येऊन गेले. जुन्या लोकांच्या दृष्टीनें ही गोष्ट शिष्टसंमत नव्हती; पण आपल्या भावी श्वशुर गृहांतील माणसांशीं अशा प्रकारचे वरचेवर संबंध आल्यापासून उभय पक्षांनाहि हितप्रद होतें, अशी महाराजांची समजूत होती व ती बरोबर होती. १९०८ सालच्या मार्च महिन्याच्या २१ तारखेस कोल्हापूर येथें विवाहसमारंभ घडून येण्यापूर्वी बरेच दिवस देवासचे राजेसाहेब कोल्हापुराला परिचित झालेले होते. बुद्धीनें कुशाग्र, जात्याच साधे व आनंदी स्वभावाचे, मनमिळाऊ व सहजलभ्य असे ते असल्यानें दरबारलाच केवळ नव्हे, तर कोल्हापुरांतील जनतेलाहि ते प्रीय झाले होते. कोल्हापुरांतील हजारों लोकांना हा विवाह आनंददायक झाला होता. या प्रसंगाची आठवण राहावी ह्मणून दाजीपूर येथील श्रीक्ष्मीतलावानजीक महाराजांनीं एक नवीन शहर वसविलें, व आपल्या मुलीच्या नांवावरून त्या शहराचें नांव **राधानगरी** असें ठेविलें. भोंवतालच्या लोकांच्या सोईसाठीं तालुका कचेऱ्याहि तेथेंच स्थापन केल्या. २१ मार्च हा दिवस विवाहाकरितां मंगल ह्मणून ज्योतिषांनीं ठरविला होता. ह्याप्रीत्यर्थ मोठी तयारी चालली होती. जुन्या राजवाड्यांच्या आवारांत विवाहसमारंभासाठीं एक कायमचा मंटप व बावडेकरांच्या वाड्याच्या आवारांत वर पक्षाकरितां एक तात्पुरता मंटप उभारण्यांत आला होता. या लग्नाची वरात ज्या ज्या रस्त्यावरून जाणार होती, त्या त्या रस्त्यांवर कमानी उभारण्यांत आल्या होत्या. संस्थानचे बंगले व पाहुण्यासाठीं ह्मणून ठरविलेले इतर वाडे, सुशोभित करण्यांत आले होते. तंबू उभारून रेसिडेन्सीनजीक यूरोपीयन पाहुण्याकरितां एक सुंदर छावणी तयार करण्यांत आली होती. या समारंभासंबंधीं प्रत्येक व्यवस्था चोख ठेवण्यासाठीं महाराजांचे बंधु कागलचे चीफसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमण्यांत आली. महाराजांच्या इच्छेला मान देऊन सरकारनें कर्नल फेरीस यांच्या नोकरीची मुदत विवाहसमारंभ संपेपर्यंत वाढविली; कारण, हा संबंध जुळवून आणण्याच्या कामीं त्यांनीं विशेष पुढाकार घेतला होता. या प्रसंगीं कर्नल फेरीस व त्यांच्या पत्नी उभयतां हजर राहिल्यामुळें महाराजांना मोठा आनंद झाला. विवाहाप्रीत्यर्थ निमंत्रित केलेल्या यूरो-

पीयन पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्यास फेरिस–दंपती स्वखुषीनें तयार झालें या समारंभाच्या निरनिराळ्या प्रसंगाला अनुसरून संस्थानांतील अधिकारी लोकांन त्यांच्या दर्जाप्रमाणें कामें सांगण्यांत आलीं होतीं. १९०८ सालच्या मार्च महि-न्याच्या प्रारंभापासूनच कोल्हापुराच्या लोकांमध्यें अपूर्व उत्साह दिसून येत होता व या विवाहासंबंधींच्या पूर्व समारंभाला सुरवातहि पण झाली होती. ग्वाल्हेरचे महाराजासाहेब हे देवासच्या राजेसाहेबांचे आप्त असून, ते छत्रपति महाराजांचे एक स्नेहीहि होते. स्वत: हजर राहून या समारंभाला शोभा आणण्यासाठीं त्यांना निमंत्रणहि गेलें होतें. ग्वाल्हेरचे महाराज या सुमंगल प्रसंगीं हजर राहण्यास मोरे आतुर झाले होते. परंतु कांहीं जरूरीचें काम असल्यामुळें, लग्नाच्या दिवशीं ह्मणजे ८ मार्च रोजीं त्यांना ग्वाल्हेरमध्यें रहाणें अपरिहार्य होतें. महाराजांच्या इच्छेल मान देऊन, प्राथमिक विधींत भाग घेण्याच्या हेतूनें पाहुणा या नात्यानें ग्वाल्हेरचे महाराज सहकुटुंब कोल्हापुराला आले. ग्वाल्हेरच्या महाराजांच्या या सौजन्याचें महाराजांनीं मोठें कौतुक केलें व प्रेमाचें आगत-स्वागत होऊन मेजवान्यांवर मेज-वान्या झाल्या. तारीख १५ मार्च रोजीं स्पेशल ट्रेननें वऱ्हाडी मंडळी दाखल झाली. वराला स्टेशनपासून बावडेकरांच्या वाड्यापर्यंत मोठ्या लवाजम्यानें व थाटमाटानें नेण्यांत आलें. पुष्कळ यूरोपीयन व हिंदी पाहुणे २० मार्च शुक्रवार रोजीं दाखल झाले. प्रमुख यूरोपीयन पाहुणे ह्मटले ह्मणजे मुंबईचे गव्हर्नर नेव नामदार सर जॉर्ज क्लार्क व त्यांच्या पत्नी, हिज म्याजेस्टीज रॉयल नेव्ही ईस्ट इंडीज स्कॉड्रनचे मुख्य अधिपति, तसेच नामदार मि०मूर म्यॅकेंझी व त्यांच्या पत्नी आणि जनरल सर आर्चबाल्ड हंटर, कमांडिंग सदर्न आर्मी, इत्यादि होते. हिंदी पाहुण्यांमध्यें, भावनगरचे महाराजासाहेब व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांचे बहुतेक सर्व अधिपती प्रमुख होते. मुंबई इलाख्यांतील प्रमुख हिंदी संस्थानचे राज्यकर्ते या नात्यानें व थोर शिवाजी महाराजांचे वंशज या नात्यानें महाराजांना जो मान होता त्यामुळें व कोल्हापुरांत गेल्या ५० वर्षांत अशा प्रकारचा सुयोग घडून न आल्यामुळें, या प्रसंगाला अतिशय महत्त्व प्राप्त झालें होतें. हिंदुस्थानच्या सर्व भागांतून आलेल्या नामांकित पाहुण्यांचें संमेलन ही या प्रसंगीं अतिशय महत्त्वाची गोष्ट होती. हा समारंभ पहाण्यासाठीं महाराष्ट्रांतील सर्व भागांतून दररोज येणाऱ्या लोकांच्या थव्यांनीं शहर फुलून गेलें होतें. खास उभारलेल्या विस्तीर्ण मंटपांत शनिवारीं संध्याकाळीं हा विवाहसमारंभ झाला. हा मंटप विजेच्या



श्रीमन्महाराज सर तुकोजीराव पवार, राजेसाहेब, देवास.



महाराज्ञी सौभाग्यसंपन्न श्री राधाबाईसाहेब ऊर्फ आक्कासाहेब महाराज, देवास.

देव्यानें प्रकाशित केला असून विजेच्या पंख्यांनीं तेथील हवा शीतल राखण्यांत झाली होती. सभा मंटपांत पाहुण्याकरितां कोचे व खुर्च्या मांडण्यांत आल्या होत्या. या सभामंटपाच्या पूर्व पश्चिम बाजूवरील गॅलरीमध्यें राजघराण्यांतील स्त्रिया व लग्नसमारंभाला आलेल्या इतर स्त्रिया विराजित झाल्या होत्या. विवाह-घटिका भरण्यापूर्वी महाराजांचे सर्व पाहुणे ना० गव्हर्नरसाहेबसुद्धां भावनगरचे ठाकूरसाहेब व इतर पाहुणे आपापल्या स्थळीं विराजमान झाले होते. नवरदेव मोठ्या समारंभानें मंटपांत दाखल होऊन बोहल्याच्यानजीक बसले. लोकांना हा दिवस मोठ्या सणासारखा वाटला व राजवाड्याच्या बाहेरच्या बाजूला जेथून जेथून मिरवणूक पहातां येईल व सभामंटपांतील धार्मिक विधी दृग्गोचर होतील तेथें तेथें लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमल्या.

लग्नघटिका समीप येतांच राजवाड्यांतून वधूला बाहेर आणण्यांत आलें व तिला वरापुढें उभें करून, दोहोंमध्यें स्वस्तिक चिन्हानें चिन्हित झालेला अंतःपट धरण्यांत आला. दोन्ही बाजूंला उभे असलेल्या उपाध्यायांनीं मंगलाष्टकें म्हणण्यास सुरवात केली व जमलेल्या पाहुण्यांनीं या जोडप्यावर अक्षता टाकिल्या. ज्योतिषानें लग्नघटिका जाहिर करतांच शिंग्यांनीं शिंगें फुंकलीं, वाजंत्र्यांनीं वाद्यें वाजविलीं, व तोफांचा धुमधडाका सुरू झाला. अंतःपट काढिला. वधुवरांची दृष्टादृष्ट होतांच एकमेकांनीं एकमेकांच्या गळ्यांत पुष्पहार घातले. वधूवर पतिपत्नी झाल्याचें जाहिर केलें. हारतुरे, पानसुपारी व साखर वांटण्यांत आली.

या समारंभानिमित्त महाराजांनीं अठरा मराठा जोडप्यांचीं लग्नें लाऊन दिलीं. दुसऱ्या दिवशींदेखील लग्न मंटपांत आणखी कित्येक लग्नें लावून दिलीं. यांमध्यें मुसलमानांचींहि कांहीं जोडपीं होतीं. या जोडप्यांना त्यांच्या हयातीपर्यंत त्यांच्या उपजीविकेसाठीं ह्मणून रोजीना कांहीं नेमणूक करून दिल्याबद्दलचा हुकूमहि करण्यांत आला.

प्रत्यक्ष हजर राहून या प्रसंगाला शोभा आणणाऱ्या प्रख्यात पाहुण्यांच्या अनेक नामदार गव्हर्नरसाहेबांच्या सन्मानाप्रीत्यर्थ दुसऱ्या दिवशीं रात्रीं संस्थान तर्फे एक मेजवानी देण्यांत आली. या दिवसापासून घरभरणी होईतोंपर्यंत वर-पक्षाच्या सन्मानाप्रीत्यर्थ जुन्या राजवाड्यांत रोज मोठ्या मेजवान्या देण्यांत आल्या. पाहुण्यांच्या व लांब लांबच्या अंतरावरून कोल्हापुराला आलेल्या जनसंमर्दाच्या

करमणुकीसाठीं पंचगंगेच्या पैलतीरीं आतषबाजीचे प्रेक्षणीय प्रयोग २२ तारखेस सोमवारीं करण्यांत आले. ब्राह्मणांना मेजवान्या देण्याच्या बाबतींत महाराजांचें अगर ब्राह्मणांचें दुर्लक्ष झालेलें नव्हतें. गायन वादन, नाटकप्रयोग, कुस्त्या इत्यादि प्रकारांनीं वराची व वरपक्षाची करमणूक करण्यांत येत होती. २९ तारखेस रविवारीं संध्याकाळीं वरात काढण्यांत आली. तो खरोखरच प्रेक्षणीय देखावा होता. मोठया हत्तीच्या पाठीवर हौद्यांत वधूवरें बसलीं होतीं. घरभरणी होतांच विवाह समारंभाची समाप्ति झाली. हा समारंभ १५ दिवसांपेक्षांहि जास्त दिवस चालला होता. काशी, नाशिक, वांईसारख्या पवित्र क्षेत्रांहून वेदांमध्यें प्रवीण असलेल्या पंडितांना या प्रसंगीं पाचारिलें होतें. सर्व धार्मिक विधी अगदीं वैदिक पद्धतीनें करण्यांत आले. वेदोक्तपद्धतीनें हा समारंभ करितां येऊं नये, ह्मणून संकेश्वर मठाच्या प्रतिस्पर्धी स्वामीनें व कोल्हापूरच्या ब्राह्मणांनीं जमलेल्या ब्राह्मणांना पिटाळून लावण्याची शिकस्त केली; परंतु त्यांची ही करणी फेब्रिएसच्या करणीप्रमाणें हास्यास्पद होती. रोमन लोकांनीं फेब्रिएसला जेव्हां नगराबाहेर हांकून लाविलें, तेव्हां "रोमन लोक हो, मीच तुह्माला हद्दपार करीत आहें," असें तो ओरडूं लागला! कोल्हापूरच्या ब्राह्मणांनाहि आतां अशाच तऱ्हेची ओरड करावी लागली होती! या वादानें काशी येथील पवित्र वातावरण देखील दूषित झालें होतें असें समजतें. या समारंभांत तेथील ब्राह्मणांनीं भाग घेतल्याबद्दल, त्यांना जातिबहिष्कृत करण्याचे निष्फळ प्रयत्न करण्यांत आले; परंतु ही चळवळ लौकरच जागच्याजागीं थिजली.

या विवाहाचें स्मरण राहावें ह्मणून, भावनगरच्या महाराजांनीं कोल्हापूरच्या खजिन्यांत शेंकडा ४ व्याजानें ३,००० रुपये व्याजीं लावून, श्रीमती सौ० राधाबाई आक्कासाहेबमहाराजांच्या नांवानें दोन शिष्यवृत्त्या व एक सोन्याचें पदक कोल्हापुरांतील मुलींच्या शाळेंतील लायक मुलींना देण्याची व्यवस्था केली. हें पदक शाळेंतील मुलींपैकीं सर्व तऱ्हेनें सद्गुणी अशा मुलींना देण्यांत येतें. त्याचप्रमाणें कोल्हापूरच्या महाराजांनीं या प्रसंगीं कोल्हापूर शहराबाहेरील संस्थानच्या शाळेंतील लायक मुलींना देण्याकरितां तीन शिष्यवृत्त्या ठेविल्या. भावनगरच्या सद्गुणसंपन्न महाराणीसाहेबांचें कोल्हापुराला जें आगमन झालें, त्याची आठवण राहावी ह्मणून या शिष्यवृत्त्या त्यांच्याच नांवानें दिल्या जातात. या दोन

महाराजांमध्यें जो जिव्हाळा होता, त्याच्या अनेक दृश्य चिन्हांपैकीं हें एक होय. १९०७ सालच्या जानेवारी महिन्यांत महाराजांनीं भावनगरला भेट दिली. त्या प्रसंगीं देखील भावनगरच्या महाराजांनीं आपला नवीन राजवाडा महाराजांच्या नांवानें संबोधून त्यांच्यावरील आपलें प्रेम व्यक्त केलें.

या विवाहानिमित्य मुंबईचें गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क यांचें कोल्हापुराला जें आगमन झालें तें अनेक दृष्टीनें महत्त्वाचें होतें. केवळ कोल्हापुरासंबंधींच नव्हे, तर या देशाच्या सामान्य राजकारणाविषयींच्या अनेक प्रश्नांसंबंधीं चर्चा निघून, महाराजांची व गव्हर्नरसाहेबांची स्पष्ट दिलसफाई झाली. अराजकांना ताळ्यावर आणण्यासाठीं अगर शासन करण्यासाठीं ब्रिटिश सरकार नेहमीं ज्या उपायांचा अवलंब करीत असे, ते उपाय सरकारचा हेतु सफल करणारे नव्हते असें महाराजांचें मत होतें. महाराज ह्मणाले, तुमचे उपाय ह्मणजे चिमण्यांना बुजवणाऱ्या तांबड्या चिंधोटी प्रमाणें आहेत. महाराजांचा हेतु सर जॉर्ज साहेबांच्या लक्षांत बरोबर न आल्यामुळें, ' बैलाला बुजविणारी तांबडी चिंधोटी असा आपल्या ह्मणण्याचा अर्थ काय ? ' ह्मणून सर जॉर्ज साहेबांनीं महाराजांना पुन्हां प्रश्न केला. महाराज ह्मणाले, ' छे ! मी चिमण्यांसंबंधींच बोलतों.' महाराज पुढें ह्मणाले, 'आमचे शेतकरी एका काठीला चिंधोटी बांधून उभ्या पिकांचीं कणसें खाणाऱ्या चिमण्यांना बुजविण्यासाठीं ती काठी उभी करितात. या तांबड्या चिंधोटीचा कांहीं काळ उपयोग होतो खरा, परंतु थोड्याशा अनुभवानें त्यांत भिण्यासारखें कांहीं नाहीं, असें समजून येऊन या तांबड्या चिंधोटीच्या काठीवर बसून तिच्याशीं त्या यथेच्छ खेळूं लागतात. अशा प्रकारें आपल्या उपायांचा परिणाम होतो. आपल्या शासनानें अराजकांचा अगर चळवळ्या लोकांचा कांहीं काळ मोड होतो खरा, परंतु थोड्याशा अनुभवानें शिक्षा भोगलेल्या चळवळ्या लोकांना आपणास जसजशी शिक्षा होत जाते तसतशी आपली लोकप्रियता वाढते, असें प्रत्ययास येतें. शिक्षा भोगणारा एकाद्या पत्राचा जर संपादक असेल तर त्याच्या पत्राचा विस्तृत प्रमाणावर खप होऊं लागतो. अशा रीतीनें त्यांनीं स्वीकारलेल्या मार्गापासून त्यांना परावृत्त करण्यासाठीं उपयोगांत आणलेल्या बुजगावण्याशीं चिमण्यांप्रमाणें ते खेळूं लागतात. ' महाराजांच्या ह्मणण्याचा गव्हर्नरसाहेबांच्या मनावर अतिशय परिणाम झाला असला पाहिजे, हें स्पष्ट आहे.

विवाहाच्या दिवशीं महाराजांच्या राज्यकारभाराविषयीं व राजनिष्ठेविषयीं आपला अभिप्राय बोलून दाखविण्याची नामदारसाहेबांना संधि मिळाली. त्या दिवशीं कोल्हापुरांतील महत्त्वाचा प्रत्येक मनुष्य सकाळीं ९ वाजतां मोठया गडबडींत होता; कारण नेक नामदार साहेब त्या वेळीं माजी सम्राज्ञीच्या पुतळयाचें अनावरण करणार होते. सर न्यायाधीश कचेरीनजीकच्या बागेंत एका सुंदर अशा छत्रीखालीं, हिंदी प्रजाजनावर प्रेम करणाऱ्या या साम्राज्ञीचें कायमचें स्मारक उभारिलें होतें. सर जॉर्ज क्लार्कसाहेबांचें स्वागत करण्यासाठीं शामीयान्यांत बराच लोकसमुदाय जमला होता. महाराज अगोदरच त्या ठिकाणीं दाखल झाले होते. या समारंभांत कोणत्याहि प्रकारचें न्यून पडूं न देण्यासाठीं अत्यंत परिश्रम घेणारे कागलाधिपति या प्रसंगीं हजर होते. यानंतर लागलींच भावनगरचे ठाकूर साहेब आपले दिवाण मि० प्रभाशंकर पट्टणी यांच्यासह तेथें दाखल झाले. नेक नामदारसाहेब दाखल होतांच चबुतऱ्यावरील रुप्याच्या खुर्चीवर महाराजांनीं त्यांना नेऊन बसविलें. त्यांच्या उजव्या बाजूला खुद्द महाराज असून डाव्या बाजूला भावनगरचे ठाकूरसाहेब होते. आपण कोणत्या कारणास्तव येथें जमलों आहोंत हें सांगून महाराजांनीं कार्यक्रमास सुरवात केली:—

" माजी सम्राज्ञीच्या ज्या पुतळयाचें अनावरण करण्यासाठीं आज आपण माझ्या शब्दाला मान देऊन येथें जमला आहां, तो पुतळा सम्राज्ञी-वरील माझ्या भक्तीचें व स्वामीनिष्ठेचें अत्यंत साधें असें चिन्ह आहे, हें मीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. हें अल्पसें स्मारक तयार होऊन बरेच दिवस झाले. परंतु त्याचा अनावरण समारंभ मुंबईच्या गव्हर्नर साहेबांच्या हातून व्हावा या हेतूनें योग्य संधीची मी इतके दिवस वाट पहात होतों. आपल्या पूर्वींचे गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन यांनीं हें कार्य पार पाडण्याचें आह्मांस अभिवचन दिलें होतें, परंतु इंग्लंडला त्यांचें एकाएकीं प्रयाण झाल्यामुळें हा योग पुढें लोटणें भाग पडलें. आपल्या येथील आगमनाचा फायदा घेऊन हें कार्य सिद्धीस नेतांना मला मोठा आनंद होत आहे. माझ्या छोट्याशा संस्थानाची नैतिक व आधि-भौतिक प्रगति ही सम्राज्ञीच्या दीर्घकालिक व वैभवशाली कारकीर्दीशीं बहुतांशीं समकालीन अशीच झाली. सम्राज्ञी तक्तारूढ होऊन एक वर्ष होतें न होतें तोंच चक्रवर्तीचें पूर्ण अधिकार उपभोगीत असलेले या संस्थानचे शेवटचे नृपति स्वर्गवासी झाले. अर्थातच त्यांच्या मृत्यूमुळें ब्रिटिशांची खास राजनीति प्रस्था-



बादशाह सातवे एडवर्ड व महाराज्ञी अलेक्झांड्रिया यांचे पुतळे.

पित झाली. यांच्यामागून आलेले बहुतेक नृपती अकाली कालवश झाल्यामुळें चवथे शिवाजी महाराज ऊर्फ बाबासाहेब महाराज यांच्या अल्पकालीन कारकीर्दी-खेरीज करून हें संस्थान १८९४ पर्यंत ब्रिटिश नेतृत्वाखालीं राहिलें. या वर्षी माझ्या हातीं अधिकारसूत्रें देण्यांत आलीं. प्रजेच्या कल्याणाप्रीत्यर्थ सुसंस्कृत राजपद्धतीचीं व निरलस परिश्रमाचीं जर कोठें संस्थानांत स्पष्ट चिन्हें दिसत असतील तर त्यांचें सर्व श्रेय कार्यक्षम ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं वरील मुदतींत जें उत्कृष्ट कार्य झालें, त्यालाच दिलें पाहिजे. या कार्याची महत्वाची जाणीव मला व माझ्या प्रजाजनांना नाहीं, असें नाहीं.

" सम्राज्ञीच्या कारकीर्दीच्या डायमंड जुबिलीच्या प्रसंगीं दोन संस्था स्थापन झाल्या. या दोन संस्था ह्मटल्या ह्मणजे कोल्हापूर इन्फंट्री हॉस्पिटल आणि महारोग्यांचा आश्रम या होत. यांचें ध्येय रुग्ण-क्लेश-निवारण करणें हें होय. माजी सम्राज्ञीच्या अंगीं विशेष प्रसिद्ध व कौतुकास्पद असा जर कोणता गुण असेल तर तो गरीब व आर्त लोकांसंबंधीं त्यांच्याठायीं वसत असलेला कळवळा व त्यांचें दुःख–निवारण करण्यासाठीं त्यांचा एकसारखा प्रयत्न हा होय. स्त्रीजनांतील दैवी अंश–निदर्शक असा स्त्रीजनोचित गुण ह्मणजे कोमल हृदयत्व त्याचें या संस्था यथार्थ स्मारक आहेत. त्यांच्या निधनानंतर गरीब व कर्जबाजारी शेतकरी लोकांना मदत करण्यासाठीं ह्मणून माझ्या प्रजाजनांनीं एक फंड गोळा केला. पुष्कळ कर्जबाजारी इस्टेटींना याचा फायदा मिळाला आहे. मराठ्यांकरितां ह्मणून व्हिक्टोरिया बोर्डिंग इन्स्टिट्यूशन नांवाची संस्था त्यांच्याच स्मरणार्थ सुरू करण्यांत आली. माझ्या प्रजाजनांतील मागसलेल्या वर्गांपैकीं एका वर्गाचें हितसंवर्धन हें इचें ध्येय आहे. तेथें मराठ्यांचीं मुलें, राजाराम हायस्कूल व कॉलेज यांत अध्ययन करीत असतांना त्यांचें पालन पोषण केलें जातें.

" ही संस्था यशस्वी झाली आहे. या संस्थेच्या अभावीं ज्यांच्या शिक्षणाची हेळसांड झाली असती, अशा पुष्कळ तरुण मराठ्यांचें लक्ष या संस्थेकडे वेधलें. आतांपर्यंत जी यशःप्राप्ति झाली आहे, तिचा या संस्थेला मोठा अभिमान वाटत आहे. सम्राज्ञीच्या ज्ञानविषयक व सहृदयत्व द्योतक उदात्त गुणांविषयीं मी व माझे प्रजाजन यांच्या ठायीं वसत असलेला आदर व्यक्त करण्यासाठीं अशा प्रकारचे विविध मार्ग आह्मीं स्वीकारिले आहेत. आपल्या विस्तीर्ण साम्राज्यापेक्षां व सम्राट्पदापेक्षांहि अधिक मौल्यवान ठेवा ह्मणून हे गुण

आपल्या पश्चात् आपल्या संततीला त्या ठेवून गेल्या आहेत. आमचे पुण्यशील प्रभु बादशहा ( युवराज या नात्यानें ज्यांच्या हिंदुस्थानांत झालेल्या आगमनाच्या स्मरणार्थ आपल्या पुढील भव्य इमारत आल्बर्ट एडवर्ड हॉस्पिटल संबोधली जात आहे. ) यांनीं ' जगांत शांतता-प्रस्थापक ' असें सुंदर नांव यापूर्वीच कमाविलें आहे; व त्यांचे पुत्र युवराज हे आपल्या ठायीं वसत असलेल्या हिंदी लोकां-विषयींच्या खऱ्या कळकळीमुळें व आपल्या मनोवेधक साधेपणामुळें हिंदुस्थानांतील अधिकारी वर्गांना त्यांनीं पाठविलेला प्रख्यात संदेश प्रत्येक हिंदी मनुष्याच्या अंतःकरणावर खोदण्यासारखा आहे. हिंदुस्थानाला अवश्यक अशी जर कोणती गोष्ट असेल तर ती सहानुभूति ही होय, असे युवराजांनीं उद्गार काढले होते. ''

लौकरच रिटायर होणारे पोलिटिकल एजंट कर्नल फेरीस यांनीं बजाविलेल्या मोठ्या कामगिरीचा कुशलतेनें उल्लेख करून महाराजांनीं आपलें भाषण संपविलें. म्युनिसीपालिटीनें कोल्हापुरांत जी सुंदर पेठ वसविली आहे, तिच्याशीं कर्नल फेरीस साहेबांच्या नांवाचा कायमचा संबंध आला आहे. महाराजांना सर्व आयुष्यभर कर्नल फेरीस साहेबांची चांगलीच आठवण राहिली होती. छत्रीचें व पुतळ्याचें पद्धतशीर अनावरण झाल्यानंतर नेक नामदार साहेबांनीं आपल्या भाषणांत हिंदुस्थानचा कळवळा असलेल्या सम्राज्ञी व्हिक्टोरियांच्या स्मृतीची या संस्था योग्य स्मारकें आहेत, हें विशद करून सांगितलें. स्वतःला इनॉ-क्युलेद करून घेऊन महाराजांनीं आपल्या प्रजाजनांना आपण मोठें उदाहरण घालून दिलें आहे, असें ते जातां जातां ह्मणाले. प्रो० हॉफ्कीन यांनीं प्रचारांत आणलेल्या प्लेग-प्रतिबंधक इनाक्युलेशनच्या विरुद्ध महाराष्ट्रांतील वर्तमान पत्र-कर्त्यांपैकीं विशिष्ट पक्षानें खोडसाळ राजकीय चळवळ सुरू केली असतांना महाराजांनीं वरील उदाहरण घालून दिलें होतें. ते पुढें ह्मणाले:—

" कोल्हापूर संस्थानांत ब्रिटिशांचा कारभार असल्या वेळीं झालेल्या चांगल्या कामगिरीबद्दलची साक्ष महाराजांकडून ऐकणें हें टीकेचा काहूर उसळ-लेल्या दिवसांत फारच संतोषजनक आहे. त्या वेळीं घातलेला पाया जरी भक्कम असला, तरी महाराज, आपण आपल्या १४ वर्षांच्या कारकीर्दींत त्यावर सुंदर इमारत बांधली आहे. व आपल्या धोरणी आणि सहानुभूतिपरिपूर्ण अशा अमलाखालीं पुष्कळ बाजूंनीं आपल्या प्रजेची महत्वाची प्रगती झाली

आहे. पाटबंधाऱ्याची एक मोठी योजना आपल्या मनांत घोळत आहे, हें मला माहित आहे. या योजनेमुळें आपल्या संस्थानच्या बऱ्याच भागांतून गरीब शेतकऱ्यांना अतिशय गोत्यांत आणणाऱ्या अवर्षणाची भीति कायमची दूर होईल. या कामाच्या स्वरूपाची कल्पना होण्यासाठीं तलावासाठीं आंखलेली जागा मी उद्यां पाहाणार आहें. ''

मेजवानीच्या वेळीं नामदार साहेबांनीं जें भाषण केलें त्यांत त्यांनीं या विवाहित आनंदी दंपतीचें प्रेमानें अभिनंदन केलें. व कोल्हापूर आणि देवासच्या ऐतिहासिक घराण्यांच्या मिलाफापासून त्यांना सुखसमृद्धि होवो अशी त्यांनीं आशा व्यक्त केली.

अशा प्रकारें महाराजांच्या कौटुंबिक चारित्र्यांतील पहिल्या महत्त्वाच्या गोष्टीची परिसमाप्ति झाली. या समारंभाला हजर असलेल्या एका पाहुण्यानें काढिलेले उद्गार येथें देण्यासारखे आहेत:—

''शरीरानें धिप्पाड व उंच, दिसण्यांत गंभीर परंतु मराठा पद्धतीच्या पोषाखांत भव्य दिसत असल्यामुळें महाराज जेथें जेथें जातील, तेथें तेथें त्यांची आकृति उठून दिसण्यासारखी आहे. आपल्याच लोकांत नेहेमीं राहून त्यांच्या सुखाचीं साधनें शोधून काढण्यासाठीं संस्थानच्या कामकाजांतच निमग्न असणाऱ्या संस्थानिकांपैकीं महाराज हे एक आहेत. महाराजांच्या राजपद्धतीच्या सुपरिणामाचीं बाह्य स्वरूपें पाहाण्यासाठीं एकाद्यानें कोल्हापुराला जावें, ह्मणजे सुस्थितीचीं चिन्हें त्याच्या दृष्टीस पडल्याखेरीज राहाणार नाहींत. महाराजांनीं अखेर आपल्या पायाखालीं पूर्णपणें तुडवून टाकलेलें, परंतु प्रारंभीं अतिशय बेफाम झालेलें धर्मगुरूंचें बंड मोडून टाकण्याच्या महाराजांच्या खंबीर निर्धाराकडे, ( या वादाचें रहस्य ) समजून घेतलेले लोक कौतुकानें पाहात होते. हिंदुस्थानांत अतिशय प्रमुख व्यक्ति ह्मणून गाजलेल्या राजनीतिनिपुण अशा ग्वाल्हेरच्या महाराजांचें आगमन या विवाहाच्या प्राथमिक समारंभांसाठीं झालें. या गोष्टीमुळें या प्रसंगाला अधिकच महत्त्व प्राप्त झालें. काठेवाडांतील एका नमुनेदार संस्थानाचे अधिपति, भावनगरचे ठाकूरसाहेब, हे या महत्वाच्या समारंभाला हजर होते. राजकोट कॉलेजमध्यें व पुढें फ्रेजरसाहेबांच्या हाताखालीं शिक्षण संपादित असतांना ठाकूरसाहेबांची महाराजांशीं मैत्री जडली व कालगतीनें ती दृढतर होत गेली. हिंदुस्थानचें राजशकट हांकण्याच्या कामीं

ब्रिटिश सरकारचे भागीदार झालेले शिंदे, कोल्हापूर व भावनगर आज एकत्र झाले आहेत. हें मराठी सत्तेचें माहेरघर असल्यामुळें मध्य व उत्तर हिंदुस्थानांतील मराठी संस्थानांपेक्षां महाराष्ट्रांतील सरदार थोडेसे अधिक खुलून दिसतात. ''

तारीख ४ एप्रील १९१० रोजीं दोन प्रहरीं दीड वाजतां देवासच्या राणीसाहेबांना कोल्हापुरांत पुत्ररत्न होऊन, महाराजांना पितामहपद प्राप्त झालें. ही आनंदाची बातमी सर्व शहरभर पसरली व प्रजाजनांनीं आपणास झालेला आनंद विविध रीतीनें व्यक्त केला. गुढया उभारण्यांत आल्या. तोरणें बांधण्यांत आलीं. व शहरांतील कित्येक जातींच्या लोकांनीं ताटें भरभरून साखर वांटली. देवासचे राजेसाहेब आपले बंधु श्रीमंत भाऊसाहेब यांच्या समवेत बारशाचा समारंभ साजरा करण्याकरितां १९१० सालच्या एप्रील महिन्याच्या ८ तारखेस कोल्हापुराला दाखल झाले. याच महिन्याच्या २१ तारखेस कुमारांचा नामकरण विधि मोठया थाटानें करण्यांत येऊन, त्यांचें नांव विक्रमसिंह ह्मणून ठेवण्यांत आलें. कांहीं कैद्यांना बंधमुक्त करून कित्येकांच्या सजा कमी करण्यांत आल्या. अशा प्रकारें कोल्हापूरच्या राजकन्येनें देवासला युवराज प्राप्त करून देऊन, एका राजघराण्याचें मातृपद मिळविलें.

कोल्हापूरचे युवराज व त्यांचे धाकटे बंधु राजकुमार शिवाजी हे आतां प्रौढ होत चालल्यामुळें त्यांचें शिक्षण हा एक आतां महत्वाचा प्रश्न होऊन बसला. आपल्या बहिणीप्रमाणें तेहि अश्वारोहण करण्यांत निपुण होते. त्यांच्या भावी जबाबदाऱ्यांना अनुसरून त्यांना शिक्षण देण्याची योग्य तजवीज करण्याच्या आवश्यकतेची जाणीव महाराजांना पूर्णपणें होती. महाराजांच्या मनांत त्यांना ज्या प्रकारचें शिक्षण द्यावयाचें होतें, तें शिक्षण संपादण्याची त्यांच्या अंगीं पात्रता येण्यासाठीं शक्य तितक्या चांगल्या प्रतीच्या मराठी शिक्षकांकडून त्यांच्या शिक्षणाचा पाया घालण्यांत येत होता. या सुमारास महाराजांचा व मिरज येथील दोन प्रमुख अमेरिकन मिशनरी डॉ० वानलेस व डॉ० व्हेल् यांचा स्नेहसंबंध जुळला. रुग्णक्लेशनिवारक ह्मणून सर्व महाराष्ट्रभर यांची कीर्ति पसरली होती. वैद्यकीय, शैक्षणिक, धार्मिक इत्यादि त्यांच्या सर्व प्रकारच्या कामगिरीची महाराज तारीफ करीत असत. मानवी मनाचा अंतःस्थ विकास जाणण्याचें जर कोणाला सामर्थ्य असतें तर पुढें पुढें महाराजांच्या बौद्धिक स्थितींत जी क्रांति घडून आली तिचे

एक महत्त्वाचें कारण या डॉक्टरांच्या व त्यांच्या अमेरिकन व्यवसाय बंधूंच्या परोपकारी कृत्याचा महाराजांच्या मनावर न कळत घडलेला परिणाम हें होय, असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस खास आलें असतें. या वेळेपासून हे दोन डॉक्टर महाराजांचे प्रमुख वैद्यकीय सल्लागार व मित्र झाले. ते इतके कीं, मिरज येथील इस्पितळानजीक बांधलेल्या बंगल्यांत महाराज वर्षांतून कित्येक दिवस काढीत असत. त्यांनीं कोल्हापुरास यावें ह्मणून महाराजांची फार इच्छा होती. या हेतूनें कोल्हापूर येथें त्यांनीं आपल्या इस्पितळाची एक शाखा काढण्यासाठीं त्यांचें मन महाराजांनीं वळविलें. या शाखेंत स्त्रियांना व मुलांना स्वतंत्र रीतीनें औषध-पाणी देण्याची व्यवस्था करण्यांत आली. १९०९-१० सालच्या अहवालांत यासंबंधीं पुढीलप्रमाणें उल्लेख आलेला आहे:—

" ५,००० रुपये खर्च करून कावळयांचा बंगला व जुनें मिलिटरी हास्पिटल दुरुस्त केल्यानंतर महाराजांनीं हे बंगले अमेरिकन प्रेस्बिटेरियन चर्चच्या हवालीं केले.

" महाराजांच्या या उदार देणगीचें महत्त्व या मिशनला अतिशय वाटलें व त्यांनीं तिचा आभारपूर्वक स्वीकार केला. डॉक्टर वॉनलेस हे संयुक्त अमेरिकें-तील प्रेस्बिटेरियन चर्चच्या परराष्ट्रीय मिशन बोर्डचे मुनीम असल्यामुळें त्यांच्या ताब्यांत या इमारती देण्यांत आल्या व त्यांना सोईस्कर दिसेल त्या रीतीनें या इमारतींत योग्य ती दुरुस्ती करण्यासाठीं ५,००० रुपयांची रक्कम त्यांच्या हवालीं करण्यांत आली. आणखी ३,००० रुपयांची रक्कम महाराजांनीं मंजूर करून सुरवातीला संस्थानची मदत ह्मणून, ती या इस्पितळला दिली. या वर्ष अखेरीला या इमारती दुरुस्त करण्याचें काम सुरू झालें होतें."

ही शाखा कोल्हापूर येथें उपयुक्त कार्य करीत आहे, ही गोष्ट येथें सांगा-वयास पाहिजे असें नाहीं. महाराजांचें एवढ्यानेंच समाधान झालें नाहीं. कोल्हापूर येथील आपलें आल्बर्ट एडवर्ड हॉस्पिटल मि० व्हेल यांच्या ताब्यांत देऊन त्यांना दरबार सर्जन ह्मणून, आपल्या पदरीं घेण्याची महाराजांनीं वाटाघाट सुरू केली. परंतु डॉक्टर व्हेल हे आपल्या खऱ्या धर्मवृत्तीला अनुसरून या गोष्टीला तयार झाले नाहींत. डॉक्टर ह्मणाले, ' मी देवाचा नोकर आहें, व त्याला माझें जीवित अर्पण केलें आहे. ह्मणून दुसऱ्या कोणाची नोकरी

पतकरितां येत नाहीं.' मिशनरी लोकांविषयीं महाराजांच्या ठायीं किती आदर वसत होता, ही गोष्ट दृष्टोत्पत्तीस आणण्यासाठींच मीं येथें यांच्या हकीकतीचा उल्लेख केला आहे. आपल्या मुलांच्या शिक्षणाची तरतूद करण्याची जेव्हां वेळ आली तेव्हां महाराजांचें लक्ष यांच्याकडेच वळलें तें याच कारणामुळें होय. राजकुमारांना राजकोटला पाठविण्याचा विचार वजनदार लोकांनीं महाराजांपुढें मांडला; परंतु महाराजांनीं ही सूचना तात्काळ फेटाळून लाविली. मागील प्रकरणांत महाराजांच्या एका पत्रांतील उतारा दिला आहे. त्यांत याचें कारण नमूद आहे. १९०९ सालच्या एप्रील महिन्याच्या २७ तारखेस महाराजांनीं सर क्लॉड हिल यांना पुढीलप्रमाणें लिहिलें:—

" दक्षिण महाराष्ट्रांतून कांहीं राजकुमार राजकोटला विद्याभ्यासासाठीं जाणार आहेत काय, ह्मणून आपण मला प्रश्न केला आहे; हाच प्रश्न कांहीं महिन्यांपूर्वीं उपस्थित करण्यांत आला होता; परंतु ( कुमारांच्या ) आईबापांनीं ही सूचना नाकारिली. डॉक्टर आयर्विनच्या मृत्यूमुळें मी माझ्या मुलांची स्वतंत्र व्यवस्था केली आहे. हे अत्यंत दयाळू अंत:करणाचे अमेरिकन गृहस्थ होते. कांहीं सुधारणा घडवून आणल्याखेरीज—कोणत्या सुधारणा कराव्यात हें मी फार लांब अंतरावर असल्यामुळें मला सांगतां येणार नाहीं—या कॉलेजांत विद्यार्थ्यांचा भरणा होणार नाहीं, असें मीं आपलें मत दिलें. मुलांना विलायतेला पाठविण्याची जरी आईबापांची तयारी आहे, तरी ते त्यांना राजकोटला पाठविण्यास तयार नाहींत. इतर संस्थेतील विद्यार्थी आपल्या प्रौढपणीं आपल्या संस्थेविषयीं चांगले उद्गार काढितात; परंतु या कॉलेजची तशी स्थिती नाहीं. खुद्द विद्यार्थीच याला नांवें ठेवूं लागतात. त्यामुळें, स्वाभाविकपणेंच मुलांच्या आईबापांना धास्ती उत्पन्न होते. मी यांपैकींच एकजण आहें, याबद्दल मला अतिशय विषाद वाटतो."

राजाराम कॉलेजचे एकदां प्रिन्सिपाल ह्मणून काम केलेले मि० सी० एच्० क्यांडी यांनीं कोल्हापुरांत राजकुमार क्लास काढण्याची जेव्हां वाटाघाट सुरू केली, तेव्हां हा प्रश्न निराळया स्वरूपांत महाराजांपुढें पुन्हां एकदां आला. १८९९ सालीं मि० क्यांडी हे कोल्हापुरांतून मोठया नाखुषीनें निघून गेले; हें मागें आलेंच आहे. ते ब्रिटिश सरकारच्या नोकरींतून रिटायर होणार असल्यामुळें कोणत्या तरी नात्यानें कोल्हापुरास परत जाण्याची त्यांची फार मनीषा होती. त्यांचें

अतिशय प्रेम असलेल्या आपल्या पूर्वीच्या कॉलेजांत जर त्यांची पुन्हां नेमणूक झाली असती, तर त्यांना आनंद झाला असता, अशी कल्पना करण्यास सबळ कारणें आहेत. खेदजनक परिस्थितींत जरी त्यांना कोल्हापूर सोडावें लागलें होतें, तरी पूर्वीच्या गोष्टी विसरून जाऊन पुन्हां त्यांच्याशीं मोकळेपणानें वागण्यास महाराज तयार होते. ज्या वातावरणांत कांहीं वर्षांपूर्वी, कोणत्या का कारणामुळें होईना, क्यांडी साहेबांनीं बरेंच मोठें वादळ उत्पन्न केलें होतें त्यांतच त्यांना परत येऊं देणें हा महाराजांचा शहाणपणा होईल किंवा नाहीं, याबद्दल स्वाभाविकपणेंच महाराजांच्या कांहीं मित्रांना शंका आली. परंतु धाष्टर्याचे प्रयोग करून पाहाणें हेंच महाराजांचें जीवितरहस्य होतें ! १९०९ सालच्या पूर्वी कित्येक वर्षांपासून महाराजांचें मि० क्यांडींशीं सूत जमलें होतें. महाराजांनीं त्यांना परत येण्यास परवानगी दिली, इतकेंच नव्हे तर सरदार क्लास स्थापन करण्यास त्यांनीं त्यांना पुष्कळ प्रकारें मदतहि केली. महाराज मात्र आपल्या मुलांना त्यांच्या क्लासांत पाठविण्यास तयार नव्हते. १९०९ सालच्या आगष्ट महिन्याच्या १४ तारखेस ते लिहितात:---

" येथें जहागिरदारांचा वर्ग सुरू करण्याची कल्पना खरोखरच मला पसंत आहे व सातारा, बेळगांव व पुणें येथील मुलें कदाचित् या वर्गांत दाखल होतील. परंतु हा क्लास स्वतंत्र राहूं दिला पाहिजे. मुलांच्या आईबापांच्या इच्छेविरुद्ध जेथें मुलांना शिकवितात अशा इंदूर, अजमीर व राजकोटप्रमाणें या क्लासावर कोणत्याहि प्रकारचें नियंत्रण असतां कामा नये. उदाहरणार्थ इंपीरियल सर्व्हिस ट्रुप्समध्यें आपल्या मुलांना जातां यावें ह्मणून त्यांना रॉयल इंजीनियरिंगचें अगर दुसरें लष्करी शिक्षण देण्याची आईबापांची इच्छा असल्यास या राजकुमार शाळांतील शिक्षण कांहीं उपयोगी नाहीं. या शाळांत सामान्य गोष्टींचें ज्ञान त्यांना चांगलें होतें, यांत शंका नाहीं. परंतु संस्थानिकांच्या खास व ज्येष्ठ वारसदाराला व त्याहिपेक्षां त्यांच्या द्वितीय अथवा कनिष्ठ मुलांना याचा विशेष फायदा होईल किंवा नाहीं, याबद्दल मला शंका वाटते. ह्मणून या नव्या वर्गाला मुलें मिळण्याची मोठी पंचाईत पडेल असें मला वाटतें. आपल्या बरोबर एक दोन मदतनीस घेऊन मि० क्यांडी हे या मुलांना विशिष्ट विषयांचेंच ज्ञान स्वतंत्र रीतीनें देऊन राजाराम कॉलेजमध्यें शिक्षण संपादण्यास ते तयार करितील तर माझ्या मतें तें यशस्वी होईल. वकील ज्याप्रमाणें

आपल्या ऐपतीप्रमाणें फी वसूल करितों; तद्वत प्रत्येक व्यक्तीच्या सांपत्तिक स्थितीप्रमाणें फीचें प्रमाण ठेवावें. अशा प्रकारें आपणास हवें असलेल्या विशिष्ट विषयांचें ज्ञान मुलांना संपादन करितां येईल, ह्मणून हा मार्ग यशस्वी होईल असें मला वाटतें. परंतु यापेक्षां जर नियमित वर्ग सुरू केला. व पुणें, सातारा, बेळगांव ते हुबळीपर्यंतचीं मुलें या वर्गांत दाखल होतील तर तेंहि ठीकच होईल. परंतु अशा योजनेच्या यशस्वीपणाबद्दल मला स्वत:ला जबरदस्त शंका येते. कारण राजकोट व अजमीरसारख्या ठिकाणींदेखील मुलें मिळण्याची मोठी पंचाईत पडते. आपण स्वत: राजकोट येथें असल्यामुळें या अडचणीची जाणीव आपणांला आहेच. मुलांच्या आईबापांना अनिष्ट वाटत असलेलें शिक्षण त्यांना आपल्या मुलांना देण्यास भाग पाडणें ही खरोखरच मोठी शोचनीय गोष्ट आहे. आतां संस्थानिक इतके सुशिक्षित झाले आहेत कीं, त्यांना आपल्या मुलांचें हितानहित इतरांपेक्षां अधिक चांगल्या प्रकारें कळतें. मी माझीं मुलें या वर्गांत पाठविणार नाहीं, हें खास. सरदार क्लासचा कोचिंग क्लासप्रमाणें उपयोग करण्यांत येईल, तरच तो यशस्वी होईल, असें माझें स्वत:चें मत आहे. तथापि क्यांडीप्रमाणें प्रयत्न करून पाहाण्याची आपली इच्छा असल्यास तसा प्रयत्न करून पाहाण्यास हरकत नाहीं. तो पूर्णपणें यशस्वी होवो, असें मी इच्छितों. तसा प्रयत्न करून पाहाण्यासारखी ही गोष्ट आहे, यांत शंका नाहीं. तो यशस्वी करून दाखविण्यास माझ्या हातून होईल तितकी मदत करण्यास मी तयार आहें. ''

याच विचारसरणीमुळें महाराजांनीं डॉक्टर आयर्विन व त्यांची पत्नी यांना आपल्या मुलांचें शिक्षक ह्मणून पसंत केलें. डॉक्टर आयर्विन हे पी० एच्० डी० असून त्यांची विद्वत्ता जाडी होती. त्यांचा स्वभावहि गोड होता. मिसेस आयर्विनच्या पतीची युवराजांचे शिक्षक ह्मणून योजना झाल्यानंतर लागलींच दुर्दैवानें डॉ० आयर्विनवर काळानें झडप घातल्यामुळें राजकुमाराची सर्व जबाबदारी मिसेस आयर्विन यांना आपल्या अंगावर घ्यावी लागली. या बाई देखील त्यांच्यावर सोंपविण्यांत आलेल्या जबाबदारीला सर्वतोपरीं लायक होत्या. महाराजांचे माजी शिक्षक व हल्लींचे दिवाणसाहेब यांच्या खास देखरेखेखालीं राजवाड्यांत त्यांनीं एक वर्ग सुरू केला.

मिसेस आयर्विन यांच्यावर आतांपासून ( १९०९–१० ) कोल्हापूरच्या भावी राज्यकर्त्यांच्या व त्यांच्या बंधूंच्या शिक्षणाची सर्व जबाबदारी येऊन पडली. ह्मणून महाराज त्यांना आपल्या कुटुंबांतील माणसाप्रमाणें लेखूं लागले, हे त्यांच्या व्यवहारदक्षतेला उचितच असें होतें. बाईदेखील सुशिक्षित मातेला उचित अशा प्रेमानें व काळजीनें या कुमारांवर देखरेख करीत होत्या, हें पुढें वाचकास समजून येणार आहे. १९०९ सालच्या फेब्रुआरी महिन्यांत महाराज डॉक्टर वानलेस यांना लिहितातः—

" या वेळीं मी मिसेस आयर्विन यांना तसदी देऊं इच्छित नसल्यामुळें आपणांस लिहीत आहें. पुरुषास लिहून भागण्यासारखें असतांना स्त्रियांशीं लिहूं नये, असा आह्मांमध्यें शिष्टसंप्रदायहि आहे. मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न अतिशय महत्त्वांचा असतो. माझ्या मुलांचें शिक्षण मिसेस आयर्विन यांच्या हातून व्हावें, अशी माझी इच्छा आहे, यांत तिळमात्र संदेह नाहीं. कांहीं वर्षें तीं यांच्या सान्निध्यांत सतत असावीं अशी पण माझी इच्छा आहे. त्यांना बराच थकवा आला आहे असें मी ऐकतों. त्यांची अशीच स्थिति राहिली तर त्यांना कांहीं महिने बरें वाटेल व पुन्हां त्या आजारी पडतील, अर्थात त्यामुळें माझ्या मुलांच्या शिक्षणांत खंड पडेल; व याहीपेक्षां अतिशय महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे, त्या काम करीत याच देशांत राहिल्या तर त्यांची प्रकृति कायमची बिघडेल. या वेळीं अभ्यासांत खंड पडला तर तो कदाचित पुरवेल. परंतु आणखी एक वर्षानंतर असें करून भागणार नाहीं. मी मिसेस आयर्विन यांना माझ्या कुटुंबांतील माणसांपैकींच एक समजत असल्यामुळें, त्यांनीं इंग्लंडला जाऊन आपली प्रकृति सुधारावी, आणि सहा महिन्यांत ह्मणजे येत्या जुलैच्या सुमारास परत यावें व ताज्या दमानें हीं मुलें आपल्या ताब्यांत घ्यावींत. पुढें कित्येक वर्षें त्यांना परत जाण्याचा प्रसंग येऊं नये अशी माझी इच्छा आहे. आतां हॉस्पीटलसंबंधीं ह्मणाल तर मला आपल्यास कांहीं सूचना करावयाच्या आहेत. त्या मान्य करून त्या दिशेनें लागलींच कामास सुरवात कराल अशी मला आशा आहे. "

कुमारांच्या शिक्षणाची केलेली व्यवस्था अपुरी वाटल्यावरून १९१० च्या अखेरीला त्यांच्या पुढील प्रगतीविषयीं विचार करणें महाराजांना भाग पडलें. हिंदी आचारविचारांतील चांगल्या गोष्टी त्यांच्या स्वभावांतून निघून न जातील

अशा तऱ्हेनें शक्य तितकें करून यूरोपियन लोकांच्या सान्निध्यांत त्यांना कांहीं दिवस ठेवावें असें महाराजांना वाटत असें. वडील माणसांच्या नियंत्रणापासून स्वतंत्र होण्याची त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति असल्या वेळीं जर तरुण मुलांना पाश्चात्य लोकांच्या संगतींत ठेविलें तर त्यांच्या ठायीं हिंदी चालीरीतींविषयीं तिटकारा उत्पन्न होण्याचा संभव असतो. महाराजांना तर ही गोष्ट टाळावयाची होती. कांहीं इतर संस्थानांतील कुमारांच्या बाबतींत जसा अनुभव आला होता, तशा प्रकारचा खेदकारक अनुभव कदाचित् आपणांसहि येईल, ह्मणून महाराजांना मोठी भीति वाटत होती. तथापि यूरोपियन लोकांच्या देखरेखेखालीं यूरोपियन मुलांच्या चांगल्या संवयी कुमारांना लागाव्यात या गोष्टीचें महत्त्व महाराजांना कोणत्याही प्रकारें कमी वाटत नव्हतें. महाराजांना परिचित असलेल्या कांहीं कुमारांच्या जन्माचें मातेरें होण्यास ज्या वाईट गोष्टी कारणीभूत झाल्या, त्यांच्या मोहाला बळी पडण्यास ज्या वयांत संभव असतो, त्या वयाचीं आपलीं मुलें होण्याच्या अगोदरच त्यांना इंग्रज शिक्षकांच्या सहवासांत ठेवून त्यापासून लागणाऱ्या संवयींचा फायदा त्यांना करून घ्यावा, हा या दोन अडचणी टाळण्याचा मार्ग महाराजांनीं पसंत केला. या दिशेनेंहि महाराजांना दोन मार्ग खुले होते. कुमार अल्पवयस्क असतांना त्यांना विलायतेला पाठवून पाश्चात्य पद्धतीचें शिक्षण कांहीं वर्षे तेथें त्यांना देऊन झाल्यावर यूरोपियन लोकांचे दुर्गुण त्यांच्या अंगीं जडण्याचा संभव उद्भवण्यापूर्वींच त्यांना परत घरीं आणणें, हा एक मार्ग होता. कुमारांचा त्यांच्या घरांतील चांगल्या गोष्टींचा संबंध न तुटेल, अशा प्रकारें त्यांना जवळच्याच यूरोपियन मुलांच्या शाळेंत पाठविणें हा त्यापेक्षां कमी धोक्याचा दुसरा मार्ग होता. प्रथमतः महाराजांना दुसरा मार्ग पसंत पडला. व कुमारांना पांचगणी येथील यूरोपियन मुलांच्या बोर्डिंग स्कूलमध्यें पाठवावें, असा त्यांनीं विचार केला. ते एका पत्रांत ह्मणतातः—

" पांचगणी स्कूलमध्यें माझ्या कांहीं सरदारांची व माझ्या मेहुण्यांचीं मुलें शिक्षणासाठीं पाठविण्याचा माझा विचार असल्यामुळें या शाळेसंबंधीं माहिती मिळविण्यासाठीं मि॰ कुरणे यांना पाठवीत आहें. मुलांना इंग्लिश येतें. अशा प्रकारच्या एकाद्या मिशनरी स्कूलमध्यें अगर शक्य असेल तर याच स्कूलमध्यें माझीं मुलें पाठविण्याची माझी इच्छा आहे. या प्रश्नाची मी आपल्याशीं प्रत्यक्ष

चर्चा करीन. याचा अनुभव पाहाण्यासाठीं ह्मणून मी हीं मुलें पाठवीत आहें. याचा परिणाम जर चांगला दिसेल तर माझीं मुलें तेथें जातील. ''

चौकशीअंतीं हें स्कूल यूरोपियन मुलांकरितांच आहे असें आढळून आलें. मग आतां दुसरा उपाय कोणता ? १९११ सालच्या एप्रील महिन्याच्या दुसऱ्या तारखेस महाराज डॉक्टर वॉनलेस यांना लिहितातः—

" त्या शाळेमध्यें हिंदी मुलांना प्रवेश मिळत नाहीं, असें मला समजतें. तेथील प्रिन्सिपॉलचे बंधुहि त्यांचेबरोबर या देशांत आले असून त्यांच्या देखरेखे-खालीं याच पद्धतीवर आणखी एक शाळा सुरू करण्याचा त्यांचा विचार आहे, असेंहि समजतें. हिंदी व यूरोपियन मुलांकरितां ह्मणून येथें एक शाळा काढण्यासाठीं त्यांचें मन जर आपण वळवाल तर मजवर आपले उपकार होतील. मुलांकरितां, शाळेकरितां आणि प्रिन्सिपॉलकरितां देखील मी मोफत जागा देईन. मात्र या शाळेमध्यें यूरोपियन मुलें असून माझ्या सरदारांच्या मुलांना ठराविक माफक फी ठेवून घेतलें पाहिजे, ही माझी एक अट आहे. ही जागा रुकडी पुलानजीक आहे. पांचगणी स्कूलच्या प्रिन्सिपॉलच्या बंधूंना हें स्थळ पाहाण्यास सांगावें.

" फक्त कनिष्ठ वर्गांतील मुलेंच यांत असणें मला आवडणार नाहीं. तर प्रतिष्ठित यूरोपियन लोकांच्या मुलांची संख्या यांत भरपूर असली पाहिजे, इतर वर्गांचींहि कांहीं मुलें राहिलीं तर त्याला माझी हरकत नाहीं, मात्र या शाळेंत इंग्लिश लोकच अध्यापक असले पाहिजेत. ''

या गृहस्थाशीं अप्रत्यक्ष रीतीनें पत्रव्यवहार करून महाराजांचें समाधान न झाल्यामुळें ते यानंतर दुसऱ्याच दिवशीं लिहितातः--

" मी स्वतः होऊन माझा आपल्यास परिचय करून देत आहें. डॉक्टर वॉनलेसचें पत्र घेऊन आपणांकडे आलेले मिस्टर कुरणे हे आपल्या शाळेची फारच तारीफ करीत आहेत. व या शाळेविषयीं त्यांना फार आदर वाटत आहे.

" आपल्या बंधूंनीं त्याची येथें एक शाखा काढावी अशी माझी इच्छा आहे. डॉक्टर वॉनलेस यांना पाठविलेल्या माझ्या पत्राची एक प्रत मी यालगत पाठवीत आहें. मेहरबानगी करून हीं पत्रें खासगी स्वरूपाचीं आहेत असें मानून चाला. कारण डॉक्टर वानलेस यांना पाठविलेल्या माझ्या पत्राच्या प्रतीवरून ही शाळा येथें कां असावी असें मी ह्मणतों, तें आपणांस

समजून येईल. मीं माझ्या पत्रांत केलेल्या विनंतीचा आपण सहानुभूतीपूर्वक विचार कराल तर मजवर आपले उपकार होतील. हीं पत्रें खासगी समजून तीं आपण गुप्त राखावींत अशी माझी आपणास विनंति आहे. कारण ब्राह्मणांना माझे विचार आवडणार नाहींत. ''

हें स्कूल फक्त यूरोपियन मुलांकरितां आहे, व शाळेच्या व्यवस्थापकांचीं मतें कोल्हापूर येथें त्याची एक शाखा काढण्यास वळविणें कठीण नाहीं, असें डॉक्टर वॉनलेस यांनीं उत्तर पाठविलें. एप्रीलच्या ४ तारखेस पाठविलेल्या पत्रांत महाराजांच्या ह्मणण्याचा आपण विचार करू, असें प्रिन्सिपॉलनें लिहिलें होतें; परंतु या वाटाघाटीपासून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. कदाचित् कोल्हापुराला एक शाळा उघडणें त्या मिशनला अशक्य झालें असावें. आतां कुमारांना विलायतेला कांहीं वर्षें पाठविणें हाच काय तो मार्ग शिल्लक राहिला. पुढच्या एका प्रकरणांत पुन्हां यासंबंधीं आह्मी लिहिणार आहों.

१९०९ सालीं पुणें येथील पेशव्यांच्या दप्तरांचें निःपक्षपातीपणें निरीक्षण करून मराठा साम्राज्याच्या इतिहासाचें साहित्य प्रसिद्ध करविण्याचा विचार महाराजांच्या मनांत आला. या गोष्टीकडे महाराजांचें पुढीलप्रमाणें लक्ष वेधलें.

" इतिहासाकडे माझें लक्ष कसें लागलें हें मी आपणांस सांगतों. मला लहानपणापासूनच इतिहासाचा शोक होता. व कांहीं जुन्या बखरींवरून मला असें आढळून आलें कीं, ब्राह्मण इतिहासकारांनीं खरी बाजू मांडली नाहीं; व खुद्द रानड्यांचा इतिहास देखील या दोषापासून अलिप्त नसून त्यांत ब्राह्मणांची बाजू उचलून धरली आहे. इतिहासकारांसंबंधीं जेव्हां मी चौकशी करू लागलों, तेव्हां × × हे मला आढळून आले. माझ्या यूरोपियन मित्रांचा सल्ला घेऊन × × हे अधिक चांगले असें मला वाटलें. परंतु माझा अनुभव मात्र याच्या अगदीं उलट आला ह्मणून आमचा स्नेहसंबंध तुटला. आपल्यांत ब्राह्मणी विचार नाहींत व अनुकूल अशा रीतीनें वेदोक्त प्रकरणासंबंधीं लिहीन, असें मला त्यानें प्रथम सांगितलें. मागसलेल्या लोकांना अनुकूल असे कांहीं कागदपत्र त्यानें मला दाखविलें व आपल्या श्रमाकरितां ह्मणून पैसे उपटले. त्यानंतर मात्र आह्मांस मदत करण्यासाठीं तो आह्मांपाशीं कधींच आला नाहीं.

" नंतर मीं डोळे उघडले आणि चौकशी करूं लागलों. अशा प्रकारची माझी पूर्ण निराशा झाल्यानंतर प्रो० डोंगऱ्याचें मन वळवून मी त्यांची

कौन्सिलर्सना व सेक्रेटरींना ओळख करून दिली; कारण माझ्या इच्छेप्रमाणें काम करून जनतेपुढें खरा इतिहास ते मांडतील, हें मला माहीत आहे. ''

या काळीं संस्थानाची प्रगति इतर दिशांनीं जी झाली, तिचें वर्णन महाराजांच्या शब्दांत देऊन, या प्रकरणाचा उपसंहार करणें योग्य दिसतें:—

''आपण आह्मांला सोडून निघून गेल्यापासून आह्मी काय करीत आहों यांचें संक्षिप्त वर्णन आपणांस लिहावें असें मला वाटतें. शिकारीच्या बाबतींत कोल्हापूर हें डुकरांची शिकार करण्याकरितां खरोखर उत्तम स्थळ बनलें आहे. आपल्या वेळीं येथें एकहि डुकर नव्हतें; ह्मणून त्यांच्यासाठीं आमच्या संस्थानाबाहेर जाणें आह्मांस नेहमीं भाग पडे. हरणांची व वाघांची शिकार करण्याच्या बाबतींतहि सुधारणा झाली आहे. ही गोष्ट साध्य करण्यासाठीं कांहीं ठिकाणीं जंगल तोडून, कांहीं ठिकाणीं तें राखावें लागलें. त्या वेळीं काळवीट सांपडणें फार कठीण होतें, हें आपणांस माहीत आहे; परंतु आतां तीं दहा वीससुद्धां मिळूं शकतात. आपण निघून गेल्यापासून मीं सुमारें वीस नवीन तलाव बांधिले; परंतु एवढयानें माझी आकांक्षा पूर्ण झाली नाहीं, ह्मणून मीं एक पाटबंधाऱ्याची योजना आतां हातीं घेतली आहे. हा तलाव हिंदुस्थानांत सर्वांत मोठा होईल. याकरितां मी माझें सर्व सामर्थ्य खर्च करीत आहें. आतां बापूसाहेब व मी या जागेवर काम करीत आहोंत. ही योजना यशस्वी व्हावी एवढेंच मी इच्छितों.

''व्यापाऱ्याच्या बाबतींत कोल्हापुराची पुण्याशीं अगर त्याहिपेक्षां लहान अशा शहराशीं तुलना केली असतां, कोल्हापूर ह्मणजे कांहींच नव्हतें; परंतु गुळाच्या व्यापाराचें एकच उदाहरण मी देतों; एका वर्षांत ५०,००,००० रुपायांचा गूळ व सुमारें २०,००,००० रुपायांचा भुईमूग आह्मीं बाहेर पाठविला.''

या काळांतील महाराजांच्या कार्यांपैकीं सर्वांत महत्त्वाची कामगिरी अद्याप सांगावयाची आहे. ही व अद्याप वर्णन करावयाच्या महाराजांच्या चारित्र्यांतील इतर कित्येक गोष्टी घडून अगदीं थोडेच दिवस लोटले असल्यामुळें, महाराजांचें चरित्र या बाबतींतही पूर्णपणें निवेदन करणें कदाचित् शक्य होणार नाहीं. तथापि ज्या स्थितींत ही गोष्ट आह्मांस सांगतां येणें शक्य आहे त्या स्थितींतहि ती अतिशय मनोवेधक व बोधप्रद होणार आहे.

# प्रकरण १६ वें.

# राजद्रोह व अराजकता.



९०८–०९ सालांत कोल्हापूर येथें जे राजद्रोही व अराजक अत्याचार घडले, त्यांचा उगम १८९९ सालच्या शिवाजी-क्लब-चळवळीच्या इतिहासांतच सांपडणार आहे. बाह्यत: हा क्लब मराठा–राष्ट्राला जन्म देणाऱ्या थोर विभुतीच्या स्मरणार्थ सुरू करण्यांत आला. याच विभुतीच्या शौर्यामुळें व मुत्सद्दीपणामुळें, कोल्हापूर संस्थान अस्तित्वांत आलें. आपल्या या कुलसंस्थापकाविषयीं, महाराजांच्या ठायीं पराकाष्टेचा आदर वसत होता, व दैवी अवताराचें 'प्रतीक' ह्मणून, या विभुतीच्या मूर्तीला ते भजत असत, हें वाचकांस यापूर्वीं विदित झालेंच आहे. या थोर पुरुषाच्या स्मृति-विषयक, जनतेच्या अंत:करणांतील वाढत्या प्रेमाकडे कोल्हापुरांतील राजकीय अधिकारी देखील, सहानुभूतीनेंच पाहात होते. अशा परिस्थितींत शिवाजी-क्लब जर समंजस व विचारी माणसांच्या नेतृत्वाखालीं चालला असता, तर यापासून कोल्हापूरच्या तरुण पिढीचें हित होऊन, त्यांना चांगलें वळण लागलें असतें; परंतु या क्लबाच्या तरुण चालकांच्या डोकींत चुकीच्या कल्पना शिरून, त्यांनीं भलतेच मार्ग स्वीकारिले. त्यामुळें ते व त्यांच्या बरोबर इतर लोकहि गोत्यांत आले. या घातुक परिणामाला अप्रत्यक्षत: टिळकांची शिकवणूकच कारणीभूत झाली, यांत शंका नाहीं. टिळकांची शिकवणूक कशा प्रकारची होती, याचा उल्लेख मागें आलाच आहे. शिवाजी सारख्या थोर विभुतीला सामान्य जनतेचे नीतिनिर्बंध लागू पडत नाहींत, असें ते प्रतिपादन करीत असत. त्यांच्या मतें, शिवाजीच्या तोडीच्या लोकांनीं खून केला तरी त्याला खून ह्मणतां येणार नाहीं. महाराष्ट्रांतील तरुण लोकांना शिवाजीसारखीच आपल्या देशाची कळकळ लागून राहिली नव्हती काय ! यापैकीं एकाद्याच्या अंत:करणांत भावी शिवाजीचें सामर्थ्य बीजरूपानें वसत

आहे किंवा नाहीं, हें तरी कोणीं सांगावें ? कदाचित् यांपैकीं एकादाच पुढें शिवाजी होण्याचा संभव होता, हें खरें; पण हें अद्वितीय भाग्य ज्याच्या पदरीं पडावयाचें तो अनुभवानें निश्चित होण्यापूर्वी, प्रत्येकाला आपल्या आराध्य देवतेच्या नीतिशास्त्राचें अनुकरण करण्याचा नैतिक अधिकार पोंचत नव्हता काय ? टिळकांच्या मतें, नीतिबाह्य नसलेल्या खुनांत, शिवाजीला त्याच्या अनुयायांनीं व मित्रांनीं मदत केली नव्हती काय ? शिवाजीच्या अफझुलखानाशीं झालेल्या झटापटींत शिवाजीनें सुरवात केली कीं, स्वतःच्या बचावाकरितां यानें आपल्या शत्रूवर हल्ला केला, या प्रश्नाचें येथें विवेचन करण्याची जरूरी नाहीं. टिळकांच्या भुरळ पाडणाऱ्या शिकवणीपासून, वरीलप्रमाणें साहजिक तर्क घेऊन, त्याचा तरुण पिढीच्या मनावर अतिशय वाईट परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं, एवढेंच येथें दाखवावयाचें आहे. चोहोंकडे दिसून येणाऱ्या अर्धवट शिकलेल्या हजारों निरुद्योगी तरुणांच्या असंतोषामुळें, त्यांची मनोभूमिका अशा प्रकारची शिकवणूक ग्रहण करण्यास, अगोदरच तयार झालेली होती, हेंहि येथें सांगणें इष्ट आहे.

महाराष्ट्रांतील तरुण लोकांच्या विचारांना, आणखी एका प्रकाराची दिशा लागली होती, त्यामुळें अशा प्रकाराच्या घातुक विचारसरणीला अधिकच जोर आला. महाराष्ट्रांतील ब्राह्मणशाही ऊर्फ पेशवाई जाऊन, त्या ठिकाणीं ब्रिटिश सत्ता आली. पेशवाईला मराठी सत्ता ह्मणतां येणार नाहीं; कारण अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पेशव्यांनीं मराठेशाही नामशेष करून टाकली होती. ब्रिटिश लोकांनीं पुण्यांतील शनवारवाड्यावर आपला बावटा चढविला व बाजीरावाला नेमणूक करून देऊन ब्रह्मावर्तीं ठेविलें; तेव्हां महाराष्ट्राच्या आजुबाजूच्या प्रदेशांत-याला आपण दख्खन ह्मणूं-ब्राह्मणांचाच अंमल होता. त्यांहीं काळ नवीन परिस्थितीशीं यांनीं जुळतें घेतलें. ब्रिटिश सरकारची संघटना पेशवाईपेक्षां श्रेष्ठ असून, ब्रिटिश लोकांनीं जनतेंत नवीन विचार प्रचलित केले. एवढेंच नव्हें, तर धनार्जन करण्याचीं आणि आपली सत्ता व वजन वाढविण्याचीं नवीं साधनें यांना उपलब्ध करून दिलीं. पेशवाईच्या नाशामुळें असंतुष्ट झालेल्या ब्राह्मण वर्गांत आनुवंशिक साक्षरता असल्यामुळें, पाश्चात्य शिक्षणाच्या बाबतींत महाराष्ट्रांतील इतर शेंकडा ९५ प्रमाणांत असलेल्या जनसंख्येवर त्याला आतां सहजीं आघाडी मारतां आली; त्यामुळें या देशांत ब्रिटिश

सरकारनें जी शासनपद्धति रूढ केली, तींत ब्राह्मणांचीच सर्व बाजूंनीं भरती झाली. याशिवाय या देशांत नवीनच सुरू झालेल्या इंग्रजी न्यायपद्धतीमुळें संपदा व सत्ता संपादण्याचे नवीन व विस्तीर्ण मार्ग अस्तित्वांत आल. आतां नोकरी व वकिलीरूपी रणांगणावरच वैभव प्राप्त करून देणारा विजय संपादावा लागल्यामुळें, अर्थातच ब्राह्मण सहज विजयी ठरले आणि महाराष्ट्रांतील इतर सर्व लोक या युद्धांत मागें पडले. पेशव्यांच्या उदयकालांत ब्राह्मणेतरांच्या अर्ध्या अधिक जहागिरी व इनामें नष्ट होऊन गेलेलींच होतीं. आज जीं मराठा संस्थानें हयात आहेत, त्यांपैकीं मुख्य सगळीं महाराष्ट्राबाहेरच असून, कोल्हापुरासारखी महाराष्ट्रांतील राज्यें पेशव्यांना नष्ट करणें अशक्य, ह्मणूनच नाश पावलीं नव्हतीं. शिवाय जरी तीं जिवंत राहिलीं तरी त्यांची सत्ता सर्व तऱ्हांनीं संपुष्टांत आली होती, हेंहि येथें विसरतां कामा नये. या ब्राह्मणी वर्चस्वाच्या तडाख्यांतून वांचलेल्या मराठा संस्थानांत सुद्धां ब्राह्मणांनीं आपले हातपाय किती लांब रुंद पसरले होते, याचाहि या ठिकाणीं उल्लेख करण्यासारखा आहे. उदाहरणार्थ, इचलकरंजी हें आरंभीं, कोल्हापूरच्या सेनेच्या मराठा सेनापतीच्या जहागिरींतून तोडून दिलेला एक लहानसा तुकडा होता; परंतु अखेर हा तुकडा खुद्द सेनापतीच्या जहागिरीच्या सहा पटीपेक्षां जास्त वृद्धिंगत झाला ! ब्राह्मणी राज्यकर्त्यांनीं, महाराष्ट्रभर बरेचसे ब्राह्मण संस्थानिक, जहागिरदार, इनामदार व वतनदार निर्माण करून, या प्रदेशांतील ऐतिहासिक राज्यकर्त्या जातींना मागें खेंचलें. ब्रिटिश सत्तेनें या कार्याची पूर्तता केली. या कारकीर्दींत हजारों मामलयाच्या नवीन जागा निर्माण करण्यांत आल्या व विशिष्ट न्यायपद्धतीमुळें, नवीन वकील वर्ग अस्तित्वांत आला. या सर्व गोष्टींमुळें, महाराष्ट्रांत पूर्वीं सत्तेला अगदीं अपरिचित असलेल्या एका लहानशा जातीच्या हातीं मोठी सत्ता प्राप्त झाली. ब्रिटिश सरकारनें जाणून बुजून, ब्राह्मणांना नवीन सत्ता उपलब्ध करून दिली, असा माझ्या ह्मणण्याचा अर्थ आहे, असें मात्र कोणीं समजूं नये. ज्यांनीं इंग्रजी शिक्षण संपादन केलें आहे, अशा वर्गांतूनच या नवीन अधिकाराच्या जागेवर लोकांची भरती करून घ्यावयाची, असा उघड व सकारण हेतु होता; परंतु यामुळें मुख्यतः ब्राह्मणांनाच सवलत मिळाली. ही गोष्ट ब्रिटिश राज्यकर्त्या लोकांच्या लक्षांत आली नाही, ही त्यांची चूक होय. ब्राह्मणेतर वर्गांना पूर्वापार सोसाव्या लागणाऱ्या अडचणींतून बाहेर पडण्यास मदत करून, त्यांनाहि या नवीन संधीचा फायदा करून देणें, हें राज्यकर्त्यांच्या शहा-

णपणाचें व न्यायाचें झालें असतें. खुल्या व्यापारपद्धतीच्या धोरणाचा पगडा त्या वेळीं व आतांहि ब्रिटिश जनतेच्या मनावर पूर्णपणें असल्यामुळें, जातिभेदाचें व या देशाच्या कित्येक शतकांच्या इतिहासामुळें जी परिस्थिति निर्माण झाली, तिचें रहस्य त्यांना समजून आलें नाहीं; याचा परिणाम असा झाला कीं, सामान्य जनतेच्या हक्कांचा अपहार ब्राह्मणांना आतां सहज करितां येऊं लागला. अशा प्रकारें दरसाल वकिलांच्या फीच्या रूपानें व विशेषतः लांचलुचपतीच्या रूपानें क्रोडो रुपये ब्राह्मणांच्या खिशांत जाऊं लागले. त्या वेळीं ब्रिटिशांच्या शासन पद्धतीचें अगर भाषेचें ज्ञान अज्ञ जनतेला नसल्यामुळें लांचलुचपतीच्या प्रकाराला बराच ऊत आला होता. आतां लोकांना उपजीविकेचें एकच साधन झालेल्या जमिनीहि या रीतीनें मिळविलेल्या संपत्तीच्या जोरावर घशांत टाकणें ब्राह्मणांना सोपें झालें. ब्राह्मणेतरांची अवनति व त्याबरोबरच ब्राह्म-णांची उन्नति, अशा प्रकारें ब्रिटिश छत्राखालीं पूर्णावस्थेला पोंचली. नवीन राजकर्त्यांच्या दृष्टीनें या शासन पद्धतीचा प्रथमचा अनुभव अत्यंत समाधान-कारक असा त्यांना वाटला; कारण, ब्रिटिश अमलाच्या आरंभींच्या काळांतील महाराष्ट्रांतील ब्राह्मण, या नवीन राजपद्धतीमुळें गब्बर होऊन, पाश्चात्य संस्कृतीच्या प्रकाशानें त्यांचे डोळे दिपून गेल्यामुळें, ते अर्थातच ब्रिटिश सरकारशीं राजनिष्ठ व कृतज्ञ राहिले; परंतु या काळांत ब्राह्मणेतरांची स्थिति मात्र एकसारखी वाईटच होत गेली. या प्रांताची सर्वसाधारण सांपत्तिक स्थिति जरी सुधारली होती, तरी शेतकरी वर्गाचें दारिद्र्य झपाट्यानें वाढतच चाललें. पूर्वींपेक्षांहि आपली स्थिति एकसारखी कां वाईट होत चालली आहे, यांचें कारण त्यांना समजेना. या व यांच्या पूर्वींच्या राजकर्त्या लोकांनीं, अस्तित्वांत आणलेल्या राजनिष्ठ व बुद्धिमान् ब्राह्मण अधिकारी वर्गावर, इंग्रजी सत्ता आतां पूर्णपणें अधिष्ठित झाली होती; परंतु सामान्य जनतेच्या वाढलेल्या दुःखांची व अव-नतीची ब्रिटिश अधिकाऱ्यांना जाणीव नसून ते याविषयीं पूर्णपणें बेफिकीर राहिले. तत्त्वतः व हेतुतः ब्रिटिश राज्यपद्धति सर्वांशीं सारखीच, न्यायप्रेरित व समतावादी होती; परंतु प्रचलित असलेली परिस्थिति लक्षांत न घेतां समतेच्या तत्त्वाचा जर पुरस्कार केला, तर त्यापासून इच्छित हेतूच्या अगदीं विरुद्ध असे परिणाम घडून येतात, हें या तत्त्वशुद्ध राज्यपद्धतीच्या प्रवर्तकांच्या लक्षांत आलें नाहीं. या सर्व काळांत महाराष्ट्रांत तर हे विपरीत परिणाम सारखे घडून येत होते.

लोक केव्हां केव्हां यामुळें दंगे करीत. मुख्यत्वेंकरून हे दंगे शेतकरी वर्गांतून उत्पन्न होत. ज्या मूळ परिस्थितीमुळें, सामान्य जनतेच्या जमिनी त्यांच्या हातांतून जाऊन शेतकरी वर्ग पुंडाईला प्रवृत्त होई, तिच्या बुडाशीं न जातां, राजकर्त्यांनीं फक्त वरवरचे उपाय योजिले. यामुळें त्यांचें दुःख कांहीं अंशीं सह्य झालें खरें; पण वस्तुतः या उपायामुळें शेतकऱ्यांच्या या दुःखाची आयुष्यमर्यादा अधिकच वाढली ! इतकें होऊनहि, दक्षिणेंतील जनतेची एकसारखी होत चाललेली खची राजकर्त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली नाहीं !

तथापि या अगदीं आरंभीच्या काळीं ज्या थोडया ब्राह्मणेतरांना शिक्षण मिळालें होतें, त्यांच्या लक्षांत या स्थितीचा पुढें काय परिणाम होणार तो आल्या-खेरीज राहिला नाहीं. राज्यकर्त्यांना व जनतेला या बाबतींत पहिला इषारा दिल्याचें सर्व श्रेय, पुण्यांतील त्या काळच्या एका गरीब परंतु सुसंकृत बुद्धीच्या **जोतीराव फुले** नांवाच्या माळी जातीच्या ब्राह्मणेतराला दिलें पाहिजे. १८२७ सालीं ह्मणजे शिवाजीमहाराजांच्या जन्मानंतर बरोबर दोनशें वर्षांनीं जोतीबांचा जन्म झाला. ब्राह्मणांच्या विरोधाला न जुमानतां, यांनीं एका मुसलमान गृहस्थाच्या व एका यूरोपीयन खिस्ती मनुष्याच्या सहाय्यानें, थोडेंसें इंग्लिश भाषेचें ज्ञान संपादिलें होतें. त्यांचा मिशनरी लोकांशीं संबंध आल्यामुळें, त्यांची दृष्टि अधिकच विस्तृत झाली. त्या काळच्या ब्राह्मणेतरांच्या मनांत जे विचार धुमसत होते, त्यांचें पूर्ण प्रतिबिंब त्यांच्या एका साध्या परंतु मर्मभेदी पुस्तकांत उठलें आहे. त्यांनीं आपल्या पुस्तकाला हिंदुस्थानांतील "गुलामगिरी" असें नांव देऊन, तें नीग्रो लोकांच्या गुलामगिरीचें उच्चाटण करण्याच्या कामीं अमेरिकन लोकांनीं केलेल्या निरपेक्ष व स्वार्थत्यागपूर्ण कळकळीचें स्मारक ह्मणून अमेरिकन राष्ट्राला त्यांनीं अर्पण केलें होतें. हें पुस्तक १८७३ मध्यें प्रसिद्ध झालें. ब्राह्मणांनीं सामान्य जनतेवर लादलेल्या मानसिक गुलामगिरीचें स्पष्ट चित्र या पुस्तकांत रेखाटिलें आहे. प्रथम या धर्मगुरूंनीं या देशांतील आद्य रहिवाशांना जिंकून, आपल्या वर्चस्वाला सुरवात केली. ते या लोकांना महा-अरि ह्मणजे 'मोठे शत्रु' असें ह्मणत असत. पुढें या शब्दाचें प्राकृत स्वरुप, महार अगर महाराष्ट्रांतील अस्पृश्य जनता, असें झालें. पौराणिक कथा, धर्मोपदेश, शाठ्य वाङ्मय इत्यादिकांच्या सहाय्यानें या लोकांनीं देशांतील सामान्य जनतेवर आपलें वर्चस्व स्थापून, त्यांना ते शूद्र अगर अतिशूद्र लेखूं लागले. ब्राह्मणी अधिकारी वर्ग, ब्राह्मण वकील, पिढीजाद ब्राह्मण

कुलकर्णी, आनुवंशिक ब्राह्मण उपाध्याय वर्ग, इत्यादि ब्राह्मण लोकांनीं ब्रिटिश छत्राखालीं ब्राह्मणेतर जनतेवरील आपल्या वर्गाची पकड दृढतर करून, त्यांची हीन स्थिति अधिकच हीन केली; ब्रिटिश राज्यकर्त्या लोकांनीं आपल्या सत्तेचा लगाम आपल्या हातीं ठेविला असतांना देखील, ब्रिटिश राज्यांत हें ब्राह्मणी वर्चस्व कसें झालें, असा जर एकाद्या अपरिचित वाचकानें प्रश्न केला, तर त्याचें देखील उत्तर या ग्रंथकारानें या पुस्तकांत लिहून ठेविलें आहे. हिंदी सामाजिक परिस्थिती-विषयीं राज्यकर्त्यांचें अज्ञान जें वारंवार दृष्टोत्पत्तीस येई, त्यामुळें ब्रिटिश राज्यांत देखील ब्राह्मणी सत्ता शक्य झाली, हें या ग्रंथकर्त्यानें स्पष्ट केलें आहे. ब्रिटिश राज्याविषयीं जोतीराव फुल्यांची पूर्ण राजनिष्ठा या पुस्तकांत पदोपदीं आढळून येते. ब्रिटिश राज्यामुळें, ब्राह्मणेतरांचें दुःख कांहीं अंशीं तरी कमी झालें; ह्मणून प्रत्येक ब्राह्मणेतर ब्रिटिश राज्याविषयीं कायमचा कृतज्ञ राहील, ही गोष्ट त्यांनीं मान्य केली आहे. तथापि वर वर्णिल्याप्रमाणें राज्यकर्त्यांच्या प्रमादांचें निर्भयपणें आविष्करण करण्यासहि त्यांनीं कमी केलें नाहीं.

एकोणिसाव्या शतकाचा मध्यकाल उलटल्यानंतर महाराष्ट्रांतील ब्राह्मणांच्या विचारसरणींत मोठी महत्त्वाची क्रांति घडून आली. खुद्द ब्रिटिश राजकर्त्यांच्या हितसंबंधास धक्का न लावतां, साक्षर वर्गानें आपला भाग्योदय जितका करून घेणें शक्य होतें, त्याची आतां बहुतेक परमावधि होत आली. यामुळें स्वाभा-विकपणेंच सुशिक्षित ब्राह्मणांची दृष्टि नवीन अधिकारक्षेत्राकडे वळली. नवीन प्रकारच्या आकांक्षा आतां त्यांच्या दृष्टीसमोर उभ्या राहूं लागल्या. हा वर्ग बुद्धिमान् असल्यामुळें, अर्थातच यांच्या हातीं बरीचशी सत्ता केंद्रीभूत झाली होती; पण उदात्त अंतःकरणाचा व जनतेची स्थिति सुधारण्याची कांहीं मर्यादेंत कळकळ बाळगणारा साहेब अद्याप यांच्या डोकीवर होताच. खुल्या व्यवहाराच्या सदोष पद्धतींत शक्य असेल तितकी व्यक्तिशः ब्राह्मणेतरांना मदत करण्यास तो नेहमीं तयारच नव्हे, तर आतुर देखील असे. ब्रिटिश राज्यांत शक्य असलेल्या सर्व संधींचा पूर्ण उपभोग घेऊन, आतां ब्राह्मण वर्ग आपले हात पाय पसरण्यास आणखी जागा पाहूं लागला. त्याच्या महत्त्वाकांक्षेला अवसर मिळण्यासारखी दुसरी जागाच न राहिल्यामुळें, ब्रिटिश लोकांच्या हातांतील सत्तेकडे त्यांचें लक्ष अर्थातच वेधलें व उच्च अधिकाराच्या जागा पटकावण्यासाठीं राजकीय चळवळ त्यांनीं सुरू केली. परवां परवांपर्यंत, ह्मणजे ब्राह्मणेतर लोकमताचा बडगा

त्यांच्या पाठीवर बसेतोंपर्यंत, त्यांचें लक्ष जनतेच्या निरक्षरतेकडे व असहाय स्थितीकडे फारसें वळलें नाहीं. सिव्हिल सर्व्हिसमध्यें प्रवेश मिळण्याचा आपला मार्ग सोपा व्हावा, हाच यांच्या प्रारंभीच्या राजकीय चळवळीचा मुख्य उद्देश होता. फुल्यांच्या नेतृत्वाखालीं त्यांच्या मित्रांनीं **सत्यशोधक** नांवाची चळवळ सुरू केली. ब्राह्मणेतरांच्या आत्म्याला व बुद्धीला पछाडलेल्या ब्रह्मसमंधाला गाडून टाकणें, हा या चळवळीचा उघड हेतु होता. त्या वेळच्या जुन्या काळांत देखील, सामान्य जनतेंत शिक्षणविषयक जागृति करण्याचेहि त्यांनीं प्रयत्न केले. खुद्द जोतीरावांनीं स्त्रियांच्या व अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या वर्गांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ एक योजना अस्तित्वांत आणिली. राजा राममोहनरायप्रमाणें त्यांना कोणत्याहि प्रकारच्या जुलमाची व अन्यायाची पराकाष्टेची चीड येत असे; परंतु त्यांना हव्या असलेल्या काळाच्या थोडेंसें अगोदर ते महाराष्ट्रांत जन्मास आले व भावी ब्राह्मणेतर समाजसुधारकांच्या मार्गनिदर्शनासाठीं त्या काळच्या अज्ञानांधःकारांत आज दीपस्तंभ बनलेलें आपलें कार्य मागें ठेवून, १८९० सालीं स्वर्गवासी झाले. ब्राह्मणांमध्यें देखील लोकहितवादीसारखे फुल्यांच्या तोडीचे थोडे लोक या काळांत होऊन गेले. रा० ब० गोपाळराव देशमुख हे **लोकहितवादी** या टोपण नांवाखालीं जोतीबाबरोबरच ब्राह्मण्यावर प्रहार करीत असत; परंतु याविरुद्ध प्रतिगामी चळवळ लौकरच सुरू होऊन, त्या वेळेपासून आजतागायत तिचा जोर एकसारखा वाढतच चालला आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर नांवाच्या एका चित्पावन पदवीधरानें एकाच वेळीं ब्रिटिश राज्यपद्धतीवर व जोतीराव आणि गोपाळराव यांनीं सुरू केलेल्या सामाजिक व धार्मिक चळवळीवर हल्ले करून, प्रथम या प्रतिगामी चळवळीस सुरवात केली. पुढें याला सरकारी नोकरीचा राजीनामा द्यावा लागला. १८८० सालीं टिळकांनीं याचाच कित्ता वळवून, सुधारकांना विरोध करणें हें महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचें मुख्य ब्रीद करून सोडलें. त्यांच्याबरोबरच कांहीं काल रानडयांनीं व आगरकरांनीं प्रागतिक विचारांची मोहिम चालू ठेविली; परंतु हें कार्य तें ब्राह्मणी दृष्टीच्या स्वाभाविक मर्यादेंतच करीत असल्यामुळें, त्यांनीं हातीं घेतलेल्या कार्याला लौकरच ओहटी लागली. १८९० सालीं झालेल्या जोतीरावांच्या मृत्यूनंतर पुढें कित्येक वर्षे ब्राह्मणेतरांना योग्य पुढारी लाभला नाहीं. त्यामुळें सामाजिक समताप्रवर्तक चळवळीविरुद्ध टिळकांना विजय सहज संपादितां आला. सुशिक्षित ब्राह्मणांच्या महत्त्वाकांक्षेला, ब्राह्मणेतरांमध्यें स्वाभिमानी

नागरिकांच्या हक्काची जाणीव उत्पन्न करून देणारी ब्रिटिश सत्ता आड आल्यामुळें, ते आतां तिचा द्वेष करूं लागले. आपल्या हातीं असलेली सत्ता हा आपलाच ठेवा आहे, अशी ब्राह्मणांची समजूत झाली असल्यामुळें, ब्राह्मणेतर चळवळीच्या योगानें आपली ही ठेव हिरावली जाईल, या भीतीनें या चळवळीचाहि पुढें ते द्वेष करूं लागले.

या वेळेच्या महाराष्ट्रांतील लोकांचे त्यांच्या विचारसरणीवरून तीन वर्ग पाडतां येतील. रानडे-आगरकरपंथ हिंदी समाज-व्यवस्थेमध्यें समतेच्या पौरस्त्य कल्पनांचा संचार करूं पहात होता. ब्राह्मणेतर चळवळीच्या संपूर्ण सामर्थ्याची यथार्थ कल्पना होण्याइतकी या पंथाची दूरदृष्टि नव्हती, हाच काय तो यांत दोष होता, हें मागें दाखविलेंच आहे. १८९५ सालीं झालेल्या आगरकरांच्या मृत्यूमुळें, रानड्यांच्या स्वभावांतील आणखी एक दोष प्रामुख्यानें पुढें आला. रानडे खरोखरच विद्वत्तेनें जाडे होते, तरी सुधारकाला अवश्य असलेला स्वार्थत्याग त्यांच्यांत फार कमी होता. या बाबतींत आगरकर हे टिळकांच्याच तोडीचे होते; व त्यांनीं टिळकांच्या प्रतिगामी धोरणाची लाट यशस्वी रीतीनें थोंपवून धरली होती. आगरकरांच्या मृत्यूनंतर रानड्यांच्या पक्षामध्यें आगरकरांच्या सामर्थ्याचा किंचित् अंशाइतकादेखील जोम राहिला नाहीं. रानड्यांनीं मराठ्यांच्या डेक्कन असोसिएशनद्वारें मराठ्यांच्या शिक्षणाला उत्तेजन दिलें; परंतु तेथें देखील त्यांच्या मनाची अंतःस्थ दुर्बलता दिसून आली. त्या वेळीं महाराजांचे चिटणीस या नात्यानें काम करीत असलेले, हल्लींचे रावबहादूर सर रघुनाथराव सबनीस यांची व रानड्यांची धुळें येथें, दोघेहि नोकरींत असतांना, ओळख झाली होती. पुढें हल्लींचे नामदार जाधवराव यांची कोल्हापूरमध्यें नेमणूक झाली. रावबहादूर सर सबनीस व न्या० रानडे यांची या नेमणुकीनंतर लवकरच गांठ पडली, तेव्हां यांना जाधवरावांच्या हातून खरोखरच चांगलें काम होत आहे काय? असा रानड्यांनीं प्रश्न केला. यावर सबनीस ह्मणाले, ते पहिल्या प्रतीचे पदवीधर असल्यामुळें, त्यांच्या हातून चांगलें काम व्हावयाला कोणती हरकत आहे? यावर रानडे पुनः ह्मणाले, 'तें खरें आहे; परंतु तुमच्या आमच्यासारखें ते काम करितात काय?' मि० रानडे जरी थोर होते, तरी ब्राह्मणांच्या खांद्यास खांदा भिडवून काम करण्याच्या ब्राह्मणेतरांच्या पात्रतेची त्यांना पूर्णपणें जाणीव नव्हती, हें यावरून सिद्ध होतें. जोतीराव फुले यांचा सत्यशोधक-समाज हा महाराष्ट्रांतील दुसरा पंथ होता. रानडे पंथाचीं तत्त्वें

महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतरांच्या सामाजिक परिस्थितीला प्रत्यक्ष ताडून पाहिलीं, तर फुल्यांचा पंथ हा खरोखरच रानडे पंथ होता; परंतु या देशाच्या दुर्दैवामुळें या दोहोंपैकीं कोणीहि तिसऱ्या टिळक पंथाचा पाडाव करूं शकला नाहीं. हिंदुस्थानांत राज्य करणाऱ्या परक्या लोकांवर केलेले टिळकांचे निकराचे हल्ले, या देशांतील प्राचीन परंपरेविषयीं त्यांचा आदर, ज्या वर्गाच्या मदतीची त्यांना अपेक्षा होती, त्या वर्गाच्या समजुती यत्किंचितहि दुखवल्या न जातील, अशा प्रकारच्या मार्गांचाच अवलंब करण्यांत त्यांनीं दाखविलेली धूर्तता, इत्यादि गोष्टीं-मुळें त्यांची एकसारखी चलती होऊन, रानडे व फुले या दोघांचेंहि राष्ट्रकार्य त्यांच्यापुढें फिकें पडलें. १८९५ सालीं त्यांनीं शिवाजी-चळवळ सुरू केली. रायगड येथील या राष्ट्रवीराच्या समाधीचा जीर्णोद्धार करणें, हा या चळवळीचा वर दिसणारा हेतु होता. या समाधीची शोचनीय स्थिति एका इंग्लिश गृहस्थानेंच प्रथम लोकांच्या निदर्शनास आणिली. ही चळवळ आपल्या हातीं घेण्याचा रानडयांनीं प्रयत्न केला; परंतु लौकरच त्यांनीं ती टिळकासारख्या चलाख गारुडयाच्या हातीं जाऊं दिली. टिळकांच्या नेतृत्वाखालीं या चळवळीला राजकीय स्वरूप प्राप्त न होणें, अशक्य होतें.

टिळकांच्या नेतृत्वाखालील शिवाजी चळवळ व ब्रिटिश लोकांच्या हिंदु-स्थानाला घडलेल्या संबंधाबद्दलची तिरस्कार बुद्धि, या दोन गोष्टींचा परस्परांशीं संबंध कशा प्रकारचा होता, हें आतांपर्यंत दिलेल्या हकीगतीवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. या मराठा-वीराविषयींच्या, जनतेच्या मनांतील पूज्य भावनेचा, सामाजिक बाबतींत प्रतिगामी व राजकीय बाबतींत ब्रिटिश लोकांच्या विरुद्ध मोहिम चालविण्याकडे दुरुपयोग करणाऱ्या टिळककंपूच्या शिवाजी चळवळी विषयीं, ब्राह्मणेतरांच्या उदयोन्मुख पुढाऱ्यांचें व त्यांतील प्रमुख कोल्हापूरच्या छत्रपतिमहाराजांचें धोरण कशा प्रकारचें असणें शक्य होतें, हें या विवेचनावरून उघडच होतें. कोल्हापुरांतील सगळेच ब्राह्मण टिळकपंथाचे अनुयायी झाले होते. महाराजांच्या छत्राखालील मराठे सरदारांच्या क्षत्रियत्वाला पराकाष्टेचा विरोध करून, आपण टिळकांचे कट्टे अनुयायी आहोंत, हें त्यांनीं जगाच्या निदर्शनास आणिलें होतें. ब्रिटिश अधिकाऱ्यांचा सहानुभूतीचा ओघ आपल्या बाजूला वळवून, त्याचा उपयोग महाराजांच्या विरुद्ध करण्याचा त्यांचा प्रयत्न निष्फळ झाल्यामुळें, महाराष्ट्रांतील इतर भागांत दृष्टोत्पत्तीस न येणारें असें, कोल्हापुरांतील ब्राह्मणांच्या

असंतोषाला एक प्रकारचें विशेष भरतें आलें होतें. महाराजांच्या ब्राह्मणेतर धोरणामुळें, ब्राह्मणांची सत्ता नष्ट झाली. त्यामुळें तर ब्राह्मण व महाराज यांच्यामधील दुजा भाव एकसारखा वाढतच गेला. अशा प्रकारें गोष्टी घडत असतां, शिवाजी आपल्या मुसलमान व हिंदु प्रतिस्पर्ध्यांशीं झगडत असतांना त्यानें जे वाम मार्ग स्वीकारिले, असें ह्मणतात, त्यावरून टिळकांनीं अप्रत्यक्षपणें जे सिद्धांत आपल्या अनुयायांना शिकविले होते, त्यांचें तरुण ब्राह्मण मनन करूं लागले, यांत आश्चर्य कसलें ?

वास्तविक पाहिलें असतां शिवाजी–क्लबाची स्थापना १८९३ सालांत झाली; परंतु १८९७ सालीं या क्लबाच्या कांहीं सभासदांच्या ताब्यांत बिगर परवानगीचीं कांहीं शस्त्रें असल्याचें जेव्हां उघडकीस आलें, तेव्हां लोकांचें लक्ष, या क्लबाकडे प्रथम वेधलें. हा तपास लागला तेव्हां, महाराज चिंतातुर झाले; कारण या लहानशा ढगांतून पुढें एखादी मुसळधार सुरू होण्याची भीति त्यांना त्या वेळींहि वाटण्यास कारणें होतीं; परंतु मुंबई सरकार या गोष्टीला कोणत्याहि प्रकारचें महत्व देणार नाहीं, असें पुढें महाराजांना कळविण्यांत आलें. १८९८ सालीं या क्लबाच्या सभासदांची संख्या ३०० पर्यंत गेली. याचें कारण या वर्षाच्या मागील सालीं शिवाजी-चळवळीमुळें टिळकांना कारागृहवास प्राप्त झाला हें असावें. या वर्षीं या क्लबाच्या एक दोन सभासदांनीं बीड व औरंगाबाद येथील एक तत्सदृश संस्था पाहिली. कोल्हापूरच्या शाखेनें तेथील समाइक फंडाला १,००० रुपयांची मदत केली. सशस्त्र बंडाची एक लहानशी ठिणगीहि उडाली, असें ह्मणतात; परंतु ती ताबडतोब विझविण्यांत आली; व या बंडाच्या मुख्य प्रवर्तकानें खोटें नांव धारण करून गोवा हद्दीकडे पलायन केलें !

१९०० सालांत कोल्हापुरामध्यें प्लेगाचा प्रादुर्भाव होऊन, शहर खालीं झाल्यामुळें, शिवाजी-क्लबाच्या तरुण सभासदांना मिळालेल्या शिकवणूकीचा उपयोग करण्याची नामी संधि प्राप्त झाली. जुलमी ब्रिटिश लोकांविरुद्ध इच्छित युद्ध पुकारण्यासाठीं त्यांना द्रव्याची जरूरी नव्हती काय ? अर्थातच घरें फोडून चोऱ्या करण्यांत येऊं लागल्या. चौकशी अंतीं कित्येक तरुणांचीं या गुन्ह्यांत नांवें उघडकीस आलीं. यांत महाराजांचे माजी असिस्टंट सर्जन मि० आपटे यांच्या मुलाचेंहि नांव निघालें. महाराजांनीं अद्याप ब्राह्मणांविरुद्ध

युद्ध पुकारिलें नव्हतें; ह्मणून कोल्हापुराला कोणत्याहि प्रकारें त्रास देण्याची या तरुण देशभक्तांची इच्छा नव्हती; परंतु शिवाजीक्लबाच्या नांवावर ज्या चोऱ्या झाल्या त्या महाराज, त्यांचे बंधु बापूसाहेब व कोल्हापुरांतील इतर कांहीं जहागिरदार यांच्या चिथावणीवरून त्या घडल्या, असें कोणीं ब्रिटिश सरकारच्या मनांत भरवून दिलें; व या मनुष्याच्या ह्मणण्याला थोडेंसें महत्वहि पण मिळालें! विषप्रकरणाचे कृष्णढग जेव्हां नाहींसे झाले, तेव्हां याहि संशयाचें निरसन झालें. कर्नल रे यांच्यामागून मि० ए० एम्० टी० जॅक्सन हे त्यांच्या जागीं आले. १९०० सालच्या मेच्या २१ तारखेस ते महाराजांना कळवितात:—

" मीं मि० मॉरिसनची गांठ घेतली व त्यांना पाठवावयाच्या पत्राचा एक मसुदा या सोबत ठेविला आहे. हा मसुदा पाहून झाल्यावर कृपा करून तो परत करा. तुमच्या बंधूंच्या अगर त्या जहागिरदारांच्या राजनिष्ठेविषयीं मला किंवा सरकारला कधींच शंका आली नाहीं,' हें आश्वासनपूर्वक मीं आपणांस सांगावयास पाहिजे, असें नाहीं. या रिपोर्टांतील हकीकतीवर सरकारचा कोणत्याहि प्रकारचा भरंवसा आहे, अगर त्याला त्यांतील हकीकतीच्या सत्यतेविषयीं चौकशी करण्याची जरूरी वाटत आहे, असें मि० मॉरिसन यांना वाटत नाहीं. कांहीं कनिष्ट अधिकाऱ्यांनीं अगर त्यांच्या नातलगांनीं या क्लबामध्यें प्रत्यक्ष भाग घेतला होता. या अनुभवास आलेल्या गोष्टीवरून माझ्या मसुद्यांत नमूद असलेला असा एक वट हुकूम काढण्यास ( आपण तयार आहां ) असें जर आपण लिहून कळवाल तर तें सरकारला पुरेंसें वाटेल. माझ्या मसुद्यामुळें, हा रिपोर्ट सरकारच्या दप्तरीं जरी राहिला, तरी कोणत्याहि प्रकारचा गैरसमज उद्भवणार नाहीं असें मला वाटतें. या प्रकरणाचा आतां कायमचा निकाल लागला असें आपण समजा."

यानंतर दोन दिवसांनीं पुण्यांतील आणखी एक अधिकारी लिहितात:—

" शिवाजी-क्लबाचे सभासद समजले जाणाऱ्या लोकांच्या नांवांची यादी मि० मॉरिसन यांच्याकडून मला मिळाली आहे, तींत बापूसाहेबांचें नांव मला आढळत नाहीं. "

या बाबतींत बापूसाहेबांचें नांव कोणीं कसें काढिलें याचें कोणालाहि आश्चर्य वाटण्यासारखें आहे; परंतु अशी स्थिति होती खरी; व त्यांचें नांव

यादींत जेव्हां आढळून आलें नाहीं, तेव्हां महाराजांना आपल्या मनावरचें ओझें कमी झालें असें वाटलें, यांत शंका नाहीं. १९०० सालच्या मे महिन्याच्या २९ तारखेस मि० जॅक्सनकडून पुढील पत्रव्यवहार होऊन या प्रकरणाचा कायमचा निकाल लागला:—

" शिवाजी क्लबाविषयीं मसुदावजा पत्र महाबळेश्वर येथें जें मीं आपल्यांस दाखविलें, त्याला उत्तर ह्मणून, या क्लबाशीं संबंध न ठेवण्याबद्दल संस्थानच्या अधिकारी लोकांना व त्यांच्या निकटच्या नातलगांना महाराज जो मनाई हुकूम सोडणार आहेत, तेवढयानें सर्व कांहीं भागेल, असें सरकारला वाटत आहे; ह्मणून मि० मॉरिसन मला कळवितात. "

या क्लबाचा सर्वांत प्रमुख असा सभासद दामू जोशी हा होता. आपणावर कोणत्याहि प्रकारचा वहीम येऊं नये, ह्मणून त्यानें कोल्हापूर सोडलें, व कोल्हापूरच्या बाहेरील कांहीं राजद्रोही लोकांच्या सल्ल्यानें लॉर्ड कर्झनसाहेबांचा खून करण्याच्या हेतूनें १९०२ सालीं ते प्रवास करीत असतांना त्यानें त्यांचा पाठलाग केला; परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं असें ह्मणतात. सर्व देशभर नेपाळ संस्थानच्या कांहीं खेडयांत देखील प्रवास करून व चोऱ्या करून, द्रव्य गोळा करण्याच्या मार्गाविषयीं व गोरा शत्रु ठार करण्यासाठीं शस्त्रें गोळा करण्याचें काम कितपत यशस्वी होईल, याविषयीं राजद्रोही प्रवृत्तीच्या कित्येक सुप्रसिद्ध व्यक्तींशीं चर्चा करून, दामू परत कोल्हापुराला आला; व आपल्या मित्रांपैकीं एकाला जपानला पाठविण्याचा त्यानें बेत केला. यासाठीं या क्लबाच्या सभासदांनीं १९०५ सालीं, कोल्हापुरांत आणखी कांहीं चोऱ्या केल्या. पोलिसांनीं या लोकांना पकडल्यावर दामूला व त्याच्या आणखी तीन साथीदारांना चोरीच्या आरोपावरून तुरुंगवास प्राप्त झाला. तुरुंगांतून सुटल्यावर १९०६ सालीं कित्येक हजार रुपये किंमतीची आणखी एक चोरी झाली. या गुन्ह्याबद्दल या क्लबाच्या दोन सभासदांना शिक्षा ठोठावण्यांत आल्या. दामूला सहा महिन्यांची कैद झाली. कैदेतून मुक्त होतांच दामूनें पुनः ठिकठिकाणीं भटकण्यास सुरवात केली, व कांहीं शस्त्रें गोळा केलीं. विशेष महत्त्वाची गोष्ट झटली ह्मणजे पुण्यांतील आपल्या कांहीं साथीदारांकडून बॉंब कसा करावा याची माहितीहि त्यानें या वेळीं पैदा केली. १९०७ सालीं सर्व वर्षभर या गोष्टी करण्यांत दामू चूर होता.

कोल्हापुरांतील ब्राह्मणांचा कित्येक गोष्टींत पूर्ण पराभव झाल्यामुळें, ते आतां किंकर्तव्यमूढ झाले होते. प्रतिनिर्धिसभारूपी अस्त्र निःसत्व ठरल्यावर लागलींच कोल्हापूरच्या दरबारानें १९०७ सालच्या जून महिन्यांत राजकीय सभेविषयीं मनाई हुकूम सोडले. त्यामुळें जिल्हा मॅजिस्ट्रेटची अगोदर परवानगी मिळविल्याखेरीज सार्वजनिक स्वरूपाच्या सभा भरविण्यास मनाई झाली. सुशिक्षित ब्राह्मणेतरांनीं जुलै महिन्यांत कोल्हापुरांतील सुंदर अशा नेटिव्ह जनरल लायब्ररीच्या नियामक मंडळांत प्रवेश करण्याचा प्रयत्न सुरू केला. या ग्रंथसंग्रहा-लयाच्या नियामक मंडळांत योग्य प्रमाणांत आपणांस प्रवेश मिळावा, अशी ब्राह्मणेतरांची मागणी सुरू झाली; परंतु त्यांचे प्रतिस्पर्धी ब्राह्मण आपल्या सभास-दांच्या संख्येच्या जोरावर नियामक मंडळांतील सर्व जागा स्वतःच बळका-वण्याच्या उद्योगास लागले. यामुळें हा तंटा बरेच दिवस लांबून, अखेर त्याचें पर्यवसान पुंडाईत झालें. महाराष्ट्रांतील जहालपक्षाचे एक पुढारी मि० मोडक यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली सभा जिल्हा मॅजिस्ट्रेटच्या हुकूमानें उधळून लावणें भाग पडलें. अशा प्रकारें चोहोंकडून एकसारखा मार बसत गेल्यामुळें, वैतागून दामू जोशी व पंडित नांवाचा एक मनुष्य मोडककडे गेले. त्यांच्या व के. डी. कुल-कर्णी नांवाच्या आणखी एका जहाल ब्राह्मणाच्या सल्लयानें कर्नल फेरीस साहे-बांचा खून करण्याचा त्यांनीं कट केला. श्रीअक्कासाहेब महाराजांच्या विवाहाच्या प्रसंगींच हा खून करण्याचा बेत होता; परंतु १९०८ सालच्या एप्रील महिन्याच्या १६ व्या तारखेस धांवत्या गाडींत कर्नलसाहेबांवर हल्ला करणें दामूला अधिक सोईचें वाटलें. गोळी घालण्याचा त्यानें प्रयत्नहि केला; परंतु रिव्हालवरचा पहिला बार फुकट गेला. व अशा प्रकारें दामूला कोल्हापुरास विन्मुख परत यावें लागलें.

येथें श्री० विजापूरकरांच्या समर्थ विद्यालय नांवच्या राष्ट्रीय शाळेचा उल्लेख केल्याखेरीज, कोल्हापुरांतील चळवळीच्या इतिहासाची पूर्तता होणार नाहीं. १७ व्या शतकांतील ब्राह्मण इतिहासकारांच्या समजुतीप्रमाणें राज्यक्रांतीचे आद्य प्रवर्तक श्रीरामदास हेच असून, शिवाजीमहाराजांच्या कर्तबगारीचें मुख्य श्रेय या ब्राह्मण संतालाच दिलें पाहिजे. या गतकालीन समर्थानें आपल्या चरणीं (!) लागलेल्या शिवाजीमध्यें ज्या प्रकारचें आध्यात्मिक सामर्थ्य अगर ज्या प्रकारची प्रेरणा निर्माण केली होती, तत्सदृश प्रेरणेशिवाय, विसाव्या शतकांतील हिंदुस्थानच्या

स्वातंत्र्याच्या झगड्यांत, या राष्ट्रवीराच्या वीर्याचें मूर्तिमंत स्वरूप ह्मणून समजल्या जाणाऱ्या या शिवाजी चळवळीचें तरी कसें चालणार ? न कळत का होईना, श्री० विजापूरकर हे अशा प्रकारें कोल्हापुराचे आधुनिक समर्थ बनून, शिवाजीक्लबानें प्रारंभ केलेल्या कार्याची त्यांनीं सांगता केली. हें साम्य येथेंच थांबत नाहीं. १७ व्या शतकांत ज्याप्रमाणें शिवाजीचा विजय पूर्ण होईतोंपर्यंत, समर्थ व शिवाजी यांच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचा संबंध घडून आल्याचें इतिहास सांगूं शकत नाहीं, तद्वतच या बाबतींत देखील "वेद मंत्रांचें सामर्थ्य" या मथळयाखालीं निबंध लिहिलेलें एक मासिक, श्री० विजापूरकर व जोशी यांच्या संपादकत्वाखालीं १९०८ सालच्या जून महिन्यांत जनतेपुढें येईतोंपर्यंत, या आधुनिक समर्थ-शिवाजींमध्यें कोणत्याहि प्रकारचा प्रत्यक्ष संबंध असल्या-बद्दलचा पुरावा नाहीं. या विद्यालयांत फारसे विद्यार्थी नव्हते व या शाळेच्या योगानें कोल्हापूरच्या अगर महाराष्ट्राच्या—पुढें ही संस्था लौकरच तळेगांवाला नेण्यांत आली—— शिक्षणांत कोणत्याहि प्रकारची महत्वाची भर पडली नाहीं; परंतु या चळवळीचीं सूत्रें ज्यांच्या हातीं होतीं, त्यांच्या अंगांत कोणत्या प्रकारचें वारें खेळत होतें, याची यावरून चांगलीच साक्ष पटते. उत्साही तरुणांच्या श्रद्धाळू मनांवर आपल्या शिकवणीचा इष्ट परिणाम घडून येईल, अशी यांना मोठी उमेद वाटत होती. या राष्ट्रीय शिक्षण—विषयक चळवळीचें स्वरूप अगर तिची आवश्यकता सर फिरोजशहा मेथा यांना मान्य नव्हती, असें ह्मणतात. आपल्या देशाची परिस्थिति लक्षांत घेतां, आमच्या शाळा व विश्वविद्यालयांमध्यें सध्यां मिळत असलेलें शिक्षण राष्ट्रीय स्वरूपाचेंच आहे, या दृष्टीनें पाहिलें असतां, त्यांचें ह्मणणें वास्तविक होतें. या संघटित पद्धतीमुळेंच राष्ट्रीयत्वाचा व अखिल भारतीय स्वदेश भक्तीचा आह्मांस ओनामा मिळाला. या पद्धतीमुळेंच राष्ट्रीय ऐक्याच्या आवश्यकतेचें महत्व आह्मांस पटूं लागलें. हिंदी लोकांच्या अंत:करणांत लोकशाहीबद्दलची प्रीति व व्यक्तिविषयक, त्याच-प्रमाणें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या कल्पना रुजण्यास हीच पद्धत कारणीभूत झाली. अशा प्रकारचे सुपरिणाम घडवून आणणाऱ्या या पद्धतीपेक्षां, उच्चतर राष्ट्रीय अशी दुसरी कोणती पद्धत असूं शकणार ? मातृभाषेंतून शिक्षण देणें, हा जर त्यांचा उद्देश असता, तर या कल्पनेला पोषक असें पुष्कळ लिहितां येण्यासारखें होतें, यांत शंका नाहीं. देशी भाषेंतून शिक्षण देण्याची पद्धत

राष्ट्रविरोधी नसली तरी, फार तर तिला दुय्यम राष्ट्रीय अगर प्रांतिक स्वरुपाची समजतां येईल. हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांत अगर प्रांतांतील एकादा भाग आपल्या दुय्यम राष्ट्रीय देशी भाषेचा हट्ट धरूं लागला, तर त्यामुळें प्रांतिक अगर जातिविषयक आकुंचित भावनांना उत्तेजन मात्र येऊन, सर्व हिंदुस्थानभर सामान्य शैक्षणिक भाषा रूढ झाल्यापासून, ज्या ऐक्य-संवर्धक गोष्टी घडून येत आहेत, त्यांना मात्र मुकावें लागेल. बर्क व मिल्ल या ग्रंथकारांच्या अमर ग्रंथांत ग्रथित झालेल्या स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या पाश्चात्य कल्पनारूपी रत्नांना अशा पद्धतीमुळें, आमच्या तरुण पिढीला मुकावें लागल्याखेरीज राहाणार नाहीं, हें त्याहिपेक्षां अनिष्ट होय. हिंदुस्थानांतील शिक्षण राष्ट्रीय करण्यासाठीं आम्हीं खरा प्रयत्न करावयाचा म्हणजे, आजदेखील अज्ञानांत खितपत पडलेल्या हिंदी समाजाच्या विस्तीर्ण व अभेद्य अशा भागांत याचा प्रवेश करून देणें, हा होय. शिक्षण पद्धतींत वरचेवर सुधारणा या घडून यावयाच्याच व सर्व देशभर रूढ असलेल्या इंग्रजी भाषेबरोबरच आमच्या मातृभाषांचा, शिक्षणाचें साधन म्हणून, अधिकाधिक उपयोग केला जाईल, हें निश्चित आहे. सामान्य जनतेंत शिक्षणाचा प्रसार करून तें राष्ट्रीय करणें, ही आमच्या काळांतील अत्यंत जरुरीची गोष्ट आहे. या बाबतींत महाराष्ट्रासंबंधानें सांगावयाचें म्हणजे, राष्ट्रीय शिक्षण याचा अर्थ ब्राह्मणेतरांमध्यें शिक्षणाचा प्रसार करणें, असाच समजणें आज अधिक जरूरीचें आहे. आमचे चरित्रनायक व मागसलेल्या जाती तर हीच गोष्ट साध्य करण्यासाठीं झटत होते.

तर मग कोल्हापुरांतील मि० विजापूरकर व बंगाल आणि महाराष्ट्रांतील पुष्कळ इतर लोक, जे या प्रीत्यर्थ तेव्हां व आतांहि चळवळ करीत आहेत, त्यांच्या भाषा शास्त्रांत "राष्ट्रीय शिक्षण" या शब्दद्वयाचा अर्थ तरी काय होता? अपक्व विचारांच्या तरुणांना सहजप्रिय अशा शिक्षणबाह्य प्रवृत्तींना सरकारानें घातलेलें निर्बंध, शिक्षण राष्ट्रीय करण्याचें निमित्त करून, काढून टाकावयाचे, हा या चळवळीचा मुख्य हेतु होता. कोल्हापुरांत समर्थ विद्यालय जन्म पावल्यापासून, महाराज अशा परिणामाविरुद्ध जी एकसारखी तक्रार करीत होते, ती यामुळेंच होती.

याच सुमारास बंगालमध्यें बाँबचा पहिला अत्याचार घडून येऊन, हें भेसजक शस्त्र हिंदुस्थानाच्या हातीं आलें, ही गोष्ट जगप्रसिद्ध झाली. जूनच्या

२७ तारखेस कोल्हापूर शहर ते रेल्वे स्टेशनला जाणाऱ्या रस्त्यावर एका छोट्याशा बाँबचा पहिला स्फोट झाला. या दिवशीं सकाळीं महाराज कोल्हापुराला येऊन, ज्या रस्त्यावर हा स्फोट झाला, त्याच रस्त्यावरून जाणार होते; म्हणून हा बाँब महाराजांकरितांच तेथें ठेविला होता, अशी लोकांची समजूत झाली. हा स्फोट झाल्या-नंतर, थोड्याशा उशीरानें पुण्याहून येणाऱ्या गाडीनें महाराज कोल्हापुरांत दाखल झाले. त्यामुळें या स्फोटानें त्या रस्त्यावरून जाणाऱ्या एका भाडोत्री टांग्यालाच मात्र इजा झाली. यानंतर एका पंधरवड्यानेंच शहरांतील प्रमुख भागांना बाँब कसे तयार करावेत, याची माहिती देणाऱ्या जाहिराती चिकटविण्यांत आल्या व आणखी एका आठवड्यानें एका खासगी शाळेंतून कांहीं घातुक रसायन द्रव्यें चोरीस गेल्याचें आढळून आलें. या उद्भवणाऱ्या वादळाचा सुगावा महाराजांना एक वर्ष अगोदर लागला होता, असें दिसतें. १९०६ सालांत ज्या चोऱ्या झाल्या त्यावरून शिवाजी-क्लबाचा आश्रय करून राहाणाऱ्या टोळीची महाराजांना कांहींशी माहिती मिळाली होती. १९०६ सालाच्या आगष्ट महिन्यांत महाराज लिहितातः—

"ब्राह्मणांच्या मुलांनीं केलेल्या चोऱ्यांचा मी तपास लावीत आहें. तपासावरून त्यांनीं कांहीं शस्त्रें गोळा केलीं आहेत, असें आह्मांस समजतें; परंतु ती पकडणें मुष्किलीचें झालें आहे. मुख्य गुन्हेगार ब्राह्मण असून, त्यांचा पुणें येथील टिळकपक्षाशीं संबंध आहे. टिळक मध्यभागीं असून, त्यांचे सहाय्यक दोन्ही बाजूस बसले आहेत, असा आह्मांस एक फोटो मिळाला आहे. चोरींत सामील असलेले तीन गुन्हेगार यांत आहेत."

यानंतर थोड्या दिवसांनीं नरसोबावाडी येथील जत्रेंत घडलेल्या एका गोष्टी-वरून या वाढत्या वादळाचें आणखी एक चिन्ह महाराजांना दिसून आलें. याच सालच्या आक्टोबरच्या १८ व्या तारखेस ते ह्मणतातः—

"माझ्या संस्थानांतील नरसोबाची वाडी नांवाच्या ठिकाणीं एक वार्षिक यात्रा भरत असते. पूजाऱ्यां व जेवणखाण करण्याकरितां पुष्कळ ब्राह्मण व इतर लोक तेथें जमत असतात. विजापूरकर, राशिंगकर व बेळगांवचे देशपांडे आणि त्यांच्या पक्षाचे लोक या धार्मिक जत्रेचा फायदा घेऊन, अराजक भाषणें करणार होते. त्यांना विरोध करण्याचा माझ्या अधिकारी लोकांनीं प्रयत्न केला. आपणांस हरकत करण्याचा त्यांना कायदेशीर हक्क नसून, परदेशी साखरेंत डुकराच्या हाडांरक्ताचा अंश आहे असें सांगून, आह्मी धार्मिक विषयावर बोलणार आहोंत, असें ते ह्मणाले.

यालाहि मान्या अधिकाऱ्यांनीं हरकत घेतली; परंतु त्यांना न जुमानतां त्यांनीं आपलीं भाषणें केलीं. पुण्याच्या खालोखाल हा ( कोल्हापूर ) आपला एक अड्डा आहे, अशी त्यांची समजूत असल्यामुळें, त्यांना अशा प्रकारचें वर्तन करण्याचें धैर्य झालें. मन मोकळें करून सांगावयाचें ह्मणजे, येथील ( कोल्हापुरांतील ) व त्याचप्रमाणें ब्रिटिश इलाख्यांतील, उदाहरणार्थ—नाशीक, बेळगाव व पुणें या ठिकाणच्या ब्राह्मणांच्या अशा प्रकारच्या वर्तनाचें पर्यवसान भयंकर अत्याचारांत होईल अशी मला मोठी भीति वाटते. ''

१९०६ सालांत झालेल्या चोऱ्यांचा सुगावा लावण्यासाठीं महाराजांनीं शक्य तितके प्रयत्न केले. हे गुन्हेगार ज्या वर्गांतील होते, त्या वर्गाचें वर्तन इतकें भयप्रद होत चाललें होतें कीं, त्याचा तपास लावण्याचें काम भयंकर जोखमीचें आहे, अशी या वर्षी महाराजांच्या एका नांवाजलेल्या पोलिस अधिकाऱ्यानें तक्रार केली. १९०२ सालीं लॉर्ड कर्झनसाहेबांचा पाठलाग केलेल्या मनुष्यासंबंधीं जी माहिती महाराजांनीं मिळविली होती, तिचा विचार करण्यासाठीं पोलिटिकल एजंटनीं आपल्या यूरोपीयन मदतनीसांना सांगावें, ह्मणून महाराजांनीं पोलिटिकल एजंटना विचारिलें. ह्मणजे या माहितीवरून जरी कोणतीहि गोष्ट कायदेशीर रीतीनें सिद्ध करतां येत नव्हती, तरी या रिपोर्टाच्या सत्यतेविषयीं मनास खात्री पटून, सरकारला सावधगिरीनें वागतां येईल, अशी महाराजांची समजूत होती. ही गोष्ट १९०७ सालच्या दुसऱ्या सहामाहींत घडली. ही माहिती सिमला येथील सर लुइसडेन यांच्या कानांवरहि त्यांनीं घातली; परंतु ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं या गोष्टीकडे विशेष लक्ष पुरविल्याचें दिसत नाहीं. केवळ संशयामुळें आपल्या मनाची शांति ढळूं द्यावयाची नाहीं, असा त्यांचा कदाचित् निश्चय असावा. एका वर्षानंतर, १९०८ सालच्या मे महिन्यांत, जर्मनी, फ्रान्स व जपान देशांत जाऊन, बॉंब करण्याची माहिती मिळवून आणलेल्या लोकांच्या मदतीनें हिंदुस्थानांत बॉंब सुरू करणाऱ्यांच्या कटांची अधिक माहिती महाराजांना मिळाली. कोल्हापुराप्रमाणेंच बेळगांव, पुणें, सातारा व नाशीक येथेंहि बॉंब तयार करण्याचें ज्ञान राजद्रोही लोकांना झालें होतें, अशीहि समजूत होती. बंगालमध्यें पहिला बॉंब उडण्यापूर्वीच ही माहिती मिळाली असल्यामुळें, तिचें महत्त्व बरेंच होतें. तरी देखील अधिकाऱ्यांचा आशावादीपणा यत्किंचितहि ढळला नाहीं. कर्नल फेरीससाहेब ह्मणतात:—

"त्यांची ( माहिती देणाऱ्यांची ) अटकळ थोडीशी अनाठायीं होती, असें त्या वेळीं मला वाटलें;" परंतु पुढें थोड्या दिवसांनींच ती "अनाठायीं नव्हती," असें त्यांनाच कबूल करावें लागलें. राजकीय गोष्टींचा तपास करण्याचें काम खुद्द आपल्या नजरेखालीं घेणें महाराजांना भाग पडलें; व कोल्हा-पुराबाहेर देखील पुढें घडणाऱ्या गोष्टींची अगोदरच अचूक अटकळ बांधण्याचें सर्व श्रेय त्यांनाच प्राप्त झालें. स्टेशन रस्त्यावरील स्फोटाचा मुख्य उद्देश जरी निष्फळ झाला, तरी त्यामुळें मोठा आणीबाणीचा प्रसंग ओढवला. दोन प्रका-रचे कज्जे आतां शिजून तयार झाले. पिनलकोडच्या ३०२, ११५ व १२४ अ कलमांप्रमाणें मि० विजापूरकर, मि० जोशी व एक मुद्रक यांच्यावर एक कज्जा स्पेशल सेशन्स जज्ज मि० किंकेड यांच्यासमोर प्रथम मांडण्यांत आला. कोल्हापुरांतील दोन न्यायाधीश मि० पंडित व मि० गोखले हे आपल्या मित्रांची चौकशी करण्यास तयार नसल्यामुळें, मि० किंकेडना कांहीं काळपर्यंत ब्रिटिश सरकारकडून मागवून आणणें भाग पडलें होतें. कोल्हापूरचें पिनलकोड कलम १२४ अ यांत ब्रिटिश सरकाराविरुद्ध राजद्रोहाचा समावेश होत नसल्यामुळें, या कज्जांत एक कायदेशीर अडचण उपस्थित झाली. १२४ अ कलमाप्रमाणें घडलेल्या गुन्ह्याला गुन्हेगारांच्या देवघेवीचे (Extradition चे) नियम लागू पडत नसल्यामुळें, आणखी एक अडचण उपस्थित झाली. पुढें आरोपी आपण होऊन कोल्हापुरांत दाखल झाल्यामुळें, एक्सट्रॅडिशनचा प्रश्न आपोआपच सुटला. जगाला पारतंत्र्यांत टाकणाऱ्या लोकांना जो छत्रपति हांकून लावीत नाहीं, त्याचें छत्रपतित्व तरी कसलें ? अशा अर्थाचा या आरोपित लेखांत उल्लेख असल्यामुळें दुसरी अडचणहि नाहींशी झाली. छत्रपति ही पदवी अयोध्येच्या प्राचीन नृपतींना होती, असें सिद्ध करण्याचा आरोपीतर्फे पुरावा करण्यांत आला; परंतु ज्या लेखासंबंधानें हा खटला उभारण्यांत आला, तो लेख कांहीं प्राचीन काळीं लिहिलेला नव्हता; व अयोध्येसहि तो प्रसिद्ध झाला नव्हता. कोल्हापुरांत या वेळीं प्रसिद्ध झालेल्या या लेखांत छत्रपतींच्या क्षत्रियत्वावर जो हल्ला करण्यांत आला, त्यावरून या लेखाचा कटाक्ष कोल्हापूरच्या महाराजांवरच होता, अशी सामान्य मराठी वाचकांची देखील कल्पना झाल्याखेरीज राहिली नसती. प्रथम या लेखांत शत्रूंवर सूड उगविणाऱ्या प्रवृत्तीचा निषेध करणाऱ्या प्रागतिकांचा उल्लेख करून, पुढें शत्रूंसंबंधीं वैदिक शाप उध्दृत केले होते. राष्ट्राच्या शत्रूंशीं

कोणत्या तऱ्हेनें वागावें, हें वर्णन करणाऱ्या वैदिक व पौराणिक ग्रंथांत ध्वनित झालेल्या उपदेशाप्रमाणें वागण्यास लोकांना सांगून, हा लेख पुरा करण्यांत आला होता. जे शब्द उद्धृत करण्यांत आले होते, ते, प्रदेश जिंकून आपल्या जातीचें वर्चस्व स्थापण्यासाठीं झगडणाऱ्या वेदकालीन आर्यांना अनुलक्षून लिहिले होते. आपल्या राष्ट्राच्या शत्रूंविरुद्ध या लेखाच्या वाचकांनीं याच प्रकारचे मार्ग स्वीकारावेत, असा या लेखकाचा स्पष्ट उद्देश होता. राष्ट्राचे शत्रू कोण ? हें येथें सांगण्याची जरूरी नाहीं. हा कज्जा चालून १९०९ सालच्या जानेवारी महिन्याच्या १९ व्या तारखेस तीन आरोपींना शिक्षा ठोठावण्यांत आल्या.

ज्यानें हा लेख लिहिला होता, त्याला यानंतर कांहीं दिवसांनीं पकडून, १९०९ सालच्या जुलै महिन्यांत सर न्यायाधीश मि० के० ए० पंडित यांच्या-समोर उभें करण्यांत आलें. संपादक मि० जोशी यांनीं सर्व आरोपित मजकुराची जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन, लेखकाला न कळत तो आपण दुसऱ्याच्या लेखांत घुसडून दिल्याचें कबूल केल्यामुळें, मुख्यत्वेंकरून याच मुद्यावर, मि० पंडित यांनीं त्याला निर्दोषी ठरविलें. दोषमुक्त करण्यास हा पुरावा पुरे होता, यांत शंका नाहीं; परंतु मि० पंडित एवढ्यावरच संतुष्ट झाले नाहींत. त्यांनीं मि० किंकेड यांच्या पूर्वीच्या ठरावावर निष्कारण व निरर्थक टीका केली. त्यामुळें, ते अधिकारच्युत होऊन, त्यांना पेन्शन घेऊन लौकरच घरीं बसावें लागलें.

दुसऱ्या तीन कज्जांची सविस्तर माहिती येथें देण्याची आवश्यकता नाहीं. यांपैकीं पहिल्या कज्जांत प्रायव्हेट स्कूलच्या रसायन-संग्रहालयांतून, रसायनें चोरून नेल्याच्या आरोपावरून, तीन ब्राह्मणांच्या मुलांना शिक्षा झाल्या. दुसऱ्या, याहि-पेक्षां अधिक महत्त्वाच्या कज्जांत, ठिकठिकाणीं बॉंब तयार करण्याची पद्धत दाखविणाऱ्या जाहिराती प्रसिद्ध केल्याबद्दल, दामू जोशी व आणखी सात इसमांवर खटला करण्यांत आला. मि० किंकेड साहेबांनीं दामूला व आणखी एकाला दोषमुक्त करून, इतरांना जुजबी शिक्षा दिल्या. तिसऱ्या कज्जांत याच जज्जानें दामूला कर्नल फेरीस यांचा खून करण्याच्या कटाच्या आरोपांतून दोषमुक्त केलें; परंतु बापट, गद्रे व गोखले या तिघांना अनुक्रमें सात, दोन व दोन वर्षांची कैद सांगून त्यांना दंडहि केला. तथापि अपिलांत दामूला प्रत्येक गुन्ह्याबद्दल सात सात वर्षांची कैद झाली. १९११ सालीं दामू हा तुरुंगांतून पळून गेला.

तेव्हांपासून अद्याप त्याचा तपास लागला नाहीं. या शेवटच्या खटल्याच्या बातर्मीतच, इंडियन पिनलकोडच्या ३०२ कलमान्वयें गुन्ह्याला प्रवृत्त केल्याच्या आरोपावरून, नागपूरकर व मोडक यांच्यावर खटले करण्यांत आले. हा गुन्हा ह्मणजे दामू जोशानें कर्नल फेरीस साहेबांचा खून करण्याचा प्रयत्न केला होता, हा होय. १९११ सालच्या मार्च महिन्यांत स्पेशल सेशन्स जज्ज मि० क्लेमंट्स यांच्यासमोर कज्जास सुरवात होण्यापूर्वींच, महत्त्वाच्या अशा ज्या कित्येक गोष्टी घडल्या त्यांचें आह्मीं थोडेंसें निरीक्षण केलें पाहिजे. १९०९ सालच्या जानेवारी महिन्यांत मि० किंकेड यांनीं दामूला दोषमुक्त केल्यामुळें, कांहीं शंका उपशंका निर्माण झाल्या असाव्या, असें दिसतें; ह्मणून या शंकांचें निरसन होणें जरूर होतें. महाराजांना अशा गोष्टींसंबंधीं स्वतःची खात्री करून घ्यावी लागत होती, एवढेंच नसून, दुसऱ्यांचीहि आपल्याप्रमाणेंच खात्री करून देणें भाग पडत होतें. महाराजांच्या या धोरणामुळें महाराजांना चोहोंकडे शत्रू उत्पन्न झाले होते; त्यामुळें, त्यांना ज्या बातम्या लागत असत, त्यांची सत्यता पुष्कळदां इतरांपेक्षां अगोदर त्यांनाच पटत असे. १९०८ सालच्या जुलै महिन्यांत, महाराजांनीं टिळकांच्या जगद्गुरूचा अपमान केल्याबद्दल त्यांच्यावर बॉंब फेंकूं, अशा प्रकारचीं धमकावणीचीं निनांवीं पत्रें महाराजांना गेलीं होतीं. बॉंब व इतर शस्त्रास्त्रें व दारू गोळा सांपडणें संभवनीय आहे, अशी सप्टंबर महिन्यांत त्यांना बातमी लागली. ब्रिटिश मुलुखांत या गोष्टीला ज्या फांद्यामुळया फुटत होत्या, त्यांची चौकशी कोल्हापूरच्या पोलिस लोकांकडून होणें शक्य नव्हतें; ह्मणून या बाबतींत ब्रिटिश पोलिसांचा निर्णय महाराजांच्या निर्णयापेक्षां अधिक महत्त्वाचा समजणें योग्य होतें. इतरांनीं नाकबूल केलेल्या कटांचा सुगावा महाराजांच्या पोलिसांना लागत असल्यामुळें, या इतर लोकांच्या मनांत मत्सर उत्पन्न होत असे, अशी महाराजांची एकसारखी तक्रार असे. 'ब्रिटिश पोलिस लोकांनीं सातारा व बेळगांव येथें चौकशी करण्याचें काम हातीं घेतलें असल्यामुळें, मीं हे भाग सोडून दिले आहेत,' असें आक्टोबर महिन्याच्या ११ व्या तारखेस महाराजांना स्पष्ट करावें लागलें. बेळगांवनजीक मजगांव येथें कांहीं उघडकीस आलेल्या महत्त्वाच्या गोष्टींसंबंधीं कोल्हापूर व ब्रिटिश पोलिस यांच्यांत मतभेद झाल्याचा हा कदाचित् परिणाम असावा. दामू निर्दोषी ठरल्यावर अपेक्षेप्रमाणें हें चौकशीचें काम यशस्वी झालें नाहीं, अशी एकाद्याची समजूत झाली असेल. महाराजांच्या नोकरलोकांनीं

उघडकीस आणलेल्या गोष्टींचें महत्त्व इतर लोकांना वाटत नसल्यामुळें, मिळालेल्या माहितीप्रमाणें महाराजांना तपास करणें अशक्य होऊन, महाराजांची मोठी निराशा होत असे, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. फौजदारीवृत्त खात्याचे मि० स्टिव्हेन्सन मूर हे फेब्रुवारींत कोल्हापुराला येऊन, स्वत: घेतलेल्या हुतिलाल नांवाच्या इसमाच्या जबानीवरून, दामू जोशानें उल्लेख केलेल्या पुण्याच्या बाँब प्रयोगाला पुष्टि येते, असा रिपोर्ट केला. " ही माहिती सिमल्याकडून मिळाली असल्यामुळें, यांत कांहीं बनावट असण्याचा संभव नाहीं. " एक यूरोपियन व दुसरा हिंदी असे ब्रिटिश नोकरींतील दोन अधिकारी आतां कोल्हापूरच्या पोलिसांना तपास चालविण्याच्या कामीं मदत करूं लागले.

अशा परिस्थितींतच बेळगांवच्या तुरुंगांत अटकेंत असलेल्या मल्लया धनगर नांवाच्या एका इसमानें कोल्हापुरांतील एका अधिकाऱ्याच्या चिथावणीवरून कोल्हापुरांतील आणखी एक अधिकारी ( मि० जाधवराव ) यांना आपण जबर दुखापत केली, असा कबूली जबाब दिल्यामुळें, हें प्रकरण बरेंच गुंतागुंतीचें झालें. यानंतर ही गोष्ट नाकबूल करून पुन: तीच गोष्ट त्यानें कबूल केली. १९०९ सालच्या अखेरीच्या सुमारास तुरुंगांतून पळून जाईतोंपर्यंत, त्यानें असेंच चालविलें होतें. मल्लयाला तुरुंगांतून काढून लावण्याच्या कामीं संस्थानांतील एकाद्या अधिकाऱ्याचें अंग असावें, असे तर्कवितर्क सुरू झाल्यामुळें, या प्रकरणाकडे सरकारनें विशेष लक्ष पुरवावें म्हणून, महाराजांना विनंति करावी लागली. डिसेंबर महिन्याच्या १५ व्या तारखेस महाराज लिहितात:--

" माझे हुजूर चिटणीस, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व मि० * * * * यांनीं त्याची ( मल्लयाची ) तुरुंगांत गांठ घेतली, अशी अफवा प्रत्येकजण उठवीत असतांना, दिवसा ढवळ्या त्यानें पळून जावें ही अतिशय लाजीरवाणी गोष्ट आहे. या क्षुद्र गोष्टीनें येथील ब्राह्मणेतरांमध्यें घासाघीस सुरू झाल्यामुळें, ब्राह्मण लोक आपला हात उगारूं पहात आहेत. तो कसा पळून गेला याची चौकशी सरकार करीलच; परंतु, आपण या गोष्टीकडे विशेष लक्ष पुरवाल तर खुद्द माझ्यावर आपण मोठी मेहेरबानगी केली, असें मी समजेन. असें केलें तरच सर्व कांहीं ठीक होईल. गुन्हेगार कोणीहि असो, त्याचा हुद्दा अगर पदवी कशीहि असो, अधिकारी माझे अगर सरकारचे असोत, त्यांना एकदांचें कडक शासन झालें पाहिजे; म्हणजे या बाजूला सर्व कांहीं शांत होईल. "

परंतु ही ठिणगी तत्काळ विझविता आली नाहीं, इतकेंच केवळ नव्हे, तर कालगतीमुळें तिला वणव्याचें स्वरूप प्राप्त झालें. मल्लयाला कांहीं महि-त्यांनीं परत पकडून ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं बेळगांव येथें नेलें. तेथील तपासांत, कोल्हापुरांतील कांहीं लोकांशीं या गुन्ह्याचा अनिष्ट संबंध असल्याचें उघडकीस आलें. यादवीचा केव्हांहि एकच परिणाम होतो. दुसऱ्या प्रकरणांत आमच्या दृष्टोत्पत्तीस आल्याप्रमाणें यादवीचे दुष्परिणाम यादवीशीं निकट संबंध आलेल्या लोकांनाच भोंवून न राहातां, सर्व राज्यपद्धतीवरहि तिचे शिंतोडे उडतात, ही गोष्ट कोल्हापूरच्या लोकांना पूर्णपणें अनुभवसिद्ध होती. या प्रकरणासंबंधींच्या व याच्या कित्येक शाखा उपशाखांसंबंधींच्या, श्रेयापश्रेयाची विभागणी करण्याचा काल अद्याप आला नाहीं. या दुःखपर्यवसायी नाटकांत भाग घेतलेले कित्येक लोक अद्याप जीवंत आहेत; म्हणून या कटाचे व त्याच्या परिणामांचें पूर्णपणें आविष्क-रण करण्याचें काम कोल्हापूरच्या भावी इतिहासकारांवर सोंपविलें पाहिजे. या आपा-पसांतील लठ्ठालठ्ठीमुळें, खुद्द महाराजांना देखील कांहीं कमी त्रास पोंचला नाहीं, एवढी गोष्ट येथें नमूद केली असतां बस्स होईल. १९११ सालच्या मे महिन्यांत महाराज लिहितात, " ब्राह्मणांकडून जरी मला त्रास भोगावा लागत असे, तरी माझा बंधू व माझी पत्नी माझे नेहमीं सांत्वन करीत असत. जर आपला माझ्यावर भरंवसा असेल, तर मी असें ह्मणूं शकेन कीं, सर्व हिंदुस्थानांत आमचें कुटुंब अतिशय सुखी आहे. उभयपक्ष हे मीं लावलेल्या रोपड्यांचेच वृक्ष असल्या-मुळें मला जें सांगावयाचें आहे तें सर्व सांगतां येणें अशक्य होऊन, मला मोठी बिकट परिस्थिति प्राप्त झाली आहे. ही बिकट स्थिति खरोखरच अतिशय मोठी आहे." महाराजांना त्या वेळीं कल्पना झाल्यापेक्षांहि ही स्थिति माझ्या मतें अधिक बिकट होती !

महाराजांची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें, महाराजांना या वेळीं अतिशय त्रास होत असल्याचें दिसून येतें. जात्याच महाराजांची शरीरप्रकृति कल्पनातीत सुदृढ असल्यामुळें व पूर्व आयुष्यांत तिचें चांगल्या प्रकारें संगोपन केलें गेलें असल्यामुळें, सामान्य मनुष्याच्या आयुष्यमर्यादेच्या दुप्पट अवधीपर्यंत त्यांची शरीरप्रकृति टिकाव धरूं शकेल, असें वाटत होतें. कोल्हापूर तें महाबळेश्वरपर्यंतचें अननुभूतपूर्व असें अश्वारोहण, त्यांच्या अंगवळणी पडलेल्या शिकारींतील त्यांचा काटकपणा व १९९८ सालीं शिरोळ येथें २ बैलांची मोट ओढण्याचा महाराजांनीं केलेला

प्रयोग इत्यादि गोष्टी महाराजांच्या निरामयत्वाची व सामर्थ्याची साक्ष देतात; परंतु महाराजांच्या शिक्षकांनीं निरीक्षण केल्याप्रमाणें महाराजांचे आनुवंशिक दोष, ते तक्तारूढ होण्यापूर्वी देखील त्यांना जाणवूं लागले होते. १९०९ सालच्या सुमारास महाराजांच्या प्रकृतींत प्रथम मोठें महदंतर दिसून आलें. महाराजांचा वात किंचित् प्रबळ होऊन, त्यांचें हृदय व त्याचप्रमाणें त्यांची पचनक्रिया किंचित् कमकुवत झाली. १९१० सालच्या एप्रील महिन्याच्या सुमारास जर्मनींत आरोग्यसंवर्धक जलमज्जन करण्यासाठीं, त्या देशाला जाण्याचा महाराजांचा विचार चालला होता; परंतु आपल्या प्रकृतीबद्दलच्या त्यांच्या नेहमींच्या निष्काळजीपणामुळें, त्यांनीं हा विचार लौकरच सोडून दिला; व त्यांनीं आपल्या शरीरप्रकृतीवर स्वत: प्रयोग करण्यास सुरवात केली. सर जॉन मूर मॅकेन्झी यांना १९१० सालच्या मे महिन्याच्या २२ व्या तारखेस ते लिहितात, " माझ्या वातप्रकृतीमुळें सहा दिवसपर्यंत उपवास करून, आज मीं उपवास सोडला, ही गोष्ट ऐकून आपणास आश्चर्य वाटेल. मला मोठी हुशारी वाटते. एक दोन महिन्यानीं मी पुन्हां उपवास करीन. " आपल्या आयुष्याच्या शेवटच्या घटकेपर्यंत महाराज एकसारखे असले प्रयोग करीत होते.

महाराज बाँबसंबंधीं व राजद्रोहासंबंधीं जो तपास करीत होते, त्यावरून महाराजांच्या कांहीं जहागिरदारांची राजकीय गुन्हेगारांना उघडपणें नसली तरी अंत:स्थ रीतीनें फूस होती, असें महाराजांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. एका आरोपीच्या डायरीवरून ते राजद्रोही लोकांना स्पष्टपणें उत्तेजन देत होते, असें सिद्ध झालें. ते टिळक व बिपीनचंद्र पालच्या सभांना हजर राहात असत व आपल्या प्रजेपासून टिळक–फंड व तत्सदृश इतर फंडाकरितां पैसा गोळा करीत असत. खुद्द त्यांचे चिटणीस आक्षेपार्ह गोष्टींसाठीं पैसा गोळा करीत होते. त्यांच्या या अयोग्य वर्तनाची महाराजांना पूर्णपणें खात्री पटल्यावर, राजनिष्ठ राहाण्याच्या अटीवर त्यांना जे अवशिष्ट अधिकार महाराजांनीं दिले होते, ते परत घेऊन, संस्थानांतील एक दोन जहागिरदारांवर आपली इतराजी झाली आहे, ही गोष्ट त्यांच्या नजरेस आणण्याचा महाराजांनीं निश्चय केला. १८६२ सालच्या कराराची १९०३ सालांत दुरुस्ती होऊन, महाराजांना प्राप्त झालेली द्विविध सत्ता जी महाराजांनीं जहागिरदारांना बहाल केली होती, तीच सत्ता १९१० सालच्या

प्रारंभीं एक फर्मान काढून; त्यांच्या हातांतून महाराजांनीं कांहीं काळ परत काढून घेतली.

संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांचा परस्परांशीं संबंध येणाऱ्या आणखी एका प्रश्नाकडे १९०९ सालीं महाराजांचें लक्ष वेधलें. मि० जी० बी० मोडक यांच्या संपादकत्वाखालील, परंतु आतां स्मृतिशेष झालेल्या मुंबई येथील एका मराठी जहाल दैनिक पत्रानें, कित्येक अंकांत कोल्हापूरच्या ब्राह्मणेतर अधिकाऱ्यांवर व संस्थानच्या राज्यपद्धतीवर १९०९ सालच्या पावसाळयांत बरीच कुत्सित टीका केली. दामू जोशानें फेरीससाहेबांचा खून करण्याचा जो प्रयत्न केला होता, त्यांत मि० मोडकांचा संबंध होता. आक्टोबरच्या १३ व्या तारखेस महाराज लिहितातः—

" देशी पत्रें माझी, माझ्या राज्यकारभाराची व अधिकाऱ्यांची नालस्ती बेमुर्वतपणें करूं शकतात, हें आपणांस विदितच आहे. कित्येक कारणांस्तव कोणत्याहि इतर संस्थानांपेक्षां आमची विशेष नालस्ती करण्यांत येते, या गोष्टीचा येथें उल्लेख करावा, असें मला वाटतें. अलीकडे 'राष्ट्रमतानें' माझे एक्झिक्यूटिव्ह इंजीनियर व दरबारसर्जन यांची यथेच्छ नालस्ती केली आहे. हे दोघे मागसलेल्या वर्गांपैकीं आहेत. रेसिडेन्सी कोर्टांत फौजदारी व दिवाणी काम चालवून, आपली नुकसानभरपाई त्यांनीं मागितलीच आहे. तेव्हांपासून हें प्रकरण आपसातींत मिटविण्यासाठीं लोक मजकडे येऊन, भीड घालीत आहेत; कारण या कज्जांना भक्कम पुरावा असल्यामुळें, राष्ट्रमताच्या अस्तित्वावर गदा येण्याचा संभव आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत मुद्रणासंबंधीं जे नियम प्रचलित आहेत, त्यांचा उद्देश ब्रिटिश हद्दींतील जनतेचें संरक्षण करण्याचा आहे; परंतु अतिशय राजनिष्ठ असलेल्या संस्थानिकांचें किंवा त्यांच्या अधिकाऱ्यांचें त्यापासून संरक्षण होऊं शकत नाहीं, ही गोष्ट वृत्तपत्रकारांना ठाऊक असल्यामुळें, ते संस्थानावर यथेच्छ तोंडसुख घेत आहेत; व हा गुन्हा अन्योन्य मदतीचा ( Extraditable ) नसल्यामुळें, संस्थानिकांना या बाबतींत कांहींच करतां येत नाहीं. ब्रिटिश कोर्टांत त्यांच्यावर काम चालविलें तर सर्व अधिकारी व साक्षीदार यांना ब्रिटिश हद्दींत पाठविणें बरेंच गैरसोईचें व मोठ्या खर्चाचें होतें. तथापि माझ्यासारख्या संस्थानिकाला ब्रिटिश हद्दींत काम चालविणें ह्मणजे मोठी मौज वाटेल; परंतु संस्थान सोडून कित्येक महिने मला राहातां

येत नाहीं. * * * * मीं याचीहि पर्वा केली नसती; परंतु ( धुवावयाची ) घाण केव्हां केव्हां अंगाला चिकटते. या अडचणींतून निघण्याचा मार्ग ह्मटला ह्मणजे रेसिडेन्सी कोर्टामध्यें, अशा प्रकारचे कज्जे चालविण्याची सवड असावी. ''

ब्रिटिश हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांच्या कुत्सित हल्ल्यापासून, संरक्षण मागण्याच्या दरबाराच्या हक्कासंबंधानें पाहिलें तर, महाराजांचें ह्मणणें अक्षरशः खरें होतें व त्यांनीं सुचविलेला उपायहि वाजवी होता. रेसिडेन्सी कोर्टांना मिळावेत ह्मणून मागणी केलेल्या विशेष अधिकाराच्या छत्राचा, संस्थानांतील अधिकाऱ्यांना आश्रय घेणें शक्य नव्हतें. संस्थानाच्या या न्याय्य गाऱ्हाण्याची दाद लागून, हिंदुस्थान सरकारनें जरी महाराजांनीं सुचविलेला उपाय अक्षरशः मान्य केला नाहीं, तरी मुद्रणकायद्यांतील ही अडचण दूर करण्यासाठीं लौकरच दुसरी तरतूद करण्यांत आली. पुढें थोड्या दिवसांनीं महाराज आपल्या एका मित्राला लिहितातः—

" असें झालें नाहीं तर, अशा बाबतींत संस्थानिकांवर व संस्थानांतील अधिकाऱ्यांसारख्या इतर हातपाय जखडलेल्या लोकांवर देशी वृत्तपत्रें आपलें हत्यार चालविल्याखेरीज राहाणार नाहींत. अब्रूनुकसान केल्याचा गुन्हा अन्योन्य मदतीचा करूनच भागणार नाहीं, असें जें मी ह्मणतों याचें कारण असें आहे कीं, जर या वृत्तपत्रांना या खटल्यांत शिक्षा झाली तर संस्थानिकांचा ' जुलूम ' होय ह्मणून ओरड करण्यांत येईल. सिंध, काठेवाड, ईंदर सारख्या लांबच्या ठिकाणीं ही योजना कदाचित चालण्यासारखी आहे. '' याला महाराजांना पुढीलप्रमाणें उत्तर आलें:—

" संस्थानिकांची व त्यांच्या राज्यपद्धतीची बेमुर्वतपणें नालस्ती करण्यांत येते, अशी जी आपली तक्रार आहे ती सर्वस्वीं योग्य आहे. कायद्याच्या दुरुस्तीबद्दल आह्मीं सूचना केलेलीच आहे. सिमला येथें मि० सिंहांना यासंबंधीं मी बोललों आहें, या बाबतींत कांहीं तरी व्यवस्था होऊन या अतिशय निंद्य गोष्टीचा शेवट लागेल अशी मला आशा आहे, तोंपर्यंत आह्मांला शक्य असेल तितके उपाय योजिले पाहिजेत. ''

इंडियन सिव्हिल सर्विसचे मि० जॅक्सन हे १९०९ सालच्या डिसेंबर महिन्यांत नाशिकच्या एका अराजक तरुणाच्या रिव्हॉल्व्हरला बळी पडले. कर्नल रे च्या

वेळचें प्रक्षुब्ध वातावरण शांत झाल्यावर मि० जॅक्सन हे पोलिटिकल एजंट ह्मणून कोल्हापुराला आले होते. महाराजांच्या राजधानींत त्यांनीं जे थोडे दिवस काढले, त्या मुदतींत ते महाराजांचे अत्यंत मनमिळाऊ मित्र बनले होते; ह्मणून त्यांच्या या निष्ठुरतेनें झालेल्या खुनामुळें महाराजांना स्वत:चेंच मोठें नुकसान झाल्यासारखें वाटूं लागलें. महाराजांनीं या दु:खदायक प्रसंगाचा हृदयद्रावक शब्दांत उल्लेख करून, पुढें कांहीं महिने लोटल्यावर, एकाएकीं व अशा निर्दयतेनें निराधार झालेल्या मि० जॅक्सन यांच्या पत्नीला एक उदार देणगी पाठविली. या प्रसंगीं महाराजांनीं भरविलेल्या दुखवटयाच्या सभेंत लोक फारच थोडे जमले होते. महाराजांच्या शब्दांतच सांगावयाचें ह्मणजे " या अमानुष कृत्याचा निषेध व्यक्त करण्यासाठीं मीं सभा बोलाविली असतां फक्त कांहीं मराठे व जैन विद्यार्थी, ब्राह्मणेतर जहागिरदार व अधिकारी तेवढेच या सभेला हजर राहिले, हें सांगण्यास मला खरोखरच मोठी लाज वाटते. एकादा देखील ब्राह्मण वकील, अधिकारी अगर विद्यार्थी हजर राहिला नाहीं. "

१९११ सालच्या मार्च महिन्याच्या ३१ व्या तारखेस मोडक व नागपूरकर यांची चौकशी पुरी होऊन, नागपूरकर दोषमुक्त झाले; परंतु मोडकाला मात्र सात वर्षांची हद्दपारी झाली. मोडकाचे मदतनीस के० डी० कुलकर्णी याच्यावर जो कज्जा चालला होता, तो हा आरोपी फरारी असल्यामुळें, कित्येक वर्षे तसाच पडून होता. हा कज्जा या बाबतींतील शेवटचा होय. १९१९ सालीं तो आपणहून हजर झाला व मि० व्ही० बी० गोखले नांवाच्या ब्राह्मण जज्जानें त्याला मोडकाइतकीच कडक शिक्षा केली.

मुख्यत: ब्रिटिश सरकारच्या विरुद्ध झालेले गुन्हे उघडकीस आणण्याच्या कामीं महाराजांनीं जी कामगिरी केली, तीबद्दल महाराजांची सरकारांत पूर्ण चहा होऊन, त्यांच्या स्वत:पुरता २१ तोफांच्या सलामीचा हक्क, १९०९ सालच्या जानेवारी महिन्यांत सरकारनें महाराजांना बहाल केला; परंतु याबरोबरच महाराजांना महाराष्ट्रांतील लोकांपैकीं एका विवक्षित वर्गाच्या रोषास पात्र व्हावें लागलें. हा वर्ग महाराजांचा पूर्वीपेक्षांहि अधिक द्वेष करूं लागला. महाराजांच्या वेदोक्त व शैक्षणिक कामगिरीमुळें, ते ब्राह्मणेतरांना जितके प्रिय झाले होते, तितकेच ते अराजक चळवळीच्या विरुद्ध मोहीम करून,

इंग्रज सरकारालाहि प्रिय झाले. सामाजिक बाबतींत महाराजांना जो वर्ग आपला कट्टा प्रतिस्पर्धी समजत असे, तोच वर्ग आतां महाराजांना आपला मोठा राजकीय शत्रु ह्मणून लेखूं लागला. या कज्जांचा निकाल लागून, पुष्कळ वर्षें लोटल्यावर व कोर्टांतील एतद्विषयक निनाद पूर्णपणें विराम पावल्यावर, पुण्याच्या एका वृत्तपत्रानें महाराजांचा या दोन तीन वर्षांच्या अवधींत, जो पत्रव्यवहार झाला होता, त्यांतील उतारे प्रसिद्ध केले. हीं पत्रें त्यास कशीं सांपडलीं, हें एक जगाला कायमचें कोडें होऊन राहील. एवढें मात्र खरें कीं, शांत डोक्याच्या कोणत्याहि लेखकाच्या लेखणींतून या पत्रव्यवहाराच्या आधारावरून शाहुमहाराज हे " स्वराज्यद्रोही छत्रपति " होते, असा गिल्ला करण्यासारखे यांत कांहीं नव्हतें. हे उतारे व त्याचप्रमाणें या उताऱ्यांवर झालेली टीका, पुढें पुस्तक रूपानें प्रसिद्ध करण्यांत आली; व या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत व उपोद्घातांत पत्रांतील मजकुरावरून, महाराज हे स्वराज्याचे शत्रु होते, अशा समजुतीनें महाराजांवर पुनरपि हल्ला करण्यांत आला. खरोखर या पत्रव्यवहारावरून निष्पन्न तरीं काय होतें ? महाराज बादशहाशीं राजनिष्ठ असून, अराजक कटांचा महाराजांना जेव्हां जेव्हां कोठें वास लागत असे, तेव्हां तेव्हां ते यासंबंधींची माहिती सरकारला पुरवीत असत, ही गोष्ट या पत्रव्यवहावरून उघड होते; पण ती गोष्ट कोणासहि नवीन नव्हती. अशा प्रकारचे कट स्वराज्यप्राप्तीचीं साधनें आहेत, अशी कल्पना केल्याखेरीज हा पत्रव्यवहार स्वराज्याच्या कार्याला कोणत्याहि प्रकारें विघातक होता, असें मानतां येणार नाहीं. हे कट उघडकीस आणण्यासाठीं महाराजांनीं जे प्रयत्न केले, त्यांचें महत्त्व ब्रिटिश सरकारानें जाणून, महाराजांच्या सत्कार्यीं आपला पाठिंबा असल्याचें सरकारनें त्यांना आश्वासन दिलें, हीहि गोष्ट या पत्रव्यवहारावरून सिद्ध होते. ही गोष्ट स्वराज्याला विघातक होती काय ? महाराज हे लोकशाहीचे शत्रु होते, असा या गिल्ल्याचा मथितार्थ होता. ' लोकशाही ' च्या व्याख्येसंबंधीं जी कित्येकांची गैरसमजूत झाली आहे ती दूर करून, तिची व्याख्या ठरविल्यानेंच या प्रश्नाचा निकाल लागणार आहे. देशांतील सामान्य जनता चांगली सुशिक्षित करून, त्यांची सध्यांच्या त्यांच्या मानसिक गुलामगिरींतून मुक्तता झाल्याखेरीज, हिंदुस्थानांतील लोकशाही ह्मणजे सामाजिक व राजकीय सत्तेच्या अभेद्य दुर्गांतील, एका विवक्षित वर्गाचें शुद्ध व घातुक

वर्चस्व होय. अशा प्रकारच्या जातिवर्चस्वापेक्षां हल्लींचा अधिकारी वर्ग महाराजांना अधिक पसंत होता; ह्मणूनच महाराज मागसलेल्या वर्गांना शक्य तितक्या लौकर शिक्षण मिळालें पाहिजे, व सामान्य जनतेची मानसिक गुलामगिरी दूर झाली पाहिजे, या दोन मुद्यांवर विशेष जोर देत असत. त्यांच्या समजुतीप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकशाहीचा हा खरा पाया होता. महाराजांचें हें मत चुकीचें होतें काय ? या अर्थानें पाहिलें असतां, या बाबतींत महाराजांवर टीका करणाऱ्या कित्येक बोलघेवड्या राष्ट्रभक्तांपेक्षां, महाराज हे लोकशाहीचे खरे पुरस्कर्ते होते, असें कबूल करावें लागेल. आपल्या देशबांधवांच्या कपाळावरचा शूद्रत्वाचा डाग धुऊन काढून, त्यांच्या अंत:करणांत स्वाभिमानाची ज्योत प्रज्वलित करण्यासाठीं, कंबर कसून प्रयत्न करणाऱ्या व कित्येक मागसलेल्या जातींना पाश्चात्य संस्कृतीचें द्वार खुलें करून देणाऱ्या महाराजांसारख्याला लोकशाहीचा द्वेष्टा समजणें योग्य होईल काय ? लोकशाहीच्या पांघरुणाखालीं, विशिष्ट जातीचें वर्चस्व स्थापूं पाहाणाऱ्या लोकांच्या प्रयत्नांविषयीं, हिंदुस्थानांतील लोकशाहीच्या खऱ्या पुरस्कर्त्यांनें सदा जागरूक असले पाहिजे. लोकशाहीसारख्या दुर्मिळ वस्तूच्या नकली प्रतिकृतीइतकी भ्रामक आणि जुलमी गोष्ट दुसरी कोणतीच असूं शकणार नाहीं. ब्राह्मणी सत्तेच्या पुनरुज्जीवनाची महाराजांना इतकी भीति वाटत होती कीं, ती पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटे. तथापि आमच्या राष्ट्रीय जीविताचा पाया विस्तृत करून, महाराजांनीं स्वराज्याची जी महत्त्वाची कामगिरी बजाविली, ती कोणालाहि अमान्य करितां येण्यासारखी नव्हती. ही महत्त्वाची कामगिरी बजावितांना, ब्रिटिश नृपतीविषयीं स्वामिनिष्ठा, पाश्चात्य संस्कृतीच्या सुपरिणामाविषयीं आदर व कौतुक, दुसऱ्याकडे हक्काची मागणी करण्यापूर्वी आपल्या खालच्या लोकांना हक्क देण्याची उत्सुकता, ब्रिटिश राष्ट्रापासून हिंदुस्थानाचें जें कल्याण झालें आहे, त्याबद्दलची कृतज्ञता, या राष्ट्रानें दिलेल्या वचनावर व त्यांच्या हिंदुस्थानविषयक धोरणाला मान्य असलेल्या ध्येयावर श्रद्धा, आमच्या सार्वजनिक जीविताचें हृदय कुरतुडणाऱ्या, कित्येक सामाजिक दोषांचें परिमार्जन करण्याच्या जरूरीची जाणीव, या व असल्याच इतर गोष्टींवर महाराजांचा विशेष कटाक्ष असे. एकंदरींत पाहिलें असता, महाराजांना स्वराज्याचे शत्रु व राष्ट्रद्रोही ह्मणून, त्यांची निंदा करणाऱ्या व देशभक्त गणिलेल्या, कित्येक लोकांपेक्षां राष्ट्रसंगोपनाच्या कार्यांत महाराजांनीं व्यक्तिश: अधिक चांगली भर टाकली होती, हें निर्विवाद आहे.

या राजकीय गुन्ह्यांतील आरोपी लोकांविषयीं, सरकारी अधिकाऱ्यांनीं जें धोरण स्वीकारिलें होतें, त्याला कोणत्याहि प्रकारें नांवें ठेवण्यासारखें या पत्रव्यवहारांत कांहींच नव्हतें. आरोपी लोकांना शिक्षा ठोठावण्यासाठीं कांही इंग्रज अधिकाऱ्यांनीं अप्रामाणिक मार्गांचा अवलंब केला होता, असें भासविण्याचा या टीकाकारांचा प्रयत्न होता. एका टीकाकारानें सर जॉर्ज क्लार्क साहेबांची ' दुष्ट ' या विधानानें संभावना केली होती. हें विधान अगदींच अन्यायाचें होतें. १९०९ सालच्या अखेरीला सर जॉर्ज क्लार्क महाराजांना लिहितात:--

" मी हिंदुस्थानांत आल्यापासून, आपल्या सहकार्याची व साम्राज्य सरकाराविषयींच्या राजनिष्ठेची मला जी प्रचीति आली आहे, तिचें महत्त्व मला अतिशय वाटत आहे; हें मीं आपणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. आपलें सहाय्य अतिशय महत्त्वाचें असून, ही गोष्ट सरकारहि जाणत आहे. याची मी आपणास ग्वाही देतों. ब्रिटिश तक्ताशीं आपण पूर्ण राजनिष्ठ राहिल्यामुळें, ज्या अडचणी उद्भवतील त्यांत सरकारचें सहाय्य आपणांस मिळेल, अशी पुन्हां खात्री देऊन, मी आपली रजा घेतों. "

याच सुमारास सर जॉन मूर मॅकेंझी लिहितात:--

" आपण व आपल्या पोलीस लोकांनीं जी कामगिरी बजाविली आहे, तिचें महत्त्व सरकार आनंदानें मान्य करील, याची आपण खात्री असूं द्यावी. आपण मागाल ती कोणतीहि योग्य गोष्ट आपल्यासाठीं करण्यास सरकार माघार घेईल, असें मला वाटत नाहीं."

त्या वेळीं इंडिया ऑफीसमध्यें असलेले, सर वुईलियम लीवॉर्नर १९१० सालच्या मार्च महिन्यांत लिहितात:--

" गेल्या वर्षीं किंवा त्या सुमारास आपल्या राजनिष्ठ कामगिरीकडे, मोठ्या कुतूहलपूर्ण दृष्टीनें मी पाहात होतों. सरकार आणि हिंदुस्थानांतील राजे लोक, यांच्या सहकार्यानें अराजक लोकांना आपण स्वीकारलेला मार्ग निंद्य आहे, इतकेंच नव्हे, तर आपल्याच देशबांधवांना तिरस्करणीय व निरुपयोगी वाटत आहे, अशी यावरून त्यांची खात्री पटल्याखेरीज राहाणार नाहीं, असा मला भरंवसा वाटतो "

महाराजांना जे इतक्या जोरानें प्रोत्साहन देण्यांत येत होतें, त्याचें इंगित काय असावें ? कांहीं टीकाकार ह्मणत त्याप्रमाणें, राजकारणी सुधारकांना कसें तरी महाराजांनीं चिरडून टाकावें ह्मणून, महाराजांची सरकार पाठ थोपटीत होतें काय ? अशा आरोपाला एका काडीचाहि पुरावा मिळत नाहीं. महा-राजांच्या कामगिरीच्या महत्त्वाची परीक्षा करतांना हिंदुस्थान व ब्रिटन यांचा संबंध उभय देशांना हितप्रद आहे किंवा नाहीं, व हा संबंध कायम ठेवून, सुव्यवस्थित मार्गानें या देशाच्या राष्ट्रीय जीविताचें ध्येय, गांठतां येईल किंवा नाहीं, हा एक महत्त्वाचा प्रश्न येथें उभा राहातो. हिंदी प्रगतीला ब्रिटिश छत्राची अत्यंत जरूरी आहे, अशी महाराजांची ठाम समजूत होती. हिंदी लोकच जीबद्दल जबाबदार आहेत, अशा सामाजिक विशिष्ट परिस्थितीमुळें, हिंदुस्थानची प्रगति इष्ट पल्ल्याला पोंचण्यास बराच कालावधि लागेल, अशीहि महाराजांची समजूत होती. या प्रश्नाविषयीं जहाल लोकांचें धोरण कशा प्रकारचें होतें, याचें उत्तर मीं द्यावयास पाहिजे असें नाहीं. अशी परिस्थिति अस-ल्यामुळें, महाराज ज्या हिंदी राजकीय पक्षांचा पुरस्कार करीत होते, त्याच्या प्रमुख तत्त्वांवर श्रद्धा असणाऱ्या लोकांना, आपला पाठिंबा देणें, सरकारचें कर्तव्यच होतें. उलट, या कामीं सरकारनें जितकें मनोधैर्य दाखवावयास पाहिजे होतें, तितकें तें दाखविलें नाहीं; अशी कित्येक लोकांची तक्रार होती. दडपशाही व अधिकारदान यांचें संमिश्रण हा लॉर्ड मोर्लेसाहेबांच्या धोरणाचा पाया होता, हें प्रसिद्धच आहे. कांहीं काळापुरती दिशाभूल झालेल्या लोकांच्या बाबतींत या मार्गाचें अवलंबन करणें, हें अगदीं योग्य धोरण होतें, यांत शंका नाहीं. प्रजेची योग्य मागणी मान्य करणें, हें शासक वर्गाच्या समंजसपणाचें लक्षण आहे; परंतु ब्रिटिशांचा संबंध अनर्थावह आहे, ह्मणून शक्य तितक्या लौकर तो तोडून टाकिला पाहिजे, ब्रिटिशांचें धोरण हिंदु-स्थानला कोणत्याहि प्रकारें कल्याणप्रद नाहीं; अशा मताचा पुरस्कार करून खुनासारख्या तोडग्याचा उपयोग करून, आपलें ध्येय गांठूं पाहणाऱ्याविरुद्ध या मिश्र पद्धतीचा फायदा होईल, असें महाराजांना वाटत नव्हतें. १९०९ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत महाराज लिहितातः--हल्लींच्या दुर्बळ धोरणामुळें, राजनिष्ठ लोक मात्र अराजक होऊन, राजद्रोही व चळवळ्या लोकांची संख्या मात्र अधिक होईल. राजकीय दुराग्रही लोकांशीं वागतांना सौम्यपणाचा अतिरेक करून,

ज्याप्रमाणें एकाद्याच्या हातून प्रमाद घडण्याचा संभव असतो, तद्वतच कडक धोरणाच्या अतिरेकापासूनहि प्रमाद घडण्याचा संभव असतो, ही गोष्ट मला कबूल आहे; परंतु आपल्या विरुद्ध मताच्या प्रामाणिक लोकांविरुद्ध दहशतीच्या मार्गांचा पुरस्कार करण्यास मार्गे पुढें न पाहणाऱ्या बदमाष लोकांना, शासन करण्यासाठीं महाराज प्रयत्न करीत असतांना, त्यांच्या धोरणाला सरकाराकडून शक्य तों पाठिंबा मिळणें अगदीं योग्य होतें.



*

# प्रकरण १७ वें.

# १९११ ते १९१४.





सम एडवर्ड बादशहांच्या मृत्यूमुळें, १९११ सालीं अखिल साम्राज्यावर उद्विग्नता पसरली, त्या वेळीं कोल्हापुरास भरलेल्या दुःखप्रदर्शक जाहीर सभेला महाराज हजर राहिले; व या सभेमध्यें वर्गणी गोळा करण्याचा ठराव होऊन वर्गणीची रक्कम ३२,००० पर्यंत गेली. या फंडाच्या व्याजांतून **एडवर्ड ॲग्रिकल्चरल इन्स्टिट्यूट** नांवाची संस्था काढण्यांत आली. महाराजांनीं या संस्थेला चांगली मदत केली. शिवाय सम्राट् बादशहांविषयीं, स्वतःच्या ठायीं वसत असलेल्या आदराचें मूर्त चिन्ह ह्मणून, सम्राट् व सम्राज्ञीचे अर्ध पुतळे तयार करण्यासाठीं महाराजांनीं हुकूम केला. १९१३ सालीं नेक नामदार वुइलिंग्डन साहेबांच्या हस्तें या पुतळयांचें अनावरण करण्यांत आलें, हें पुढें येईलच. दुर्दैवानें १९१४ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत याच पुतळयाला कोणी बदमाषानें डांबर फांसल्यामुळें, त्या ऐवजीं नवीन पुतळा तयार करावा लागला. कोल्हापूरच्या सर न्यायाधीश कोर्टासमोरील त्रिकोणी बगीच्यांत, पुण्यशील महाराज्ञी व्हिक्टोरियांची छत्री यापूर्वींच विराजित झालेली होती. या महाराज्ञींच्या बादशहा एडवर्ड व ड्यूक ऑफ कॅनॉट या दोन पुत्रांचे त्यांच्या पत्नींसमवेत आणि हल्लींचे बादशहा व त्यांची पत्नी महाराज्ञी मेरीसाहेब यांचेहि पुतळे या लहानशा बगीच्यांत उभारून, राजघराण्यांतील पुतळयांचा हा एक जणू बगीचाच तयार करण्यांत आला.

१९११ सालच्या एप्रील महिन्याच्या २९ व्या तारखेस, हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयसाहेबांनीं एक खलिता पाठवून दिला व दरबारच्या सुमंगल प्रसंगीं हजर राहाण्यासाठीं महाराजांना निमंत्रण केलें. या निमंत्रणाचा महाराजांनीं स्वीकार केला हें सांगावयास नकोच. १९११ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या २७ व्या तारखेस, महाराज आपले जहागिरदार, सरदार, अधिकारी व इतर लवाजमा बरोबर घेऊन, दिल्लीला निघाले. रस्त्यांत पुणें व भोपाळ

येथें मुक्काम करून, १९११ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या ३० व्या तारखेस महाराज दिल्लीला दाखल झाले. भोपाळ येथें महाराजांचें व त्यांच्या परिवाराचें तेथील मुलकी मंत्र्यानें बेगमसाहेबांच्या आज्ञेवरून, मोठ्या प्रेमानें स्वागत केलें. दिल्लीला असते वेळीं बादशाही दरबारासंबंधीं जो विविध प्रकारचा कार्यक्रम ठरला होता, त्या सर्व प्रसंगांना महाराज हजर राहिले. या प्रसंगीं दिल्ली येथें जो मोठा बादशाही दरबार भरला, त्या वेळीं जॉर्ज बादशहांनीं जी० सी० आय्० ई० ही बहुमानाची पदवी महाराजांना अर्पण केली. बादशहांकडून आपल्या महाराजांचा अशा प्रकारचा योग्य सत्कार झालेला पाहून, कोल्हापूरच्या लोकांना इतका आनंद झाला कीं, अननुभूतपूर्व अशा प्रेमानें व उत्साहानें, महाराज राजधानीला परत आल्यावर त्यांनीं त्यांचें स्वागत केलें.

हिंदुस्थान व ब्रिटन यांच्या परस्पर संबंधाच्या इतिहासांत घडून आलेल्या या अद्वितीय दरबारचें, कोल्हापुरांत **पाटील स्कूल** सुरू करून, महाराजांनीं स्मारक केलें. पुढें आपल्या संस्थानच्या राजपद्धतींत ज्या अतिशय धैर्याच्या सुधारणा महाराजांनीं केल्या, त्यांपैकीं एका गोष्टीचा या शाळेनें पाया घातला. महाराष्ट्रांतील ग्राम-व्यवस्थेंत, पाटील हा आनुवंशिक पुढारी गणला जातो. पाटील हा आपल्या खेड्यांतील मुख्य अधिकारी असून, त्या गांवांतील शेतकरी वर्गापैकींच तो एक असल्यामुळें, त्यांचा स्वाभाविक पुढारी असतो. फक्त ब्राह्मण खेरीजकरून, ऐतिहासिक काळांतील मराठा राष्ट्राचे बहुतेक थोर पुरुष पाटील वर्गांतूनच निपजले आहेत. आपल्या कर्तबगारीनें देशांतील कोणत्याहि पाटलापेक्षां, अतिशय मानमरातब व संपत्ति संपादन केली, तरी स्वतःला पाटील ह्मणवून घेण्यास त्यांना मोठा अभिमान वाटत असे. इतिहास-प्रसिद्ध माधवराव शिंदा हा स्वतःला राजा ह्मणविण्यापेक्षां, पाटील ह्मणवून घेण्यास अधिक उत्सुक असे. यावरून महाराष्ट्रांतील लोक पाटिलकीला किती मान देतात, हें स्पष्ट होतें; परंतु हल्लींच्या शांततेच्या युगामध्यें व हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या दुर्बोध राजपद्धतीमुळें, पाटलांचें वजन बरेंच कमी होऊन, पाटलापेक्षां कमी योग्यतेचा, परंतु थोडासा शिक्षित व कारस्थानी असा कुलकर्णी, पाटलाला मागें रेटून पुढें सरसावत आहे, ही गोष्ट महाराजांच्या लक्षांत पूर्णपणें आली होती; ह्मणून पाटलांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव उत्पन्न करून देऊन, त्यांना पुढें आणण्याचा कोल्हापुरांतील कांहीं ब्राह्मणेतरांनीं प्रयत्न सुरू केला.

या प्रीत्यर्थ महाराजांच्या प्रोत्साहनानें त्यांनीं जैन-विद्यार्थिगृहांत एक खासगी वर्ग सुरू केला. या वर्गांत कित्येक तरुण पाटलांना त्यांच्या कर्तव्याचें ज्ञान करून देण्यांत येत असें. मधून मधून, खेड्याचे पुढारी या नात्यानें त्यांनीं करावयाच्या सार्वजनिक कामाचीहि, त्यांना दिशा दाखवून दिली जात असे. महाराजांना हें कार्य पसंत पडल्यामुळें, या वर्गाचेंच रूपांतर " दिल्ली दरबार पाटील स्कूल " मध्यें करण्यांत आलें.

१९११ सालच्या मे महिन्यांत महाराजांनीं आणखी एक गोष्ट करून, आपलें मनोधैर्य व्यक्त केलें. कर्नाटकांतील लिंगायत लोक व्यासंतोळाची जी मिरवणूक काढतात, तीसंबंधानें या जातीच्या लोकांची व यांच्या प्रतिस्पर्धी ब्राह्मणांचीं मनें गेलें एक शतकभर व्यग्र झालीं होतीं. व्यासंतोळाची मिरवणूक काढण्याचे जेव्हां जेव्हां लिंगायत लोकांनीं प्रयत्न केले, तेव्हां तेव्हां शांतताभंग, करण्यापर्यंत ब्राह्मणांनीं आपली मजल नेऊन, खुद्द सरकारलाहि या प्रश्नासंबंधीं बरीच चिंता उत्पन्न केली. व्यासानें विष्णूचें स्तोत्र लिहिलें ह्मणून, त्याचा अपमान करण्यासाठीं व्यासंतोळाची ( व्यासाचा हात ) मिरवणूक काढण्यांत येते, अशी वैष्णवांची तक्रार होती. याविरुद्ध लिंगायत लोकांचें असें ह्मणणें होतें कीं, आपण ही मिरवणूक व्यासाच्या हाताचा सत्कार करण्याच्या हेतूनेंच काढीत असतो ! शिवाची उपेक्षा करून, विष्णूचें स्तोत्र ज्या हातानें लिहिलें होतें, तो तुटलेला हात शिवाच्या ध्वजाला बांधावा ह्मणून, खुद्द व्यासानें शिवाची प्रार्थना केली होती, असें लिंगायत लोकांचें ह्मणणें होतें. या मिरवणुकीचा हेतु उघड आहे. ज्या पद्धतीवर एका पंथाची श्रद्धा असते, त्याच्या-वरच दुसऱ्याचा अविश्वास व केव्हां केव्हां रागहि असतो. अशा परिस्थितींत एकमेकांच्या समजुतीविषयीं एकमेकानें सहिष्णुता धारण केल्याखेरीज, शांततेनें नांदणें अशक्य आहे. कायद्यानें एकादी गोष्ट योग्य किंवा अयोग्य ठरविण्याचा प्रयत्न केल्यापासून, कोणत्या तरी एका वर्गाची निराशा झाल्याखेरीज रहात नाहीं. ब्राह्मणी वर्चस्वाच्या प्रबळ दाबामुळें कर्नाटकांतील ब्रिटिश अधिकारी लिंगायतांच्या व्यासंतोळाच्या मिरवणुकीला सुमारें एक शतक एकसारखा विरोध करीत आले होते. हा प्रश्न कोल्हापुरांत उद्भवला त्याच सुमारास मुंबई सरकारनें बेळगांव जिल्ह्याच्या आसपासच्या भागांत व्यासंतोळाच्या मिरवणुकीला कायमची मनाई केली, होती. पुढें ही मनाई मुंबईच्या हायकोर्टानें रद्द केली, हा मार्ग

निराळा ! मुंबई सरकारच्या ठरावामुळें ब्रिटिश कायदे कोर्टांत काम चालून उभय पक्षांकडून पैशाचा चुराडा करण्याचें काम चालूंच होतें. अशा परिस्थितींत लिंगायतांच्या जगद्गुरूची मिरवणूक काढतांना व्यासंतोळाचीहि मिरवणूक काढण्याची परवानगी महाराजांकडे मागण्यांत आली. या लिंगायत जगद्गुरूचा मठ म्हैसूर संस्थानात होता. तें संस्थानहि बऱ्याच दिवसांपासून ब्राह्मणी वर्चस्वाखालीं असल्यामुळें, तेथेंहि या मिरवणुकीला मनाई होती ! लिंगायतांच्या हक्काची जी इतकी पायमल्ली होत होती, त्याच्या बुडाशीं आपणांस अप्रिय असलेली गोष्ट कोठेंहि घडूं देऊं नये, असें इच्छिणाऱ्या ब्राह्मणांचें वर्चस्व, हेंच होतें, ही गोष्ट महाराजांच्या लक्षांत येतांच, म्हैसूर सरकार व मुंबई सरकार लिंगायतांच्या विरुद्ध असतांना देखील, महाराजांनीं या मिरवणुकीला परवानगी दिल्यामुळें, ही मिरवणक कोल्हापूर शहरांत १९११ सालच्या मे महिन्याच्या १२ व्या तारखेस पार पडली. शांतताभंग करण्याची दहशत घालणाऱ्या लोकांच्या हातून या प्रसंगीं कोणत्याहि तऱ्हेची अनिष्ट गोष्ट घडली नाहीं. व त्यांच्या धमकावण्या जेथल्या तेथेंच जिरल्या, हें पाहून कर्नाटकांतील लिंगायत जातीला अतिशय आनंद झाला. लिंगायतांच्या मिरवणुकीबरोबर महाराजांचा रिसाला व बँडहि हजर होता. महाराजांनीं जगद्गुरु राहात असलेल्या ठिकाणीं प्रत्यक्ष जाऊन, त्यांचा सत्कार केला. कोल्हापूरमध्यें ही गोष्ट घडल्यानंतर बेळगांवांतील अधिकाऱ्यांनींहि आपला दृष्टिकोन बदलून अथणी, मनोळी व यरगट्टी इत्यादि कित्येक ठिकाणीं व्यासंतोळाच्या मिरवणुकीला परवानगी दिली, ही गोष्ट जातां जातां मला येथें सांगावीशी वाटते.

या काळांत पदव्यांची संस्थानाला समृद्धि झाली. निरनिराळया मार्गांनीं श्रीमंत बापूसाहेब संस्थानाची उत्कृष्ट कामगिरी करीत होते. दाजीपूर येथील महाराणी लक्ष्मीबाई-तलावावरची त्यांची देखरेखहि यामध्यें प्रमुख होती. वर्षारंभाच्या दिवशीं सी० एस्० आय्० ही पदवी त्यांना बहाल करून, सरकारांनीं त्यांच्या या कामगिरीचें चीज केलें. पुढें, ऑर्डर ऑफ् ब्रिटिश एंपायरचेहि त्यांना सभासद करून घेण्यांत आलें. दिल्ली दरबाराच्या वेळीं, जी० सी० आय्० ई० ही पदवी महाराजांना अर्पण करण्यांत आली होती, हें मागें आलेंच आहे. पुढें दोन वर्षांनंतर रावबहादूर सबनीस यांना सी० आय्० ई० या पदवीनें, सरकारकडून विभूषित करण्यांत आलें. एक वर्षानंतर म्हणजे १९१५ सालीं, १०३ मराठा लाईट इन्फंट्रीचे महाराजांना ऑनररी कर्नल करण्यांत आलें.



कोल्हापूरचे पहिले रेसिडेंट डब्ल्यु. बी. वुडहाऊस, सी आय. ई.



कोल्हापूरचे दुसरे रेसिडेंट कर्नल मेरीवेदर, सी. आय. ई.

आतांपर्यंत ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधि ह्मणून कोल्हापुराला पोलिटिकल एजंट राहाण्याची वहिवाट होती, ती बंद होऊन १९११ सालच्या आगष्ट महिन्या-पासून कोल्हापुराला रेसिडेंट राहाण्याची वहिवाट सुरू होऊन, कोल्हापूर दरबाराची इभ्रत बरीच वाढली. छत्रपति महाराजांच्या दरबारीं पहिला रेसिडेंट होण्याचा बहुमान कर्नल एफ्० डब्ल्यु० उड्हाऊस यांना मिळाला. महारा-जांच्या मेहेर नजरेनें हल्लींच्या इचलकरंजीच्या जहागिरदारांना, चीफ् ही पदवी त्यांच्या हयाती पुरती धारण करण्याची परवानगी देण्यांत आली होती; परंतु ते आतां दिलेले खास अधिकार परत घेतल्याच्या हुकुमाची टाळाटाळ करीत होते; परंतु त्यांना तसें करूं दिलें नाहीं. याची हकीकत सरकारी अहवालाच्या शब्दांतच देणें योग्य होईल;--

" फौजदारी बाबींत इचलकरंजीच्या जहागिरदारांना दिलेले जादा अधिकार परत घेतल्याची हकीगत, गेल्या सरकारी अहवालाच्या पहिल्या प्रकरणाच्या एकविसाव्या कलमांत आलीच आहे. जहागिरदारांच्या कोर्टावरील वरिष्ठ कोर्ट या नात्यानें, दरबारानें आपल्या सत्तेचा उपयोग करून, कांहीं विवक्षित कज्जांतील कागदपत्रें मागितलीं व नियतकालिक पत्रकेंहि मागितलीं. रेसिडेंटना मान्य असलेल्या दरबारच्या या हुकमाला जहागिरदारांनीं हरकत घेऊन, जहागिरींतील फौजदारी कज्जाचीं पत्रकें व कागद दरबारला मागतां येणार नाहींत, असें रेसिडेंटसाहेबांकडून दरबारला लिहून जावें ह्मणून, त्यांनीं मुंबई सरकाराला विज्ञप्ति केली. सरकारनें ही विज्ञप्ति अमान्य करून, त्यांना असें कळविलें कीं, " कोल्हापूरच्या दरबारानें आपलें हायकोर्टचे अधिकार ( जहागिरींत ) न चाल-विण्याची जी सवड ठेविली होती, ती १९१० सालच्या जानेवारी महिन्याच्या १३ व्या तारखेस काढून लावण्यांत आली असल्यामुळें, इचलकरंजी जहागिरींत हायकोर्टचे अधिकार चालविण्याची सत्ता दरबारला आहे; ह्मणून विनंति केल्या-प्रमाणें कोल्हापूर दरबारला सल्ला देण्याचा, अगर कोल्हापूर महाराजांच्या खास अधिकारांत हात घालण्याचा प्रसंग उद्भवला आहे असें सरकारला वाटत नाहीं."

आपल्या जहागिरींतील फौजदारी बाबींत कोल्हापूरच्या दरबारनें, हायकोर्ट या नात्यानें चालविण्याच्या अधिकाराची व्याप्ति व त्याची प्रयोजकता या संबंधीं कागल ( धाकटी पाती ) च्या जहागिरदारानें एक प्रश्न उपस्थित करून निर्णयासाठीं तो त्यानें मुंबई सरकारकडे सादर केला. या प्रश्नाचा निकाल

लावतांना सरकारनें आपला असा अभिप्राय दिला कीं, 'सरकारच्या सम्मतीनें १९०४ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या १४ तारखेस, जेव्हां कोल्हापूर दरबारला जहागिरींत हायकोर्टचे अधिकार चालविण्याची सत्ता प्राप्त झाली, तेव्हांपासून खालच्या मॅजिस्ट्रेट लोकांवर हायकोर्ट या नात्यानें चालविण्याचे सर्व अवशिष्ट अधिकार दरबारच्या हातीं आले आहेत.'

या गोष्टीपासून जो योग्य धडा घ्यावयाचा, तो इचलकरंजीच्या जहागिरदारांनीं घेतला नाहीं; तथापि या गोष्टीचा व रेसिडेंट साहेबांनीं दिलेल्या प्रेमाच्या सल्ल्याचा परिणाम सर्वस्वीं निष्फळ होण्यासारखा नव्हता. १९१४ सालच्या मे महिन्यांत ते महाराजांना लिहितात:—

"फौजदारी बाबींतील माझे वरिष्ठ अधिकार काढून घेऊन, चार वर्षांपेक्षां अधिक काळ लोटला. ते परत मिळविण्याची माझ्या अंगीं पात्रता आणण्यासाठीं, मीं शक्य ते प्रयत्न केले व रावबहादूर देशपांडे येथें आल्यापासून, दरबारचा व रेसिडेंट साहेबांचा बराच विश्वास मीं संपादिला आहे असें मला वाटतें. आतां ही गोष्ट सर्वस्वीं महाराजांवर अवलंबून आहे, महाराजांची इच्छा असेल तर, सर्व कांहीं क्षणार्धांतच ठीक होईल. हल्लींच्या लाजिरवाण्या स्थितीमुळें, राज्यकारभारांत बराच प्रत्यवाय येत आहे व या मानहानीचा माझ्या प्रकृतीवरहि बराच परिणाम घडला आहे. मीं व मि० देशपांडे यांनीं, या बाबतींत महाराजांना अनेकदां विनंति केली आहे. माझ्यावरचा हा काळिमा महाराजांना दूर करितां येईल, तर मी फार आभारी होईन. व या मेहेरबानगीबद्दल मी महाराजांशीं सदा कृतज्ञ राहीन."

यावरून जहागिरदारांच्या धोरणांत, इष्ट असा बदल घडून आल्याचें जरी स्पष्ट होतें, तरी याचा व जहागिरदारांच्या कांहीं इतर प्रयत्नांचा महाराजांना मेळ घालितां येईना. महाराजांच्या मनावर सरकारी वजनाचा दाब आणण्यासाठीं ते शक्य तितके प्रयत्न करीत होते, असें ह्मणण्यास जागा आहे; परंतु त्यांच्या इच्छेप्रमाणें आपल्या वजनाचा उपयोग करण्याची सरकारची प्रवृत्ति झाली नाहीं. १९१४ सालच्या सप्टेंबर महिन्यांत, आपण या प्रश्नाविषयीं पूर्णपणें तटस्थ वृत्ति धारण करीत आहोंत, असें सरकारनें महाराजांना स्पष्टपणें कळविलें होतें. गत गोष्टी विसरून जाऊन, जहागिरदारांशीं स्नेह जोडण्याची महाराजांची तयारी होती. महाराज ह्मणतात:—'पंतसचिव' या आनुवंशिक पदवीकडे त्यांचें (इचलकरंजीकरांचें)

लक्ष लागून राहिलें आहे, असें मला त्यांच्या नवीन कारभाऱ्याकडून समजतें. ही पदवी मिळविण्यासाठीं त्यांच्या पूर्वजांनीं प्रयत्न केले होते; परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. भोरच्या जहागिरदारांना देखील ही आकांक्षा उत्पन्न झाली. हा मान मीं जर त्यांना अर्पण केला, तर त्याच्या योगानें त्यांची मर्जी संपादून सरकारशीं व माझ्याशीं त्यांना अनकूल करून घेतां येईल, असें मला वाटलें; म्हणून मीं ही पदवी त्यांना अर्पण केली. एका फौजदारी कामांत त्यांचे कांहीं पोलिस अधिकारी अडकल्यामुळें, त्यांच्यावर खटला करण्यांत आला. या कज्जाचा निकाल त्यांच्या विरुद्ध झाला तर, त्यांच्या पोलिस लोकांचें वजन सर्वस्वीं नाहींसें होऊन, जहागिरदारांच्या इभ्रतीला धक्का पोंचेल, अशी त्यांना धास्ती पडली. सर्व कांहीं त्यांच्या इच्छेनुरूप करून, या प्रकरणाचा समाधानकारक निकाल लाविला." परंतु याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. जहागिरदारांनीं आपला धोपट मार्ग तसाच चालूं ठेविला. पुढें १९१७ सालीं जहागिरदारांनीं महाराजांना फिरून विनंति केली व त्याप्रमाणें इचलकरंजी-विशाळगडच्या जहागिरदारांना परत घेतलेले अधिकार महाराजांनीं फिरून दिले.

या काळांत ब्राह्मणेतरांच्या शैक्षणिक कार्याची प्रगति झपाट्यानें चालली होती. या कार्याचें स्वरूप नजरेस आणण्यासाठीं, नामदेव—वसतिगृह व सरस्वती बाई—सारस्वत—वसतिगृह हीं अनुक्रमें एप्रील १९१५ सालांत उघडण्यांत आलीं, ही गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. इतर ब्राह्मणजातींकडून, पिढ्यानुपिढ्या ज्या जातीवर एकसारखा अन्याय होत होता, अशा ब्राह्मणांपैकींच एका पोटजातीचें हें सारस्वत—वसतिगृह असल्यामुळें, ही संस्था विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. निकृष्ट वर्गाच्या वसतिगृहाची प्रगति मोठ्या झपाट्यानें चालली होती. महाराजांप्रमाणेंच कर्नल उडहाऊसहि अस्पृश्य गणलेल्या लोकांच्या उन्नतीविषयीं पराकाष्टेची कळकळ दर्शवीत होते. या वर्गांत शिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं अस्तित्वांत आलेली संस्था कोल्हापुरांत चांगलीच कामगिरी करीत होती. १९१२ सालच्या एप्रील महिन्यांत, जैन—वसतीगृहाच्या चतुराबाई—हॉलमध्यें, वार्षिक बैठकीच्या वेळीं वाचण्यांत आलेल्या अहवालांत नमूद असल्याप्रमाणें, या सोसायटीचा हेतु " खुद्द निकृष्ट वर्गांतील लोकांमधून, शिक्षित व उदार दिलाचे पुढारी पैदा करणें, " हा होता. ह्या अहवालांत पुढील उल्लेख आहे:—" अद्यापि अज्ञानांत खितपत पडलेल्या या विस्तीर्ण दुर्दैवी समाजाकरितां, कांहीं तरी केलें

पाहिजे. हें कार्य संस्थानानेंच अंगीकृत करण्यासारखें आहे; परंतु शिक्षणाकडे मुलांच्या आईबापांचें लक्ष वेधून, उपयुक्त असें बरेंचसें कार्य खासगी प्रयत्नानेंहि होण्यासारखें आहे. त्यांच्या अंगवळणी पडलेल्या जीवनक्रमापेक्षां, उच्चतर जीवनक्रमाबद्दल त्यांच्यामध्यें आवड उत्पन्न करून, संस्थानांतील शाळांचा फायदा घेण्यासाठीं, या मुलांना उत्तेजन देऊन, अस्पृश्य वर्गांतील विद्यार्थ्यांना प्रेमानें व सदयतेनें वागविण्याची बुद्धि शिक्षक वर्गांत जागृत करून, त्यांच्याकरितां अस्तित्वांत आलेल्या स्वतंत्र शाळांच्या व्यवस्थेंतील दोष, संस्थानच्या योग्य अधिकाऱ्यांच्या नजरेस आणून व इतर मार्गांनीं, या सोसायटीसारख्या खासगी संस्थांच्या हातून, या वर्गांना शिक्षण देण्याच्या संस्थानच्या प्रयत्नांना बरीच मदत करितां येण्यासारखी आहे.'' या वर्गांच्या उद्धारासाठीं महाराज लौकरच जे मोठे उपाय अमलांत आणणार होते, त्यांचा पायाहि अशा संस्थांकडून घालतां येण्यासारखा होता. असेंहि आह्मांस ह्मणतां येईल. एका सुंदर इमारतींत १९१४ सालीं या वसतिगृहाची प्राणप्रतिष्ठा कायमपणें करण्यांत आली; व महाराजांनीं या इमारतीच्या खर्चाची अर्धी रक्कम दिली.

अस्पृश्योद्धाराच्या या मुहूर्तमेढीमुळें कोल्हापुरामध्यें जें कांहीं महत्कार्य घडलें, त्याचें सर्व श्रेय निकृष्ट वर्गांच्या उन्नतीच्या कार्याचा पुरस्कार करण्याच्या कामीं महाराजांनीं जें धैर्य व्यक्त केलें, त्यालाच दिलें पाहिजे. ब्राह्मणांनीं तर या कामीं तिळाइतकेंहि काम केलें नाहीं. कांहीं ब्राह्मणेतरांनीं आपल्यांत मंथरा-संचाराला अवकाश देऊन, आपले प्रतिस्पर्धी ह्मणून मानलेल्या लोकांनीं केलेल्या कार्याची हानि करण्याचाहि प्रयत्न केला. तथापि पुढें महाराजांनीं आपल्या स्वतःच्याच जोरावर हें अस्पृश्योन्नतीचें कार्य नांवारूपास आणिलें.

मागासलेल्या जातींच्या उद्धाराच्या कामीं जरी अशा प्रकारचीं विघ्नें आलीं, तरी या कार्याची गति अशा कारणामुळें कधींच खुंटली नाहीं, हें निर्विवाद आहे. १९११ सालीं राजाराम-हायस्कूलमध्यें शिक्षण घेत असलेल्या एकंदर ५०७ मुलांपैकीं, १५६ मराठे व तत्सम जातीचे विद्यार्थी, ३५ जैन, १४ लिंगायत, २६ महार, १० मुसलमान, यांखेरीज पार्शी व ख्रिश्चन मिळून ३, अशी ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांची संख्या होती. अशा प्रकारें या हायस्कूलमधील विद्यार्थ्यांमध्यें ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांचें प्रमाण शेंकडा सुमारें ५० होतें. या

निरनिराळया जातींच्या लोकांच्या संख्या लक्षांत घेतां, ही प्रगति समाधानकारक होती, असें समजतां येणार नाहीं; तथापि गतकाळांतील प्रगतीच्या मानानें ही प्रगति निःसंशय चांगलीच होती.

या सर्व काळांत महाराजांचें लक्ष भावी योजनेचा विचार करण्यांत गुंतलें होतें. आपल्या संस्थानामध्यें प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याचा विचार, महाराजांच्या मनांत १९१२–१३ च्या सुमारास उदय पावला. १९१२–१३ च्या अहवालांत याविषयींच्या आद्य कल्पनेची पुढील माहिती मिळते:—

"शिक्षणखात्याकडे छत्रपतिमहाराजांचें लक्ष पूर्वीप्रमाणें विशेष वेधलें आहे. दुसऱ्या कोणत्याहि खात्यांत, महाराजांचें इतकें औदार्य दिसून येणार नाहीं. मागसलेल्या वर्गांत शिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं जरी प्रयत्न करण्यांत येत आहेत, तरी आतांपर्यंत झालेली प्रगति महाराजांना समाधानकारक वाटत नाहीं; झणून या प्रगतीच्या हल्लींच्या गतीला चालन देण्याच्या हेतूनें पाया विस्तृत करून, प्राथमिक शिक्षण सर्वांना सुलभ करून देणें, महाराजांना जरूर वाटत आहे. संस्थानांतील प्रत्येक खेडयांत, त्यांतील बहुसंख्यांक जातीच्या इसमांच्या नेतृत्वाखालीं एकेक शाळा असावी, अशी महाराजांची आज्ञा झाली आहे. हें काम करण्यास लायक माणसें मिळावींत झणून, आपल्या नोकरीकरितां इनामें धारण करणाऱ्या आनुवंशिक ग्रामनोकरांच्या यादींत, शाळामास्तरांचीं नांवें दाखल करणें महाराजांना जरुर वाटतें. ही योजना यशस्वी करण्यासाठीं मेहेरबान पिराजीराव घाटगे सी० एस्० आय्० सी० आय्० ई० कागलचे जहागीरदार (मोठी पाती) यांच्या नेतृत्वाखालीं एक कमिटी नेमिली आहे. हे महाराजांचे उजवे हात असून, राज्यकारभाराच्या सर्व खात्यांत सुधारणा घडवून आणण्याच्या कामीं महाराजांना मदत करण्यास त्यांची नेहमीं तयारी व खुषी असते."

१९१३ सालच्या प्रारंभीं ही योजना तयार करण्यांत आली; परंतु वर्ष अखेरपर्यंत तिची विशेष प्रगति झाली नाहीं. पुढें कांहीं वर्षांनीं सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची योजना जी अस्तित्वांत आली, तिला पगारी शिक्षक नेमण्याच्या तत्त्वावरच सुरवात करण्यांत आली.

या सुमारास घरगुती स्वरूपाच्या दोन प्रमुख गोष्टी घडल्या. श्रीमंत बापूसाहेबांची जेष्ठ कन्या म्हणजे महाराजांची पुतणी श्री० (धाकट्या) आक्कासाहेब महाराज यांचें लग्न १९०८ सालीं महाराजांच्या कन्येचें लग्न ज्या थाटानें

झालें, त्याच थाटानें १९१२ सालच्या एप्रील महिन्याच्या २८ तारखेस अक्कलकोटचे राजेसाहेबांशीं झालें. विवाहानंतर लागलींच अक्कलकोटच्या या नूतन राणीसाहेबांना आपलें मातृगृह सोडून, मिस् माक्सन यांच्या देखरेखीखालीं राहावें लागलें. १९१२ सालच्या मे महिन्याच्या २५ तारखेस, कै. राजाराम-महाराजांच्या पत्नी श्रीआजीसाहेब महाराज स्वर्गवासी झाल्या. या बाई चांगल्या सुशिक्षित असल्यामुळें, महाराजांना घरगुती गोष्टींत त्यांचा फार उपयोग होत असे. व त्या कुटुंबांतील वडील माणूस असल्यामुळें, महाराज त्यांना फार मानहि देत असत. त्यांच्या मृत्यूमुळें महाराजांची मोठी हानी झाली. प्रेतसंस्कार वेदोक्त पद्धतीनें करण्यांत आले. सत्यशोधक चळवळ कोल्हापुरांत या वेळीं सुरू होती, तरी नेहमींप्रमाणें हे संस्कार ब्राह्मणांकडूनच करण्यांत आले. यानंतर अवघ्या पंधरवड्यानेंच युवराजमहाराज आपल्या कनिष्ठ बंधूसह विलायतेला निघाले. पुढील प्रकरणांत या संबंधानें आम्ही विस्तारानें लिहूं.

कर्नल उड्हाऊस हे रजेवर इंग्लंडला जाण्याकरितां निघाल्यामुळें, १९१२ सालच्या दुसऱ्या सहामाहीपर्यंत कर्नल मेरी वेदर, हें कोल्हापूरचे रेसिडेंट झाले. महाराजांचा व त्यांचा मोठा स्नेह जमून, नवीन बांधलेल्या क्रिकेट प्याव्हिलियनला महाराजांनीं त्यांचें नांव दिलें.

१९१३ सालच्या मे महिन्याच्या २३ व्या तारखेस, महाराजांनीं संस्थानांतील सर्व इनामें, अविभाज्य ठरविलीं. ही मोठीच क्रांतिकारक सुधारणा होती, यांत शंका नाहीं. अनियंत्रित राज्यपद्धतीखेरीज दुसऱ्या कोणत्याहि राज्यपद्धतींत अशा प्रकारची सुधारणा घडवून आणणें, शक्य झालें नसतें किंवा निदान इतकें सोपें तरी गेलें नसतें. हिंदुस्थानांतील सर्व प्रकारची मिळकत सामान्यपणें जरी विभाज्य गणली गेली आहे व महाराष्ट्रांतील हिंदुधर्म शास्त्राप्रमाणें, कुटुंबांत जन्म घेतलेल्या प्रत्येक इसमाचा, अशा मिळकतीला जरी हक्क पोहोंचतो, तरी वहिवाटीच्या जोरावर कित्येक इनामें ब्रिटिश कोर्टांनीं अविभाज्य ठरविलीं आहेतच. कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या नोकरीबद्दल मुशाहिरा म्हणून प्राचीन नृपतींनीं दिलेल्या इनामांच्या हेतूकडे व स्वरूपाकडे दृष्टि फेकली असतां, या इनामाचे लहान लहान तुकडे होऊन, ती बेकिफायत-शीर न होतील, अशी व इनामदार लोक दात्यांच्या आद्य हेतूंकडे या इनामांचा उपयोग करण्यास असमर्थ न होतील, अशी सरकारानें अगर जनतेनें तजवीज

करणें योग्य दिसतें. ज्येष्ठ पुत्रास सर्व वारसा यावा हें महाराजांचें ध्येय असावेंसें दिसतें. अशा प्रकारच्या क्रांतिरूप प्रयत्नांचे दोष कसेहिं असोत, महाराजांनीं इच्छिलेली सुधारणा सर्वांच्याच अत्यंत हिताची होती. या इनामांतील हिस्से—बहुधा हे हिस्से बेकिफायतशीर होतील इतके लहान असतात-धारण करणारे लोक ऐदी व डौली बनून, नवीन उद्योग धंद्यांत लक्ष घालण्याकडे त्यांची सहसा प्रवृत्ति होत नाहीं. परसांतील पोपयांच्या झाडाचीं फळें वांटून घेण्यासाठीं, आपापसांत भांडणाऱ्या इनामदारांच्या एका बड्या घराण्यासंबंधीं, एक दंतकथा सांगतात. या झाडाची वांटणी करून घेणें अशक्य होतें, ह्मणून या झाडाच्या फळांसंबंधानें यांच्यामध्यें सदा भांडण जुंपे व झाडाला दुसरे वर्षी नवीन फळ येईतोंपर्यंत हें जुनें भांडण चालू राही. सर्वांशीं सख्य असलेल्या मध्यस्थाची मदत हे तंटे मिटविण्यासाठीं घेण्यांत आली. सामोपचारानें त्यांच्यामधील मतभेद दूर करण्याचे त्यानें शक्य तितके प्रयत्न केले; परंतु त्याचा कांहीं एक उपयोग न होतां, त्यांच्यामधील ही यादवी पुढें तशीच चालू राहिली. हें पाहून, त्या तिऱ्हाइतानें एके दिवशीं मध्यरात्रीं तें झाड मुळासह तोडून टाकिलें! दुसरे दिवशीं जेव्हां तो जागा झाला, तेव्हां त्याच्या अपेक्षेप्रमाणें हे भांडखोर भाऊबंध आपल्या पोटापाण्याचा मार्ग पाहाण्यासाठीं आपल्या पुर्वजांचें घर सोडण्याच्या तयारींत असल्याचें त्याला आढळून आलें. त्यांचें भांडण आतां मिटलें असल्यामुळें, त्या ठिकाणीं कुजत पडण्याचें त्यांना कारण राहिलें नाहीं! महाराजांनीं या उदाहरणाचें अनुकरण केलें व त्यांनीं इनामें अविभाज्य ठरवून, ऐदीपणाचें कारण काढून टाकलें! अशा प्रकारें, इनामाचा आद्य हेतु पार पाडण्यास इनामदारांचा मार्गहि त्यांनीं खुला केला.

मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नरसाहेब नेक नामदार लॉर्ड बुइलिंग्डनसाहेबांनीं १९१३ सालच्या नोव्हेंबरच्या २३ व्या तारखेस कोल्हापुराला आपल्या भेटीचा लाभ दिला. या प्रकरणाच्या प्रारंभीं उल्लेख केलेल्या दर्शनी पुतळ्यांचें अनावरण करणें हा या भेटीचा मुख्य उद्देश होता. पुतळ्यांचें अनावरण करतांना नेक नामदारसाहेब ह्मणालेः—

" आपण माझें जें आज प्रेमानें स्वागत केलें, त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. आपल्या प्रजाजनांना सुकाळ होईल, अशी आपली अपेक्षा असण्याच्या सुमारास, माझें येथें आगमन झालें, हें पाहून मला आनंद झाला.

यापूर्वीच आपल्या संस्थानाला भेट देण्याची माझी फार इच्छा होती. कारण आपल्या नेहमींच्या चिकाटीच्या पाठिंब्याचें व तद्विषयक आपल्या राजनिष्ठेचें महत्त्व ब्रिटिश सरकारला किती वाटत आहे, हें सरकारतर्फे या इलाख्याचा अधिपति या नात्यानें व्यक्त करण्यास मी फार दिवसांपासून आतुर झालों होतों. गतकालीन आणीबाणीच्या प्रसंगीं व या इलाख्यांतील चळवळीच्या अलिकडील धामधुमीच्या काळीं, आपला व आपल्या कुटुंबांतील माणसांचा आमच्या बादशहाला व त्यांच्या राज्यव्यवस्थेला मोठा पाठिंबा मिळत आला आहे, ही गोष्ट ऐकून मला मोठें समाधान वाटत आहे; व आपणालाहि ही गोष्ट मोठी अभिमानास्पद वाटेल. आपण सर्वदा व्यक्त केलेली चोख राजनिष्ठा ब्रिटिश सरकार कधींच विसरणार नाहीं."

१९१४ सालाच्या प्रारंभीं कोल्हापूरला आणखी एक आलेले प्रसिद्ध पाहुणे म्हणजे श्री तुकोजीरावमहाराज होळकर, हे होत. छत्रपति व इंदूर महाराज यांच्या नवीन मित्रत्वाचा हा केवळ प्रारंभ असून, त्यापासून अनेक हितप्रद गोष्टी घडून येतील, अशी सर्वांस अपेक्षा होती. त्यांच्या दर्जाला उचित अशा बहुमानानें, महाराजांनीं त्यांचें स्वागत केलें. छत्रपति घराण्याला आपण कोणत्या प्रकारें मान देणें उचित आहे, याची या पाहुण्यांनाहि जाणीव नव्हती असें नाहीं. होळकर महाराजांच्या सन्मानार्थ महाराजांनीं १९१४ एप्रील महिन्याच्या २७ व्या तारखेस नवीन राजवाड्यांत खास दरबार भरविला. प्रमुख जहागिरदार, सरदार, अधिकारी वर्ग यांच्यासमवेत महाराजांनीं तुकोजीराव होळकर महाराजांचें योग्य शब्दांत स्वागत केलें. या स्वागतपर भाषणास उत्तर देतांना, होळकर महाराजांनीं आपलें अंतःकरण मोकळें करून पुढील प्रमाणें भाषण केलें:--

"महाराज, जहागिरदार, सरदार, सभ्य स्त्रिया व गृहस्थ हो, दरबारी थाटानें माझें जें आदरातिथ्य करण्यांत आलें, माझ्या करमणुकीसाठीं व माझ्या समाधानासाठीं जी उत्तम व्यवस्था ठेवण्यांत आली व माझ्या येथील आगमनाचा जो प्रेमळ शब्दांत उल्लेख केला गेला, याबद्दल महाराजांचे मोठ्या प्रेमानें मी आभार मानितों. आपल्या इतिहासप्रसिद्ध राजधानीला मीं भेट द्यावी म्हणून, महाराज! आपलें जेव्हां आमंत्रण मला मिळालें, तेव्हां तें एक माझ्या खास मित्राकडून आलेलें निमंत्रण समजून त्याचा मीं स्वीकार केला, परंतु ज्या

भावनेमुळें हा माझा निश्चय ठरला तिचीं मुळें फार दूरवर गेलीं होतीं. छत्रपतींचें प्रख्यात घराणें व होळकरचें घराणें यांच्यामधील ऋणानुबंध इतके प्रसिद्ध आहेत कीं, त्यांची येथें द्विरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं. जरी काळ बदलला आहे, बदलत आहे व आमचे संबंधहि बदलले आहेत, तथापि मी व त्याचप्रमाणें प्रत्येक मराठा, मग त्याचा दर्जा कोणत्याहि तऱ्हेचा असो, या घराण्याच्या प्रतिनिधीकडे राजनिष्ठेच्या, प्रेमाच्या व आदराच्या भावनेनें पाहिल्याखेरीज राहणार नाहीं. याच दृष्टीनें मीं आपलें निमंत्रण स्वीकारून, ज्याप्रमाणें एकादा मनुष्य आपल्या आराध्य देवतेला प्रणिपात करण्यासाठीं यात्रेला निघतो व आपलें मन व शरीर पूनीत करून, आपल्या मायभूमीला परत जातो, त्याचप्रमाणें मी येथें आलों.

" माझ्या सुदैवानें ज्या कांहीं मनोरंजक गोष्टी मीं येथें पाहिल्या, त्यांपैकीं शेतकीप्रदर्शन ही एक होय. याचा येथें उल्लेख केल्याखेरीज माझ्यानें राहवत नाहीं. महाराज! आपल्या समवेत मीं या प्रदर्शनाला भेट दिली व त्या ठिकाणीं यशस्वी प्रतिस्पर्ध्यांना बक्षिसें वांटण्यास मला आपण सांगितलें. हें पहिलेंच वर्ष आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन, हें प्रदर्शन मोठें यशस्वी झालें, असें मला वाटतें. महाराज! आपल्या संस्थानांत ही गोष्ट प्रत्येक वर्षी घडून येऊन, शेतकरी वर्गावर व त्यांच्या कृषिकर्म पद्धतीवर तिचा सुपरिणाम घडून येईल, अशी मला आशा आहे. अशा संस्थांशीं संबंध ठेवल्यानें मला फार आनंद होतो. ब्रिटिश सरकारच्या कृपेमुळें या देशांत अशा गोष्टींची वाढ हळुहळू होत आहे.

" कुस्त्या, हत्तींच्या टकरा व डुकरांची शिकार यांच्यायोगें देखील माझ्या करमणुकींत चांगलीच भर पडली. आमच्या येथील मुक्कामाचा प्रत्येक क्षण आनंदानें गेला व महाराज! आपल्या औदार्य व कनवाळुपणाबद्दलच्या अपरिमित कृतज्ञतेच्या भावनेनें या भेटीची आम्हीं आठवण करूं, हें महाराज, आपणांस व महाराणीसाहेबांस मी खात्रीपूर्वक सांगतों. आमच्या प्राचीन अविनाशी ऋणानुबंधांत या भेटीनें चांगलीच भर पडेल."

उपरिनिर्दिष्ट प्रदर्शन एप्रीलच्या ८ व्या तारखेपासून, १६ तारखेपर्यंत संपूर्ण एक आठवडा खासबागेच्या मैदानांत भरलें होतें. या अवधींत ज्योतीबाच्या यात्रेच्या निमित्तानें, महाराष्ट्रांतील सर्व भागांतून हजारों मराठे शेतकरी कोल्हापुरास आले होते. १९१४ सालीं त्या वेळचे पोलिटिकल सेक्रटरी

मि० रॉबर्ट्सन यांच्या हस्तें हें प्रदर्शन उघडण्यांत आलें, व इंदूरच्या महाराजांच्या हस्तें बक्षिसें वाटण्यांत आलीं.

महाराजांच्या स्वभावांत आपल्या पूर्वजांविषयीं पूज्य भक्ति प्रामुख्यानें वसत असल्यामुळें, कराची येथें आपणाकरितां थोडीशी जागा पैदा करावी ह्मणून, कर्नल उडहाऊस यांना महाराजांनीं विनंति केली. बुवासाहेबमहाराजांचे बंधु कै० चिमासाहेबमहाराज यांची एक छत्री बांधण्याची महाराजांची इच्छा होती. सिंधमधील कमिशनरच्या मेहेरबानगीनें कर्नल उडहाऊसनीं जरूर असलेली जागा पैदा केली. व तेथें छत्री बांधण्यांत आली. पूर्व वहिवाटीला अनुसरून पादुकांची पूजा करण्याची तरतूदहि महाराजांकडून करण्यांत आली.

१९१२ सालच्या अक्टोबर महिन्यांत, महाराजांच्या घशांत कांहीं रोग उद्भवून, त्या महिन्याच्या ७ व्या तारखेस डॉक्टर वॉनलेस यांच्या हातून त्यावर शस्त्रक्रिया करण्यांत आली. महाराजांनीं आपणांवर क्लोरोफार्मचा प्रयोग करूं न दिल्यामुळें, हा शस्त्रप्रयोग महाराजांच्या पूर्ण सावधान स्थितींत करावा लागला. शस्त्रक्रिया चालू असतां झालेल्या मरणप्राय वेदना, महाराजांनीं मोठ्या धैर्यानें सहन केल्या. तथापि त्यांना झालेल्या वेदनांची तीव्रता कोणत्याहि प्रकारें कमी नव्हती. आक्टोबर महिन्याच्या २१ व्या तारखेस मि० हिल साहेबांना महाराज लिहितातः—

" माझ्या शस्त्रक्रियेचे परिणाम मला अद्याप भोगावे लागत आहेत. ती शस्त्रक्रिया नसून, ती एक प्रकारची कसाबगिरीच होती; कारण मला क्लोरोफार्म देणें त्यांना शक्य नसल्यामुळें खुर्चीवर बांधून सुमारें २० लोकांनीं मला घट्ट धरिलें. मी मोठमोठ्यानें ओरडलों; परंतु व्यर्थ. कसेंबसें आतां मला बरें वाटतें. "

पुढें एका वर्षानंतरहि महाराजांच्या प्रकृतींत विशेष फरक पडला नाहीं. १९१३ सालच्या आगष्ट महिन्याच्या २८ व्या तारखेस महाराज लिहितात :—

" येथील कांहीं डॉक्टर लोकांना मीं माझी प्रकृति दाखविली. माझी परीक्षा करून, स्थिति फार भयंकर आहे, असें ते सांगतात. त्यांचा अभिप्राय घेऊन, मी मिरजेला लवकरच परत जाणार आहे. डॉक्टर व्हेल हे औषधोपचार करतील. मला मोठी हुषारी वाटते, ह्मणून डॉक्टर लोकांच्या धमकावणीचा मला राग येतो. मीं विलायतेला जावें, ह्मणून कांहीं जण मला सल्ला

देत आहेत. त्यापासून कांहीं विशेष फायदा होईल, असें मला वाटत नाहीं. मला येथेंच बरें वाटेल व खर्चाचा प्रवास करण्याच्या कामीं पैशाचा दुरुपयोग करूं नये, असें मला वाटतें."

दुर्दैवानें डॉक्टर लोकांचा उपहास करण्याची व त्यांचा सल्ला तुच्छ लेखून, प्रकृतीच्या बाबतींत आपणांस योग्य वाटत असलेला मार्गच स्वीकारण्याची महाराजांची प्रवृत्ति कधींच निघून गेली नाहीं. डॉक्टर लोकांच्या सल्ल्याकडे दुर्लक्ष करून, आपल्या प्रकृतीवर स्वतःच प्रयोग करण्याचा क्रम त्यांनीं चालूंच ठेविला होता. महाराजांच्या शरीररचनेंत, जोंपर्यंत कोणत्याहि प्रकारचा दोष उत्पन्न झाला नव्हता, तोंपर्यंत हें ठीक चाललें; परंतु आतां अशी वेळ आली होती कीं, या वेळीं जर त्यांनीं डॉक्टर लोकांच्या सल्ल्याला मान दिला असता, तर कदाचित त्यापासून त्यांचें हित झालें असतें; पण उपास तापास, भर दोन प्रहरीं हिंडणें, पावसाळ्याच्या अगर थंडीच्या दिवसांतहि उघड्या जंगलांत मुक्काम करणें अशा प्रकारच्या संवयी महाराजांनीं पूर्ववत् चालूं ठेविल्या. अशा उपायांनीं आपली प्रकृति सुधारत आहे, असें त्यांना वाटे; परंतु १९१३ सालच्या अखेरीला आपली प्रकृति अधिकच बिघडल्याचें त्यांना आढळून आलें. ते ह्मणतातः—

"आपणांस भेटण्यास येण्याचा माझा विचार होता; परंतु तसें मला आतां करितां येत नाहीं, याबद्दल मला फार वाईट वाटत आहे. माझ्यावर पुनः शस्त्रक्रिया करण्यांत आली आहे. व आतां जीवित हें मला ओझें वाटूं लागलें आहे. रक्तस्राव भयंकर झाला. हा रक्तस्राव सुमारें ३ पासून ४ पिंटपर्यंत झाला व मला मूर्च्छा आली. मला फार अशक्तता वाटत आहे. माझी प्रकृति केव्हां बरी होईल हें मला कळत नाहीं."

डॉक्टर व्हेल हे कोल्हापुरांत असणें अत्यंत जरूर आहे, असें याच वेळीं महाराजांना वाटलें; परंतु मीं मागें सांगितल्याप्रमाणें कायमपणें महाराज त्यांना कोल्हापुरांत आणवूं शकले नाहींत.



## प्रकरण १८ वें.

# सत्यशोधक समाज

## व

# कुमारांचें इंग्लंडांतील शिक्षण.



९१० सालच्या समाप्तीबरोबरच महाराजांच्या आयुष्यांतील, ब्राह्मणेतर चळवळीच्या पहिल्या भागाची समाप्ति झाली. सामाजिक सुधारणेच्या कामीं महाराजांनीं या कालांत जरी आपलें पाऊल बरेंच पुढें टाकिलें, तरी पूर्वपरंपरागत हिंदु सामाजिक व्यवस्थेंत ब्राह्मणेतरांचा जो दर्जा नष्ट झाला होता, तो परत मिळावा या पलीकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं. पुराणप्रणीत वर्णव्यवस्था मान्य करूनच, महाराज आतांपर्यंत ब्राह्मणांशीं सामना देत होते. ज्या क्षत्रिय वर्गापैकीं आपण आहोंत, ह्मणून महाराज प्रतिपादन करीत असत, त्या क्षत्रिय वर्गांना या समाजव्यवस्थेंत दुय्यम स्थान दिलें गेलें होतें. महाराजांची ही अल्पसंतुष्टपणाची व निरुपद्रवी मागणी पाहून, एकाद्या दूरदृष्टी ब्राह्मणाला आनंदाच्या उकळ्या फुटल्या असत्या; व महाराजांसारख्या समाज सुधारकाची ब्राह्मणांपेक्षां कमी प्रतीचा दर्जा स्वीकारण्याची तयारी पाहून, त्याला आंतल्या आंत गुदगुल्या झाल्या असत्या. ब्राह्मणांच्या कारवाईनें अस्तित्वांत आलेल्या धार्मिक पायावरच्या सामाजिक व्यवस्थेंतील श्रेष्ठत्व ब्राह्मणांना तसेंच उपभोगूं देऊन, या व्यवस्थेंतील दुय्यम स्थान स्वीकारण्यांतच संतोष मानावा, एवढीच या काळच्या ब्राह्मणेतर चळवळीची महत्वाकांक्षा होती. ब्राह्मणांच्या सहजलब्ध श्रेष्ठत्वाचें उच्चाटन करणें अद्याप शक्य नव्हतें. हिंदुसमाजाची धार्मिक उन्नति घडवून आणण्याचा हक्क सर्वतोपरी अद्याप ब्राह्मणांचाच होता. महाराजांची येथवरची मागणी-अर्थात् ही मागणी ब्राह्मणांच्या श्रेष्ठत्वाला बाधक अशी कधींच झाली नसती-योग्य किंवा अयोग्य ठरविण्यासाठीं ब्राह्मणांनाच विनंति करणें

त्यांना भाग असें. आतांपर्यंतच्या ब्राह्मण-ब्राह्मणेतरांच्या लढ्यापासून ब्राह्मणांना कोणत्याहि तऱ्हेचा अपाय घडण्यासारखा नव्हता. या लढ्यांत क्षत्रियांना जर यशःप्राप्ति झाली असती, तर बऱ्या वाईट अगर बेपर्वाई वृत्तीच्या ब्राह्मणांची वेदोक्त पद्धतीनें पूजा करून, स्वतःला पूनित करून घेण्याचें समाधान ब्राह्मणेतरांना प्राप्त झालें असतें. ब्राह्मणांच्या कुत्सित वासनेप्रमाणें या लढ्यांत ब्राह्मणेतरांना जर अपयश आलें असतें; तरी देखील स्वतःस क्षत्रिय ह्मणविणाऱ्या लोकांना ब्राह्मणांपेक्षां हीनतर दर्जाच प्राप्त झाला असता. एकूण महाराज क्षत्रिय ठरोत अगर शूद्र ठरोत, ब्राह्मणांचा पाय ब्राह्मणेतरांच्या मस्तकीं हा राहाणारच, अशी या चळवळीची येथपर्यंत स्थिति होती.

आतांपर्यंतच्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर लढ्याची अशा प्रकारची लंगडी बाजू असूनहि, ब्राह्मणांपेक्षां कमी योग्यतेचा दर्जा स्वीकारून, ब्राह्मणेतरांना जो आनंद होणार होता, तोदेखील त्यांना उपभोगूं देण्याची ब्राह्मणांची तयारी नव्हती ! त्यांनीं महाराजांच्या अत्यंत नम्र अशा आकांक्षानांहि कसून विरोध केला. ब्राह्मणांच्या अंगीं थोडीशी तरी धूर्तता असती, तरीदेखील पुढची चळवळ मुळांतच खुडून टाकण्याचें श्रेय त्यांच्या पदरीं पडलें असतें. या चळवळीची लंगडी बाजू ब्राह्मणेतरांच्या निदर्शनास पुढें लौकरच येऊन, यापेक्षांहि अधिक स्वाभिमानपूर्ण व शिष्टमान्य दर्जा प्राप्त करून घेण्याची त्यांना इच्छा उत्पन्न झाली. एखादा तत्त्वनिष्ठ मनुष्य ज्या कार्यासाठीं आपलें रक्त सांडतो, त्या कार्याच्या यशाला त्याचा हा आत्मयज्ञच कारणीभूत होतो, असें इतिहास सांगतो. याच न्यायानें या लढ्यांतदेखील, ब्राह्मणांच्या हेकेखोरपणामुळेंच ब्राह्मणेतरांना यशःप्राप्ति झाली.

मीं मागें सांगितल्याप्रमाणें सत्यशोधक चळवळीचा उपक्रम तिच्या उत्पादकांकडून १८७३ सालीं झाला; परंतु १८९० सालीं जेव्हां फुले कैलासवासी झाले, तेव्हांपासून पुढें कित्येक वर्षेंपर्यंत आपल्या अस्तित्वाची जाणीव उत्पन्न करून देण्याचें या चळवळींत सामर्थ्य राहिलें नव्हतें. जोतीरावांच्या पश्चात् त्यांचे जे अनुयायी राहिले, ते तसेंच तत्वनिष्ठ राहिले व पुण्याच्या डॉक्टर विश्राम रामजीसारख्या लोकांच्या नेतृत्वाखालीं या चळवळीनें बराच जोम दाखविला; परंतु हा जोम फार दिवस टिकला नाहीं. प्रतिक्रियेच्या लाटा इतक्या उसळत होत्या कीं, त्यांच्यापुढें कशाचाहि टिकाव न लागल्यामुळें, सत्यशोधक चळवळीला

दूरदूरच्या खेड्यांचा आश्रय करावा लागून तेथेंहि तिला उपहास व निर्भत्सना सहन करावी लागली. ब्राह्मण उपाध्यायाच्या मदतीशिवाय धार्मिक विधी करण्याचा जेव्हां कांहीं जणांनीं आग्रह धरिला, तेव्हां जोशाला न बोलावितां धार्मिक विधी न करण्याबद्दल ताकीद व्हावी, व दुसऱ्या कोणीं मनुष्यानें हे विधी केल्यास त्याबद्दलची नुकसानभरपाई मिळावी ह्मणून भिक्षुकांनीं दावे केले. मोठे समाज सुधारक ह्मणून प्रसिद्ध असलेले रानडे हे त्या वेळीं नुसते खालच्या दर्जाचें न्यायाधीश होते. यांनीं भिक्षुकांच्या दोन्ही प्रकारच्या मागण्या मान्य केल्या. हिंदुस्थानांतील सामाजिक व धार्मिक सुधारणेच्या चळवळीचा खरा हितचिंतक, तत्त्ववेत्ता व मार्गदर्शक ह्मणून समजले गेलेल्या या थोर पुरुषाला आपल्या हातून कशा प्रकारची गोष्ट घडत आहे याची हा निकाल देतांना जाणीव झाली नाहीं हें आश्चर्य आहे. इतर प्रांतांतील हायकोर्टांनीं अशा प्रकारच्या गोष्टींत हात घालण्याचें यापूर्वींच नाकारिलें होतें. कर्मठपणाचें केंद्रस्थान गणलेल्या मद्रास प्रांताच्या हायकोर्टाकडे देखील आपल्या हक्कांना कायद्याचें पाठबळ मिळावें, ह्मणून मुंबई इलाख्यांतील भिक्षुकांप्रमाणेंच तेथील भिक्षुकांनींहि मागणी केली होती. तथापि मद्रासी ब्राह्मणांमधून देखील, अशा अन्यायी मागणीचा पुरस्कार न करण्याइतकें मनोधैर्य असलेले न्यायाधीश निर्माण झाले. मद्रास हायकोर्टच्या ब्राह्मण न्यायाधीशांनीं आपला अभिप्राय स्पष्टपणें असा दिला कीं, " पुरोहितपणाचा हक्क कोर्टांनीं मान्य करूं नये व अशा प्रकारचा हक्क कबूल करणें हें सार्वजनिक धोरणाच्या विरुद्ध आहे; " परंतु मुंबई इलाख्यांतील सुधारकाग्रणी हे त्या वेळीं सुदैवानें खालच्या कोर्टांतीलच न्यायाधीश होते. यांनीं पुरोहिताचा हक्क मोडल्याबद्दल नुकसान भरपाई मागण्याचा पुरोहिताचा हक्क कबूल केला, इतकेंच नव्हें तर आनुवंशिक ब्राह्मण उपाध्यायाखेरीज कोणाकडून विधि करून घेऊं नये, ह्मणून हिंदूंना ताकीद देण्याचाहि हुकूमनामा केला. अशा प्रकारचे प्रश्न मुख्यत: ब्राह्मणेतरांच्या बाबतींतच उद्भवत असत. मुंबईचें हायकोर्ट हें यूरोपीयन न्यायाधीशांनीं अधिष्ठित असल्यामुळें, पुण्यांतील ब्राह्मणांपैकीं सर्वोत्तम गणलेल्या ब्राह्मणापेक्षांहि त्यांची न्यायप्रियता या वेळीं उच्चतर ठरली; मात्र उपाध्यायांच्या हक्कांचें जेथें उल्लंघन घडेल, तेथें नुकसानभरपाई करून देण्याची भिक्षुकांची मागणी कबूल करणें, कायद्यानें योग्य आहे असें हायकोर्टनें ठरविलेंच. इंग्लिश न्यायाधीशांनीं हा जो ठराव दिला, यांतहि अन्याय होता. उपाध्याय हे बहुधा आपल्या कामास गैरलायक असतात, या गोष्टीकडे या

ठरावांत दुर्लक्ष करण्यांत आलें. ते केव्हां केव्हां दुराचरणीहि असून, त्यांच्याकडून धार्मिक विधी करून घेणें ह्मणजे खुद्द ब्राह्मणी शास्त्रांच्याहि आज्ञेचें उल्लंघन करण्यासारखें असतें. या शास्त्रांत आनुवंशिक हक्कानें एकाद्या उपाध्यायाची पात्रता ठरते, असें कोठेंहि सांगितलें नाहीं. उलट दुराचरणी उपाध्यायाकडून धार्मिक विधी करून घेऊन, त्यांना दान दिलें तर यजमानाला नरकवास भोगावा लागतो, अशी या शास्त्रांची स्पष्ट अनुज्ञा आहे. या ठरावानें भिक्षुकांच्या ज्या हक्काचा पुरस्कार करण्यांत आला, तो हक्क पुष्कळ ब्राह्मणेतरांना व कांहीं ब्राह्मणांना देखील जाचक झाला. या ठरावामुळें भिक्षुकांना आपल्या यजमानाला शूद्र लेखणें सोपें झालें.

या अन्यायाची जाणीव ब्रिटिश न्यायाधीशांनादेखील कां झाली नाहीं ? या कज्ञानंतर अशाच बाबतींत हायकोर्टानें जे ठराव केले आहेत, त्यांवरून या ठरावाच्या अन्यायाची जाणीव त्यांना होती, यांत शंका नाहीं. परंतु या अन्यायाचें स्पष्टपणें परिमार्जन करण्याचें त्यांना धैर्य झालें नाहीं. पेशव्यांनीं आपल्या सत्तेच्या जोरावर हिंदु समाजाच्या मानगुटीवर भिक्षुकशाहीचें भूत जें बसविलें, त्याची शक्ति आतां कमी पडत चालली असली तरी, तें अजीबात गाडून टाकणें त्यांना शक्य वाटलें नाहीं.

या अन्यायाची जाणीव ब्रिटिश न्यायाधीशांना देखील कां झाली नाहीं ? या कज्ञानंतर अशाच बाबतींत हायकोर्टानें जे ठराव केले आहेत त्यावरून या ठरावाच्या अन्यायाची जाणीव त्यांना होती, यांत शंका नाहीं. परंतु या अन्यायाचें स्पष्टपणें परिमार्जन करण्याचें त्यांना धैर्य झालें नाहीं. पेशव्यांनीं आपल्या सत्तेच्या जोरावर हिंदु समाजाच्या मानगुटीवर भिक्षुकशाहीचें भूत जें बसविलें, त्याची शक्ति आतां कमी पडत चालली असली तरी, तें अजिबात गाडून टाकणें, त्यांना शक्य वाटलें नाहीं. इतर ब्राह्मण जातीचे देखील जोशी काढून टाकून आपल्या चित्पावन जातींतील जोशी इतर ब्राह्मणांवरहि लादण्याचे प्रयत्न पेशव्यांनीं केल्याचीं उदाहरणें कांहीं थोडींथोडकीं नाहींत. या देशांत ब्रिटिशांचें राज्य झाल्यानंतर देखील, ब्राह्मणेतर लोक ब्राह्मणांच्या वर्चस्वाला न कळत बळी देण्याचा प्रघात चालूंच राहीला. सदर दिवाणी अदालतीच्या ब्रिटिश न्यायाधीशांना सल्ला देण्यासाठीं नेमलेल्या ब्राह्मण शास्त्र्यांनीं दिलेल्या माहितीप्रमाणें असल्या प्रश्नांचे हे न्यायाधीश निकाल देत. शिवाय जोशी हक्काबद्दल या अदालतींत प्रारंभीं जे कज्जे आले त्यांत वादी प्रतिवादी दोघेहि बहुतेक ब्राह्मणच होते, ही त्यांतल्या त्यांत मोठी

दुर्दैवाची गोष्ट होती. अगदीं प्रथमच्या कज्जांत यजमान व उपाध्याय यांच्या एकमेकांच्या हक्काबद्दलचा प्रश्न न्यायाधीशासमोर कधींच उद्भवला नव्हता. एखाद्या खेड्यांतील आपल्या हक्काचें, प्रतिवादी जोशानें उल्लंघन केलें अशा अर्थाची एका जोशाची दुसऱ्या जोशाविरुद्ध या कज्जांत तक्रार असे. या परिस्थितींत हक्कदार जोशाच्या हक्कांत परक्या जोशानें हात घालणें योग्य नव्हे, असें या न्यायाधीशांना साहाजिक वाटलें. सत्यशोधक चळवळीचा उदय होईतोंपर्यंत, या कज्जामध्यें यजमानांच्या आवडीनिवडीचा कधीं प्रश्नच उद्भवला नव्हता; परंतु या अवधींत अदालत कोर्टाकडून कांहीं काल्पनिक धार्मिक गोष्टी कायदेशीर म्हणून ठरविल्या गेल्यामुळें, उपाध्यायाचे हक्क स्थावर इस्टेटीच्या स्वरूपाचे समजून, त्यांचें संरक्षण करण्यांत येऊं लागलें. या न्यायाधीशांना हिंदु समाजाच्या निर्बंधांचें जर यथार्थ ज्ञान असतें, तर-हे निर्बंध ब्रिटिश न्यायासनासमोर जितके कडक मानण्यांत येत, तितके ते निदान खास नव्हते-अगर कोर्टांतील पंडितांच्या नेतृत्वाखालीं स्वतंत्र विचार करण्याची त्यांना जितकी मोकळीक होती, त्यापेक्षां जर त्यांना अधिक मोकळीक असती, तर हा प्रमाद त्यांच्या हातून सहसा घडला नसता. कित्येक जातींनीं विशेषत: लिंगायत जातींनीं आपल्या समाजांतील ब्राह्मण उपाध्याय वर्ग काढून टाकून त्यांच्या ठिकाणीं आपल्या जातीचेच उपाध्याय नेमिले. जनतेच्या भावनेला मान दिला जाणाऱ्या हिंदु राज्यांत ही गोष्ट करणें त्यांना शक्य झालें. कोल्हापुरांत ब्राह्मण उपाध्याय १८४० च्या सुमारास जैनांवर लादण्याचा संस्थानचा विचार होता; परंतु बरीच भवति न भवति होऊन, ब्राह्मण उपाध्यायाच्या हक्कांचें उच्चाटन करण्याच्या कामीं जैन लोक यशस्वी झाले. सामान्य कायद्यांचे ठराव सर्वांना बंधनकारक लेखण्याच्या ब्रिटिश विचारसरणीमुळें, नाखूष असलेल्या यजमानांवर देखील ग्रामोपाध्यायाच्या हक्कांची अमल बजावणी करणें योग्य आहे, असें मुंबई हायकोर्टाला वाटलें. सत्यशोधक तर ब्राह्मण उपाध्यायांचीं मुळें खणून काढण्याचे प्रयत्न करीत होते. सुशिक्षित ब्राह्मणेतरांची संख्या फारच थोडी होती. जे कांहीं सुशिक्षित होते, त्यांच्यामध्यें उपाध्याय वर्गाची सत्ता अबाधित राखण्याच्या कर्मठ अगर अकर्मठ ब्राह्मणांच्या प्रयत्नाला विरोध करण्याचें सामर्थ्य नव्हतें, अगर ते देखील धर्मभोळेच होते. अशा प्रकारच्या वातावरणांत मुंबई हायकोर्टानें ब्राह्मणांचे हक्क अंशत: मान्य केले हें आश्चर्य नाहीं.

ब्राह्मण उपाध्यांना न बोलावितां आपल्याच जातीच्या इसमाच्या मदतीनें ब्राह्मणेतरांनीं केलेले लग्नासारखे समारंभ या ठरावांनीं बेकायदेशीर अगर रद्द ठरविले नाहींत हें ब्राह्मणेतरांचें मोठें भाग्य होय! या ठरावामुळें अतिशय अपमानास्पद असा दंड मात्र ब्राह्मणेतरांवर लादला गेला. केवळ दंडावरच भागल्यामुळें सत्यशोधक चळवळीला आपला जीव तरी धरून राहातां आलें. वेदोक्ताचा वाद निमाल्यानंतर हिंदु समाज—व्यवस्थेंतील जे दोष सर्भोवार प्रचलित होते, त्यांचें निराकरण करण्याचा यशस्वी असा उपाय शोधून काढण्याचा विचार कोल्हापुरांतील ब्राह्मणेतर करूं लागले. सत्यशोधक चळवळीचें पुनरुज्जीवन करणें, हाच या बिकट परिस्थितींतून निभावण्याचा मार्ग आहे असें त्यांना वाटलें. राजवाड्यांतील नोकरीबद्दल उपाध्यायांना ज्या उदार देणग्या देण्यांत आल्या होत्या, त्या परत घेण्याची त्यांना भीति घालून महाराज आपणांस हवे ते विधी त्यांच्याकडून करवून घेऊं शकत यांत शंका नाहीं. परंतु सामान्य स्थितींतील मराठे व तत्सम जातींतील लोकांच्या हातीं आपल्या इच्छेनुरुप गोष्टी घडवून आणण्याची सत्ता अगर पैशाचा लोभ दाखवून कांहीं ब्राह्मणांना आपल्या पक्षाला ओढण्यास त्यांच्याजवळ संपत्तीहि नव्हती. शिवाय ब्राह्मण उपाध्यायांचा उपयोग केला असतां, ब्राह्मणेतरांच्या कपाळावरचा हीनतेचा डाग तसाच कायम राहून तत्त्वतः ब्राह्मणेतरांना आपले धार्मिक विधी स्वतः करण्यास अधिकार नाहीं,' अशी कबूलीहि दिल्यासारखें होत होतें हें वेगळेंच. अमूक एक प्रकारचा विधि करा म्हणून ब्राह्मण भिक्षुकांची पायधरणी करावी लागणारी अपमानकारक परिस्थिति कोणत्याहि स्वाभिमानी पुरुषाला सहन होणारी नव्हती. इतकें करूनहि अमूक एक प्रकारचा विधि करणें किंवा न करणें हें या भिक्षुकांच्या लहरीवरच राहाणार. १९११ सालच्या जानेवारी महिन्यांत सत्यशोधक समाजाची कोल्हापुरांत स्थापना करण्याचा विचार सुरू झाला. पुढील वर्षी म्हणजे १९१२ सालच्या आगष्ट महिन्याच्या २१ व्या तारखेस सत्यशोधक मताची पहिली श्रावणी मि० बाबूराव यादवांच्या घरीं मराठ्यांच्या हस्तें वेदोक्त पद्धतीनें करण्यांत आली. मराठ्यांच्या घरीं मराठे वेदमंत्र म्हणत असतांना ब्राह्मणांचा घोळका जमला. परंतु त्यांना ताबडतोब हांकून लावण्यांत आलें. त्याच दिवशीं संध्याकाळीं याच मराठा उपाध्यायांनीं—हे धंदेवाईक अगर आनुवंशिक नव्हते हें उघड आहे—एक जाहीर पूजा केली

या पूजेला श्रीमंत नानासाहेब मुळीकासारखे कांहीं जुने सरदार मिळून सुमारें १५० मराठे हजर होते. पूजा संपतांच जमलेल्या लोकांनीं भजकांच्या कल्याणासाठीं प्रार्थना करण्याची नेहमींची वहिवाट सोडून देऊन धार्मिक सत्तेचा मक्ता ब्राह्मण जातीलाच दिला आहे, या प्राचीन वेडगळ समजुतींतून ब्राह्मणेतरांच्या मनांची मुक्तता होवो ह्मणून परमेश्वराची करुणा भाकली. यानंतर एका आठवड्यानेंच कोल्हापूरच्या रिसाल्यांतील मराठ्यांनीं याच उदाहरणाचें अनुकरण करून नेहमींच्या ब्राह्मण जोशाची मदत न घेतां वेदोक्त पद्धतीची श्रावणी केली. दुसऱ्या दिवशीं ह्मणजे २० व्या तारखेस शुक्रवार पेठेंतील मराठ्यांनीं ही गोष्ट पाहून आणखी एक सत्यशोधक पद्धतीचा विधि केला. २४ सप्टेंबरचा दिवस हा जोतीराव फुल्यांनीं स्थापन केलेल्या सत्यशोधक समाजाचा वाढदिवस होता. जाहीर सभा भरवून हा वाढदिवस साजरा करण्याचा प्रसंग सत्यशोधक चळवळीच्या इतिहासांत पहिलाच होता. ब्राह्मण शंकराचार्य हा हिंदूंचा पोप असून लूथरच्या नेतृत्वाखालीं प्रॉटेस्टंट पंथाच्या लोकांनीं स्वर्गाची किल्ली आपल्या हातीं ठेवणाऱ्या पोपच्या वर्चस्वाविरुद्ध ज्याप्रमाणें बंड केलें, त्याप्रमाणें ब्राह्मणेतरांनींहि हिंदु स्वर्गाच्या किल्ल्या आपल्या हातीं ठेवणारा ब्राह्मण उपाध्याय वर्ग व शंकराचार्य यांच्याविरुद्ध बंड केलें पाहिजे असें या सभेंत ठरलें.

अर्थातच या गोष्टीकडे ब्राह्मणांचें लक्ष वेधल्याखेरीज राहिलें नाहीं. वेदोक्त हक्कासाठीं चाललेल्या मराठ्यांच्या चळवळीच्या जे अगदींच विरुद्ध होते, ते तिच्या या नवीन रूपांतराच्याहि विरुद्ध होते, ही गोष्ट येथें सांगण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. परंतु या लढ्यांत आपला पुरा मोड झाला आहे, अशी ब्राह्मणांची खात्री होऊन चुकल्यामुळें या अत्यंत क्रांतिकारक सामाजिक चळवळीला मुख्य विरोध अन्य दिशेकडूनच झाला. ज्या ब्राह्मणांनीं महाराजांना वेदोक्त प्रकरणांत पाठिंबा दिला होता, त्यांना आपल्या मान्यतेच्या दूरगामी परिणामाची आतां कोठें पूर्णपणें जाणीव उत्पन्न झाली. आपल्या जात बांधवांच्या हेकेखोरपणाचा फायदा घेऊन मोठमोठ्या देणग्या उपटतांना त्यांना आनंद झाला होता. परंतु मराठ्यांच्या या जागृतीचे स्वाभाविक परिणाम कोठपर्यंत जाणार याची त्यांना त्या वेळीं खरी कल्पना झाली नव्हती. वेदोक्ताविषयीं महाराजांना कबूली देऊन आपलें श्रेष्ठत्व अबाधित व स्पष्ट केलें अशी ब्राह्मणांना मोठी घमेंड वाटत होती;

परंतु आतां आणखी एक अनपेक्षित गोष्ट त्यांच्यासमोर दत्त ह्मणून उभी राहिली. महाराज या वेळीं तटस्थच होते. या नवीन सुधारकांशीं महाराजांचें अद्याप तादात्म्य झालें नव्हतें. परंतु कोणत्याहि प्रकारचा महाराजांचा प्रत्यक्ष संबंध नसतांना प्रस्तुत प्रसंगासारखीच श्रावणींतूनच वेदोक्त चळवळ उत्पन्न झाली नाहीं काय, असा त्यांनीं स्वतःशींच प्रश्न केला असावा ? पूर्वीप्रमाणेंच या कांकणभर अधिकच क्रांतिकारक चळवळीचा प्रवेश राजवाड्यांत होणार नाहीं हें कशावरून ? शंकराचार्यांच्या नेतृत्वाखालीं या धूर्त वेदोक्त ब्राह्मणांनीं आपल्याविरुद्ध उद्भवणाऱ्या बंडाला तोंड देण्याची तयारी चालविली. कांहीं परप्रत्ययनेय बुद्धीच्या मराठ्यांची देखील त्यांना या कामीं फूस होती. ब्राह्मण लोक जरी यांना लहान मुलांप्रमाणें तुच्छ लेखून कधीं यांची पाठ थोपटीत व यांच्या हातून आज्ञाभंग झाल्यास कधीं यांना चोपहि देत; तरीसुद्धां ब्राह्मणांची सदा थुंकी झेलण्यांत धन्यता मानण्याइतकी त्यांच्यामध्यें अद्याप मानसिक गुलामगिरी होतीच. शंकराचार्य स्वामींनीं एकदां एक सभा भरविली. हिंदुस्थानच्या सर्व भागांतील १०,००० हिंदु पुढाऱ्यांच्या परिषदेच्या पसंतीनें ब्राह्मण शंकराचार्यांनें हिंदुसमाजाला निर्बंध घालून द्यावेत असें या सभेंत ठरलें. शंकराचार्य हे सर्व हिंदूंमध्यें एक श्रेष्ठ धार्मिक सत्ता आहे, या काल्पनिक हक्कावर या कल्पनेची उभारणी करण्यांत आली होती. या श्रेष्ठत्वाचा उपयोग ब्राह्मण उपाध्याय वर्गाच्या साह्यानें आपलें वर्चस्व अबाधित राखण्याची या शंकराचार्यांची इच्छा होती. या वर्षी सत्यशोधक समाजमतें कोल्हापूर शहरांत सुमारें २०० विवाह व यापेक्षांहि अधिक इतर विधी करण्यांत आले. इतक्या अल्पावधींत या चळवळीला इतकें मोठें स्वरूप प्राप्त झाल्यामुळें अर्थातच ब्राह्मण गर्भगळित झाले. अशा जलद व दूरगामी क्रांतीपुढें १० वर्षांपूर्वीचें वेदोक्त प्रकरण कांहींच नव्हतें. ब्राह्मण गुरूच्या मदतीशिवाय झालेले विवाह कायदेशीर नसून अशा विवाहापासून झालेली संतती बेकायदेशीर ठरणार अशी लागलींच त्यांनीं कंडी पिकविली. गरीब मराठ्यांमध्येंच सत्यशोधक पद्धतीचे विवाह कां होतात ? असा ते प्रश्न करीत असत. हे विवाह बेकायदेशीर असल्यामुळें कोल्हापुरांतील बडे ब्राह्मणेतर अशा प्रकारें विवाह करण्यास तयार नव्हते, असा, या प्रश्नाच्या त्यांच्या उत्तराचा ध्वनितार्थ होता. जोशी हे आनुवंशिक उपाध्याय असून संस्थानचे ते हक्कदार उपाध्याय होते, ह्मणून त्यांच्या मदतीशिवाय

झालेला विवाह अर्थातच रद्द ठरणार. ही चळवळ ठार करण्यासाठीं अशा प्रकारच्या युक्त्या प्रयुक्त्या योजिल्या जात असतांहि, कोल्हापूरच्या आसपासच्या खेड्यांत तिचा वणव्यासारखा प्रसार होऊं लागला. महाराजांच्या वेदोक्ताशीं शंकराचार्य अनुकूल झाल्यामुळें, त्याची कर्मठ ब्राह्मणांतून हकालपट्टी होऊन, मराठे लोकांमध्यें आपला जम बसविण्यासाठीं तो प्रयत्न करूं लागला. देशांतील मराठ्यांपेक्षां, कोंकणांतील मराठे थोडेसे अधिक श्रद्धाळु असल्यामुळें, आपली तुमडी भरून, आपलें धार्मिक वर्चस्व पुनरपि प्रस्थापित करण्यासाठीं, संस्थानच्या पश्चिम भागांतून आपला दौरा काढण्याचा त्याचा विचार होता; परंतु विघ्नसंतोषी सत्यशोधकांनीं त्या खेड्यांत मि० बाबूराव यादवासारखे सत्यशोधक समाजाचे प्रचारक पाठवून त्याचा पिच्छा पुरविला ! याचा असा परिणाम झाला कीं, धर्मगुरूच्या गुलामगिरीचें जूं आपल्या खांद्यावर इतःपर घेण्यास ते नाखुष झाले. कोंकणांतील कोंकरांमध्यें आतां वाघाचे गुण आले ! या गोष्टीचा इतका भयंकर परिणाम झाला कीं, आपलें स्वागत करण्याची तयारी करण्यासाठीं, जरी स्वामीनें आपले जासूद पाठविले होते, तरी आपला पूर्वीचा बेत रहित करून, स्वामी घरींच बसून राहिला. नंतर त्यानें आपली दृष्टि मुंबई शहराकडे वळविली. या शहरांत कोंकणी मराठ्यांची मोठीच वसती असून, ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व मान्य करून ब्राह्मणी समाजव्यवस्थेंतील आपलें दुय्यम स्थान स्वामीकडून कबूल करून घेण्याची त्यांना मोठी भूक होती. दसऱ्याच्या दिवशीं, सत्यशोधकांविरुद्ध लोकमत तयार करण्यासाठीं, मोठी सभा भरविण्यांत आली. शंकराचार्य, ब्राह्मण व ब्राह्मणेतर आणि अर्धवट शिकलेले, परंतु ब्राह्मणांच्या ताटाखालील कोल्हापूरचे एक दोन मराठे मिळून, त्यांनीं सत्यशोधकांवर बहिष्कार टाकिला. ही चळवळ आतां कायमपणें चीत होणार कीं काय ? असा रंग दिसूं लागला. महाराजांनीं या सुमारासच सत्यशोधकशाळेला वर्षासन करून दिलें; परंतु अद्याप सत्यशोधक समाजाच्या चळवळींत ते प्रत्यक्ष भाग घेत नव्हते. अशा परिस्थितींत हा हल्ला या चळवळीला मर्मभेदी झाला नसता काय ? तथापि कांहीं अदूरदृष्टी ब्राह्मणेतर व ब्राह्मण मिळून झालेल्या या विघ्नसंतोषी कंपूचे प्रयत्न व त्याच्या सर्व आशा अल्पावधींतच निष्फळ ठरल्या.

१९११ सालच्या जुलै महिन्यांत महाराजांच्या मदतीनें कोल्हापुरांत सत्यशोधक-शाळेची स्थापना झाली. मि० डोणे नांवाच्या कळकळीच्या व

विशेष बुद्धिमान् धनगर गृहस्थाच्या हातीं ही शाळा प्रारंभीं देण्यांत आली. आपले धार्मिक विधी करण्याच्या कामीं हिंदु लोकांना जे धार्मिक हक्क पाळावयाची आवड आहे व ज्या करण्याचा ब्राह्मणेतरांना अधिकार नाहीं, असें ब्राह्मण लोक ह्मणत असत, त्या विधींचें ज्ञान ब्राह्मणेतरांना देणें हा या शाळेचा हेतु होता. दूरदूरचे तरुण ब्राह्मणेतर या शाळेंत गोळा होऊन, त्यांनीं उपाध्यायाच्या कर्तव्याचें ज्ञान संपादिलें व परत गेल्यावर ते आपापल्या ठिकठिकाणच्या ब्राह्मण भटजींना रिकामे करून टाकीत सुटले. या वेळीं महाराजांची सहानुभूति निःसंशय समाजाच्या बाजूलाच होती; परंतु महाराज आपल्या नेहमींच्या सावधगिरीला अनुसरून परिस्थिति कशी काय उत्पन्न होते हें पाहात होते. १९१३ सालीं एकट्या राजधानींत ब्राह्मणांच्या मदतीखेरीज धार्मिक समारंभ १५१३ झाले, यांपैकीं २६६ विवाहसमारंभ होते. दुसऱ्या वर्षीं अशा विवाहांची संख्या २९९ पर्यंत गेली. अंतःस्थ व बाह्य अडचणी लक्षांत घेतां, ही प्रगति बरीच जलद झाली ह्मणण्यास हरकत नाहीं. या शाळेला मदत करून प्रत्यक्षपणें व नवीन उपाध्यांनीं केलेले विवाह बेकायदेशीर आहेत, असा कांगावा करणाऱ्या लोकांच्या प्रयत्नांवर विरजण घालून अप्रत्यक्षपणें, महाराज सत्यशोधक चळवळीचा पुरस्कार करीत होते. १९१४ सालच्या जानेवारी महिन्यांत एडवर्ड बादशहांच्या पुतळयाला डांबर फांसलें गेलें व त्यामुळें ज्या भानगडी उपस्थित झाल्या, त्यांत हें संपूर्ण वर्ष व त्यानंतरहि कांहीं काळ महाराजांचें मन व्यग्र झालें. एका ब्राह्मण अधिकाऱ्याच्या मदतीनें या अत्याचाराचा संबंध सत्यशोधकांशीं जोडण्याचाहि प्रयत्न करण्यांत आला. त्यामुळें या चळवळीला कांहीं काळ अडथळा आला.

या वर्षांतील महाराजांच्या कामगिरीच्या ज्या एका अंगाचा मीं अद्याप उल्लेख केला नाहीं, तें अंग ह्मटलें ह्मणजे आतां ऐन उमेदींत येत चाललेल्या राजकुमारांचें शिक्षण हें होय. १९१२ सालीं युवराजांचें वयोमान जवळ जवळ १५ वर्षांचें असून, त्यांचे धाकटे बंधू राजकुमार शिवाजी महाराज त्यांच्यापेक्षां दोन वर्षांनीं लहान होते. राजकुमारांच्या शिक्षणाकडे महाराजांचें लक्ष अधिक वेधलें होतें, हें पूर्वीं दिसून आलेंच आहे. याप्रीत्यर्थ महाराजांनीं मिसेस आयर्विन नांवाच्या स्कॉच अमेरिकन स्त्रीची शिक्षक ह्मणून योजना केली होती. हिंदुस्थानांतील एकाद्या युरोपियन स्कूलमध्यें, त्यांना पाठविण्याचाहि महाराजांचा विचार चालू होता. तथापि या गोष्टीच्या

उपयुक्ततेची त्यांना विशेष खात्री न पटल्यामुळें, मीं मागें सांगितल्याप्रमाणें या बाबतींत चौकशी झाल्यावर, त्यांनीं ५।६ मराठ्यांचीं मुलें पांचगणी स्कूलमध्यें पाठविलीं; पुढें त्यांना बेंगलूर येथील यूरोपियन मुलांच्या शाळेंत पाठविलें. तेथें झालेलें कार्य पाहून, महाराजांचें अगर मुलांचेंहि समाधान झालें नाहीं; ह्मणून महाराजांना आतां फक्त एकच मार्ग मोकळा राहिला. तो मार्ग ह्मटला ह्मणजे कुमारांची इंग्लंडला ताबडतोब रवानगी करणें हा होय. कुमारांचें वयोमान लक्षांत घेतां ही गोष्ट करणें मोठें कठीण काम होतें; परंतु अमूक एक गोष्ट केली पाहिजे अशी महाराजांची एकदां खात्री पटल्यावर, ते हयगय अगर धरसोडपणा कधींच करीत नसत. थोडे दिवस कुमारांबरोबर इंग्लंडला स्वतःच जाण्याचा विचार महाराजांच्या मनांत प्रथम आला होता; परंतु कांहीं अतर्क्य कारणांमुळें, आपल्याऐवजीं श्रीमंत बापूसाहेब व मि० सबनीस यांचीच रवानगी करण्याचा महाराजांचा निश्चय झाला. युवराजांचें पूर्ववयांतील प्रकृतिमान हा एक या बाबतींत मोठ्या चिंतेचा प्रश्न होता; परंतु आतां त्यांची प्रकृति सुधारत चालली होती. आतां ते एक हुशार क्रिकेटपटू व चांगले शिकारी ह्मणून त्यांची ख्याति होत चालली होती. युवराजांची पहिली शिकार ह्मणजे, १९१२ सालच्या जानेवारी महिन्याच्या २० तारखेस तुमजाई जंगलांत ७ फूट ६ इंच लांबीचा त्यांनीं मारलेला एक पटाईत वाघ, ही होय. राजकुमारांचे इंग्लंडांतील सहचारी ह्मणून जीं मुलें जाणार होतीं, तीं संस्थानांतील सरदारांच्या घराण्यांपैकीं होतीं. मीं मागें सांगितल्याप्रमाणें, श्रीमंत बापूसाहेब व रावबहादूर सबनीस दिवाणसाहेब, यांच्या समवेत राजकुमार आपल्या सोबत्यांसह १९१२ सालच्या मे महिन्याच्या ११ व्या तारखेस मुंबईहून इंग्लंडला निघाले. इंग्लंडांत योग्य अशा ठिकाणीं राजकुमारांची उतरण्याची सोय करण्यासाठीं ह्मणून मिसेस आयर्विन या बाई थोड्याशा अगोदर निघाल्या होत्या. लंडनपासून सुमारें २० मैल अंतरावरील, मिडलसेक्स काउंटीपैकीं हडन येथील "बर्नहॅम हाऊस" नांवाची शाळा कुमारांकरितां पसंत करण्यांत आली. मध्यम वर्गांतील विद्यार्थ्यांकरितां ही संस्था अस्तित्वांत आली असून, तिचें चालकत्व एक केंब्रिजचे पदवीधर मि० बेकन व लष्करांत काम केलेले मि० फाल्कर यांच्याकडे होतें. ही शाळा ३०–३५ वर्षे चालली असून, बर्नहॅमच्या माजी विद्यार्थ्यांच्या चारित्र्यावरून या शाळेंतील प्रशंसनीय शिक्षणाची

व शिस्तीची साक्ष पटते. " क्लासांतील अभ्यासाविषयीं आवड उत्पन्न करून न थांबतां, मुलांच्या बुद्धिमत्तेचा विकास करण्यासारख्या सर्व विषयांची व उद्योगधंद्याची आवड उत्पन्न करणें, त्यांचें सद्वर्तन सुदृढ करून, त्यांना सार्वजनिक शाळेंतील अधिक विस्तृत आयुष्यक्रमासाठीं लायक बनविणें, असा येथील शिक्षकांचा प्रयत्न असतो. " अशी प्रिन्सिपॉलच्या मतें या शाळेच्या ध्येयाची व्याख्या होती. धार्मिक शिक्षण, ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, गणित, चित्रकला व नेहमींचे इंग्लिश विषय यांचा तेथील अभ्यासक्रमांत समावेश झाला होता. सुतारकी, पोहणें ललितकला, नृत्यकला व जर्मन भाषा या विषयांचीहि तरतूद करण्यांत आली होती.

शाळेंतील अभ्यासक्रमास सुरवात होण्याला, अद्याप कुमारांना तीन महिन्यांचा अवधि होता; ह्मणून शाळेंतील शिक्षण संपादण्यासाठीं कुमारांच्या अंगीं पात्रता यावी ह्मणून दोन स्वतंत्र शिक्षकांची योजना करण्यांत आली. या शाळेचे ' रहिवासी ' विद्यार्थी होण्यास, कुमार योग्य होईतोंपर्यंत कुमारांसमवेत राहाण्यासाठीं मिसेस आयर्विन यांनीं बर्नहॅम हाऊस नजीकच एक घर घेतलें. जून महिन्याच्या आरंभीं मिसेस आयर्विनच्या देखरेखीखालीं या नवीन घरांत कुमार जाऊन राहिले. यापूर्वी कुमारांच्या नियोजित व्यवस्थेसंबंधीं कांहीं अडचणी उपस्थित झाल्या, त्यांचा येथें उल्लेख केला पाहिजे. सर वुइलियम लीवॉर्नर वगैरे महाराजांच्या इंग्लंडांतील कांहीं मित्रांना, कुमारांना हल्लींच्या त्यांच्या कोंवळया वयांत, इंग्लंडांत ठेवण्याचा विचार रुचला नाहीं. " महाराजांच्या पित्याच्या अंत्यसमयींच्या इच्छेनुरूप महाराजांना इंग्लंडला आणण्याचा जेव्हां आमचा विचार होता, तेव्हां त्याला महाराजांनींच विरोध केला. व आतां महाराजच आपल्या मुलांना इंग्लंडला पाठवीत असतांना महाराजांच्या या विचाराला विरोध करावा असें आह्मांला वाटतें, हा केवळ दैवदुर्विपाक होय " असें सर वुईलियम ह्मणाले. त्यांच्या सूचनेवरून श्रीमंत बापूसाहेब व मि० सबनीस यांनीं राजकुमारांना मि० ऑर्नोल्ड यांच्याकडे नेलें. " ते एकत्र राहिल्यानें त्यांची कदाचित् एकलकोंडया स्वभावाची प्रवृत्ति होईल, ह्मणून " दोघादोघांच्या जोडया करून, कुमारांच्या तीन तुकडया कराव्यात, असा मि० ऑर्नोल्ड यांनीं सल्ला दिला. या बाबतींतील व महाराजांच्या इतर मित्रांनीं उपस्थित केलेल्या

याविषयींच्या दुसऱ्या प्रश्नासंबंधीं महाराजांचे कशा प्रकारचे विचार होते, हें पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होणार आहे.

९ जूनला मि० सबनीस यांना महाराजांकडून कळविण्यांत आलें कीं:—

" हेंडन येथील कुमारांची व्यवस्था आपणांस व बापूसाहेबमहाराजांना समाधानकारक वाटत असेल, तर हल्लीं त्यांना तेथून हलविणें इष्ट होणार नाहीं. पुढील वर्षी महाराज स्वतःच विलातेस जाणार आहेत, तेंव्हां वस्तुस्थिति पाहून, सर डब्ल्यु० लीवॉर्नर व इतर मित्रांच्या सल्ल्यानें जरूर वाटल्यास ते याहून निराळी व्यवस्था करतील. तोंपर्यंत हल्लींची व्यवस्था कुमारांच्या प्रगतीला कोणत्याहि प्रकारें बाधक होईल, असें महाराजांना वाटत नाहीं. मिसेस आयर्विन यांच्या देखरेखेखालीं, कुमारांना स्वतंत्रपणें सोडणें महाराजांना अधिक श्रेयस्कर वाटतें. त्यांची व्यवस्था लागल्यानंतर क्षणभरहि आपण त्यांच्याबरोबर राहूं नये, ह्मणजे आपल्या भावी शिक्षणासाठीं आपण आपल्या पायांवरच उभें राहिलें पाहिजे, याची त्यांना जाणीव उत्पन्न होईल. कुमारांना तेथें ठेवून, तुह्मीं सर्व येथें परत यावें, अशी महाराजांची इच्छा आहे. राजकुमारांपेक्षांहि इतर कुमारांना अधिक चांगल्या प्रकारें वागविण्याबद्दल आपण परत येतें वेळीं समज द्यावी, अशी महाराजांची फार इच्छा आहे.''

लीवॉर्नर यांना जूनच्या २३ तारखेस महाराज लिहितात:—

" आह्मांविषयीं जी कळकळ आपण घेत आहां, त्याबद्दल कृतज्ञता यथार्थपणें मी खरोखर व्यक्त करूं शकत नाहीं. आपण माझ्या वडिलांच्या अतिशय जिवलग स्नेह्यांपैकीं एक होता. माझ्याबद्दल व माझ्या बंधूबद्दल तितकीच कळकळ आपण दाखविली होती व माझे दोन मुलगे आणि इतर कुमार आपल्या आतां कळकळीचे वांटेकरी झाले आहेत. माझा वडील मुलगा बराच अशक्त असल्यामुळें, त्याच्या प्रकृतीची मला फार काळजी वाटते. या वयांत त्याला इंग्लडला पाठविण्याची माझ्या मनाची प्रवृत्ति मुळींच नव्हती; परंतु इंग्लंडांतील हवेनें त्याला चांगलें वाटेल असें डाक्टर लोकांचें मत पडलें. याच्या वयाच्या वेळीं मी जितका हुशार होतों, त्याच्या अर्ध्यानें देखील हा हुशार नाहीं. ही माझी बढाई सांगतों असें नाहीं; तथापि कुमारांची नीतिमत्ता सर्वोत्कृष्ट आहे, याबद्दलची मी आपणास हमी देतों. ते

सुस्वभावी व आज्ञाधारक असून, कांहीं इतर संस्थानिकांच्या मुलांप्रमाणें ते अपेशी ठरणार नाहींत.

" इंग्लडांतील अराजक व बदमाष लोक देखील त्यांना बिघडवूं शकणार नाहींत. तथापि आपण नजर ठेवून, अशा प्रकारच्या लोकांचा त्यांना संपर्क घडणार नाहीं, अशी दक्षता घ्याल, अशी मला आशा आहे. मिसेस आयर्विन यांनीं केलेली व्यवस्था आपणाला आवडेल, अशी माझी पूर्ण खात्री आहे. सर्व कुमारांना एकाच शाळेंत ठेवण्याची माझी उत्कट इच्छा आहे. या बाबतींत माझे बंधु, दिवाण व मिसेस आयर्विन यांना आग्रहानें सांगितलें आहे. व अशीच तजवीज ठेवण्याची माझी फार इच्छा आहे. ते स्वतःच्याच संगतींत राहूं शकतील, हा या व्यवस्थेंतील फायदा आहे. राजकुमार कॉलेजांतील माझ्या स्वतःच्या अनुभवावरून पांचगणी येथील इंग्लिश मुलांच्या सहवासांतील कुमारांच्या थोडया अनुभवावरून, ते आपली गट्टी करून राहूं शकतात, इतकेंच केवळ नव्हें, तर इंग्लिश मुलांशीं मिळून मिसळून, त्यांच्याशीं खुल्या दिलानें ते बोलूंहि शकतात असें मला वाटतें. मुलें एकत्र ठेवल्यापासून, माझ्या मतें आपल्या राष्ट्रीयत्वाचा त्यांना विसर पडणार नाहीं. त्यांच्या मनांत हिंदी लोकांविषयीं तिटकारा उत्पन्न होणार नाहीं व एकमेकांचा द्वेष करून, एकमेकां-विषयींच्या चहाडया सांगण्याची त्यांना प्रवृत्ति होणार नाहीं.

" ज्यांनीं आपलीं मुलें पूर्वीं इंग्लंडला पाठविलीं होतीं, अशा आईबापांनीं आपलीं मुलें मातृभूमि पाहाण्यास आतुर झाल्यामुळें, त्यांची प्रकृति बिघडल्याचें मला सांगितलें आहे. अशा स्थितींत त्यांना परत आणणें भाग पडतें; म्हणू-नच माझ्या वडील मुलाबद्दल मला भीति होती; परंतु आतां विद्यार्थ्यांची संख्या मोठी असून, ते एकाच शाळेंत असल्यामुळें, मला ही भीति वाटत नाहीं.

" मातृभूमि पाहाण्यास आतुर झाल्याच्या सबबीवर माझ्या वडील मुलाची ये, जा, करून, त्याच्या शिक्षणांत व्यत्यय आणण्याची माझी इच्छा नाहीं. "

याच वेळीं महाराज मिसेस आयर्विन यांना लिहितात:—

" माझीं मुलें परत आल्यानंतर त्यांना सोबत्यांची जरूरी राहाणार असल्या-मुळें, कोणत्याहि सबबीवर ही गट्टी आपण फोडूं नये. इंग्लंडाहून परत आल्या-नंतर मुलांना मित्र रहात नसल्याचें, केव्हां केव्हां आढळन येतें; म्हणून

अपरिचित अशा हिंदी लोकांशीं त्यांना स्नेह करावा लागतो. नाहीं तर तीं एकलकोंडीं होतात."

कुमार हे आतां हेंडन येथें रहात असून, त्यांचा अभ्यासाचा जम बसला. १९१२ सालच्या आगष्ट महिन्याच्या ८ व्या तारखेस, महाराज मिसेस आयर्विन यांना लिहितात:—

"त्यांची पहिल्या दोन वर्षांतील प्रगति यशस्वी अशी दिसून आल्यास, त्यांना तेथें पांच वर्षें ठेवण्याचा माझा विचार आहे. क्रिस्टल पॅलेस नजीकच्या इंजिनीयरिंग स्कूलमध्यें इंजिनीयरिंगचें त्यांनीं अध्ययन करावें, असा माझा विचार आहे. मला मोठ्या आग्रहानें ही सूचना करण्यांत आली आहे; परंतु ती अमलांत आणणें मुलांच्या प्रगतीवर सर्वस्वीं अवलंबून आहे.

"मला लॅटिनची जरूरी वाटत नाहीं, हा विषय त्यांच्या अभ्यास-क्रमांतून वगळण्यास हरकत नाहीं. बीजगणितचा व भूमितीचा अनुभव घेऊन, पाहावा. हे विषय त्यांना अतिशय कठीण वाटले, तरी त्यांनीं या विषयाचा अभ्यास चालूच ठेवावा; कारण त्यांनीं पुढें इंजिनीयरिंगचें ज्ञान संपादावें, अशी माझी इच्छा आहे. निदान त्यांना अशी संधि देऊन तरी पाहावें. कुमारांना अनुकूल असा अभ्यासक्रमांत बदल करण्यास, मुख्य अध्यापकांनीं आपली संमति दिल्याबद्दल, मी त्यांचा आभारी आहें असें त्यांना कळवा."

सप्टेंबरच्या अखेरीला शाळेच्या अभ्यासक्रमाला नियमितपणें सुरवात झाली; व शाळेंतील मुलांमध्यें कुमार बोर्डर ह्मणून आतां राहाणार होते. मिसेस आयर्विन या सप्टेंबरच्या १० व्या तारखेस लिहितात:—"विद्यार्थी ह्मणून ते लौकरच शाळेंत राहणार आहेत; परंतु जेवणाकरितां अगर फराळाकरितां ते रोज माझ्याकडे येतील; व संध्याकाळचा वेळ बहुधा ते माझ्या सहवासांत घालवितील. कोणी आजारी पडल्यास किंवा कोणाला औषधोपचार अगर शुश्रूषा हवी असल्यास, अगर एकाद्या कुमाराला विशेष पथ्य पाहिजे असल्यास, तशी व्यवस्था करण्यासाठीं माझ्या घरा शेजारीं कुमारांना नेऊन ठेवण्याची सोय केली आहे."

याला महाराजांचें जें उत्तर गेलें, तें महाराजांच्या स्वभावाला अनुरूप असेंच होतें. सप्टेंबरच्या २६ व्या तारखेस ते त्यांना लिहितात:—

" शाळेंतील इतर विद्यार्थ्यांपेक्षां अन्य तऱ्हेनें कुमारांना वागविण्यांत यावें, अशी माझी इच्छा नाहीं, हें आपणांस ठाऊक आहे. इतरांसारखेंच त्यांनाहि वागविण्यांत आलें पाहिजे. प्रत्येक दिवशीं एक वेळ तुमच्या घरीं त्यांनीं जेवणें मला आवडत नाहीं. आठवड्यांतून एकदां त्यांनीं तुमच्या घरीं जेवण केलें तरी तेवढें बस्स होईल. कोणत्याहि प्रकारें त्यांचे लाड करण्यांत येतात, असें त्यांना वाटूं देऊं नये. त्यामुळें त्यांचें वर्तन मात्र बिघडेल. त्यांच्या प्रगतीच्या मानानें त्यांना निरनिराळ्या वर्गांत घालून, त्यांना आतां एकमेकांपासून, अलग ठेवून प्रत्येकाबरोबर एक इंग्लिश सोबती देण्यांत येईल, अशी मला आशा आहे. इंग्लिश मुलांत त्यांनीं अतिशय मोकळ्या मनानें मिसळावें."

तारीख १७ आक्टोबर रोजीं मिसेस आयर्विन या महाराजांना लिहितातः—

" सप्टेंबरच्या २६ तारखेचें आपलें पत्र पाहून, मला फार आनंद झाला. हेंडन अँड फिंचली टाइम्स पत्रांतील शाळेच्या खेळांसंबंधीं हकिकत वाचून, आपणांस फार आनंद होईल. यशस्वी मुलांच्या नामावलीसह कार्यक्रम व या पत्राचा अंक मी आज डाकेनें पाठवीत आहें. कुमारांनीं चांगली कामगिरी केली, हें महाराजांच्या नजरेस येईल. बाळा फार चांगलें खेळला, त्यानें एक रुप्याचा पेला व एक क्रिकेट बॅट जिंकली. शिवाजीला एक सुंदर लहान घड्याळ मिळालें. जयसिंगरावाला एक चाकू मिळाला. इंगळ्याला एक चेंडू, आप्पाला एक सुंदर चामड्याची लिहिण्याची पेटी व शंकररावाला कड्याची एक जोडी मिळाली.

" शाळेंत इतर विद्यार्थ्यांप्रमाणेंच कुमारांना वागविण्यांत यावें, अशी जी महाराजांची इच्छा आहे, तीसंबंधानें ह्मणाल तर, सर्व दिवसभर शाळेंत त्यांना एकाच प्रकारें वागविण्यांत येतें व ते इंग्लिश मुलांशीं अतिशय मोकळ्या मनानें मिसळतात, असें मी आपणांस सांगू शकतें. शाळेंतील मुलांशीं ते इतके एकजीव झाले आहेत कीं, ते इतर मुलांहून कोणत्याहि प्रकारें भिन्न असल्याचें महाराजांना दिसून येणार नाहीं." कुमार शाळेंत दाखल झाल्यानंतर एक वर्षानें सर डब्ल्यु० मॉरिसन हे कुमारांच्या प्रगतीसंबंधीं आपला अभिप्राय लिहितातः—

" काल दोन प्रहरीं मी हेंडनला गेलों; तेथें साही मुलें फुटबॉल खेळण्यांत दंग असल्याचें मला आढळून आलें. ती शनवारची दुपारची वेळ होती. मी

सुमारें अर्धा तास हा खेळ पाहात होतों. युवराज हे इतरांप्रमाणेंच मेहेनतीनें खेळत होते. इंग्लंडमध्यें त्यांना जेव्हां मीं प्रथम पाहिलें, त्यापेक्षां या वेळीं ते थोडेसे कमी स्थूल व अधिक चपळ झाल्याचें दिसलें, त्यांच्या अंगांतील फाजील मांस झडून जाऊन, ते अधिक कृश व सशक्त दिसले. कांहीं बाबतींत ते अद्याप थोडेसे मागे आहेत, यांत शंका नाहीं; परंतु प्रत्येक वेळेला मला प्रगति दिसून येते. स्वभावानें ते फार चांगले आहेत. प्रत्येकाला ते आवडतात. साहीजण चांगले व सुखी दिसले. एकाच्या ( कोणता कुमार याचें स्मरण नाहीं. ) हाताच्या बोटावर थंडीची बाधा झाली होती. एवढेंच !

" ४ जूनच्या पत्राबद्दल मी आपला आभारी आहें. आपण पुनः पूर्णपणें बरे झाला आहांत, हें ऐकून, मला फार आनंद होत आहे. पुढील वर्षीं इंग्लंड-मध्यें आपल्या भेटीची वाट मी पहात आहें. पुणें टर्फ—क्लबमध्यें, बापूसाहेब प्रत्येक वर्षीं केवढा तरी विजय संपादित आहेत ! आर्० आर्० एस्० दोन किंवा तीन पहिले नंबर पटकावीत नाहींत, असें एकहि संमेलन नाहीं. त्यांच्या विषयींची माझी पूज्यबुद्धि त्यांना श्रुत करा. त्यांनीं इंग्लंडमध्यें येऊन, डर्बीकरितां जरूर प्रयत्न करावा. काल दोन प्रहरीं मि० बेकन हे बाहेर निघून गेल्यामुळें, त्यांची मला गांठ पडली नाहीं; परंतु अलेक्झांडरशीं मी बराच वेळ बोललों, कुमारांबरो-बर रहाण्यास ते सर्वथैव योग्य गृहस्थ आहेत, असें मला दिसलें. या टर्मच्या वेळीं कुमार आपल्या अभ्यासांत अतिशय चूर असल्यामुळें, त्यांची आपणांस कांहींच कल्पना होत नाहीं असें ते ह्मणतात. " तीन महिन्यानंतर, महाराज आपल्या मुलांच्या अभ्यासाची दिशा सुचवितात:—

"विश्वविद्यालयाच्या अभ्यासाच्या नादीं लागण्यापेक्षां व्यावहारिक रसायन शास्त्र, इंजिनीयरिंग अगर कृषिकर्म शिकण्यास माझ्या वडील मुलाचें मन त्याचप्रमाणें बाबा, अप्पा व शिवाजी यांचीं मनें आपण वळवूं शकणार नाहीं काय ? विश्व-विद्यालयाच्या अभ्यासक्रमाचा मला तिटकारा आहे, असें त्यांना कळवा. त्यांना मेकॅनिकल इंजिनीयरिंगचें ज्ञान व्हावें.

" मेहेरबानगी करून उलट डाकेनें उत्तर पाठवा. कुमारांना विडीचा अगर दारूचा नाद लागला नाहीं, अशी मला आशा आहे, यासंबंधीं काय तें कळवाच. "

यानंतर लागलींच १९१४ सालच्या जानेवारी महिन्यांत युवराज ऑक्स-फोर्ड येथील सेंट एडवर्डस् नांवाच्या शाळेंत दाखल झाले; व राजकुमार शिवाजी महाराज, ब्राम्सग्रूव्ह येथील किंग एडवर्ड शाळेंत दाखल झाले. कुमारांचे कळकळीचे हितचिंतक सर डब्ल्यु० मॉरिसन हे, १९१४ सालच्या मार्च महिन्यांत मुलांची प्रगति कशी होती, तें पुढीलप्रमाणें कळवितात:—

" आज मी ऑक्सफोर्डला गेलों व जयसिंगराव व बाळा यांची गांठ घेतली. त्यांच्याविषयीं माझें काय मत झालें, तें समजून घेणें, आपणांस प्रीय वाटेल हें मला माहीत आहे. मिसेस आयर्विनपासून निराळे झाल्यानंतर ही पहिलीच टर्म, ही गोष्ट लक्षांत घेतां, त्या दोघांचें ठीक चाललें आहे, असें मला वाटतें. शाळेच्या कोणत्याहि शिक्षकाची मला गांठ पडली नाहीं; परंतु बाईशीं मीं भाषण केलें. इतर मुलांना ते दोघेहि फार आवडत व विशेषत: जयसिंगराव फार प्रिय झाले आहेत, असें बाईनें मला सांगितलें. गेल्या वर्षापेक्षां जयसिंगराव बरेच कृश झाले असून, ते चांगले दिसतात. त्यांना इंग्लिश अधिक चांगल्या प्रकारें बोलतां येऊं लागलें आहे. पूर्वी इतकें आतां ते भिडस्त नाहींत. पूर्वीपेक्षां आपण होऊन ते अधिक बोलले, असें माझ्या नजरेस आलें. ते अतिशय चांगले कुमार, असून प्रत्येकाचें मन त्यांच्यावर बसल्याखेरीज राहात नाहीं. ही शाळा चांगली दिसते. खोल्या, तालीमखाना, पोहोण्याची जागा वगैरे मीं फिरून पाहिलीं;

" आपली प्रकृति सुदृढ आहे अशी मला आशा आहे. या वर्षीं इंग्लंड-मध्यें आपली भेट आह्मांस होणार नाहीं काय ? "

कुमारांच्या प्रगति व सद्वर्तन विषयींच्या या अभिनंदनपर उद्गारांना, खुद्द त्यांच्या शिक्षकांचाहि भरपूर पुरावा मिळतो. मि० बेकन नांवाचे शिक्षक ह्मणतात, " ते येथें अतिशय प्रीय झाले होते. माझें त्यांच्यावर खरें प्रेम होतें. शिवाय माझ्या शाळेंत जी उच्च शासन-पद्धति मीं माझ्या दृष्टीसमोर ठेविली होती, तिला बाध न लावण्यासाठीं त्यांनीं शिकस्त केली, याची मला पूर्ण जाणीव आहे. जयसिंगरावांचा स्वभाव अतिशय प्रेमळ होता. लहान मुलांवरची त्यांची दयार्द्रदृष्टि एकाद्याला दुखापत अगर आजार झाला असतांना त्याबद्दल त्यांची पराकाष्टेची सहानुभूति, या गोष्टीचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. शिवाजी हा अतिशय मनोवेधक मुलगा असून, तो विशेष खेळाडू स्वभावाचा, उत्साही, निरुपद्रवी व चेष्टेखोर आहे. दोघां बंधूंच्या स्वभावामध्यें विशेष

अंतर दिसून येत असे, तरी नीतिमत्ता व सद्वासनांच्या बाबतींत दोघेहि सारखेच होते. माझ्यापासून जेव्हां ते मोठया शाळेंत गेले, तेव्हां त्यांच्या या गुणांची तेथें चहा झाल्याचें मला माहित आहे."

युवराज शेतकीच्या अभ्यासक्रमाला सुरवात करणार होते. १९१४ सालच्या जुलई महिन्याच्या २४ व्या तारखेस मिसेस आयर्विन यांना महाराज लिहितात:—

" बरेच दिवस आपलेकडील वर्तमान मला कळलें नाहीं. आपली प्रकृति चांगली आहे, अशी मला आशा आहे. या सुमारास जयसिंगरावानें शेतकी-विषयक शिक्षणास सुरवात केली असावी, असें मला वाटतें. त्यांना हें काम आवडून, त्यांत त्यांना समाधान वाटेल तर मला ती एक आनंदाची गोष्ट होईल. शेतीवर केवळ देखरेख न करितां, शेतीचें प्रत्यक्ष ज्ञान त्यांना झालें पाहिजे अशी माझी इच्छा असल्यामुळें, शेतांत त्यांच्याकडून प्रत्यक्ष काम करवून घेण्याची, मेहेरबानगी करून दक्षता ठेवा.

" पुढील वर्षी अमेरिकेमध्यें मोठें प्रदर्शन होणार आहे, हें आपणांस माहीत असेल. कुमारांनीं त्या प्रदर्शनाला जावें अशी माझी इच्छा आहे. अशा प्रकारची संधि त्यांना पुनः कदापि मिळणार नाहीं. तें एक जगाचें प्रदर्शन होईल. त्यापासून त्यांचा पुष्कळ फायदा होऊन, शिक्षणाच्या दृष्टीनेंहि तें अतिशय महत्वाचें होईल. ह्मणून, मी या गोष्टीसंबंधीं इतका आतुर आहें. आपल्या मायभूमीला भेट देण्याची कल्पना तुम्हांलाहि आवडेल, असें मला वाटतें. तेथील आपल्या मित्रांच्या मदतीनें कुमारांचा काळ मोठ्या मजेंत जाईल. या प्रवासाची तयारी ठेवण्यासाठीं आपणांस मुबलक वेळ मिळावा, ह्मणून मी यासंबंधीं आपणांस आतांच लिहीत आहें."

१९१४ सालच्या आगष्ट महिन्याच्या ४ थ्या तारखेच्या संस्मरणीय दिवशीं, इंग्लंडनें जर्मनीविरुद्ध महायुद्ध पुकारिलें. त्याच महिन्याच्या १० व्या तारखेस महाराज, रेसिडेंट कर्नल उडहाऊस यांना लिहितात:—

" बालचमूचे स्वयंसेवक ह्मणून, माझ्या मुलांना घ्यावें, अशी सरकारला विनंति करण्याचा माझा विचार आहे. ते सर्व सहाजण आहेत. केवळ औपचारिक दृष्टीनें नव्हे तर खरोखरीच सरकारला त्यांची जरूरी असेल, तर ती एक

मोठा आम्ही बहुमान समजूं. यांना घेण्याचा सरकारचा निश्चय होईल, तर मी, माझे बंधू व माझे कांहीं नातलग पहिल्या बोटीनें निघूं. व कोणत्याहि प्रकारचें कनिष्ट अगर दुसरें कोणतेंही काम आम्ही करूं.

" मी हें केवळ औपचारिक रीतीनें लिहीत नाहीं. तर अशी माझी खरोखरीच इच्छा आहे. माझ्या तारेला जें उत्तर मिळालें, त्याबद्दल सरकारचा मी आभारी आहें. कृपा करून, आपलें वजन खर्च करून, मला व माझ्या नातलगांना अशी संधि प्राप्त करून द्याच !

" मी लिहून अगर भेट घेऊन, नेक नामदार गव्हर्नर साहेबांना त्रास देऊं इच्छित नाहीं; कारण या प्रसंगीं नामदार साहेब किती कार्यमग्न असतील, हें मला माहीत आहे; ह्मणून कृपा करून माझें पत्र नामदार साहेबांना सादर करा. कुमारांचा कोणत्याहि प्रकारें उपयोग होण्यासारखा नसेल, तर त्यांना परत बोलाविणें मला भाग होईल. "

१९१५ सालच्या मार्च महिन्याच्या सुमारास कुमारांना ब्रायटनपैकीं होव्ह येथील प्रिन्सेस हॉटेलमध्यें नेऊन ठेवण्यांत आलें. याच्या थोडेंसें अगोदर मिसेस आयर्विन लिहितात.:—

" चार आठवड्यानंतर आह्मी हें घर सोडीत आहों, ह्मणून मी नवीन पत्ता देत आहें. आगष्टच्या प्रारंभीं आह्मी इंग्लंडहून निघेतोंपर्यंत, आमचा वरील पत्ता राहील. त्या सुमारास रस्ता निष्कंटक व सुरक्षित होईल, असा मला भरंवसा आहे; कारण त्याच दृष्टीनें आमचे सर्व बेत ठरत आहेत. कुमारांना हिंदुस्थानला परत सुरक्षित पोंचविल्यानें, मला खरोखरच मोठी धन्यता वाटेल.

" कोल्हापूरचे युवराज ह्मणून जयसिंगरावांच्या मनावर स्वावलंबन व प्रसंगावधान यांचें महत्त्व बिंबविण्यासाठीं त्यांना मी थोडेंसें बाहेर नेत आहें.

" रॉयल पॅव्हिलियन व डोम मधील जखमी झालेल्या हिंदी लोकांना, कुमारांना भेटविण्याची मीं व्यवस्था केली. तेथील अधिकाऱ्यानें आमचें स्वागत केलें. युवराजांची व त्यांच्या बंधूंची मीं त्यांना ओळख करून दिली. नंतर शिवाजीसह मी मागें राहिलें 'आणखी एक अधिकारी व जयसिंगराव हे मेजर इरविन, फोर्टस्कूल यांच्याबरोबर पुढें झाले.

" युवराजांनीं आपलें काम चोख करून, सर्वांना संतुष्ट केलें. मराठे जखमी लोकांना युवराजांशीं बोलतांना आनंद झाला. व विशेषत: कोल्हापूर व कागल नजीकचे जखमी लोक युवराजांशीं बराच वेळ बोलत राहिले. जयसिंगरावांनीं त्यांना मिठाई वांटली. मेजर साहेबांची परवानगी घेतांना जखमी लोकांच्या विशेष आरामासाठीं ह्मणून, खर्च करण्यासाठीं ५ पौंड युवराजांनीं त्यांच्या हातीं ठेविले. इतर चार कुमारांसाठीं ह्मणून मीं आतां एक पास देखील काढला आहे. सुंदर रॉयल पॅव्हिलियनमधील हिंदी लोकांना पाहाण्यास ते फार आतुर झाले आहेत.

" गेल्या आठवड्यांत डॉक्टर टेंगसेकडून एक मिठाईची पेटी आली. कुमारांना वेळोंवेळीं मिळालेल्या रुप्याच्या लहान करंड्यांत ही मिठाई घालून, हे करंडे पॅव्हिलियनमधील मराठ्यांना पाठविण्यांत आले.

" मी कांहीं दिवसांपासून आजारी असून, आजारीपणांतच मी हें पत्र लिहीत आहें. माझें डोकें पुन: दु:खूं लागलें आहे; परंतु हें घर सोडण्याची तयारी करीतोंपर्यंत, व प्रवासांत आह्मांबरोबर घेण्यास जरूर नसलेल्या वस्तूंची, हिंदुस्थानांत रवानगी होईतोंपर्यंत मी बरी होईन, असें मला वाटतें.

" कुमारांनीं आपल्या राष्ट्रीय पोषाखांत अगर डोकीला फक्त हिंदी तऱ्हेचें पागोटें बांधून इंग्लिश पोषाखांत मुंबईला उतरावें, हें महाराज कृपा करून मला कळवितील काय ? फक्त फेटे खेरीज करून, त्यांच्या सर्व हिंदी पद्धतीच्या वस्तु मी येथून निघण्यापूर्वीच पाठवितां येतील."

तारीख १० जुलई रोजीं राजकुमार इंग्लंडहून निघून, त्याच महिन्याच्या १९ व्या तारखेस ते न्युयॉर्कला ( अमेरिका ) पोंचले. तेथील ठळक स्थळें पाहून, ते जपानला गेले. तेथून चीनला जाऊन, कोलंबोवरून १९१५ सालच्या आक्टोबर महिन्याच्या १७ व्या तारखेस, ह्मणजे कोल्हापूर सोडल्यानंतर सुमारें ३॥ वर्षांनीं ते परत आले. आपल्या प्रेमळ लोकांत व आईबापांत हे तरुण कुमार परत आल्यामुळें, जो आनंदीआनंद झाला, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. त्यांचें स्वागत करण्यासाठीं सर्व जातींमध्यें अहमहमिका सुरू होऊन, युवराजांना व कुमारांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या प्रसंगीं त्यांच्या प्रगतीबद्दल आस्था बाळगून, या दूर देशांत मातृतुल्य वात्सल्यानें त्यांची काळजी घेणाऱ्या मिसेस आयर्विन या बाईनाहि लोकांनीं मानपत्रें अर्पण केलीं.

मिसेस आयर्विन या अमेरिकेहून पाठविलेल्या आपल्या पत्रांत युवराज जयसिंगरावांविषयींचा आपला अभिप्राय पुढीलप्रमाणें लिहितात:—

"सुमारें १६ वर्षांपूर्वी जेव्हां हिंदुस्थानांत राजकुमारांच्या शिक्षणाची जबाबदारी घेण्यास कै० महाराजांनीं प्रथम मला विनंति केली, त्या वेळीं डुकराची शिकार, वाघाची शिकार व इतर जंगली खेळांतून कुमारांचें लक्ष काढणें मोठें कठीण काम होतें.

"तथापि हळूहळू ओंजारून गोंजारून व बरीच सहनशीलता धारण करून, त्यांना अभ्यास करून मेंदूला श्रम देण्याच्या महत्त्वाची जाणीव उत्पन्न करून देण्यांत आली.

"जयसिंगराव हे शिक्षक व विद्यार्थ्यांना सदां प्रिय असत.

"लंडन व ऑक्सफोर्डमध्यें त्यांच्या आज्ञाधारकपणामुळें व शिस्तीला धरून वागण्याच्या त्यांच्या स्वभावामुळें, त्यांच्या शिक्षकांचें व प्रोफेसरांचें त्यांच्यावर खरें प्रेम व भक्ति बसली. जयसिंगरावांचें व त्यांच्या सोबत्यांचें यूरोपीयन मुलांनीं अनुकरण करावें, असे ते वारंवार उद्गार काढीत असत.

"अभ्यासाच्या बाबतींत आपल्या सहाध्यायी विद्यार्थ्यांची अभ्यास करून बरोबरी करण्यासाठीं, ते सदा उत्सुक असत; परंतु कांहीं काळ अभ्यास चांगला करण्याच्या त्यांच्या काळजीचा परिणाम घातुक होऊं लागला; परंतु विशेष नुकसान न होण्यापूर्वींच, ही गोष्ट शिक्षकांच्या नजरेस येऊन, क्रिकेट व फुटबॉलसारखे घराबाहेरचे खेळ खेळण्यांत अधिक वेळ खर्च करण्यास त्यांनीं त्यांना लाविलें.

"त्यांच्या सहाध्यायी विद्यार्थ्यांमध्यें जयसिंगराव हे प्यारे होते. त्यांची हसत मुद्रा, सभ्य स्वभाव, उदार व दयाळु अंतःकरण, या गुणांमुळें कित्येक मुलांचे व विशेषतः भिडस्त व गरीब मुलांचे, ते एक प्रेमळ मित्र व संवगडी होते. युवराज एकटेच असतांना त्यांची मुद्रा विचारी व व्यवधानपूर्ण दिसे. आह्मी प्रवासांत असतांना जी एक मनोरंजक गोष्ट घडली, तिचा येथें उल्लेख करण्यासारखा आहे. सामान्य इंग्लिश गृहस्थाच्या मुलांप्रमाणेंच आपल्या मुलांना इंग्लंडांतील त्यांच्या शाळेच्या मुदतींत वागविण्यांत यावें, अशी कै० महाराजांची इच्छा होती; ह्मणून इतःपर हुजऱ्याचें काम, विशेषतः पोषाख करणें, टाय बांधणें इत्यादि, आपणांस स्वतःसच करावें लागणार, अशी तरुण युव-

राजांना धास्ती पडून, बुटाचे बंध बांधण्यास व नेकटाय बांधण्यास ते नाखुषीनें तयार झाले. घरीं व शाळेंत असतांना ते शिस्त सारखीच पाळीत असत.

"हिंदुस्थानांत व इंग्लंडांत असतांना डॉक्टर आयर्विन यांना व मला पुढें आश्चर्यकारक परिणाम घडवून आणण्यासारख्या, युवराजांच्या स्वभावांतील गुणांचें निरीक्षण करण्याची मुबलक संधि मिळाली. युवराजांची मुद्रा भव्य असून, लाखों दुःखित जनांचें बरें वाईट करण्याची सत्ता ज्याच्या हातीं आहे, त्यांना साजेल असा मिष्ठा आवाज व सुस्वभाव युवराजांच्या अंगीं होता.

"त्यांच्या माता महाराज्ञी आईसाहेब यांच्याविषयीं भक्ति व निष्ठा आणि त्यांचे वडील छत्रपति महाराज यांच्या इच्छेविषयीं आदर व तदनुसार वागण्याची त्यांची तत्परता हे त्यांच्या स्वभावांतील दोन प्रमुख गुण होते.

"बालपणीं आज्ञाधारक असणें, हा जर चांगल्या राज्यकर्त्याचा आधारभूत गुण समजावयाचा असेल तर मग हल्लींचे महाराज सर्वोत्कृष्ट ठरले पाहिजेत.

"युवराजांचा आत्मविश्वास व उघडें दिल असल्यामुळें, त्यांना आवश्यक असलेल्या गोष्टींची मला चिकित्सा करितां आली व त्यांच्या बौद्धिक प्रगतीच्या अतिशय आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांच्या बालिश स्वभावाचें सहानुभूतिपूर्वक यथार्थ आकलन करितां आलें."

कुमारांनीं सुमारें दोन महिने कोल्हापुरांत घालविले. या मुदतींत, लॉर्ड वुइलिंग्डन साहेबांची मुलाखत घेण्यासाठीं ते एकदा मुंबईस जाऊन आले. ते नामदार साहेबांची मुलाखत घेण्यासाठीं निघण्यापूर्वी, आक्टोबरच्या ३१ व्या तारखेस महाराज लिहितात:—

"माझ्या कुमारांच्या पालक मिसेस आयर्विन यांची आपणांस ओळख करून देण्याची मला परवानगी असावी. त्या जन्मानें स्कॉच असून, विवाहानें अमेरिकन आहेत. कोणत्याहि स्त्रीच्या हातून न होणारी, किंबहुना कोणत्याहि पुरुषाच्या हातून न होणारी, अशी कामगिरी या बाईनें बजाविली आहे, यांत शंका नाहीं. सी० पी० बी० इत्यादिकांचीं उदाहरणें जर आपण लक्षांत घ्याल, तर अपवादादाखल देखील एकहि चांगलें उदाहरण घडून आल्याचें दिसून येत नाहीं. अक्कलकोटचे फत्तेसिंगराव यांना मिस मॉगसन यांचा जसा उपयोग झाला, तसाच यांचाहि माझ्या कुमारांना उपयोग झाला. हे कुमार

सह्य आहेत. माझे दोन पुत्र शिवाजी व राजाराम, माझे पुतणे आप्पासाहेब, माझे नातलग बापूसाहेब इंगळे व माझे जहागिरदार नेसरीकर हे होत. अगोदर मिसेस आयर्विन यांची जर आपण गांठ घ्याल, तर त्या, कुमारांचा सर्व इतिहास आपणांस निवेदन करतील. मला माझ्या मुलांची प्रशंसा करावयाची नसून, मिसेस आयर्विन यांची मला प्रशंसा करावयाची आहे. इंग्लिश व देशी रीतीभातींत तज्ञ असलेले कर्नल उडहाऊस व माझे बंधू, हे मिसेस आयर्विन यांनीं कुमारांना दोन्ही रिवाजांचें वळण लाविलें असल्याचें आपणांस सांगतील. मनानें व शरीरानें ते शुद्ध आहेत. धूम्रपानाचा देखील त्यांना संपर्क नाहीं. मिसेस आयर्विन यांना मी पुढें पाठवीत आहें, म्हणजे नामदार साहेबांनीं त्यांची गांठ घेतल्यास, कुमारांची आपणांस यथार्थ कल्पना होईल. मिसेस आयर्विन यांनीं जी कामगिरी बजाविली आहे, तिचें महत्त्व जनतेला, माझ्या अधिकारी लोकांना, सरदारांना व इतरांना इतकें वाटत आहे कीं, त्यांचीं मानपत्रें स्वीकारण्याला त्यांना पुरेशी वेळ देखील मिळत नाहीं. यावरूनच त्यांची योग्यता समजून येईल. माझीं मुलें पाहून, मला अगदीं संतोष झाला, ही गोष्ट कबूल करणें मला भाग आहे. आपणांस मला एक विनंति करावयाची आहे. कुमार आपले शिक्षण पूर्ण करण्यास फार आतुर असल्यामुळें, एक दोन महिन्यांत मी त्यांना परत इंग्लडला पाठविणार आहें. पनामा कालवा, शेतकी विषयक व रसायनशास्त्र विषयक, कारखाने पाहाण्यासाठीं, रस्त्यांत अमेरिकेमध्यें कांहीं महिने ते काढतील. तेथील दरबारी वकीलाला अगर आपल्या ओळखीच्या मनुष्याला देण्यासाठीं म्हणून एक ओळखीचें पत्र आपण जर कृपा करून द्याल, तर मजवर उपकार होतील. मिसेस आयर्विन यांची व माझ्या कुमारांची आपणांस यथार्थ कल्पना व्हावी, म्हणून मीं हें विस्तृत पत्र लिहिलें आहे."

दुर्दैवानें कुमारांना अमेरिकेला व यूरोपला परत पाठविण्याची कल्पना कृतींत पुनः कधींच उतरली नाहीं.

या अवधींत महाराज, जुन्या परंपरेविषयीं कुमारांच्या मनांत कितपत आवड होती, हें पाहण्यांत व कुमारांची धर्मावर डोळस श्रद्धा बसावी, म्हणून प्रयत्न करण्यांत चर होते. अक्टोबरच्या २८ व्या तारखेस महाराज श्रीमंत बापूसाहेबांना लिहितात:—

" सुमारें तीन साडेतीन वर्षांनीं, कुमार येथें परत आले असल्यामुळें, धर्माच्या चालीरीतींचें व आचारविचारांचें अधिक ज्ञान त्यांना झालें पाहिजे. व सर्वांत महत्त्वाची गोष्ट झटली ह्मणजे, प्रौढ होऊन ते परत आल्यानंतर, स्वतः-करितां मित्रांची व सोबत्यांची निवड करण्यास व आपल्या देशाचा तिटकारा न करितां त्यावर प्रेम ठेवून, आपल्या पुढील आयुष्यांत सुखी होण्यास, त्यांनीं शिकलें पाहिजे, अशी माझी इच्छा आहे. येथील अल्पशा अवधींत त्यांना आपल्या लोकांच्या व आपल्या प्रेमळ आईच्या व काकींच्या आणि त्याचप्रमाणें आपल्या कुटुंबांतील प्रमुख माणसांच्या सहवासांत त्यांनीं विशेष असलें पाहिजे, अशी माझी इच्छा आहे. ते जानेवारी अगर फेब्रुवारी महिन्यांत परत जातील. तुह्मी व मी, चुलते व वडील असल्यामुळें, आईच्या कोमल अंतःकरणाची कल्पना करूं शकतों, इतरांना या गोष्टी समजत नाहींत. ते दोन महिने येथें असेतों-पर्यंत आमच्या धर्माविषयीं, सामाजिक चालिरीती वगैरे विषयीं, त्यांच्या दर्जाच्या मानानें साम्राज्य सरकारांशीं त्यांनीं कसें वागावें या गोष्टीविषयीं, तुह्मी त्यांना जरूर समजावून सांगा. कृपा करून, त्यांना योग्य वळण लावा; ह्मणजे भावी काळांत त्यांचें सर्व ठीक चालेल. "

डिसेंबरच्या ९ व्या तारखेस कुमारांना यूविंग ख्रिश्चन कॉलेजांत, शेतकी व तत्सम विषयांचें अध्ययन करण्यासाठीं अलाहाबादला पाठविण्यांत आलें. त्यांनीं त्या कॉलेजमध्यें एक वर्ष काढल्यानंतर आपल्या संस्थानांतील राज्य-कारभाराचें व्यावहारिक ज्ञान मिळविण्यासाठीं ते आपल्या राजधानींत परत आले.



## प्रकरण १९ वें.

# महा-युद्ध.



९१४ सालच्या आगष्ट महिन्यांत जर्मनीविरुद्ध व पुढें थोड्याच दिवसांनीं तुर्कस्थानाविरुद्ध, ब्रिटिशसाम्राज्यानें जेव्हां युद्ध पुकारिलें, तेव्हां हिंदुस्थानच्या सर्व वर्गांतील लोकांच्या राजनिष्ठेला इतकें पराकाष्ठेचें भरतें आलें की, त्यावरून ग्रेट ब्रिटनच्या इतिहासाच्या कोणत्याहि भागांत पूर्वीं इतक्या प्रमाणांत कधींहि अनुभवास न आलेला असा हिंदुस्थानांतील ग्रेट ब्रिटनच्या न्यायी धोरणाचा विजय झाला, असें दृष्टोत्पत्तीस आलें. हें धोरण सर्वस्वीं निर्दोषी होतें, असें ह्मणतां येणार नाहीं, ही गोष्टहि याबरोबरच सांगितली पाहिजे. केव्हां केव्हां या धोरणाच्या इतिहासांत अक्षम्य प्रमादहि घडले आहेत. कांहीं कृत्यांचा खुलासा हीं कृत्यें ज्यांच्या हातून घडलीं, ते मुत्सद्दी, ब्रिटिश बेटांतील लोकमताच्या सामान्य विवेकबुद्धीनें आंखलेल्या धोपट मार्गापासून च्युत झाले, असें मानल्याखेरीज, होणें शक्य नाहीं; परंतु महायुद्धामुळें ओढवलेल्या दुर्धर प्रसंगीं अखिल हिंदुस्थानच्या साम्राज्यविषयक खऱ्या भावनांची पूर्ण कसोटी लागून, हिंदुस्थान हें ब्रिटिश साम्राज्याचें घटक या नात्यानें हिंदुस्थानच्या ग्रेट ब्रिटनशीं राहाणाऱ्या संबंधावरच हिंदुस्थानचा भावी भाग्योदय सर्वस्वीं अवलंबून आहे, याची खात्री पटून चुकली. साम्राज्यविषयक राजनिष्ठेच्या हिंदुस्थानच्या अंतःस्थ भावनांच्या या आविष्करणामध्यें हिंदुस्थानच्या संस्थानिकांनीं पूर्ण भाग घेतला होता, हें येथें सांगावयास पाहिजे असें नाहीं. या साम्राज्याच्या ऐक्याचें बादशाहा हे अत्यंत अनुरूप असें दृश्य चिन्ह होय. ब्रिटिश सरकार व संस्थानिक यांच्या अन्योन्य संबंधापासून होत असलेल्या हितप्रद परिणामांविषयींचे छत्रपति शाहुमहाराजांचे विचार काय होते, ते वाचकांस आतां माहीत झाले असल्यामुळें, युद्ध सुरू होतांच साम्राज्याच्या कार्यीं त्यांची अंतःकरणपूर्वक निष्ठा व शक्य त्या मार्गानें या कामीं मदत करण्याची त्यांची तत्परता, हीं उच्चतम प्रमाणांत जागृत झालीं असलीं पाहिजेत, हें त्यांना न सांगताहि समजण्यासारखें आहे. युद्धाला सुरवात होतां

क्षणींच, महाराज आपल्या नेहमींच्या उघडया दिलाला अनुसरूनच साम्राज्याची सेवा करण्यास सज्ज झाले. आपल्या इंग्लंडांतील मुलांना व सोबत्यांना कोणत्याहि कामीं स्वयंसेवक ह्मणून घ्यावें, अशी महाराजांची इच्छा असल्याचा यापूर्वीच उल्लेख केला आहे. याच हेतूनें १९१४ सालच्या आगष्ट महिन्याच्या १० व्या तारखेस महाराज कर्नेल वुडहाऊस यांना लिहितात:—

" कुमारांच्या वयासंबंधीं आपणांस माहिती देण्यास मी माझ्या दिवाणांना सांगितलें आहे. सरासरीनें त्यांचें वयोमान १६ वर्षांचें आहे.

" स्वयंसेवक होऊं इच्छिणाऱ्या नातलगांची व सरदार इत्यादि लोकांची एक यादी करण्यास माझ्या बंधूंना मीं सांगितलें आहे. ही त्यांची इच्छा औपचारिक नव्हे. मी वरचेवर या विषयासंबंधीं लिहिणार आहें, ह्मणून माझ्या सर्व पत्रांची योग्यता थैलीपेक्षां अधिक समजण्यांत यावी. थैली पाठविण्याची औपचारिक पद्धत मला आवडत नाहीं. ज्यांची खरी इच्छा आहे, अशांचींच नांवें पाठविण्यास मीं माझ्या बंधूंना सांगितलें आहे. माझ्या हातचीं दोन्हीं पत्रें आपण पुढें पाठवावीं.

" ता० क०—या सर्व गोष्टींत ज्यांची मला मदत होत आहे व जे स्वतः मेहेनत करीत आहेत अशा माझ्या बंधूखेरीज इतर जहागिरदारांना आपण विचारावें. माझ्या बंधूच्या व माझ्या हाताखालीं चांगले लोक आहेत. जरूर असल्यास आसपासच्या जिल्ह्यांत व आमच्या संस्थानांत निदान युद्धसामुग्री गोळा करण्याची आह्मांस परवानगी असावी. स्वयंपाक, मोतद्दाराचें काम, हमाली अगर कोणतेंहि हलकें काम करण्यास आह्मी तयार आहों. "

अशा प्रकारच्या निष्ठेनें या प्रसंगीं महाराज साम्राज्यसेवा बजावण्याच्या उद्योगाला लागले. श्रीमंत बापूसाहेबखेरीज महाराजांच्या इतर मांडलिकांना खुद्द रेसिडेंट साहेबांनींच विचारणें अधिक बरें, असें जरी महाराजांना वाटलें--याचीं कारणें अतिशय उघड असल्यामुळें त्यांचा येथें उल्लेख करण्याची आवश्यकता नाहीं--तरी शक्य त्या मार्गानें साम्राज्याला मदत करण्यासाठीं महाराजांनीं आपले सरदार, अधिकारी लोक, प्रमुख नागरिक इत्यादिकांना पत्रें पाठविलीं. महाराजांनीं अगर महाराजांच्या राजनिष्ठ प्रजाजनांनीं कोणत्या दिशेनें मदत करावयाची हें वेळींच कळविण्याची सरकारची तयारी न झाल्यामुळें या इच्छेस मूर्त स्वरूप येण्यास उशीर झाला. परंतु लॉर्ड वुइलिंग्डन

साहेबांनीं सुरु केलेल्या वॉर रिलीफ फंडाला वर्गणी गोळा करण्याचें काम अगदीं आरंभापासून सुरू होतें. १९१५ सालच्या जुलै महिन्याच्या ३० व्या तारखेस महाराज रेसिडेंट साहेबांना कळवितात:—

“ माझे सरदार, इनामदार, संस्थानचे नोकर व माझ्या संस्थानची रयत या सर्वांनीं वॉर रिलीफ फंडाकरितां ह्मणून सुमारें ३९,००० ची रक्कम वर्गणीन जमविली आहे. जखमी लोकांच्या गाड्यांची तरतूद करण्याकडे व त्या व्यवस्थित राखण्याकडे या रकमेचा उपयोग करावा, अशी जी आपण थोड्या दिवसांपूर्वी सूचना केली होती, ती मला अगदीं पसंत आहे. मला जे आंकडे मिळाले आहेत, त्यावरून आतां गोळा झालेल्या रकमेंतून एक वर्षपर्यंत तूर्त पांच गाड्यांची तरतूद करितां येईल असें आह्मांस वाटतें. ह्मणून माझ्या संस्थानतर्फे ही देणगी स्वीकारण्यासाठीं नेक नामदार लॉर्ड वुइलिंगडनसाहेबांना आपण जर कृपा करून लिहाल, तर मी आपला आभारी होईन. आपणांकडून काय तें कळतांच या रकमेची हुंडी आपणांकडे पाठविण्यांत येईल. दोस्तांना विजय प्राप्त होऊन या महायुद्धाची समाप्ति लौकरच व्हावी, ज्या कार्यासाठीं हें युद्ध पुकारिलें आहे, त्याचा खरेंपणा प्रस्थापीत व्हावा, व घातुक हडेलहप्पीला कायमची मूठमाती मिळावी, अशी माझ्या प्रजाजनांची उत्कट इच्छा आहे. ”

या वॉर रिलीफ फंडाला खुद्द महाराजांनीं २०,००० रुपयांची वर्गणी दिली व नेकनामदार लेडी वुइलिंगडनसाहेबांनीं सुरू केलेल्या स्त्रियांच्या फंडाला आणखी ४,००० रुपयांची देणगी दिली.

कूट-एल-आमारा येथील हिंदी सेनेवर तुर्की सेनेचा मराठा शिपायांना वेढा पडून या व इतर आपदा ज्या त्यांच्यावर ओढवल्या त्यामुळें मराठा राष्ट्रावरील आपल्या विलक्षण वजनाचा उपयोग करण्याची महाराजांना संधि प्राप्त झाली. हिंदी सेनेला घेरा पडलेल्या दीर्घ अवधींत, अन्नाचा पुरवठा अपुरा पडून, घोड्याच्या मांसावर शिपायांनीं जगण्याची आवश्यकता भासूं लागली; परंतु मराठा पलटणींतील लोक, मांस खाण्यास तयार होईनात. वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं जरी आपली शिकस्त करून पाहिली, तरी घोड्याचें मांस निषिद्ध ठरविणाऱ्या रूढीचें ते उल्लंघन करीनात. हिंदु धर्माच्या मुख्य अधिकाराची घमेंड बाळगणारे ब्राह्मण व त्यांचे शंकराचार्य आतां कोठें गेले होते ? मराठा पलटणींतील लोक—यांत केवळ मराठा जातीचेच लोक नसून, धनगर, परीट,

माळी इत्यादि तत्सम जातीचे लोकहि होते. त्यांचे सामाजिक पुढारी कोल्हापूरचे छत्रपतिमहाराज यांचाच फक्त शब्द ऐकण्यास ते तयार होते. घोड्याच्या मांसाचा उपयोग करण्यास परवानगी देणारी त्यांच्या सही शिक्याची आज्ञा जर ते आपणांस पाठवूं शकतील, तर त्याचा उपयोग करण्यास आपली हरकत नाहीं, असें त्यांनीं आपल्या अधिकाऱ्यांना सांगितलें; ह्मणून मुंबई सरकारनें महाराजांना ही गोष्ट विदित केली; व महाराजांनीं पलटणींतील लोकांचीं मनें वळविण्यास आपली लागलींच सम्मति दिली. आकाशयानांतून खुद्द स्वतः तेथें जाऊन, याविषयासंबंधीं त्यांच्याशीं बोलण्याचा महाराजांचा प्रथम विचार होता; परंतु वेढा पडलेल्या सेनेंत महाराजांना नेणें ह्मणजे आपल्या अंगावर बरीच मोठी जबाबदारी घेणें, असें सरकारला स्वाभाविकपणेंच वाटलें असावें; ह्मणून महाराजांची ही इच्छा सरकारनें मान्य केली नाहीं. तथापि शत्रूंचा वेढा पडलेल्या मुदतींत घोड्याच्या मांसाचा उपयोग करावा ह्मणून शिपायांना सांगणारें आपल्या सहीचें एक आज्ञापत्र महाराजांनीं पाठविण्याचें ठरलें. मार्चच्या २३ व्या तारखेस हें आज्ञापत्र पाठवून महाराज लिहितात:--

" काल आमच्या संभाषणांत ठरल्याप्रमाणें रणांगणावर असलेल्या मराठे अधिकाऱ्यांना व लोकांना पाठवावयाचें एक विनंतिपत्र असलेली एक थैली निराळी पाठविण्यांत येत आहे. त्याचा इष्ट परिणाम होईल व घोड्याच्या मांसासंबंधीं जातीची आडकाठी या उपर राहाणार नाहीं असा मला भरंवसा आहे."

ही थैली अनेक दृष्टीनें महत्त्वाची आहे. मराठा पलटणींतील लोकांना या अन्नाचा स्वीकार करण्यास त्यांचीं मनें वळविण्याच्या कामीं या पत्राचा तात्काळ उपयोग झाला. त्यामुळें या पत्राच्या अभावीं जितका वेळ शक्य होतें, त्यापेक्षांहि अधिक काळ त्यांना टिकाव धरितां आला; ह्मणून तें मी येथें जसाचें तसें देत आहे:--

" मराठा पलटणींतील माझे बांधव, अधिकारी लोक व शिपाई गडी हो, सार्वभौम सरकार आपल्या दोस्तांसह सुमारें गेलीं दोन वर्षे महायुद्धामध्यें गुंतलें आहे. आपल्या शूर पूर्वजांच्या निष्कलंक यशाला साजेशी, धैर्याची व शौर्याची कामगिरी मराठे एकसारखें बजावीत असल्याचें ऐकून, प्रत्येक मराठ्याला मोठा अभिमान वाटत आहे. आपणांस माहित असल्याप्रमाणें, मी ब्रिटिश सेनेंतील शूर मराठा पलटणीचा कर्नल असल्यामुळें, या पराक्रमाचें महत्त्व मला विशेष वाटतें.

या महायुद्धामध्यें आह्मांपैकीं कित्येकांना प्रत्यक्ष भाग घेतां आला नाहीं; ह्मणून आमची निराशा होणें स्वाभाविक आहे. तथापि आपल्या जिवाची यत्किंचितहि पर्वा न करितां, मोठे हाल सोसून, साम्राज्याच्या कार्यासाठीं आमचेच बांधव रात्रं-दिवस झटत असल्याचें पाहून, प्रत्येकाला मोठें समाधान वाटत आहे. माझे मराठा बांधव निस्सीम निष्ठेनें आपलें पवित्र कर्तव्य बजावीत असतांना, ते मोठ्या संकटांत सांपडले आहेत, व जातीच्या निर्बंधानुसार कोणतें खाद्य व कोणतें अखाद्य ठरवावयाचें, या संबंधीं एक प्रश्न उपस्थित झाला आहे, असें मला समजतें. शत्रूंच्या वेढयांत ते सांपडले असल्यामुळें, त्यांना दिवसानुदिवस अन्नाचा पुरवठा कमी पडत चालला आहे. सामुग्रीचा पुरवठा करण्यासाठीं साम्राज्य सरकार आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीत आहे. तरी देखील वेढयांत सांपडलेल्या सैनिकांना सामुग्री पाठविणें अतिशय दुरापास्त झालें आहे. अशा प्रसंगीं प्राण वांचविण्यासाठीं मिळालेल्या अन्नावर जगणें जरूर आहे. संकटांच्या प्रसंगीं लोकांनीं कसें वागावें हें ज्यांत सांगितले आहे अशा महाभारतामध्यें हेंच तत्त्व प्रतिपादन केलें आहे. घोडयाच्या मांसाचा उपयोग करण्यास कोणतीच आडकाठीं नाहीं, असें खुद्द आमच्या शास्त्रावरून देखील स्पष्ट होतें. प्राचीनकाळीं घडलेल्या महा अश्वमेधांची हकीकत तुह्मांपैकीं प्रत्येकाला ठाऊक आहे. या काळीं घोडयाचें मांस खात असत. ह्मणून शत्रूंच्या कचाटींत सांपडलें असतां त्याचा उपयोग करण्यास यत्किंचितहि आडकाठी असणें शक्य नाहीं. मी माझ्या नातलगांसह व माझ्या जातीच्या इतर लोकांसह या युद्धांत भाग घेऊन, तुमच्या कष्टांचा व संक-टांचा मोठ्या आनंदानें वांटेकरी झालों असतों. मग हा अन्नासंबंधीचा प्रश्न सहजच सुटला असता; परंतु दुर्दैवानें ही संधि प्राप्त होणें माझ्या नशीबीं नाहीं; व आतां तुह्मांला येऊन मिळणें मला अशक्य आहे. ह्मणून माझे बांधव हो, माझी अत्यंत कळकळीची व अंतःरणपूर्वक अशी प्रार्थना आहे कीं, या प्रसंगीं छाती घट्ट करून, संकटसमयीं शास्त्रानें सांगितलेलें कर्तव्य लक्षांत आणून, उपलब्ध असलेल्या अन्नावर तुह्मीं जिवंत रहावें आणि तुह्मीं आपलें कर्तव्य बजावून, तुमच्या पूर्वजांची कीर्ति निःष्कलंक राखावी. माझा थोर व पूज्य पूर्वज, मराठा साम्रा-ज्याचा संस्थापक शिवाजी हा आपल्या अनुयायांसह दिल्लींत अटकेंत असल्यावेळीं या महायोध्यानें या बिकट प्रसंगाला कसें तोंड दिलें हें तुह्मांला माहित आहेच. घोड्याच्या मांसाचा उपयोग करून, जातिनिर्बंध मोडल्याबद्दल तुह्मांला यत्किंचितहि

दूषण लागणार नाहीं, याबद्दल मी हमी देतों. माझ्या शब्दांवर पूर्ण भरंवसा ठेवून आपण रहावें. या कठीण प्रसंगांत तुह्मी सांपडलां नसून, मी सांपडलों आहें, असें मी समजतों. मला या संकटाची पूर्ण जाणीव आहे. ह्मणून तुह्मीं परत आल्यावर तुमच्या लग्नकार्यांत व इतर धार्मिक समारंभांत तुह्मांला कोणतीच गैरसोय भोगावी लागणार नाहीं, असें देवाला स्मरून मी वचन देतों.

या गोष्टीच्या सत्यतेबद्दल या विनंति पत्रावर माझी सही, शिक्का व मोर्तब करीत आहें. माझे शब्द निरर्थक होणार नाहींत व तुह्मी आपले प्राण बचावाल आणि जातिविषयक नसत्या अडचणी उपस्थित करून व आपल्या पवित्र कर्तव्याची हेळसांड करून तुह्मी आपल्या पूर्वजांच्या चांगल्या नांव लौकिकाला काळें फांसणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. ''

तथापि या गोष्टीनें महाराजांचें सांत्वन न होऊन हें आज्ञापत्र पाठविल्या-नंतर दुसऱ्या दिवशीं महाराज लिहितात:—

" वेढा पडला असतांना तेथें जाण्यास सरकारनें मला परवानगी दिली नाहीं, हा सरकारचा मोठा दयाळूपणा आहे. तरीदेखील माझी जाण्याची इच्छा आहे. आकाशयानांतून जाण्याची मला भीति वाटत नाहीं.

" लष्करी कामास मी योग्य नाहीं, हें मला माहीत आहे. मला तशाप्रकारचें शिक्षणहि मिळालें नाहीं. एकदां माझा रणभुमीवर जाण्याचा विचार होता; ह्मणून त्याबद्दल डॉ० व्हेल यांचा मी सल्ला घेतला. मी मोठे परिश्रम करण्यास जरी समर्थ नाहीं तरी साधारण प्रतीचीं कामें करण्यास मी योग्य आहें, असें त्यांनीं सांगितलें. तथापि शिकारीच्या वेळीं नेक नामदार साहेबांनीं माझें शारीरिक सामर्थ्य पाहिलें असल्यामुळें, मी सर्वस्वीं निरुपयोगी नाहीं, असें मला वाटतें.

" मी मराठा घराण्यांत जन्मलों आहे, हें आपणांस माहीत आहे. ह्मणून या मोठया राष्ट्रीय युद्धाशीं माझा कांहीं तरी संबंध असावा असें मला वाटतें. ते वेढयांतून बाहेर पडल्यानंतर त्यांना उत्तेजन देऊन उदाहरण घालून देणें, त्यांचा स्वयंपाक करणें, त्यांच्या सुखसोयी पाहाणें, इत्यादि प्रकारचें मी ज्या कामाला योग्य आहे, असें आपणांस वाटेल, तें काम करण्यास मला कृपा करून पाठवा.

"नामदर साहेबांची इच्छा असल्यास, अभिनंदनपर, उत्तेजनपर व सहानु-भूतिपर संदेश पोंचविणें व त्यांनीं बजाविलेल्या कामाबद्दल ह्मणून कांहीं देणग्या व बक्षिसें देणें व जखमी झालेल्या लोकांकरितां कांहीं विशेष बक्षिसें देणें, इत्यादि कामें करण्यास मला परवानगी देतां येण्यासारखें आहे. ते वेढ्यांतून बाहेर येतांच त्यांच्या प्रीत्यर्थ वर्गण्या गोळा करण्याचें काम मला सांगतां येण्यासारखें आहे. गरीब जखमी झालेल्या लोकांची, ते परत येतेवेळीं शुश्रूषा करण्यास जर मला पर-वानगी देण्यांत येईल तर तो एक मी मोठा बहुमान समजेन.

"तोंपर्यंत प्रस्तुत प्रसंगीं कोल्हापूरच्या महाराजांना जखमी लोकांची काळजी घेण्यासाठीं व त्यांच्या सुखसोयी पाहून त्यांना उत्तेजन देण्यासाठीं सरकार पाठवीत आहे असा संदेश वेढ्यांत सांपडलेल्या मराठ्यांना आपण, लष्करी अधि-काऱ्यांमार्फत पाठवण्यास हरकत नाहीं, असें मला वाटतें. अशाप्रकारच्या संदेशामुळें, शिपायांना धैर्य येऊन त्यांना उत्तेजन व उत्साह येईल, यांत शंका नाहीं.

"मी हें सर्व अंतःकरणपूर्वक सांगत आहें. कृपा करून मला नाउमेद करूं नकां."

वास्तविक पाहिलें असतां, महाराजांचा मानसिक जोम जरी यत्किंतहि कमी झाला नव्हता तरी महाराजांच्या शरीरावर वार्धक्यानें आणि त्याच्या साथी-दारांनीं पुष्कळच पगडा बसविला होता ह्मणून महाराज इच्छित असलेले, अशा प्रकारचे शारिरीक श्रम घेणें त्यांना शक्य नव्हतें. ह्मणून महायुद्धाला अत्यंत आवश्यक असलेली गोष्ट आपल्या संस्थानांत राहूनच त्यांना करणें अवश्य होतें व यामुळें ते स्वतः रणांगणावर न जाण्यानें होत असलेली उणीव, बऱ्याच अंशानें त्यांना भरून काढतां आली. पुष्कळ लोकांच्या अजमासाबाहेर महायुद्ध लांब-ल्यामुळें, अननुभूत अशा प्रमाणांत शिपायांची भरती करणें जरूर झालें. आरंभीं ब्रिटिश रिक्रूटींग पार्टीनें हें काम हातीं घेतलें. या पार्टीनीं संस्थानिकांच्या हद्दींतहि आपली कामगिरी चालविली. महाराज आपल्या संस्थानांत त्यांना शक्य तेवढी मदत करीत असत; परंतु कित्येक महिनेपर्यंत समाधानकारक अशी फल-प्राप्ति झाली नाहीं. मोठ्या प्रमाणांत सैन्य भरतीची जरूरी नसणारा असा मध्यं-तरी बराच शांततामय काळ लोटल्यामुळें, या नवीन सैन्य भरतीच्या मोहिमीनें खेडगळ लोकांना धास्ती उत्पन्न होऊन, हे भरती करणारे लोक खेड्यांत जातांच खेड्यांतील लोक भिवून पळूं लागले! या भरती करणाऱ्या लोकांनीं अवलंबिलेल्या

मार्गांत, विशेषतः त्यांच्या स्वच्छंदी वृत्तीला जेथें सहज आळा घालतां येण्यासारखा नव्हता, अशा लांबच्या ठिकाणीं ते गेले असतांना, अरेरावीची बरीचशी छटा दिसून येत होती, हीहि गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. अशा मार्गांनीं शिपायांचें भरती करण्याचें काम लोकप्रिय न होतां, उलट खेडगळ लोकांना रिक्रूटिंगबद्दल मोठी भीति उत्पन्न झाली. एकादा मनुष्य आपखुषीनें या भरती करणाऱ्या लोकांना मिळाला तरी त्याला बलात्कारानें दाखल करून घेण्यांत आलें, अगर विश्वासघात करून त्याला फसविण्यांत आलें, अशी लोकांची वारंवार समजूत होई. अशा लोकांना केव्हां केव्हां सोडविण्यासाठींहि प्रयत्न करण्यांत येत. असे प्रयत्न करीत असतांना उभय पक्षांची लठ्ठालठ्ठी झुंपे, हें सांगावयास नकोच. सैन्याची भरती करणाऱ्या लोकांपेक्षां लोकसमुदाय जेव्हां जास्त जमे तेव्हां खवळलेल्या लोकांकडून यांना चांगलाच चोप मिळे. असा एक दंगा कोल्हापूर संस्थानांतील चिंचली नांवाच्या गांवीं १९१६ सालच्या मार्च महिन्यांत झाला. तेथें अत्याचार करण्याकडे लोकांची प्रवृत्ति कां झाली होती, हें महाराज जाणून होते; परंतु युद्धाच्या वेळीं रिक्रूटिंग पार्टीचें ह्मणणें खोटें ठरविणें कठीण होतें. १९१६ सालच्या एप्रील महिन्याच्या १५ व्या तारखेस महाराज लिहितातः—

" जेव्हां मीं आपली गांठ घेतली तेव्हां चिंचली प्रकरणाविषयीं कांहींच बोलणें मला शक्य नव्हतें. रिक्रूटिंग पार्टीच्या लोकांना मार बसल्या कामीं झालेल्या चौकशीचा रिपोर्ट आतां पुरा झाला आहे. त्यावरून लष्करी लोक वाईट लोकांच्या नादीं लागले होते, असा माझा तर्क झाला आहे. दोन पोलिस लोकांनीं आपणांस मारिलें असें ते आतां ह्मणत आहेत. चिंचलीकर हा मराठा असल्यामुळें माझा नातलग आहे. कर्नल ग्रॅथम यांच्या हाताखालीं त्यानें लष्करी शिक्षण संपादिलें आहे. ह्मणून लष्करी लोक त्यांना फार आवडतात; ह्मणून अशाप्रकारच्या गोष्टीला ते उत्तेजन देतील हें संभवनीय नाहीं. माझा स्वतःवर जितका विश्वास बसेल तितकाच चिंचलीकरावर आहे. परंतु सरकारची इच्छा असल्यास त्याला शासन करण्यास माझी आडकाठी नाहीं. सैन्यांत भरती होणें अगर न होणें, हें ज्याच्या त्याच्या खुषीवर आहे. हिंदुस्थानांत कोठेंहि सक्ति करण्यांत येत नाहीं. ह्मणून अशा प्रकारचे दंगे तरी कां व्हावेत हें मला समजत नाहीं. "

कांहीं लोकांची चौकशी होऊन त्यांना शासन करण्यांत आलें. मात्र या निरपराधी इनामदारानें संरक्षण करण्याच्या कामीं महाराजांना यश आलें.

गेल्या अर्ध्यापेक्षां अधिक शतकांत जे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होऊन गेले, त्यांमध्यें श्रेष्ठ गणलेले लॉर्ड हार्डिंग साहेब १९१६ सालच्या एप्रील महिन्यांत हिंदुस्थानाहून निघाले व आपण रिटायर होण्याच्या वेळीं त्यांनीं महाराजांच्या कार्याची योग्य शब्दांत तारीफ केली. मार्च महिन्याच्या १४ व्या तारखेस ते लिहितात:---

" बादशाहांशीं तुह्मीं जी राजनिष्ठा सर्वदा व्यक्त केली आहे, तिचें महत्व मी अतिशय मानीत आहें, हें या प्रसंगीं स्पष्ट करण्याची व हल्लींच्या आणीबाणीच्या प्रसंगीं साम्राज्याला आपण जी मदत केली आहे, तिची जाणीव व्यक्त करण्याची माझी इच्छा आहे. "

मार्चच्या ३१ व्या तारखेस महाराज लिहितात:—

" माझ्या ल्हानशा संस्थानचें सामर्थ्य मर्यादित असल्यामुळें माझ्या उत्कट इच्छेप्रमाणें मला सरकारच्या उपयोगीं पडतां आलें नाहीं, ही गोष्ट मला फार झोंबते. तथापि अंत:करणपूर्वक राजनिष्ठेनें बजाविलेल्या माझ्या अल्प सेवेचा स्वीकार करून नेक नामदार साहेबांनीं तिचें महत्व जाणलें, ही गोष्ट मला समाधानाची झाली आहे. दोस्त राष्ट्रें जो उदात्त स्वार्थत्याग करीत आहेत, तो फलद्रुप होऊन हडेल हप्पीच्या भूताला कायमचें गाडून टाकून युद्धाचा लौकरच शेवट होईल, अशी मला उत्कट आशा आहे. माझ्यापूर्वीं होऊन गेलेल्या नृपतींनीं व माझ्या सर्व कुटुंबानें ब्रिटिश सरकारार्शीं स्नेहभावानें राहण्याबद्दल सदां प्रयत्न केले आहेत. त्यांच्या पाऊलावर पाऊल ठेवून वागण्याचा माझा सतत प्रयत्न आहे. ह्मणून अशा अभिनंदनपर शब्दांत आपण या संबंधाचा उल्लेख आपल्या पत्रांत केला आहे, याबद्दल मला मोठा अभिमान वाटतो. "

कूट येथें वेढ्यांत सांपडलेली सेना शरण गेल्याचें जेव्हां महाराजांनीं ऐकलें, तेव्हां महाराजांना फारच वाईट वाटून त्यांनीं गव्हर्नरसाहेबांना पुढील तार केली:—

" कूट-एल-आमारा येथील शूर सेनेच्या दुर्दैवाचा मी पूर्णपणें वांटेकरी आहें, ही गोष्ट व्यक्त करण्याची माझी इच्छा आहे. अतिशय प्रतिकूल परि-

स्थितींत त्यांनीं खंबीर वर्तन ठेविलें, ही गोष्ट महायुद्धांतील अतिशय ओजस्वी गोष्ट ह्मणून तिची सदा ख्याती राहील."

रिक्रूट भरती करणाऱ्या लोकांच्या हातून घडलेल्या प्रमादांचे महाराजांना जे दुष्परिणाम भोगावे लागले, त्यामध्यें दुर्दैवानें चिंचलीची मारामारी ही एकच गोष्ट नव्हती. रिक्रूटिंग पार्टीकडून कोल्हापुरांत रिक्रूट मिळविण्याच्या कामीं सक्ति केली जाते, या समजुतीनें रिक्रूटांच्या हितचिंतकांकडून प्रतिकार करण्याचा जो प्रयत्न झाला, त्यामुळें चिंचलीपेक्षां फारच भयंकर स्वरूपाचें एक प्रकरण उपस्थित झालें. आणखी कित्येक वर्षेंपर्यंत ज्यांची सविस्तर हकीकत देणें शक्य होणार नाहीं, अशा महाराजांच्या आयुष्यांतील गोष्टींपैकीं हीहि एक गोष्ट आहे. जरूर असलेली उणीव भरून काढण्याचें काम भावी कालावर सोंपवून घडलेल्या प्रकाराची संक्षिप्त हकीगत वाचूनच वाचकांनीं समाधान मानिलें पाहिजे. असो. कॅप्टन डफळे यांच्या नेतृत्वाखालीं कोल्हापुरांत रिक्रूटिंग पार्टीचे लोक कित्येक महिने रिक्रूट भरतीचें काम करीत होते; परंतु त्यांना विशेष यश आलें नाहीं. सुमारें बारा महिने काम करूनहि त्यांना फक्त १२ च रिक्रूट मिळाले. फेब्रुवारी महिन्याच्या प्रारंभीं, यापूर्वीं उल्लेख केलेल्या चिंचली प्रकरणांत संस्थानावर दांत असलेला एक नाईक या रिक्रूटींग पार्टीत येऊन मिळाला. संस्थानांतील अधिकाऱ्यांच्या मदतीशिवाय स्वतंत्रपणें काम करणाऱ्या रिक्रूट भरतीच्या लोकांनीं अवलंबिलेल्या वाम मार्गासंबंधीं प्रचलित असलेले जनापवाद,—अशा जनापवादाचा खरें खोटेपणा ठरविणें हें नेहमीं कठीण काम असतें,—एकसारखे वाढत जाऊन शहरांत चोहोंकडे गवगवा सुरू झाला. रिक्रूट भरती कामगार, लोकांना पकडून नेतात, यासंबंधींच्या कंडया वणव्याप्रमाणें पसरत जाऊन, फेब्रुवारी महिन्याच्या १६ व्या तारखेच्या पूर्वीं अजमासें एक आंठवडा कुलमजुरी करणारे लोक, गाडीवाले व व्यापारी कोल्हापुराला व्यापारधंद्यासाठीं देखील येण्यास धजेनात! यासंबंधींच्या तक्रारी कॅप्टनच्या कानांवर जरी घालण्यांत आल्या, तरी या लोकांच्या दांडगाईला आळा घालण्यासाठीं कांहींच उपाय केल्याचें दिसून आलें नाहीं. पूर्वीच्या राजद्रोहाच्या खटल्यांत शिक्षा पावून ती भोगल्यानंतर मोकळे झालेल्या कांहीं अराजक लोकांच्या चिथावणीनें व कसें तरी करून दरबारला गोत्यांत आणण्यास उत्सुक असणाऱ्या शहरांतील ब्राह्मण चळवळ्या लोकांच्या प्रोत्साहनानें कोल्हापुरांतील कांहीं अडाणी परंतु जोमदार तालीमबाज लोकांनीं, ज्या लोकांची

लष्करांत जबरीनें भरती करून नेण्यांत येत आहे असें त्यांना वाटत होतें, त्यांची जबरदस्तीनें मुक्तता करण्याचा निश्चय केला. अंबाबाईच्या देवालयांत एक जाहीरनामा लावून त्यांत हातांत काठी घेतल्याखेरीज कोणीं रस्त्यांत हिंडूं नये व जबरीनें पकडलेल्या प्रत्येक इसमाची सोडवणूक करावी, असा लोकांना उपदेश केला होता. पोलिस लोकांना हा जाहीरनामा सांपडून, त्यांनीं या प्रसंगाला तोंड देण्याची विशेष तयारी केली. फेब्रुवारी महिन्याच्या १६ व्या तारखेस संध्याकाळीं सुमारें ५०० लोकांचा जमाव जमून त्यानें शुक्रवार धर्मशाळेवर हल्ला केला. या धर्मशाळेंत रिक्रूटींग पार्टीनें तळ दिला असून, तेथें एकाला जबरीनें अटक केली होती, अशी या लोकांची समजूत झाली होती. ही गर्दी धर्मशाळेंत शिरली, तेव्हां रिक्रूटर सगळे बाहेर गेले होते. तेव्हां तेथ सांपडलेल्या दोन स्वैपाक्यांना, ते रिक्रूटर्सपैकींच ह्मणून, चोप देण्यांत आला. पोलिस लोकांनीं गर्दी मोडून त्या ठिकाणीं आपला पहारा ठेविला.

दुसऱ्या दिवशी पोलिसांनीं चौकशी करून हातांत काठ्या घेऊन पांच किंवा पांचांपेक्षां अधिक लोकांचा जमाव करून सार्वजनिक रस्त्यांतून हिंडणें गैरकायदेशीर आहे, असें जाहीर करण्यास डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचें मन वळविलें. तरी देखील रात्रीं मंगळवार पेठेंत एका रिक्रूटावर हल्ला करण्यांत आलाच. या दंगेखोर लोकांचा पुढारी असलेल्या एका गवंड्याला पोलिसांनीं पकडून त्याला गुजरींतील पोलिस ऑफिसांत कोंडून ठेविलें. १९ व्या तारखेस सकाळीं या ऑफिसच्या समोर लोकांचा घोळका जमून ते त्या गवंड्याला जामिनीवर खुलें करावें ह्मणून पोलिसांना सांगूं लागले. पोलिस लोक त्यांना उधळून लावीत असतांना महाराज या ठिकाणीं दाखल झाले. थोडीशी दटावणी दाखवून आपल्या पुढाऱ्याला जामिनीवर खुलें करून घेण्याचा दंगेखोर लोकांनीं प्रयत्न केला, ह्मणून महाराजांनीं दंग्यांतील कांहीं प्रमुख इसमांना अटक करून रस्ता मोकळा केला; यानंतर त्यांनीं शहरावर जादा पोलिस बसवून आपलें कर्तव्य बजाविण्याच्या कामीं कुचराई केलेल्या पोलिस लोकांनाहि शासन केलें. लोकांचा दंगा याबरोबरच थांबला. ही गोष्ट खरोखरच क्षुद्र असल्यामुळें या गोष्टीकडे विशेष लक्ष पुरविणें जरूर नव्हतें. परंतु या दंग्याचा फारच भयंकर परिणाम झाला. १८ व्या तारखेस सकाळीं घडलेल्या प्रकरणानंतर जरी पूर्ण शांतता नांदत

होती, तरी कोल्हापुरांतील पलटणीच्या कांहीं लोकांना शहरांतील रस्त्यावर पाहारा ठेवण्यासाठीं पाठवावें ह्मणून महाराजांनीं रेसिडेंटसाहेबांना विनंति केली. रिक्रूटिंग पार्टी संबंधानें दरबार जें वर्तन करीत होतें, त्यासंबंधीं दरबारची व रेसिडेंटसाहेबांची, एकवाक्यता होती किंवा नाहीं याबद्दल जर कोणास शंका असल्यास तिचें यामुळें निरसन होईल, अशी महाराजांची समजूत होती. परंतु पलटणीच्या पाहऱ्यामुळें रोगापेक्षां त्यावर दिलेलें औषधच अधिक घातक ठरावें, असा प्रकार झाला ! लष्करी लोकांचें असमंजस वर्तन दंग्यापेक्षांहि अधिक अनिष्ट झालें. शहरांत पाहऱ्यावर असलेल्या मुदतींत आपल्या दृष्टीस पडलेल्या प्रत्येक पाहरेकऱ्याला प्रत्येकानें सलाम करावा ह्मणून, दुकानदार लोकांना त्यांच्या दुकानांतून बाहेर खेंचणें, शाळेंतील मुलें, व्यापारी लोक, सभ्य गृहस्थ, सरदार, अधिकारी इत्यादि लोकांना जबरीनें सलाम करावयास लावणें, वगैरे लष्करी लोकांचे चाळे सुरू झाले. शहरांतील पाहारा काढून टाकिल्यानंतर या क्षुद्र वावटळीच्या कार्यकारणसंबंधाची चिकित्सा सुरू झाली आणि कोल्हापुराचे पोलिस लोक शहरांत शांतता राखण्याच्या कामीं नालायक ठरविण्याचा प्रयत्न करण्यांत आला. रिक्रूट भरती करणाऱ्या लोकांना कितपत मार बसला ही गोष्ट या प्रकरणांत तितकी महत्त्वाची नसून बादशाहाच्या युनिफॉर्मचा अपमान होणें व कोल्हापुरांतील दंगेखोर लोकांनीं अटक केलेल्या मनुष्याच्या मुक्ततेची जाहीरपणें मागणी करणें, या गोष्टींना विशेष महत्त्व देण्यांत आलें. या प्रकरणांत आरंभापासून अखेरपर्यंत आपला अगर अधिकारी लोकांचा कांहीं एक संबध नव्हता, अशी ब्रिटिश अधिकाऱ्यांची खात्री करून देतांना महाराजांना बरीच दगदग व प्रयास पडले.

हें प्रकरण मिटल्यानंतर वॉर लोनला महाराज मोठ्या उत्साहानें वर्गण्या गोळा करूं लागले. मार्चच्या ४ थ्या तारखेस महाराज मुंबई येथील आपल्या एका मित्राला लिहितातः—

" वॉर लोनसंबंधीं एक जाहिरात मीं वर्तमानपत्रांत नुकतीच वाचली. या फंडाला आपल्या शक्त्यनुसार मदत करावी ह्मणून जहागिरदार, इनामदार व माझ्या संस्थानांतील श्रीमंत व गरीब अशा सर्व लोकांना उत्तेजन देण्याचा माझा विचार आहे. संस्थानांत कडक रीतीनें खर्चाची बचत चालविली आहे. तूर्त जरूर नसलेल्या कामकाजांतील खर्च तहकूब केला आहे. मोठ्या पाठबंधाऱ्याचें काम तूर्त बंद ठेवण्यास, मीं हुकूम केला आहे. "

यानंतर संस्थानामध्यें वॉर लोन लोकप्रीय करण्यासाठीं जारीनें चळवळ सुरू झाली. हिंदुस्थान सरकारनें सुरू केलेल्या वॉर लोनसंबंधीं झालेल्या ठरावाला मूर्त स्वरुप देण्यासाठीं, कोल्हापूरच्या नागरिकांची व रयत लोकांची एक सभा, त्या वेळचे इन्चार्ज रेसिडेंट कर्नल कंडॉन यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. आपले दोन कुमार, सरदार, जहागिरदार व अधिकारी लोक यांच्यासह हजर राहून, या प्रसंगाला महाराजांनीं शोभा आणिली. लोक गुदमरून जाण्याइतकी नाटकगृहांत गर्दी जमली. लोकांत बराच उत्साह दिसून आला. वॉर लोनमध्यें पैसा घालण्याच्या उपयुक्ततेची साक्ष लोकांना पटवून देऊन, पद्धतशीर रीतीनें वर्गण्या गोळा करण्याकरितां, आपआपल्या हद्दींत यासारख्या सभा त्यांना भरवितां याव्या ह्मणून, सर्व मामलेदार, महालकरी व मांडलिक जहागिरींचे कारभारी, या सर्वांना या प्रसंगीं हजर राहाण्यास कळविलें होतें. या सभेंत या वॉर लोनमध्यें ५,००,००० रुपये घालण्याचा आपला उद्देश महाराजांनीं जाहीर केला. याचा चांगलाच परिणाम घडून, प्रत्येकानें अंत:करणपूर्वक या कामीं मदत केली. वॉर लोनसंबंधीचें काम युवराज श्रीराजाराममहाराज व मेहेरबान पिराजीराव बापूसाहेब घाटगे सी० आय्० ई० सी० एस्० आय्० यांच्यावर सोपविण्यांत आलें. उभयतांहि या कामीं मोठ्या उत्साहानें व आस्थेनें झटूं लागले. याचा साहाजिक परिणाम होऊन, कोल्हापूर दरबार, मांडलिक जहागिरदार व कोल्हापूर संस्थानांतील प्रजाजन या सर्वांनीं इंडियन वॉरलोनला दिलेल्या वर्गणीची रक्कम १९,३४,६१७ पर्यंत गेली.

यानंतर रिक्रूट भरतीच्या कामाकडे महाराजांचें विशेष लक्ष वेधलें. अडाणी लोकांमध्यें आरंभीं वर निर्दिष्ट केल्या प्रकारचा कांहींसा गैरसमज पसरल्यामुळें, थोडयाशा अडचणी उपस्थित झाल्या; परंतु या अडचणी दूर करण्यासाठीं लागलींच प्रयत्न करण्यांत आले. रिक्रूट भरतीच्या कामाकरितां ह्मणून, दोन अधिकाऱ्यांची स्पेशल डयूटीवर नेमणूक झाली. मराठे व संस्थानांतील इतर लढवय्या जातीचे लोक, मोठया प्रमाणांत गोळा होऊन, आपल्या जातीची राजनिष्ठ परंपरा व आपला लष्करी बाणा राखावा ह्मणून, रिक्रूट भरतीच्या कामीं विशेष सवलती देण्याचा एक जाहीरनामा महाराजांकडून प्रसिद्ध करण्यांत आला. त्यांत देऊं केलेल्या सवलती पुढील प्रकारच्या होत्या:—" ( १ ) कमींत कमी २५ रिक्रूट गोळाकरून देणाऱ्या ग्रामाधिकाऱ्यांच्या कामगिरीचें महत्त्व लक्षांत घेऊन, पाटलाला ढाल तलवार व कुलकर्ण्याला एक रुप्याचें पदक बहाल करण्यांत येईल;

व दसरा-दरबारला निमंत्रण देण्याच्या हक्काची त्यांना सनद करून देण्यांत येईल. ( २ ) रिक्रूट आणणाऱ्या कोणत्याहि इसमाला, प्रत्येक लढवय्या रिक्रूटामागे दहा रुपये व प्रत्येक बाजारबुणग्यामागे तीन रुपये आणि २५ अगर अधिक रिक्रूट त्याला मिळवून देतां येईल, तर एक रुप्याचें पदक बहाल करण्यांत येईल. निघण्यापूर्वी आपल्या कुटुंबाची व्यवस्था करितां यावी ह्मणून प्रत्येक लढाऊ रिक्रूटाला ४० रुपये देण्यांत येतील. बिनलढाऊ रिक्रूटाला प्रत्येकीं २० रुपये मिळतील. संस्थानचे नोकर लढाऊ रिक्रूट ह्मणून गेल्यास लष्करी नोकरींत असलेल्या मुदतींत त्यांना त्यांचा अर्धा पगार मिळेल. ते परत आल्यावर त्यांना आपल्या नोकरीवर परत हजर करून घेण्यांत येईल व गैर असलेल्या मुदतीचा काळ पेन्शनच्या वेळीं जमेस धरण्यांत येईल. ''

कोल्हापुरांतील वारलोनची-चळवळ यशस्वी करण्याचें उत्कृष्ट कार्य महाराजांचे तरुण पुत्र युवराजसाहेब हे त्या वेळीं करीत होते. ज्या देशाभिमानी इंग्लिश लोकांचे प्रयत्न युवराजांनीं इंग्लंडांत प्रत्यक्ष आपल्या डोळयांनीं पाहिले होते, त्यांच्या पराकाष्टेच्या कर्तव्यजागृतीचें युवराजांच्या अंत:करणांत बीजारोपण झालेलें असल्यामुळें, ते अप्रतिम एकाग्रतेनें या कामास लागले. आसपासच्या व लांब अंतरावरच्या ठिकाणीं जाऊन, सभा भरवून व या सभांत प्रत्येक नागरिकानें आपआपल्या शक्त्यनुसार वर्गणी देण्याचें महत्त्व आपल्या भाषणानें विशद करून, युवराजांनीं लोकांत उत्साह उत्पन्न केला. १९१७ सालच्या जुलै महिन्याच्या ११ व्या तारखेस ते महाराजांना लिहितात:---

" परमपूज्य आबासाहेब,

" वॉरलोनकरितां पैसा गोळा करण्याचें काम माझ्यावर सोंपविण्यांत आलें आहे; व आतांपर्यंत वर्गणी अजमासें २,००,००० रुपये जमली आहे; आणखी सुमारे चार पांच लाख गोळा करण्याची माझी अपेक्षा आहे. वर्गणी गोळा करण्याचें काम थोडयाशा उशीरानें मला सांगण्यांत आलें, नाहींतर मीं तें यापूर्वींच पुरें केलें असतें.

" पुष्कळ लोकांकडून लहान लहान वर्गण्या जमविणें, हें वर्गणी गोळा करण्याचें मुख्य तत्त्व आहे असें मला वाटतें. या तत्त्वाचा सर्रास उपयोग करण्यांत येत आहे. संस्थानचे रयत लोक लोनला सढळ हातानें मदत करीत आहेत; परंतु बहुतांशीं व्यक्तिश: दिलेल्या रकमा इतक्या अल्प आहेत कीं, प्रत्येक

व्यक्तिला पोष्टाचें कॅश सर्टिफिकेट मिळवून देणें शक्य नाहीं; ह्मणून एक रकमेनें पैसा गोळा केला जात असून वॅार बॉंडच्या बाबतींत सरकाराकडून जें व्याज दिलें जातें, त्याच व्याजाच्या दरानें संस्थानच्या जमाबंदींतून प्रत्येक इसमाला रकम परत करण्याची व्यवस्था करण्यांत येत आहे. पोंच झालेल्या प्रत्येक रकमेबद्दल पावत्या देण्यांत येत आहेत. या व्यवस्थेमुळें गोळा केलेली रक्कम कोल्हापूर दर-बारच्या नांवानें वॅारलोनमध्यें घालणें अगदीं जरुर आहे; ह्मणून वॅारलोनमध्यें ही रक्कम घालण्यासाठीं दरबारला परवानगी व्हावी ह्मणून सरकारला विज्ञप्ति करावी, अशी माझी आपणांस विनंति आहे. मुदतीनंतरहि वॅारलोनमध्यें रकम घाल-णेस सरकारानें कांहीं संस्थानिकांना परवानगी दिल्याचें टाईम्स ऑफ इंडिया पत्राच्या एका अंकांत मीं वाचल्याचें स्मरतें. ह्मणून अशाच प्रकारची सवलत कोल्हापूर दरबारालाहि सरकार सदय अंतःकरणानें देईल अशी मला आशा आहे.''

याच दिवशीं ह्मणजे १९१७ सालच्या जुलै महिन्याच्या ११ व्या तारखेस लॉर्ड वुइलिंग्डन साहेबांना पाठविलेल्या पत्रांत सरकारला मदत करण्याची आणखी एक योजना महाराजांनीं सुचविली:—

“ मला मि० सँढर्स्ट यांची गांठ पडली व रिक्रूट मिळविण्याचा व रिक्रूटांना येथें उत्तेजन देण्याचा, उत्कृष्ट मार्ग कोणता याची आह्मी वाटाघाट करीत आहोंत. आह्मीं दिलेल्या सवलतींमुळें लोक अधिक प्रमाणांत दाखल होतील, असें मला वाटतें. आणखी एक कल्पना मला सुचली आहे; परंतु ही सूचना पद्धतशीर रीतीनें मांडण्यापूर्वीं ती आपणांस पसंत आहे कीं काय, हें समजून घेणें मला इष्ट वाटतें. आमचें कोल्हापूरचें पायदळ येथें आहे. हे लोक फार हुशार असून, ते चांगली कवाईत शिकलेले आहेत. त्यांची स्वतंत्र पलटण करण्यांत येईल तर त्यांचा फार उपयोग होईल; व ऑफिसर लोकांचा दर्जा राखण्याची अडचणहि उपस्थित होणार नाहीं. बहुतेक लोक आनंदानें कबूल होतील असें मला वाटतें. तरी त्यांची रीतसर कबूली घेणें जरूर आहे. कारण युद्धाच्या वेळीं त्यांना जेथें पाठविण्यांत येईल तेथें त्यांनीं गेले पाहिजे. त्यांच्या ठिकाणीं रणक्षेत्रावरून परत आलेल्या लोकांना, विश्रांतिकरितां येथें पाठवावे व त्यांनीं येथील हलकें काम करावें अशी माझी सूचना आहे. येथील पायदळची छावणी अतिशय चांगली असून या ठिकाणची हवाहि उत्साहजनक आहे.

"रेसिडेन्सी अगर अन्य ठिकाणची पाहाऱ्यासाठीं लोक कमी पडत असल्यास माझ्या लाल रिसाल्यांतील अगर पोलिसांतील लोक त्यांच्या ठिकाणीं पाठवीन."

कर्नल वुडहाऊस यांना जुलैच्या २० तारखेस जें पत्र पाठविण्यांत आलें, त्यामध्यें हीच सूचना विस्तृत रीतीनें मांडण्यांत आली:--

"माझ्या कोल्हापूर पायदळासंबंधानें मला एक सूचना करावयाची आहे; व कृपा करून आपल्या शिफारसीसह ती सरकारापुढें ठेवा अशी माझी आपणांस विनंति आहे. हे लोक किती हुशार व कवाईतनिपुण आहेत हें आपणांस माहितच आहे. या प्रसंगीं साम्राज्यसेवा बजाविण्यास ते देखील उत्सुक आहेत याबद्दल मला शंका वाटत नाहीं. जर त्यांना रणक्षेत्रावर पाठविण्यांत येईल तर खात्रीनें ते आपलें नांव करतील. त्यांच्या ठिकाणीं विश्रांतिकरितां ह्मणून हिंदुस्थानला परत आलेले लोक पाठवावेत अशी माझी सूचना आहे. रणक्षेत्राच्या मानानें येथील काम त्यांना हलकें वाटेल. कोल्हापूर पायदळाच्या हल्लींच्या छावणींत ते येऊन राहातील. ही छावणी सोईस्कर असून आरोग्यवर्धक आहे. या ठिकाणची हवादेखील उत्साहजनक आहे. ह्मणून आरोग्याच्या बाबतींत या लोकांचा चांगलाच फायदा होईल. कोणत्याहि लष्करी ठाण्यापेक्षां येथें अधिक स्वताई आहे. या बाबतींत सरकारला जादा खर्च पडणार नाहीं. कोल्हापुर पायदळांतील लोकांच्या कुटुंबाची व्यवस्था संस्थानमधील त्यांच्या त्यांच्या गांवीं करण्यांत येईल. त्यांची व्यवस्था करून सध्यां शिपायांना मिळत असलेल्या पगाराच्या अर्ध्या इतकी रक्कम त्यांना दरबार खुषीनें देईल. त्यांना सरकारच्या लष्करी नोकरींत घेतल्यानंतर त्यांना सरकारकडून जें मिळेल त्याखेरीज ही रक्कम त्यांना मिळणार आहे."

महाराजांनीं या पत्राची पूर्तता पुढील शब्दांत केली. त्यावरून आपलें पायदळ रणक्षेत्रावर जावें ह्मणून महाराजांची किती उत्कट इच्छा होती हें व्यक्त होतें:—

"आपल्या अनुकूल शिफारसीसह ही योजना सरकारापुढें विचाराकरितां आपण कृपा करून मांडाल अशी मला आशा आहे. अशा प्रसंगीं माझें पायदळ सरकारच्या कांहींतरी उपयोगीं पडल्याचें पाहून मला केवढा अभिमान वाटेल, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं."

साम्राज्याला अन्य तऱ्हेनें मदत करण्याचा विचार महाराज आतां करीत होते. रिक्रूट भरतीचें काम लोकप्रिय करण्यासाठीं महाराजांनीं काय केलें, हें पुढें सांगण्यांत येईलच. महाराजांनीं आणखी एक योजना लॉर्ड वुइलिंग्डनसाहेबां-पुढें ठेविली, तीवरून ते आपली हरएक उपयुक्त बाब सरकार-कारणीं लावण्यास किती अंत:करणपूर्वक प्रयत्न करीत होते, ही गोष्ट पुन: एकवार दृष्टोत्पत्तीस आली.

आगष्ट महिन्यांत महाराज नेक नामदारसाहेबांना लिहितात:—

" पुढील महिन्यांत नेक नामदारसाहेबांची मुलाखत घेण्याची माझी फार इच्छा होती; परंतु चित्त्याची शिकार करितांना चार घोडयांच्या छक-डयावरून मी पडलों, त्यामुळें माझ्या बरकडया दुखावल्या आहेत. हिंडणें फिरणें मला मोठें मुष्किलीचें झालें आहे. व आंत कांहीं इजा झाली कीं काय तें मला कळत नाहीं. ह्मणून मी मिरजेला जात आहें. तेथें डॉक्टर व्हेल यांच्या शुश्रुषेखालीं मी राहाणार आहें. रिक्रूट भरतीच्या कामासंबंधीं चर्चा करण्यासाठीं मि० मौंटफर्ड हे रायबाग येथें मजकडे आले व चित्त्याची शिकार करण्याकरितां आह्मी दोघें मिळून गेलों. "

* * *

" रिक्रूट भरतीसाठीं व रणक्षेत्राहून परत येणाऱ्या जखमी लोकांकरितां देखील, माझ्या अल्प शक्तीप्रमाणें मला काय करितां येईल, याचा मी विचार करीत आहें. माझ्या मनांत जे विविध विचार घोळत आहेत, त्यासंबंधींची चर्चा मि० मौंटफर्ड यांनीं माझ्याशीं केली. काय करणें इष्ट आहे असें मला वाटतें, तें मीं त्यांना मोकळया मनानें सांगितलें. माझ्या सूचना व योजना काय आहेत, त्या त्यांच्या-कडून नेक नामदारसाहेबांना विदित होतील; व जखमी लोकांकरितां दक्षिण महाराष्ट्र इस्पितळाची माझी योजना नेक नामदारसाहेबांना पसंत पडेल, अशी मला आशा आहे. या खर्चाचा बराचसा अंश मी माझ्या अंगावर घेईन व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिक देखील सढळ हातानें मदत करतील, अशी माझी खातरी आहे. नेक नामदारसाहेबांनीं माझें इस्पीतळ व पन्हाळयाचा किल्ला देखील पाहिला आहे. इस्पितळच्या सर्व नोकर-चाकरांसह व प्रस्तुतच्या सर्व तयारी-सह हें इस्पीतळ सरकारच्या हवालीं करण्याचा माझा विचार आहे. माझ्या लोकांकरितां मी निराळी व्यवस्था करीन. आजारी व जखमी लोकांची शुश्रूषा करण्याकरितां हें इस्पितळ उपयोगी पडेल. पन्हाळा येथील माझा राजवाडा

आराम वाटणाऱ्या रोग्यांना हवेशीर ठिकाण ह्मणून उपयोगी पडेल. पन्हाळा हें एक थंड ठिकाण असून, तेथील हवा उत्साहजनक आहे. जरूर वाटल्यास मि० कॅडेल व मि० मौंटफर्ड यानीं कृपा करून कोल्हापुरास येऊन हीं स्थळें आपल्या नजरेखालीं घालावींत.

" अशा संस्थांची संख्या जितकी अधिक होईल, तितकी अधिक प्रसिद्धि होऊन महायुद्धांत जखमी झालेल्या लोकांकरितां सरकार किती काळजी व कळकळ घेत आहे, हें लोकांना समजून येईल; हा, ही सूचना करण्यांत माझा हेतु आहे. यामुळें रिक्रूट भरतीच्या कामाला चालन मिळेल. तालुक्यांतील सुखवस्तु गृहस्थांना अशा लहान लहान संस्थांना उदार अंत:करणानें मदत करण्यास सांगून, अशा संस्थांचा खर्च स्थानिक लोकांकडून भागवितां येण्यासारखा आहे. राजकीय विभाग लक्षांत न घेतां, स्थानमहत्त्वानुसार वर्गण्यांचा विनियोग करण्यांत यावा, ह्मणजे संस्थानांतील लहान लहान तुटक प्रांतांनीं ब्रिटिश हद्दींतील अगदीं लगतच्या इस्पितळाला मदत करावी व ब्रिटिश मुलुखांतील लहान लहान तुटक प्रांतांनीं संस्थानांतील इस्पितळांना मदत करावी.

" या योजनेचा सर्व बाजूंनीं मीं अद्याप विचार केलेला नाहीं; परंतु वॉरलोन फंडाच्या बाबतींत माझ्या हातून जशी दिरंगाई झाली, तद्वतच या कामींदेखील दिरंगाई न व्हावी ह्मणून जसे विचार सुचले, तसे ते नमूद करण्यांत आले आहेत. ५,००,००० चा लोन मीं घेतला, याखेरीज आणखी १४ लाख रुपये गोळा करण्यांत आले आहेत. ही गोष्ट सहजासहजीं येथें नमूद करावीशी वाटते. ह्मणजे माझ्या संस्थानांतील एकंदर वॉरलोन सुमारें २० लाखांचा होतो. माझ्या संस्थानची जमाबंदी अजमासें १३ लक्षांची आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां हें कार्य माझ्या वडील बंधूंना व माझ्या वडील मुलाला भूषणावह आहे, असें माझ्या अल्पबुद्धीप्रमाणें वाटतें. यांनीं या कामास मोठया उत्साहानें खटपट केली असून, इतर संस्थानांतील आंकडयाशीं याची तुलना केली असतां ती अयोग्य ठरणार नाहीं." साम्राज्य कार्याला मदत करण्यासाठीं आतांपर्यंत केलेल्या कोणत्याहि गोष्टीपेक्षां कदाचित् अधिक महत्वाचें असें नवीन रिक्रूट गोळा करण्याचें काम झपाटयानें चालू झालें. रिक्रूटिंग पार्टीपैकीं कांहीं लोकांनीं चालविलेल्या आक्षेपार्ह मार्गांना आतां पूर्ण

प्रतिबंध घालण्यांत आला. खुद्द महाराजच आतां या मोहिमेचे कर्णधार झाल्यामुळें, त्यांना इतक्या यशस्वी रीतीनें ती लोकप्रिय करितां आली. रिक्रूट होऊं इच्छिणाऱ्या लोकांना महाराजांनीं दिलेल्या सवलतीचा आह्मीं वर उल्लेख केलेला आहे, तथापि त्या अपेक्षेप्रमाणें यशस्वी ठरल्या नाहींत. मध्यंतरीं संस्थानांतील अडाणी व भोळया भाबडया रयतेचें खेडयांतील कुलकर्ण्यांनीं जें नुकसान केलें होतें, तें भरून कसें काढावें याचा विचार करण्यांत महाराज निमग्न झाले होते. कायद्याच्या ताजव्यांत धूर्त व शिक्षित अल्प संख्यांक लोक व अडाणी आणि श्रद्धाळू बहुसंख्यांक लोक, यांच्यामधील परस्परांशीं असलेले संबंध जरी कोर्टाकडून समतोल जोखले जात, तरी पुष्कळ बाबतींत अन्याय घडल्याचें नजरेस येई. पुढील एका प्रकरणांत या गोष्टीची मला पुनः चर्चा करावी लागणार आहे, ह्मणून फसले गेलेल्या गरीब लोकाच्या बाबतींत कायद्याचा कडकपणा शिथिल करण्याचा महाराजांनीं निश्चय केला, एवढी गोष्ट येथें सांगितली असतां बस्स होईल. महाराजांनीं आतां सुरू केलेल्या आर्बिट्रेशन ( मध्यस्थी ) कोर्टामध्यें यांना न्याय मिळण्यासारखा होता; कायद्याप्रमाणें निकाल लागलेल्या परंतु ज्यांत अडाणी लोकांना अन्याय घडल्याची तक्रार अद्याप कायम होती अशा कज्जांच्या बाबतींत, या सक्तीच्या मध्यस्थी कोर्टाचा फायदा घेणाऱ्यांनीं खुद्द स्वतः लष्करांत भरती व्हावें किंवा आपल्या तर्फें रिक्रूट मिळवून द्यावेत, अशी अट घालण्यांत आली होती. खुद्द युवराज व राजकुमार शिवाजी महाराजांसारख्या, महाराजांच्या पूर्ण विश्वासांतील माणसांना या कोर्टावर अधिष्ठित होण्यास सांगण्यांत आलें होतें. कोणतेंहि न्यायपीठ अगर मानवी बुद्धीला गम्य असलेली कोणतीहि पद्धत अन्याय घडण्याचे प्रसंग सर्वस्वीं टाळूं शकणार नाहीं; परंतु नेहमींच्या दिवाणी न्यायपद्धतीनें घडलेल्या अन्यायांचें परिमार्जन करण्याचा प्रामाणिक मनानें या पंचकोर्टाकडून प्रयत्न करण्यांत आला. या कोर्टांत लोकांची इतकी गर्दी जमे कीं, तीवरून सामान्य कायद्यानें प्रचलित असलेल्या परिस्थितीशीं लोक किती नाराज झाले होते, हें चांगलेंच निदर्शनास आलें. खेडयांतील हुशार अल्प संख्यांक लोकांच्या कारवाईला सहज बळी पडणाऱ्या महाराष्ट्रांतील शेतकरी लोकांकरितां स्वतंत्र शेतकी ॲक्ट अमलांत आणून, ब्रिटिश सरकारनेंहि कांहीं विशिष्ट बाबतींत सामान्य न्यायपद्धतीहून निराळया प्रकारचा उपाय योजण्याचें तत्त्व मान्य केलें होतें, हें येथें नमूद करण्यासारखें आहे.

मध्यस्थी कोर्टामुळे पुढें स्पेशल रेव्हिन्यु इन्कायरी बेंच अस्तित्वांत आलें, हीहि गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे.

" मध्यस्थी कोर्टांत व अन्य तऱ्हेनें झालेल्या चौकशीवरून कुलकर्णी लोकांकडून रयत लोकांची फसगत होऊन, त्यांनीं व त्यांच्याशीं संगनमत झालेल्या इतर लोकांनीं त्यांच्या जमिनी बळकाविल्या आहेत, असें हुजुरांच्या नजरेस आलें आहे. ह्मणून रयत व कुलकर्णी यांना न्याय देण्याचा अधिकार असलेलें एक स्वतंत्र रेव्हिन्यु इन्कायरी कोर्ट निर्माण करणें जरूर वाटलें.' सहा महिन्यांच्या मुदतीनें या बेंचांत तीन इसमांची नेमणूक करण्यांत आली. दाखल झालेल्या ७८ अर्जांपैकीं १२ अर्जांचा निकाल लागून ६६ शिलकी कज्जे राहिले. नवीन अर्ज येतच आहेत, ह्मणून या ऑफिसाची मुदत आणखी सहा महिने वाढविणें योग्य वाटलें.

" नेहमींच्या दिवाणी कोर्टाच्या पद्धतीनें जो खर्च आला असतां, त्यापेक्षां किती तरी कमी खर्चानें, रयतेला न्याय देण्याचा या कोर्टानें मार्ग स्वीकारिला आहे. थोडयाशा कमी शास्त्रीय परंतु व्यावहारिक पद्धतीचा या कोर्टानें अवलंब केला असल्यामुळें, पक्षकारांना व साक्षीदारांना अधिक सवलत मिळाली आहे. "

या प्रयत्नामुळें रिक्रूटिंगच्या कामांत कसा उपयोग झाला, यासंबंधींची माहिती महाराजांच्या ता० ११ डिसेंबर १९१७ च्या पत्रांत अशी दिली आहे:-

" रिक्रूट भरती करण्याचें काम आमच्या हातीं देण्याच्या पूर्वीं दोन वर्षांत त्यांना ( रिक्रूट पार्ट्यांना ) फक्त १२ च रिक्रूट पैदा करितां आले; परंतु आतां महिन्यांची संख्या सुमारें २०० पर्यंत जाते. माझी जमाबंदी १३ लाखां-पेक्षां अधिक नसून, माझ्या संस्थानानें वॉरलोनला २० लाख रुपये दिले आहेत. याचें सर्व श्रेय माझ्या बंधूंच्या व माझ्या वडील मुलाच्या अविश्रांत परिश्रमाला व उत्साहाला दिलें पाहिजे. रिक्रूट पैदा करण्याची एक कल्पना माझ्या बंधूंना सुचली आहे. ही कल्पना त्यांच्याकडूनच आपण ऐकावी अशी माझी इच्छा आहे. आपली तशी इच्छा असल्यास ते मुंबईला येऊन ती आपणांस समजा-वून सांगतील. आमचें रिक्रूट भरतीचें प्रमाण पंजाबापेक्षांहि अधिक आहे; व सरकारला युद्धाचा शेवट लौकर करितां यावा, ह्मणून शक्य तितकी मोठी संख्या देण्याचा मी प्रयत्न करीत आहें. हें प्रमाण अधिक काळपर्यंत असेंच राखतां येणार नाहीं ही गोष्ट खरी आहे. निरनिराळया वर्गांतून, गुन्हेगार लोकांच्या

जातींतून व मांग, महार, जैन, मुसलमान, मराठे इत्यादि लोकांतून रिक्रूट पैदा करण्याच्या कामांत आमचे स्वतंत्र रिक्रूट भरती करणारे लोक अगदीं तरबेज झाले आहेत. येथील कार्य पुरें झाल्यावर सरकारची इच्छा असल्यास ब्रिटिश जिल्ह्यांत काम करून सरकारला मदत करण्याकरितां माझ्या रिक्रूट भरती करणाऱ्या लोकांना पाठविण्यास मला आनंद होईल. ''

आतां जी जोराची रिक्रूट भरती होत होती, तीमध्यें सामान्यपणें मराठा ह्मणून प्रसिद्ध असलेल्या जातीबाहेरच्या विविध जातींच्या लोकांचाहि समावेश करण्यांत येत होता. वर उध्दृत केलेल्या पत्रामध्यें महाराजांनीं इतर जातींपैकीं कांहींचीं नांवें दिलीं आहेत. सामान्यपणें गुन्हेगार वर्ग ह्मणून समजल्या जाणाऱ्या बेरड व रामोशी जातींतूनहि रिक्रूट मिळाले. १९१७ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत ६० रामोशी पाठविले. त्यांना सेनेंत दाखल करून घेण्यांत आलें. या बाबतींत त्या वेळचे मुंबई इलाख्यांतील रिक्रूटिंग बोर्डचे सेक्रेटरी मि० कॅडेल हे १९१८ सालच्या जानेवारी महिन्यांत महाराजांना कळवितात कीं, लष्करी अधिकारी मि० टिगे हे " बेळगांव येथें बेरड व लिंगायत जातीचे रिक्रूट पाहून खूष झाले. '' कोणत्याहि विशिष्ट जातीची विशेष क्षात्रतेजाची घमेंड ही ब्राह्मणांच्या विशिष्ट बुद्धिमत्तेच्या घमेंडी इतकीच खरी अगर खोटी आहे, हा यांतील मुख्य मुद्दा आहे. निसर्ग कोणाचा पक्षपात करीत नसतें. आतां जें कर्तव्य बजावण्यास लोकांना बोलविण्यांत येत होतें, त्या कर्तव्याचें ज्ञान देण्याच्या बाबतींत हेळसांड करण्यांत आली, हीच खरी चूक होय. हिंदुस्थानांतील दीर्घ शांततेच्या काळांत बिनलढवय्या समजलेल्या जाती प्रचलित असलेल्या परिस्थितीमुळें बिनलढाऊच राहिल्या. " शांततेच्या काळीं मराठा पलटणी मोडण्यांत आल्या. व त्यांच्यामधील क्षात्रवृत्ति कांहींशी नष्ट झाली. '' या गोष्टीमुळें मराठ्यांमध्यें देखील रिक्रूट भरती मंदगतीनें होत आहे, असे एक वर्षानंतर, १९१९ सालच्या जानेवारी महिन्यांत, महाराजांनीं उद्गार काढले. पुढें ते ह्मणाले, " ह्मणून सैन्याची संख्या जरी कमी करण्यांत आली तरी मराठा पलटणी मोडूं नयेत. '' ब्रिटिश हिंदुस्थानमधील सैन्यांत भरती करण्याच्या कामीं जातीकडे लक्ष दिलें गेल्यामुळें सरकार आतां ज्या कित्येक जातींच्या मदतीची अपेक्षा करीत होतें, त्यांच्यामधील क्षात्रतेज समूळ नष्ट झालें होतें. महाराजांनीं या बाबतींत जी सूचना केली आहे, ती सर्व

जातींना लागूं पडणारी असल्यामुळें, युद्धानंतरच्या शांततेच्या काळांत या गोष्टीकडे दुर्लक्ष होणार नाहीं, अशी आशा आहे.

लॉर्ड वुइलिंग्डनसाहेबांनीं मुंबई युद्ध—परिषद् जी बोलाविली ती १९१८ सालच्या जूनच्या ११ तारखेस भरली. या परिषदेला हजर राहून मुख्य ठराव परिषदेपुढें मांडावा ह्मणून नेक नामदार साहेबांनीं महाराजांना खास विनंति केली होती. टाऊन हॉल मधून एकाएकीं शिष्टाचाराविरुद्ध निघून जाऊन या परिषदेचें कार्य हाणून पाडण्याचा कै० टिळक व आणखी कांहीं जणांनीं प्रयत्न केल्याचें प्रसिद्धच आहे. अशा प्रकारच्या लोकांना निमंत्रण देण्याला महाराजांनीं हरकत घेतली होती, तिकडे लॉर्ड वुइलिंग्डननीं दुर्लक्ष केलें; परंतु अशा प्रकारें महाराजांहून भिन्न मत असलेल्या लोकांपेक्षां महाराजांचेंच ह्मणणें अधिक साधार होतें, हें दृष्टोत्पत्तीस आलें.

महाराज हे हिंदुस्थानांतील बडया मानलेल्या संस्थानाचे अधिकारी नसल्यामुळें, युद्ध जिंकण्याच्या कामीं त्यांनीं केलेलें हें कार्य सकृतदर्शनीं ठळकपणें नजरेंत भरण्यासारखें नाहीं; मात्र आपल्या परिमित सामर्थ्याला अनुसरून शक्य तितकें जास्त कार्य महाराजांनीं केलें, हें स्पष्ट आहे. या दृष्टीनें पाहिलें असतां, या बाबतींत महाराजांनीं केलेली कामगिरी अलौकिक होती, असें मानण्यास तिळमात्र शंका नाहीं. तरुण राजकुमार शिवाजीमहाराज यांच्या आकस्मिक व हृदयभेदी मृत्यूमुळें जरी त्यांचें धैर्य खचल्यासारखें झालें होतें, तरी युद्ध संपेतोंपर्यंत त्यांनीं आपला जोम कायम राखिला होता. एकटया आगष्ट महिन्यांत दक्षिण महाराष्ट्रांतील निरनिराळया भागांत युवराजांनीं १७ सभा भरविल्या व सुमारें १६ हजार लोकांना साम्राज्याला मदत करण्याची आवश्यकता समजावून सांगितली. आगष्टच्या २० तारखेस कर्नल वुडहाउसनीं याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें. सप्टेंबरच्या १३ व्या तारखेस रायबाग येथें झालेल्या एका सभेंत ४ इसम युवराजांच्या उपदेशानुसार तात्काळ सैन्यांत जाण्यास तयार झाले. यांत दोन मराठे, एक लिंगायत व एक मांग होता. चिंचली येथें बलात्कार करण्यांत येत आहे, अशा कंडया पिकवून लोकांना भेडसावण्याचे प्रयत्न करण्यांत आले होते. तरी देखील तेथें दुसरेच दिवशीं भरलेल्या सभेंत युवराज महाराजांच्या भाषणाचा इतका परिणाम झाला कीं, सभेंतील तीन इसम रिक्रूट

होण्यास तयार झाले. यानंतर दोन दिवसांनीं बेळगांव जिल्ह्यापैकीं निपाणी येथें अशाच प्रकारची सभा भरविण्यास युवराज गेले होते. ते घरीं परत जाते वेळीं त्यांची मोटार बिघडली; परंतु दुसऱ्यांची गैरसोय होऊं न देण्याच्या त्यांच्या नेहमींच्या स्वभावानुसार त्यांच्याबरोबर असणाऱ्या इतर लोकांच्या मोटारींतून जाण्याचें त्यांनीं नाकारिलें, व आपली मोटार दुरुस्त होईतोंपर्यंत बराच वेळ ते तेथें राहिले. त्यांचे मित्र तर आपापल्या घरीं यापूर्वींच निघून गेले होते. अशा प्रकारच्या उत्साहपूर्ण कार्याची योग्यता या कार्याच्या दृश्य परिणामापेक्षां अधिक नसली तरी निदान ती सारखीच असते.



## प्रकरण २० वें.

# कौटुंबिक गोष्टी व शिकार.



तकी व तत्सदृश विषयांचें अधिक ज्ञान संपादन करण्यासाठीं अलाहाबाद येथें एक वर्ष राहून, १९१६ सालच्या अखेरीला युवराज महाराज आपल्या बंधूंसह कोल्हापुराला कायमचे परत आले. ते घरीं परत आल्यानंतर त्यांचा विवाह करणें हा पहिला प्रश्न महाराजांच्या दृष्टीसमोर उभा राहिला. कांहीं अतर्क्य कारणांमुळें लहान कुमाराचा विवाह १९१७ सालच्या जून महिन्याच्या ६ व्या तारखेस बुधवारीं ५ वाजून ५४ मिनिटांनीं कोल्हापूर येथें करण्यांत आला. बरीच चौकशी करून पुणें जिल्ह्यांतील सासवडचे जगताप श्रीशंकरराव यांची सद्गुणसंपन्न कन्या कुमारी जमुनाक्का यांना कुमार शिवाजीमहाराज यांच्याकरितां वधू पसंत करण्यांत आलें होतें. यांचा जन्म जगतापांच्या कुलीन घराण्यांत झाला असून निसर्गदत्त सौंदर्यानें व मातृगृहीं मिळालेल्या शिक्षणामुळें अधिकच विकास पावलेल्या बुद्धिमत्तेनें, त्या भूषित झाल्या होत्या.

युवराज महाराजांचा विवाह १९१८ सालच्या एप्रील महिन्याच्या पहिल्या तारखेस झाला, ही गोष्ट स्वाभाविकपणेंच अधिक महत्त्वाची होती. १९०९ सालापासून बडोद्याचे युवराज फत्तेसिंगराव यांची पहिली कन्या इंदुमतीदेवी ही कोल्हापूरची भावी राणी होणार ही गोष्ट बहुतेक ठरल्यासारखीच झालेली होती. १९०८ सालीं आक्कासाहेबांच्या विवाहाच्या सुमारास, आपली वडील कन्या युवराज राजाराममहाराजांना द्यावी, या हेतूनें युवराज फत्तेसिंगरावांनीं महाराजांशीं बोलणें सुरू केलें. "आपल्या कन्येच्या विवाहाच्या सुमारासच हा वाङ्निश्चय व्हावा अशी माझी इच्छा आहे. वाङ्निश्चय होण्यापूर्वीं हुंड्यासंबंधींची वगैरे सर्व इतर व्यवस्था व्हावी असें मला वाटतें," अशी त्यांनीं तार पाठविली. तथापि त्या वेळीं कांहींच ठरलेलें नव्हतें. पुढील वर्षीं श्रीसयाजीराव महाराजांचें जे कोल्हापुराला आगमन झालें, तें युवराज महाराजांना पाहून त्यांच्याशीं आपला



श्री राजाराम छत्रपति महाराज, जी. सी. एस्. आय., कोल्हापूर.



श्री सौभाग्यसंपन्न ताराबाई राणीसाहेब महाराज, कोल्हापूर.

प्रत्यक्ष परिचय घडावा, या इच्छेनें झालें असावें. १९११ सालच्या मार्च महिन्यांत गायकवाड महाराजांनीं एक पत्र पाठवून रीतसर बोलणें सुरु केलें; व राजकन्येचें एक छायाचित्र पाठवून त्याबरोबरच तिची जन्मपत्रिका पाठविली. ही वाटाघाट तशीच लांबत गेली. युवराज महाराज वयस्क होऊन या बाबतींत आपलें मत व्यक्त करण्याची त्यांच्या अंगीं पात्रता येई तोंपर्यंत या विवाहाची घाई करावयाची नाहीं, अशी महाराजांची इच्छा असावी. १९१६–१७ सालीं कोल्हापूर व बडोदा यांच्यामध्यें होणाऱ्या विवाहसंबंधाबद्दल वाटाघाट करण्याच्या हेतूनें, बडोद्याच्या महाराजांचे बंधु कै० आनंदराव गायकवाड हे कोल्हापुरास आले. १९१७ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या प्रारंभीं हा विवाह बहुतेक निश्चित झाला; कारण या वर्षाच्या फेब्रुवारी महिन्यांत महाराजांनीं आपल्या भावी स्नुषेला घरगुती गोष्टी, घोड्यावर बसणें, मोटार हांकणें वगैरे शिक्षण द्यावें, असें गायकवाड महाराजांना कळविलें होतें. आगष्ट महिन्यांत श्रीमंत बापूसाहेब व मि० सबनीस हे प्राथमिक गोष्टी ठरविण्यासाठीं बडोद्याला गेले. शेवटीं सप्टेंबर महिन्यांत उभय पक्षांना या गोष्टी मान्य होऊन बडोद्यांत होणाऱ्या या विवाहाची १९१८ सालच्या फेब्रुवारी महिन्याची २५ वी तारीख ठरविण्यांत आली. बडोद्यानें कोल्हापुराला ६,७०,००० रुपये वरदक्षणा द्यावयाची असें ठरलें. हा मुहूर्त बदलून विवाहाची तारीख १ एप्रिल ठरविण्यांत आली. कोल्हापूरचें वऱ्हाड बडोद्याला मार्च महिन्यांच्या २९ तारखेला पोंचलें. त्यांचें मोठया उत्साहानें व समारंभानें स्वागत करण्यांत आलें. दुसऱ्या दिवशीं नवरदेव तेथें दाखल झाले. युवराजांचें सीमांत–पूजन होऊन विवाहसमारंभाला सुरवात झाली. यानंतर नवरदेवाच्या बिऱ्हाडापर्यंत जी मिरवणूक निघाली, ती या प्रसंगाला साजेशीच होती. लग्नाचा मुख्य समारंभ एप्रीलच्या पहिल्या तारखेस संध्याकाळीं झाला. या मोठया समारंभाला जे हजारों लोक जमले होते, त्यांमध्यें होळकर महाराज, मुधोळचे राजेसाहेब, राजकीय खात्याचे सेक्रेटरी मि० रॉबर्टसन व नामदार मि० कार्मायकेल हे प्रमुख होते. नेहमींचे सोहळे झाल्यानंतर वधू, वर व वऱ्हाड १९१८ सालच्या एप्रील महिन्याच्या ८ व्या तारखेस कोल्हापुराला दाखल झालें, व त्यांनीं मोठया समारंभानें शहरांत प्रवेश केला. या भाग्यशाली दंपत्याचें दर्शन घेण्यासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या. वधूवर हत्तीच्या रथांत बसले असून हा रथ जागजागीं थांबवून लोकांनीं आपल्या टाळयांच्या गजरानें व

जयघोषानें त्याजवरील प्रेम व्यक्त केलें. सार्वजनिक संस्थांनीं व नागरिकांनीं त्यांना पानसुपारी करून त्यांचा गौरव केला.

वधू इंदुमतीबाई या आतां कोल्हापुराच्या ताराबाई राणीसाहेब झाल्या. व त्यांनीं कोल्हापूर राज्याच्या संस्थापकाचें नांव धारण केलें. यांचा जन्म १९०४ सालीं जूनच्या २४ व्या तारखेस झाला असल्यामुळें, कोल्हापूरच्या युवराज्ञी ह्मणून छत्रपति घराण्यांत त्यांचा प्रवेश झाला त्या वेळीं, त्यांचें वय अदमासें १४ वर्षांचें होतें. त्यांच्या मातापित्यांनीं व सर सयाजीराव महाराजांनीं त्यांच्या शिक्षणाबद्दल पराकाष्टेची दक्षता घेतली होती. आपल्या मातृभाषे-खेरीज इंग्लिश व गुजराथी या भाषांचें ज्ञान त्यांना चांगलेंच होतें. जात्याच या साध्या व उदात्त अंत:करणाच्या असल्यामुळें त्या वयांत सुशिक्षणानें उपलब्ध होणारे सर्व गुण त्यांनीं संपादिले होते. यामुळें कोल्हापुराच्या युवराज राजाराम महाराजांना त्या सर्वतोपरी अनुरूप अशा अर्धांगी झाल्या. विवाहाच्या थोडेंसें पूर्वींच महाराजांनीं युवराजांना खासगी खात्यांत स्वतंत्र अधिकार दिले होते. या-पूर्वींच ते या गोष्टीमध्यें लक्ष घालीत असत; परंतु हें काम रावबहादूर सबनीस यांच्या देखरेखेखालींच ते आतांपर्यंत करीत होते. कांहीं खात्यांमधील पूर्ण अधिकार देण्यास युवराज अनुभवानें योग्य झाले आहेत, अशी महाराजांची खात्री होऊन १९१८ सालच्या मार्च महिन्यांत त्यांनीं हा मार्ग स्वीकारिला व अशा तऱ्हेनें कोल्हापूरच्या भावी राज्यकर्त्यांना अनुभव घेऊन राज्यकारभार चालविण्याची पात्रता आपल्या अंगीं आणण्याची त्यांनीं संधि दिली. युवराजांना दिलेल्या अधिकारांपैकीं कांहीं अधिकार चालविण्यास राजकुमार शिवाजी महाराजांनाहि सांगण्यांत आलें.

तथापि कुमारांचा केवळ हाच व्यवसाय नव्हता. व्यापारविषयक धंद्यांत त्यांचें लक्ष लागावें ह्मणून महाराजांची फार इच्छा होती. आपापल्या मित्रांच्या मदतीनें एकेक धंदा सुरू करण्यास महाराजांनीं त्यांचीं मनें वळविलीं. युवराज महाराजांना भागीदार करून आर० बी० एन्० अँड को नांवाची कंपनी १९१८ सालच्या मे महिन्यांत अस्तित्वांत आली. या कंपनीचें भांडवल १,००,००० रुपयांचें होतें. राजकुमार शिवाजी महाराजांनीं एस्० ए० बी० कंपनी काढिली. याच महिन्यांत राजकुमार शिवाजीराव हे कोल्हापुरांत सहकारी कोठार सुरू करणाऱ्या सभेचे अध्यक्ष झाले, व मे महिन्याच्या

५ तारखेस त्यांनीं केलेल्या भाषणांत अशा संस्थेचे फायदे चांगल्या रीतीनें त्यांनीं लोकांस समजावून सांगितलें.

महाराजांना व त्यांच्या इष्ट मित्रांना समाधानकारक अशा प्रकारें या गोष्टी घडत असतां, छत्रपति घराण्यावर एकाएकीं आकाशाची कुऱ्हाड पडून १९१८ सालच्या जून महिन्याच्या १२ व्या तारखेस निर्घृण कालानें तरुण राजकुमार शिवाजीरावांना अचानक ओढून नेलें. त्या वेळीं महाराज युद्ध परिषदेला हजर राहण्यासाठीं मुंबईस होते. कोल्हापूर सोडतांना महाराजांना भावी दुर्दैवाची खडतर दुश्चिन्हें दिसत होतीं, असें ह्मणतात. उद्विग्नतेच्या कारणाची जरी महाराजांना कल्पना होईना, तरी त्यांचें मन दु:खी व अस्वस्थ झालें. ज्या दिवशीं सकाळीं शिवाजीरावांची महाराजांना त्यांच्या बंगल्यावर गांठ पडली, त्या वेळीं आपला प्रिय पुत्रच उदास आहे, असें वाटून 'तुला काय पाहिजे ?' ह्मणून महाराजांनीं त्यांना विचारिलें. 'तुला गिरणी काढावयाची आहे काय ?' असा महाराजांनीं पुन: प्रश्न केला. 'नाहीं' असें याला उत्तर मिळालें. तुझें कुटुंब फारच लहान असल्यामुळें दुसरें लग्न तुला करावयाचें आहे काय ?' असें महाराजांनीं थट्टेनें विचारिलें. राजकुमार ह्मणाले, 'नाहीं. जरी माझी पत्नी वारली तरी मी पुन: विवाह करणार नाहीं. मी माझ्या सर्व आयुष्यभर ब्रह्मचारी राहीन.' 'तर मग तुला काय पाहिजे ? असें महाराजांनीं विचारिलें. यावर उत्साही राजकुमार ह्मणाले, 'कुंभोजच्या डोंगरांत मी डुकराची कशी शिकार करितों, तें पाहाण्यासाठीं आपण १२ तारखेला येथें परत यावें, एवढीच माझी इच्छा आहे. निरुत्साही मुलें ह्मणून तुह्मी आह्मांस सदां टोंचून बोलतां. आपण त्या दिवशीं याच व आपल्या मुलांत पाणी आहे कीं नाहीं, तें पहा." शक्य तितक्या लवकर परत येण्याचें अभिवचन देऊन महाराज कोल्हापुराहून त्याच दिवशीं संध्याकाळीं ह्मणजे जूनच्या आठव्या तारखेस निघाले. हीच त्यांच्या मुलाची त्यांना झालेली अखेरची भेट !

राजकुमार शिवाजीराव हे आपल्या मातोश्री व चुलते यांच्यासमवेत कुंभोजच्या डोंगरांत शिकार करण्याकरितां गेले. सकाळीं कित्येक डुकरांची शिकार करून नेज नजीकच्या आंबराईंत या शिकारी लोकांनीं तळ दिला. ते आतां पानांवर बसणार तोंच एक डुकर उठलें व आपल्या जेवणापूर्वीं या डुकरावर भाला

टाकण्याचा मोह राजकुमार शिवाजीरावांना अनावर झाला. त्यांनीं लागलींच या डुकराचा पाठलाग केला. त्यांचा भाला या सावजाला लागतो न लागतो तोंच त्यांच्या घोड्यानें ठेंच खाल्ली व त्यासरशीं हे तरुण राजकुमार डोकें खाली होऊन जमिनीवर आदळले. त्यांना मोटारींत घालून डॉक्टर वॉनलेस यांच्याकडे मिरजेला नेण्यांत आलें. तथापि डॉक्टरांचे सर्व उपाय हरले व आपला शोक करण्यास आपल्या तरुण पत्नीला व कुटुंबांतील माणसांना पाठीमागें ठेवून संध्याकाळीं ८ वाजून ४५ मिनिटांनीं राजकुमार स्वर्गवासी झाले! ही गोष्ट महाराजांच्या आयुष्यांत अत्यंत हृदयविदारक अशी झाली! राजकुमार शिवाजीराव हे मोठे उत्साही व धीट असल्यामुळें त्यांचें सहकार्य महाराजांना व याहिपेक्षां कोल्हापूरचे राजपद प्राप्त झाल्यानंतर युवराजांनाहि अतिशय महत्त्वाचें झालें असतें. प्रत्येक बाबतींत बाणेदारपणानें वागण्याची त्यांची प्रवृत्ति असल्यामुळें यांचा कोल्हापूरच्या जनतेलाहि अतिशय उपयोग झाला असता; परंतु या आतां संकेतार्थांतील गोष्टी ठरल्यामुळें यांच्या स्मरणानें दुःख मात्र द्विगुणित होतें. या अनर्थामुळें महाराजांच्या आयुष्यांत झालेली पराकाष्टेची उणीव पुनः कधींच भरून निघाली नाहीं, ही गोष्ट सांगावयास पाहिजे असें नाहीं. परंतु महाराजांनीं हें दुःख कसें गिळून टाकिलें, हें येथें सांगणें जरूर आहे. हिंदु कुटुंबांतील बालविधवेच्या दुर्दैवाची त्यांना चांगलीच कल्पना होती. हिंदु समाजांतील विधवेच्या आशांकुरविरहित अशा कष्टमय स्थितीची गोष्ट जरी क्षणभर बाजूस ठेविली, तरी रूढ असलेल्या वेडगळ समजुतींमुळें तिच्या नवऱ्याच्या अकाली निधनाबद्दल तिला जबाबदार धरलें जातें. तिच्या दुःखाबद्दल व तिच्या अंधःकारमय आयुष्याच्या भयाणतेबद्दल सहानुभूति व अनुकंपा न दर्शवितां उलट तिच्या नवऱ्याच्या निधनाबद्दल तिची अवहेलना व विटंबना करण्यांत येते. जणूं काय तिच्या हातून तिच्या नवऱ्याचा प्रत्यक्ष खूनच घडला आहे! सुदैवानें महाराजांची हिंदु समाजांतील या वेडगळ समजुतीवर श्रद्धा नव्हती. महाराजांनीं या आपल्या दुर्दैवाला दुर्दैवापेक्षां अधिक किंमत दिली नाहीं. हतभागी बालविधवा श्री० इंदुमती राणीसाहेब यांच्याविषयीं महाराज इतःपर अतिशय काळजी घेऊं लागले. महाराजांच्या अंतसमयापर्यंत त्या नेहमीं त्यांच्याबरोबर होत्या. त्यांच्या शिक्षणाची अतिशय काळजीपूर्वक तरतूद करण्यांत आली. इतःपर त्या दीर्घोद्योगी व विद्याव्यासंगी झाल्या. त्यांना शक्य तितक्या चांगल्या सुशिक्षित करून

संस्थानांतील महिला शिक्षण त्यांच्या ताब्यांत देण्याचा महाराजांचा विचार होता. हा हेतु मनांत धरून त्यांना इंग्लिश भाषेचें ज्ञान देण्याची महाराजांनीं व्यवस्था केली. त्यांचें शुद्ध आचरण व स्वभाव पाहून महाराजांना मोठें समाधान वाटत असे. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या सालीं ह्मणजे १९२१ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या १२ व्या तारखेस महाराज श्री० इंदुमतीराणीसाहेबांना लिहितात:—

" तूं निदान आतांपर्यंत यांच्या × × × × × × × पेक्षांहि मला अधिक सुख दिलें आहेस. मला सुख देण्याचा हेतूनें तूं आपल्या इच्छेविरुद्ध वागून देखील माझी आज्ञा पाळीत आहेस. × × × × × × तूं जें हें करीत आहेस तें पाहून मला आनंद होतो. या जगांत सर्वच गोष्टी आमच्या इच्छेनुरुप घडत नाहींत. परंतु आपल्या वडील माणसांना सुख देण्यासाठीं आपली इच्छा बाजूस सारण्यास शिकणें हा खऱ्या स्त्रीचा धर्म आहे. [illegible] तुझी बुद्धि जसजशी विकास पावत जाईल, तसतसे तुझे विचार अधिकाधिक उदात्त होतील. ह्मणून अभ्यासाची हेळसांड करूं नकोस; तुला सुशिक्षित विदुषी करण्याची माझी फार इच्छा आहे. ही इच्छा पूर्ण करण्याचें तुझें पवित्र कर्तव्य आहे. ही आशा फलद्रुप करण्याची सर्व जबाबदारी तुझ्यावर आहे. अशिक्षित मनुष्याला शारीरिक दृष्टि असली तरी तो आंधळा आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं."

या वेळीं जो दुष्ट रोग महाराजांची प्रकृति पोंखरीत होता, त्याची महाराजांना सर्वस्वीं विस्मृति पडली होती असें नाहीं. ह्मणून ते आपल्या गरीब विधवा स्नुषेविषयीं उत्तम तजवीज कशी करितां येईल, याचा पुष्कळ दिवसांपासून विचार करीत होते. शिकार करण्याच्या हेतूनें कोल्हापुराला सर जॉर्ज लॉइड यांचें जेव्हां आगमन झालें, तेव्हां महाराजांनीं यांची नेक नामदार साहेबांना ओळख करून दिली. आपल्या पश्चात् यांच्याबद्दल कशा प्रकारची तरतूद करावयाची यासंबंधींचे आपले विचार महाराजांनीं आपल्या कित्येक मित्रांपाशीं व्यक्त केले होते. मुंबई येथें आपल्या काळजाचा विकार विकोपास गेल्याचें महाराजांना जेव्हां आढळून आलें, तेव्हां आपल्या मृत्यूच्या अगोदरच्या दिवशीं " मसुदा बरोबर घेऊन " मुंबईला निघण्यासाठीं त्यांनीं रावबहादूर सबनीसांना तार केली. हा मसुदा ह्मणजे अर्थातच मृत्युपत्राचा मसुदा होय. यांत यांच्याबद्दल काय व्यवस्था करावयाची तें नमूद करण्याचा महाराजांचा विचार होता.

हा अनर्थ ओढवल्यानंतर पुढें एक वर्षाच्या अवधींतच भावनगरच्या भाऊसिंगजी महाराजांच्या मृत्यूमुळें महाराजांचे एक जिवलग व अत्यंत प्रेमळ असे स्नेही नाहींसे झाले. दुखवट्या निमित्य महाराज भावनगरला जाऊन आल्यानंतर लागलींच मुंबईच्या गव्हर्नर साहेबांचें आगमन कोल्हापुरास झालें. त्यांच्या अभीष्ट चिंतनाच्या वेळीं महाराजांनीं आपल्या कै० मित्राचा पुढील शब्दांत उल्लेख केला:—

" आमचे पूज्य गुरु व पालक मि० ( आतां सर ) स्टुअर्ट फ्रेजर यांच्या हाताखालीं आम्ही शिक्षण घेत होतों. त्या वेळीं आम्ही स्नेही झालों. माझा लहान मुलगा गमावून नुकतेंच एक वर्ष झालें. त्याच्या मृत्यूमुळें मला जबरदस्त धक्का बसला; परंतु हा धक्का त्याहिपेक्षां हृदयभेदक होता. त्यांनीं मला बोलाविलें असतांनाहि मी त्यांच्या अंतसमयीं त्यांना पाहाण्यास गेलों नाहीं, ही गोष्ट माझ्या मनाला अतिशय झोंबते. त्यांचा अंतसमय इतका समीप आला होता, असें कोणालाहि वाटलें नाहीं. परंतु ऐन तारुण्यांत त्यांना घेऊन जाणें परमेश्वराला इष्ट वाटलें. त्यांच्या भूतदयेच्या व बुद्धिमत्तेच्या विविध गुणांचें विवेचन करण्याचा हा प्रसंग नाहीं. त्यांच्या मृत्यूमुळें भावनगरचेंच नुकसान झालें नसून त्यामुळें ब्रिटिश सरकारचेंहि नुकसान झालें आहे; त्यांची उणीव सहसा भरून निघणारी नाहीं, एवढी गोष्ट येथें सांगितली असतां बस्स होईल. "

यांच्या मृत्यूविषयीं आपले गुरु सर एस्. एम्. फ्रेजर यांना लिहितांना १९१९ सालच्या आगष्ट महिन्यांत महाराज ह्मणतात:—

" आपण लौकरच हिंदुस्थानांतून निघून जाणार हा विचार मनांत आला ह्मणजे मला फार वेदना होतात. आपण रिटायर होण्यापूर्वींच आमचे मित्र भावसिंगजी हे आपली इहयात्रा संपवून या जगांतून कायमचे निघून गेले. हा विचार मनांत आला ह्मणजे मला किती तरी दुःख होतें. सर क्लॉड हिल हे देखील आमच्या सहवासांत फार दिवस रहाणार नाहींत. माझ्या एका युरोपियन मित्रानें उद्गार काढल्याप्रमाणें तुह्मी दोघेहि माझे " मित्र, तत्वज्ञानी व मार्गदर्शक " झाला आहांत "

महाराजांनीं हें जें लिहिलें त्यांत अतिशयोक्ति मुळींच नव्हती. महाराजांना जर कोणी मित्र असले तर ते सर एस्. एम्. फेझर व सर क्लॉड हिल हे होते. दोघेहि



सर क्लॉड हिल्, के. सी. एस. आय.



राजकुमार शिवाजी महाराज यांची नेज येथील समाधी.

बहुतेक एकाच वेळीं हिंदुस्थानांतून निघून गेले, ह्मणून सिव्हिल-सर्विसमधून आपले दोन अत्यंत स्नेही निघून जात असल्याचें पाहून महाराजांना फार वाईट वाटलें. कोल्हापूरच्या पूर्वेस दोन मैलांवर असलेल्या इतिहासप्रसिद्ध त्र्यंबुली टेकडी वरील नव्या ' रुग्णालयाला ' सर क्लॉड हिल साहेबांचें नांव देऊन त्यांचा आपल्याशीं जो स्नेह होता, त्यांचें महाराजांनीं यथायोग्य स्मारक केलें. सर स्टुअर्ट फ्रेजरसाहेबांच्या महाराजांशीं असलेल्या दीर्घकालिक ऋणानुबंधाचें शाहूपुरींतील फ्रेजर-मार्केट हें स्मारक होऊन, गुरुशिष्यांचें त्यांच्या ऐतिहासिक यात्रेप्रमाणेंच त्यांच्या स्मारकांतहि चिरकाल सान्निध्य राहिलें. आपले जुने शिष्य जे महाराज यांचा निरोप घेण्यासाठीं १९२० सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या ३ र्‍या तारखेस सर एस्. फ्रेजर हे जेव्हां कोल्हापुरास आले, त्या वेळीं त्यांच्या हातूनच या स्मारकाच्या पायाची कोनशिला बसविण्यांत आली.

हें चरित्र निवेदन करीत असतांना आतांपर्यंत महाराजांच्या खासगी गोष्टींचा आह्मांस वारंवार परिचय घडला आहे; परंतु महाराजांच्या चरित्राच्या पुढील कांहीं प्रकरणांत आह्मी ज्या गोष्टी सांगणार आहोंत, त्यांचें मर्म वाचकांच्या ध्यानांत यावें, ह्मणून महाराजांच्या दिनक्रमाचें येथें संक्षिप्त सिंहावलोकन करणें जरूर दिसतें. आह्मीं मागें सांगितल्याप्रमाणें महाराजांनीं आपल्या पूर्व वयांत अत्यंत साध्या व कष्टाळु रहाटीची आपणांस संवय लाऊन घेतली होती. लाकडी खाटेच्या आपल्या साध्या बिछान्यावरून ते सकाळीं पाहांटेस उठून स्नान करीत व त्या नंतर ते बहुधा शिवपुजा करीत असत. ही पूजा केल्याखेरीज ते चहा अगर दूध देखील घेत नसत. यानंतरचा त्यांचा क्रम आरंभीं कित्येक वर्षें, पोलो खेळणें अगर घोड्यावर बसून रपेट करणें, हा असे. घोड्यावर बसून रपेट करण्याचा व्यायाम घेतां घेतां, ते फिरावयाच्या भागांतील स्थितीची बारीक नजरेनें पाहणी करीत. सुमारें सकाळीं ९ वाजतां परत येऊन, ते आपलें खासगी अगर राजकीय टपाल पाहाण्यांत एक तास घालवून, ११ वाजण्याच्या सुमारास त्यांचें जेवण होई. भोजन झाल्यावर ते आपलें ऑफीसचें काम पहात असत. ऑफीसाची जागा मात्र ठराविक नसे. या दिनक्रमाच्या निरनिराळ्या प्रसंगीं त्यांना भेटण्यास आलेल्या लोकांचा ते समाचार घेत असत. दोनप्रहरांनंतर कित्येक वर्षें ते तालीम करीत असत. त्यानंतर शहरांतून व शहराच्या आसपास घोड्याच्या गाडींतून ते फिरत. रथाला कधीं चार व कधीं आठ

देखील घोडे जुंपून, त्यांना पूर्णपणें आपल्या ताब्यांत ठेवून ते सहज हांकीत असत. आपल्या पूर्व वयांत कोणत्याहि प्रकारचा अपघात होऊं न देतां, शहरांतील अरुंद रस्त्यांतूनहि सोळा घोडे एकदम जुंपून त्यांना हांकीत असतांना पुष्कळांनीं पाहिलें होतें.

त्यांना शिकारीचा फार नाद होता; व हा नाद त्यांनीं आपल्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत कायम ठेविला. कालगतीनें शिकार हा एक त्यांचा स्वभावधर्मच बनला. आपल्या अंतकाळच्या पूर्वी कांहीं वर्षेपर्यंत महाराजांची जी सुदृढ प्रकृति राहिली, याचें कारण त्यांची ही उत्साही मृगयावृत्ति हेंच होय. त्यांच्या बरोबर जाणाऱ्या लोकांना धैर्यगलित करणाऱ्या कष्टसाध्य शिकारीमध्यें महाराज जो टिकाव धरूं शकत असत, त्याचेंहि कारण हा त्यांचा शिकारी बाणाच होय. शिकारीची मौज पाहाण्यासाठीं जे पुष्कळ लोक त्यांच्याबरोबर जात असत, त्यांना मृगयामग्न महाराजांना जंगलांत सोडून एकटेंच पुष्कळ वेळां परत यावें लागे. डुकराच्या शिकारीसाठीं सूर्याच्या प्रखर तापांत घोड्याच्या पाठीवर बसून तसाचे तास ते घालवीत असत. कधीं कधीं ते दिवसाचे बारा तासहि घोड्याच्या पाठीवर बसून काढीत! जेव्हां ते जंगलांत तळ देत, तेव्हां तेथील खेडगळ लोकांशीं ते मनमोकळेपणानें मिसळत. त्यांचा बिछाना अनेकवार उघड्या मैदानावरच असल्यामुळें, भिजून चिंब झालेल्या बिछान्यावरून आपलें अर्धें अधिक शरीर भिजलें आहे, अशा स्थितींत त्यांना केव्हां केव्हां उठावें लागे!

संवयीनें महाराजांनीं आपलें मन व शरीर काटक केलें. त्यावरून आत्मसंयमन करण्याचें त्यांचें लोकोत्तर सामर्थ्य व्यक्त होतें. अखेर अखेरच्या दिवसांत त्यांची प्रकृति ढासळेतोंपर्यंत, कोणत्याहि कारणामुळें महाराज उद्विग्न अगर त्रासिक झाल्याचा एकहि प्रसंग उद्भवला नाहीं. आपणांस झालेला सर्व प्रकारचा विरोध, सर्व प्रकारच्या अडचणी व कधीं कधीं शत्रूंकडून झालेली आपली मानखंडनाहि अत्यंत शांत चित्तानें व बाणेदारपणानें ते सहन करीत असत. आपल्या इंग्लंडांतील कांहीं मित्रांसह आपल्या संस्थानामध्यें शिकारीविषयीं जी व्यवस्था केली आहे, तीसंबंधीं महाराज एकदां चर्चा करीत असतां, शेजारीं बसलेले आणखी एक संस्थानिक आपल्या बड्या संस्थानांत याहिपेक्षां अधिक खर्चाची व विस्तृत

व्यवस्था केल्याची फुशारकी मारूं लागले. त्यांचें सर्व भाषण ऐकिल्यानंतर, त्यांनीं वर्णन केलेल्या व्यवस्थेला शिकार ह्मणतां येणार नाहीं, असें महाराजांनीं शांतपणानें उत्तर दिलें, त्यामुळें ते संस्थानिक रागावून ह्मणाले, ' तुह्मीं यापेक्षां अधिक ती काय व्यवस्था केली आहे ? ' असहाय प्राण्यावर गोळी झाडणें, याला मी मुळीं शिकारच समजत नाहीं. ही शिकार नसून, ही कसाबगिरी आहे. शिकाऱ्यावर हल्ला करण्यास अगर पळून जाण्यास अगर आपला प्राण वांचविण्यास सावजाला आह्मीं पूर्ण सवड ठेविली पाहिजे. नाहींतर सावजाला चोहोंकडून वेढून बुरुजावरील आरामखुर्चीवरून गोळ्या झाडणें, याला शिकार ह्मणतां येणार नाहीं. ' असें यावर महाराजांनीं खरमरीत प्रत्युत्तर दिलें !

१८९५ सालीं महाराज आपल्या एका शिकारीचें वर्णन पुढीलप्रमाणें देतातः-

" विजापूरच्या बाजूला शिकार करून मी कालच परत आलों. तो काळ मोठया मजेंत गेला. एकंदर आह्मी १४ शिकारी होतों. यांमध्यें कांहीं सरदार व मानकरी होते. माझे बंधु, चुलते, हिंम्मतबहाद्दर, हैसाळकर, रंगराव, आप्पासाहेब, नानासाहेब, भाऊसाहेब, दत्ताजीराव (ज्येष्ठ), व माझे मेहुणे बाबासाहेब, शिकारींत आमच्याबरोबर राहूं शकतील अशा रीतीनें घोड्यावर बसण्यास शिकलेले मि० सबनीस हे यांत प्रमुख होते. आह्मी सदर्न मराठा रेलवेनें चालू महिन्याच्या १५ व्या तारखेस निघालों व धारवाडला सूर्योदयाला पोंचलों. तेथील परिचित स्थळें पाहून आपल्या व भाऊसिंगजीच्या सहवासांत आह्मीं घालविलेल्या आल्हाददायक दिवसांची आह्मांस आठवण झाली. निदान कांहीं तास तरी तेथें काढावेत, असें मला फार वाटलें, परंतु तेथून निघण्यास दुसरी सोईस्कर गाडी नसल्यामुळें मला तसें करितां आलें नाहीं. आह्मी तेथून निघालों व दुसऱ्या दिवशीं पहांटेस दोन वाजतां मलवाडास पोंचलों. मलवाड हें विजापूरच्या या बाजूला सुमारें १२ मैलांवर आहे. मलवाडाहून आह्मी महमदापुराला गेलों. तेथें पुष्कळ डुकरें आहेत, अशी आह्मांस खबर मिळाली. या खेपेला लहान डुकर व माद्या आह्मीं मुद्दाम वगळल्या. आह्मांला तेथें मोठाले डुकर मिळाले. बापूसाहेब व रंगराव यांना पहिल्यांदा भाला फेंकण्याची संधि मिळाली. आह्मी तेथें पोंचलेल्या दिवशींच ही शिकार झाली. दुसऱ्या दिवशीं पावसामुळें जमीन फार जड झाली, ह्मणून आह्मांस कांहीं काम करितां आलें नाहीं. त्या दिवशीं पाऊस फार पडूं लागल्यामुळें आह्मांस विजापुराला जावें लागलें. तेथें पुनः

आपल्याबरोबर केलेल्या सुखदायक सहलीची मला आठवण झाली. आमचे शिकारी गडी हरणांची शिकार करण्याकरितां निघाले. आह्मांला सोळा हरणें व तीन मांद्या मिळाल्या. या मांद्या चुकून मारल्या गेल्या. तेथून ३० मैलांवरील तिलसूरीला गेलों. तिलसूरी येथें आह्मांस ४ डुकरें मिळालीं. वडील दत्ताजी-रावाला दोन डुकरांवर प्रथम भाला टाकण्याची संधि मिळाली; व बाकीच्या दोघांवर माझ्या मेहुण्यानें व मीं भाले टाकिले. नंतर तेथून ३० मैलांवरील मुचंडीला आह्मी गेलों. तेथें आह्मांला चांगली शिकार मिळाली नाहीं, कारण जतच्या कारभाऱ्यानें तेथील निवडुंग काढून टाकून व कुली लोकांकडून गोळया घालून व जाळून डुकरें नाहींशीं करून टाकलीं, हें ऐकून मला फार चीड आली. अशा प्रकारें डुकरांची शिकार करण्याचें एक उत्कृष्ट स्थळ नाहींसें झालें. मेजर रे हे जर येथें असते तर त्यांनीं अशी कत्तलीसारखी कसाबगिरी कधींच होऊं दिली नसती. शेवटीं उठलेल्या १०० डुकरांपैकीं आह्मांस सुमारें ३० डुकरें मिळालीं. परंतु या वेळीं आह्मी फक्त पांचच डुकर उठविले; यांपैकीं ४ माद्या निघाल्यामुळें त्यांना सोडून द्यावें लागून एका डुकरावरच आह्मांस समाधान मानावें लागलें. या डुकरावर माझ्या बंधूनें प्रथम भाला टाकला. तेथून टप्पे करीत करीत आह्मी घोड्यावरून मिरजेला आलों. रस्त्यांत कलाती येथें आह्मीं एक मोठा डुकर मारला. या डुकरानें तेथील पुष्कळ लोकांना ठार व जखमी केल्यानें खेडवळ लोकांना त्याची मोठी धास्ती उत्पन्न झाली होती. माझ्या बंधूंच्या भाल्याला तो प्रथम लागला.''

१८९६ च्या एप्रील महिन्यांत महाराजांनीं आणखी एक साहसी शिकार केली. एप्रीलच्या १२ व्या तारखेस महाराज फ्रेजरसाहेबांना लिहितातः—

"या भागांत जो मीं छोटासा दौरा केला, तो शुभदायक ठरला. तीन डुकर, एक काळवीट, चांगल्या शगांचें एक चितळ व एक सुंदर वाघ मीं मारला. या वाघाची वाढ पूर्ण झाली असून, त्याची लांबी ८ फूट ९ इंच होती; तो फार देखणा होता. मीं तो कांहींशा विशिष्ट परिस्थितींत मारला. हा दौऱ्याचा शेवटचा दिवस होता. हिरंड्याचा मक्ता ठरविण्यासाठीं मला कोल्हा-पुराला हजर राहणें भाग असल्यामुळें, तिकडे जाण्याची सर्व तयारी झाली होती; परंतु आह्मी निघणार तोंच माझ्या शिकारी लोकांनीं एका वाघानें दोन बैल ठार केल्याची खबर आणली. माझ्या या वेळच्या मनाच्या स्थितीची

आपणांस चांगली कल्पना होईल. हा मोह टाकणें मला शक्य नव्हतें. तथापि ठरल्याप्रमाणें सर्व नोकरचाकर व मुलें कोल्हापुराला पाठविण्यांत आलीं व थोडेसे शिकारी घेऊन मी मागें राहिलों. थोडे रान धरणारे लोक घाईनें गोळा करून मी माळयावर जाऊन बसलों. एक दोन तास मोठ्या आस्थेनें वाट पाहून मी मोठा निराश होऊन खालीं आलों; इतक्यांत एकाएकीं वाघ माझ्या दृष्टीसमोर आला. त्यानें माळयाकडे दृष्टी लाविली होती. झाडाशीं स्तब्ध उभें राहिल्या-खेरीज दुसरा मार्ग नव्हता. सुदैवानें तो थोडासा बाजूस झाला. मी माझी छोटी बंदूक घेऊन ती त्याच्यावर झाडली. ती रायफल नसल्यामुळें गोळीचा व्हावा तसा परिणाम झाला नाहीं. ह्मणून सावजानें माझ्यावर चाल केली. मी एकदम झाडावर चढलों व त्याच्यावर नेम धरतों न धरतों तोंच तो झाडाच्या अगदीं खालीं आला. मीं त्याच्यावर दुसरी गोळी झाडली. व त्याला शांत करण्यास सुदैवानें ती बस्स झाली. त्यानें जेव्हां माझ्यावर चाल केली तेव्हां बापूसाहेब माझ्याजवळ असावेत असें मला किती तरी वाटलें, परंतु माझ्याबरोबर एकच शिकारी होता. ”

ही शिकार इतकी साहसाची होती कीं, महाराजांच्या मित्रांना महाराजांच्या या धाडसीपणाबद्दल चिंता उत्पन्न होऊन अशा प्रकारच्या शिकारीचा नाद सोडून देण्यासाठीं त्यांनीं महाराजांना उपदेश केला. महाराज भावसिंगजी एप्रील २० व्या तारिखेस महाराजांना लिहितात:--

“इतक्या लौकर दुसरें पत्र माझ्याकडून आल्याचें पाहून आपणांस आश्चर्य वाटेल. याच्या कारणाची आपणांस अटकळ होत नसेल तर मीं कालच एका वर्तमानपत्राच्या अंकांत आपण एक भयंकर वाघ मारल्याचें आनंददायक वृत्त वाचलें, हें मी आपणांस सांगतों. या बातमीमुळें मला अपरिमित आनंद झाला. पहिली गोळी जेव्हां मर्मीं लागली नाहीं, तेव्हां स्वाभाविकपणेंच वाघ फार खवळला असला पाहिजे. लगतच्या झाडावर उडी मारून चढण्याची बुद्धि देवानें आपणांस चांगली सुचविली; नाहींतर अतिशय वाईट परिणाम घडून आला असता. जेव्हां जेव्हां आपण मोठी शिकार करण्याकरितां निघाल, तेव्हां एकादा दुसरा विश्वासूक हुजऱ्या आपल्याबरोबर असावा. आपल्या चिकाटीबद्दल व प्रसंगावधानाबद्दल आणि आपण त्या प्रसंगीं दाखविलेल्या धैर्याबद्दल मी पुनः एकवार आपलें अभिनंदन करितों.”

दुसऱ्यांना महाराजांच्या या साहसीवृत्तीमुळें किती जरी चिंता उत्पन्न झाली तरी खुद्द त्यांना त्याचें कांहींच वाटत नसें. पुढें पुढें असलीं साहसाचीं कृत्यें त्यांच्या अंगवळणींच पडलीं. १८९८ सालच्या मार्च महिन्यांत महाराज आणखी एका साहसाचें पुढीलप्रमाणें वर्णन करितात:—

"गेल्या महिन्यांत दाजीपूरच्या बाजूला आह्मी शिकारीकरितां गेलों. संध्याकाळीं वाघिणीची खबर आह्मांस लागल्यामुळें आह्मी जेवण करून निघालों. ४० मैलांपेक्षां अधिक अंतर असल्यामुळें डांकेची सोय करण्यास वेळ नव्हता; ह्मणून आह्मीं उंटांवरून प्रवास करून आठ तासांत मजल गांठली. आह्मी पोंचतांच वाघीण, मारलेलें जनावर टाकून गेल्याचें ऐकून आमची निराशा झाली. दोन प्रहरीं कर्नल रे व त्यांच्या पत्नी घोडयांवरून आल्यामुळें त्यांचीहि निराशा झाली. आह्मीं दोन दिवस वाट पाहिली; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं, पण आह्मी निघाल्यानंतर सुमारें अर्ध्या तासानें वाघिणीनें आणखी एक जनावर मारिलें. कर्नल रे व त्यांच्या पत्नी यांना पुन: परत जावेसें न वाटल्यामुळें, मी एकटाच परत फिरलों. नेहमींप्रमाणें माझ्याबरोबर लोक होते. दत्ताजीराव इंगळे ( ज्येष्ठ ) यांच्याजवळच वाघीण उठली; व तिच्या जबडयांत पांच इंच जखम झाली. बार झाल्यानंतर दहा मिनिटांच्या आंतच मी, माझे बंधु व माझे मेहुणे आप्पासाहेब सुर्वे मिळून आह्मी त्या ठिकाणीं गेलों. व तिचा माग काढीत जाण्याचा आह्मीं निश्चय केला. परंतु आह्मी १० यार्ड जातों न जातों, तोंच लपून बसलेल्या वाघिणीनें आमच्यावर चाल केली. परशराम हवालदार, बापूसाहेब व आप्पासाहेब यांनीं तिला पुनः घायाळ करून जेथल्या तेथेंच उभें केलें. नंतर आह्मीं सहाजण एक जुटीनें जाऊन तिला थंड केलें."

१९०५ सालच्या सुमारास महाराजांना कुत्र्यांचा शोक लागला. त्यांचा पुढें ते लौकरच शिकारीकडे उपयोग करूं लागले. १९०७ सालच्या जानेवारी महिन्यांत ते कर्नल फेरीससाहेबांना लिहितात:—

"आपण मजकरितां ह्मणून कृपाकरून जे कुत्रे आणिले, त्यांच्या मदतीनें हरणाची शिकार करण्याकरितां एक आठवडाभर मी जंगलांत हिंडत आहें. याखेरीज सुमारें एक वर्षाच्या वयाचे कांहीं कुत्रे माझ्याबरोबर होते. त्यांना इकडील हवेची चांगली संवय होऊन डुकरें, नीलगाई व चितळें यांची त्यांनीं वर्षभर शिकार केली होती. जुन्या कळपांत पांच स्टॅगहाऊंड, एक फॉक्स



महाराज जंगलांत शिकार करीत असतांना.

हाउंड व आठ टेरीअर असे कुत्रे आहेत. दुसऱ्या कोणत्याहि कळपाप्रमाणें हे कुत्रे जुटीनें शिकार करूं शकतात. दुसऱ्या कोणत्याहि जातीपेक्षां टेरीअर जातीचे कुत्रे अधिक चांगले असतात, असा माझा अनुभव आहे. कारण ते फार चपळ असून आह्मांस हवी असलेली शिकार करणें थोड्याशा परिश्रमानें त्यांना शिकवितां येतें.

"माझ्या बंधूंचें मत असें नाहीं, याबद्दल मला फार वाईट वाटतें. स्टॅग हाउंड हे सर्वांत उत्तम असें ते ह्मणतात. पहिल्या दिवशीं हाउंड्सनीं भेकरीचा पाठलाग केला; परंतु आमच्या देशी टेरिअर जातीच्या कुत्र्यांनीं तिचा लौकरच शेवट लावल्यामुळें दुर्दैवानें ही शर्यत फार वेळ टिकली नाहीं. यानंतर दोन दिवसांनीं एका हरणीची व यांची चांगलीच शर्यत लागली; परंतु ती यांच्यापेक्षां फार चपळ होती, ह्मणून त्यांना परत बोलावून आह्मीं दुसऱ्या एका काळविटा मागें लाविलें. दाट जंगलांतून त्याला आपल्या शिंगांमुळें पळतां येईना. ही शर्यत १ तास ४५ मिनिटें टिकली. तोंड टाकणारे कुत्रे दुसऱ्या बाजूनें राहिले, त्यामुळें त्यांचा उपयोग करितां आला नाहीं. नाल्यामध्यें हाउंड्सनीं जेव्हां त्याला थोपवून धरिलें, तेव्हां ब्यूगलखेरीज आह्मांजवळ कांहीं नव्हतें; नाहींतर आह्मीं त्याला पकडलें असतें. एका स्वाराजवळ एक बंदूक होती, परंतु ती घेऊन त्याला घोडा संभाळतां येईनासा झाल्यामुळें त्यानें ती मागें ( रस्त्यांत ) ठेवून दिली होती. आह्मीं त्याच्यावर दगड व काठया फेंकल्या, परंतु हा मृग फार बळकट होता. आपण ज्या ठिकाणीं वाघ मारिला, त्याच ठिकाणीं आमची छावणी आहे. पांच वाघ, सहा डुकरें, तीन मृग व दोन बिब्ये वाघ आहेत, अशी खबर आली आहे. ते नेक नामदार साहेबांसाठीं राखून ठेवीत असल्यामुळें त्यांची शिकार आह्मीं केली नाहीं. स्वतःचे स्टॅगहाउंड्स विकून टाकण्याचा माझ्या बंधूंचा विचार आहे. परंतु गेल्या वर्षाप्रमाणें नेक नामदार साहेब शिकारी-करितां येत असतील तर ते आपल्याजवळ ठेवण्यास मी त्यांना सांगणार आहें. गेलीं दोन वर्षे मी शिकारी कुत्रे पाळीत आहें. शिकारीपासून उत्तम व्यायाम मिळून शर्यतीप्रमाणें ती खर्चाची नसल्यामुळें, शिकारीसारखा जगांत दुसरा सर्वोत्कृष्ट खेळ नाहीं असें मला वाटतें. हा अवघा पांच सहा हजारांचा प्रश्न आहे. ह्मणजे ही एका शर्यतीच्या घोड्याची किंमत आहे. गेल्या दोन वर्षांपासून मीं शर्यतीचा अगदीं नाद सोडून दिला आहे; ग्रँड स्टँडचा मी या मुदतींत जिना-

देखील चढलों नाहीं. एक दोन दिवसांत मी कोल्हापुराला जाईन. हा ऋतु सुरू झाल्यापासून आह्मांला २२ डुकरें, तीन चितळें, २ नीलगाई, १ भेंकर इतकीं सावजें मिळालीं. टेरिअर व हॅरिअरनीं मिळून एका बिब्या वाघाला ठार केलें. ”

“ मी सकाळीं पाहटेस उठलों तेव्हां जवळच्या उंसाच्या मळ्यानजीक असलेल्या राईत एक वाघ असल्याची खबर एका शेतकऱ्यानें आणली. येथें माझी बंदूक संभाळणाऱ्या इसमाखेरीज मजबरोबर कोणी शिकारी नव्हते. व माझे कुत्रे संभाळीत असलेले एक सरदार होते. याखेरीज गिधाडें राखणारे कांहीं लोकहि होते. यांना मिरशिकारी ह्मणतात, हें आपणाला माहितच आहे.

“ मला हल्लीं घोड्याचा उपयोग करितां येत नसल्यामुळें त्या ठिकाणीं मी बैलगाडींतून गेलों. आह्मी राईला पोंचतांच वाघ तेथून निघून टेकडीनजीकच्या उंसाच्या मळ्यांत शिरला.

“ हा बिब्या वाघ, एकादा तरस अगर कदाचित एकादा लांडगा असावा असें आह्मां सर्वांस वाटलें. आह्मांजवळ भाले अगर बंदूका नव्हत्या. पांच वर्षांपूर्वी माझ्या कुत्र्यांच्या मदतीनें दोन बिब्या वाघांची व तीन डुकरांची मीं यशस्वीपणानें शिकार केली असल्यामुळें या शिकारीची मला खातरी होती. या खेपेला मजबरोबर कुत्र्यांच्या दहा जोड्या, टेरियरच्या दहा जोड्या व ग्रेहाऊंड व अरबच्या सात जोड्या होत्या. या सर्व कुत्र्यांना इशारा होतांच बाहेर पडण्यास व फॉक्स हाऊंडप्रमाणें मिळून हल्ला करण्यास चांगलें शिकविलें आहे. बिब्या वाघांची अगर डुकराची शिकार करितांना आह्मी नेहमीं करितों त्याप्रमाणें या कुत्र्यांचे मीं सहा कळप केले. प्रथम नांवाजलेला कळप सोडला. अशा प्रसंगीं वाघांचा अगर कुत्र्यांचा जोर झाला हें समजावून घेण्यास सदा सावध राहिलें पाहिजे. कुत्र्यांच्या अगर सावजाच्या आरडाओरडीवरून हें सहज ताडतां येतें. आह्मीं तीन कळप सोडल्यानंतर कुत्र्याचा जोर होत आहे व सावज वाघ नसून वाघुटें आहे, असें स्पष्ट दिसून आलें. जे सरदार मजबरोबर होते, त्यांनीं लांब अंतरावर ठेवलेल्या इतर कळपांना बोलाविलें. व अर्ध्या तासाच्या अंतरानें त्यांना एकदम सोडून दिलें. शेवटच्या कळपांत कांहीं अरब व इंग्लिश ग्रेहाऊंड होते. सर्व कुत्रे सोडून दिल्यानंतर थोड्या वेळानें वाघाचें गुरगुरणें मंद झालें. त्यावरून सावजाचा शेवट समीप आला असून कुत्र्यांना आपल्या जयाची खात्री पटून त्यांचें भुंकणें जोरावत आहे, असें आह्मांस वाटलें; ह्मणून

काय प्रकार होत आहे, तो पाहाण्यासाठीं मी पुढें झालों. माझ्यामागें सरदार व कुत्रीं संभाळणारे कांहीं नोकर होते.

" सर्व बाजूंनीं त्या कुत्र्यांनीं एका भव्य वाघाला जागच्या जागीं थोपवून धरिलें आहे, असा देखावा पाहून मी आश्चर्यचकित झालों. मीं काय करावें याचें भान न राहिल्यामुळें, पुतळयाप्रमाणें मी उभा राहिलों. माझ्या कुत्तेवानांनीं गुपचुपपणें मला मागें खेंचलें व आह्मीं सर्वजण परतलों.

" क्षणभरच विचार करून जवळच्या खेडयांतून कांहीं भाले, गजाची बंदूक व कांहीं कुऱ्हाडी पैदा करण्याची आह्मीं कल्पना काढली. थोडक्याच वेळांत सुमारें सात कुऱ्हाडी, दोन भाले व एक गजाची बंदूक पैदा करण्यांत आली.

" मी बंदूक घेऊन तीमध्यें दारू भरीत असतां कुत्तेवान, भाले व कुऱ्हाडी घेऊन धांवले, आणि त्यांनीं सर्व कांहीं करून टाकलें; परंतु वाघाला दोनच ठिकाणीं भाले लागले होते, ही गोष्ट माझ्या कुत्र्याच्या उत्कृष्ट कामगिरीचें द्योतक आहे, हें मला कबूल केलें पाहिजे. "

कुत्र्यांनीं वाघाशीं यशस्वी रीतीनें जो हा सामना दिला, त्याबद्दल मि० फ्रेजरसाहेबांनीं महाराजांचें अभिनंदन केलें, यावद्दल कांहीं आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. ते लिहितात, " कुत्र्यांच्या कळपानें पूर्ण वाढ झालेल्या वाघाला ठार केल्याची करामत मीं कधींच वाचली नाहीं. उंसाच्या मळयांत शिरल्यानंतर जवान वाघ जेव्हां आपल्यासमोर दिसला, त्या वेळीं आपल्या मनाची स्थिति काय झाली असेल याची मला कल्पना होते. अशा प्रसंगीं लोकांची मदत क्वचितच होत असते. ह्मणून आपल्या कुत्तेवानांनीं आपल्या भाल्यांनीं वाघाला ठार केलें, यावरून त्यांचें धैर्य व्यक्त होतें. धारवाड येथें आह्मांबरोबर असलेल्या वृद्ध नायकाच्या तोडीचे कांहीं शिकारी अद्याप आपल्याजवळ कोल्हापुरास आहेत, हें यावरून स्पष्ट होतें. हा सर्व प्रकार इतका विलक्षण आहे कीं, आपण याची हकिकत बॉंबे नॅचरल हिस्टरी सोसायटीच्या जनरलला पाठवाल अशी आशा आहे. "

या सुमारास महाराजांना हत्तींचा व साठमारीचा नाद लागत गेला. सह्याद्रीच्या जंगलांत महाराजांनीं पुष्कळ हत्ती जमविले व त्यांची पैदास करण्याचा प्रयत्न केला; परंतु तो अयशस्वी ठरला. साठमारीविषयींचे महाराजांचे प्रयत्न

अधिक यशस्वी झाले. महाराजांनीं साठमारीच्या ज्या तीन जागा बांधल्या त्यांपैकीं एक राधानगरीला आहे. दुसऱ्या दोन अनुक्रमें रजपूतवाडी व खासबाग येथें आहेत. साठमारी हें एक कठीण शास्त्र आहे. हत्तीचा स्वभाव ओळखून त्याला कोणत्याहि प्रकारची इजा न करतां त्याच्याकडून काम करवून घेणें, ही महत्त्वाची गोष्ट आहे.

आपल्या आयुष्याच्या अखेरीला महाराजांना चित्त्याच्या शिकारीचा मोठा नाद लागला. या शिकारीच्या पद्धतींत महाराजांनीं कल्पनातीत सुधारणा घडवून आणली. आपल्या कल्पनेप्रमाणें तयार केलेल्या गाडींत डोळे झांकलेले दोन चित्ते बरोबर घेऊन व गाडीला चार उमदे घोडे किंवा बैल जुंपून रायबागच्या बाजूकडील उंच सखल अशा वृक्षरहित डोंगराळ प्रदेशांत महाराज ही शिकार करीत असत. सर्व बाजूला पसरलेल्या चपळ मृगांच्या कळपावर दृष्टी ठेवून झाडाझुडपांतून दऱ्याखोऱ्यांतून, महाराजांना गाडी हांकतांना पाहाणें म्हणजे हा एक प्रकारचा देखावाच होता. गाडीचे हेलकावे इतके जबरदस्त असत कीं, सामान्य मनुष्यें थोडक्याच अवकाशांत जमिनीवर आदळल्याखेरीज राहात नसत. अशा प्रकारें पुढें जातां जातां, धांवत्या हरणांवर झडप घालण्यासाठीं चित्त्याला महाराज अगदीं वेळेवर सोडीत असत.

या शिकारींत चित्त्याचा उपयोग होईल अशा रीतीनें त्याला पढविणें ही एक प्रकारची कलाच होय. या कलेंत महाराज निष्णात होते. मि० सबनीस हे एकदां नवीन राजवाड्यांत एका चित्त्याशेजारीं उभे असतां, महाराजांनीं त्यांना विचारिलें, " येथून जुन्या राजवाड्याला जाण्यास चित्त्याला किती वेळ लागेल, असें आपणांस वाटतें ? नवीन राजवाडा व जुना राजवाडा यांच्यामधील अंतर अजमासें एक मैल असल्यामुळें दिवाणसाहेबांनीं महाराजांच्या प्रश्नाला " दोनतीन तास लागतील," असें उत्तर दिलें. यावर महाराज म्हणाले, " नाहीं, याला सबंध एक दिवस लागतो. तें कां, हें आपणांस माहित आहे काय ? त्याचा स्वभाव संस्थानिकासारखा आहे. आपणांस कोणत्या ठिकाणीं मालक नेत आहे, याची त्याला कल्पना असूनहि मार्गदर्शकानें पसंत केलेल्या ठिकाणीं आपण जात आहों, अशी मार्गदर्शकाची समजूत होऊं देण्यास तो नाखूष असतो. हळू हळू आपणास जुन्या राजवाड्याकडे नेण्यांत येत आहे,

हें त्याला समजतें. परंतु तो इकडे तिकडे वळतो व केव्हां केव्हां तो जागच्या जागींच थांबून पुढें पाऊल देखील टाकण्यास नाकबूल होतो. शाहाणा वाटाड्या त्याला हे सर्व चाळे करूं देतो. आपण आपला स्वतंत्र मालक आहों, अशी वाटाड्याची समजूत करून देण्याची चित्त्याची इच्छा असली तर वाटाड्याहि आपण चित्त्याला स्वतंत्रपणें वागूं देत आहों अशी त्याची समजूत करून देतो. अशा प्रकारें ते दोघेहि आपापल्या इच्छेप्रमाणें वागतात. व शेवटीं, उशीरा का होईना, वाटाड्या त्याला आपल्या इच्छित ठिकाणीं नेतो. इतर प्राण्यांचे व्यवहार ज्या नियमाप्रमाणें घडतात ते जाणण्याचा महाराजांचा हातखंडा असे. यामुळें माणसाशीं वागण्यांत त्यांच्या हातून कधीं फारशा चुका होत नसत. अर्थातच नैतिक जागृतीमुळें एखाद्या मनुष्याच्या अजमात्रलेल्या वर्तनांत फरक पडला ह्मणजे मात्र मनुष्य व जनावर यांच्यांतील सामान्य तत्त्वांवर उभारलेली ही अटकळ चुकत असे, हें उघड आहे. असले चुकीचे प्रसंग मात्र त्यांना फार थोडे आले !

महाराज मोठे शिकारी असल्यामुळें त्यांचें आपल्या जनावरांवर विलक्षण प्रेम असें. भावनगरचे चित्ते विक्रीकरितां काढिले आहेत, असें महाराजांनीं जेव्हां ऐकिलें, तेव्हां ते १९१९ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या १६ व्या तारखेस मि० टुडर ओवेन यांना ते लिहितातः—"आणखी कांहीं चित्ते घालवून टाकण्याचा आपला विचार आहे, असें मी ऐकतों. मेहेरबानगीकरून दुसऱ्या कोणाला तुह्मी ते देऊं नका. कारण या प्राण्यांची कशी योग्य काळजी घ्यावी, याचें त्यांना ज्ञान नसतें. त्यांना ते कुत्र्याप्रमाणें वागवितात. माझे मित्र भावनगरचे महाराज यांचीं जनावरें चांगल्याच्या हातीं पडावींत अशी माझी इच्छा आहे. ह्मणून आपण जर ते कमी करीत असाल, तर कृपा करून त्यांना मजकडे पाठवून द्यावें." महाराजांचें चित्त्यावर जें प्रेम होतें, त्याचें मुबलक बक्षिस प्रेमरूपानें व आज्ञाधारकपणानें महाराजांना मिळालें. आपला त्यांच्यावर पराकाष्ठेचा ताबा आहे, व त्यांचा आपल्या शिकारींत हवा तसा उपयोग करितां येतो, याबद्दल महाराजांना सदा अभिमान वाटे. १९२१ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत कर्नल ॲपल बाय् यांना महाराज दिल्ली येथील मुक्कामावरून लिहितातः—

"कोल्हापुराला आपण अल्पशीं भेट देऊन जावें, अशी माझी इच्छा आहे. माझी चित्त्याची शिकार पाहून तुह्मांला खात्रीनें आनंद होईल. नरेंद्र-

समेच्या बैठकीकरितां पुढील खेपेस जेव्हां मी येईन तेव्हां मी माझे चित्ते येथें आणीन. आह्मी शिकार करण्याकरितां मिळून जाऊं. ह्मणजे चित्त्यांना कसें शिकविलें आहे व ते शिकार कशी करितात हें आपण पाहाल."

आपल्या मित्रांच्या चित्त्यांची चांगली काळजी घेण्यांत यावी, या उत्कट इच्छेनें महाराज १९२१ सालच्या मार्च महिन्याच्या ५ व्या तारखेस मेजर बर्क यांना लिहितातः—

"चित्ते व पक्षी घेऊन माझा नोकर आला आहे. आपल्या कनवाळू-पणाबद्दल मीं कसें उतराई व्हावें हें मला समजत नाहीं. जामनगरला पाठविलेले दोन चित्ते मजकडे घेण्याची माझी फार इच्छा आहे. त्यांपैकीं मादी, माझे मित्र भावसिंगजी यांची फार लाडकी होती; ह्मणून त्यांना मजजवळ ठेवण्याची माझी इच्छा आहे. करितां मेहेरबानगी करून आपण त्यांना दुसऱ्या कोणालाहि देऊं नये. ते तेथें येतांच, त्यांना आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं मी माझा मनुष्य पाठवीन. ते दाखल होतांच कृपा करून मला लिहा."

महाराजांच्या अखेरच्या दिवसांत त्यांना अप्रिय अशा ज्या अनेक गोष्टी घडल्या त्यांतून आपल्या त्रस्त मनाची करमणूक करण्यास चित्त्याची शिकार हें एक उत्तम साधन आह, असें त्यांना वाटे. कांहीं मराठी वर्तमानपत्रांत आपल्या कुटुंबांतील माणसांची निंदा झाल्याची ऐकून महाराज १९२१ सालच्या मार्चच्या २८ व्या तारखेस कर्नल मेरीवेदर यांना लिहितातः--

"क्रिया व प्रतिक्रिया यांच्यावर खरोखर माझी श्रद्धा आहे. माझी व माझ्या सुनेची निंदा झाल्यानंतर गेल्या वीस वर्षांत कधींहि न झालेली अशी चित्त्याची उत्कृष्ट शिकार मला आतां लाभली. मला सहा हरण मिळाले. यांमध्यें एकहि मादी अगर बच्चा नव्हता. चित्त्याच्या साहाय्यानें शिकार करणें हें कोर्सिंगप्रमाणें असतें. या जनावराला नर अगर मादी ओळखण्याचें ज्ञान नसतें, ह्मणून कळपांतील माद्या वगळून, चित्त्याला नराचीच शिकार करण्यास लावण्यासाठीं आह्मांला अतिशय सायास पडतात. परंतु गेल्या खेपेस विशेष अडचण न पडतां मला पांच हरण मिळाले. मजजवळ एक चित्त्याची मादी आहे, तिचा स्वभाव इतका शांत आहे कीं, मादी जरी अगदीं तिच्यासमोर आली, तरी देखील ती तिला ठार करीत नाहीं. ती फक्त नराचीच शिकार करिते. तिला हें एक विलक्षण उपजत ज्ञान आहे."



शिकारीनंतर महाराज व लॉर्ड विलिंग्डन साहेब.

(१) लेडी विलिंग्डन. (२) महाराज. (३) लॉर्ड विलिंग्डन. (४) श्री बापुसाहेब.



जंगली हत्तींना माणसाळविण्यासाठीं महाराजांनीं तयार करविलेलीं शस्त्रें.

चित्त्याच्या शिकारींतच महाराज बहुतेक मन कां घालीत होते, याचें कारण १९२२ सालच्या एप्रील महिन्याच्या पहिल्या तारखेला ते येणें-प्रमाणें सांगतातः—

" कोर्सिंगच्या वेळीं फार उष्णता असते. माझ्या डोळ्यामुळें मला नेम मारितां येत नाहीं. चित्त्याच्या शिकारीचें सौख्यच काय तें मला आतां अनुभवतां येतें. पुढील खेपेस मी जेव्हां दिल्लीला येईन तेव्हां मजबरोबर एक दोन चित्ते आणीन व ही गंमत स्वतः तुम्हांस दाखवीन. मजजवळ एक सुंदर चित्ता आहे. चित्त्याची शिकार करण्यास दिल्ली हें अतिशय चांगलें ठिकाण आहे. "

त्यांच्या उपलब्ध पत्रांतील शेवटचें पत्र चित्त्याच्या शिकारीविषयींचें आहे, हा एक योगायोगच होय. १९२२ सालच्या मे महिन्याच्या तिसऱ्या तार-खेस महाराज बडोदें येथें मि० खासेराव जाधवांना लिहितात. " मोटारींतून चित्त्यांची शिकार पाहाणें एक नवीन चीज आहे. व राणीसाहेबांना या शिकारीपासून चांगली करमणूक होईल अशी माझी खातरी आहे. ही शिकार एकदां तरी पहाण्यासाठीं राणीसाहेबांना जर आपण विनंति कराल तर बरें होईल. " याच दिवशीं त्यांनीं ही शिकार राणीसाहेबांना दाखविली. चित्त्याच्या शिकारीपासून आपला श्रमपरिहार करून घेण्याचा हा प्रसंग अखेरचा होता, याची कोणासहि त्या वेळीं कल्पना झाली नसेल!



## प्रकरण २१ वें.

# शिक्षणविषयक चळवळी.




तिभेदामुळें पछाडलेल्या हिंदु समाजाचे रोग नाहींसे करण्यास मोफत आणि सक्तीचें शिक्षण हें एकच औषध उपलब्ध आहे, असें ता. १५ एप्रील १९२० रोजीं नाशीक येथें केलेल्या एका भाषणांत महाराजांनीं सांगितलें. ह्मणूनच " मीं माझ्या संस्थानांत सक्तीचें प्राथमिक शिक्षण सुरू केलें असून त्या योगानें पुढची सगळी पिढी सर्वस्वीं साक्षर होईल यांत शंका नाहीं, " असेंहि त्यांनीं त्याच वेळीं भाकीत केलें. शिक्षणप्रसाराचें एवढें महत्त्व महाराजांना कां वाटत होतें, या प्रश्नाचें त्यांनीं आणखी एक उत्तर असें दिलें कीं, " माझ्या प्रजेला शक्य तेवढ्या लवकर स्वराज्याचे अधिकार देण्याची मला उत्सुकता आहे," अशा प्रकारचे उच्च विचार मनांत बाळगूनच, महाराजांनीं आपल्या कारकिर्दींत अनेक शिक्षणविषयक चळवळी केल्या. त्या, उभारलेल्या शिक्षणमंदिराचा पाया ह्मणजे निरनिराळया सर्व वर्गांची मानसिक अथवा बौद्धिक जागृति हें होय. हा पाया त्यांनीं कसकसा घातला, हें आतां वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करून, तो विस्तृत व बळकट करण्याच्या उद्योगास आतां त्यांनीं प्रारंभ केला. नवीन शाळा काढून तेथें वतनदार शिक्षक नेमण्याची त्यांनीं १९१२ सालच्या अखेरीस काढिलेली योजना वाचकांच्या लक्षांत असेलच. या योजनेंत कांहीं दोष असले तरी, वर लिहिलेल्या हेतूनेंच त्यांनीं तिचा पुरस्कार केला. ती अमलांत येणें कठीण आहे, हें १९१४ सालीं त्यांच्या लक्षांत आलें. तात्काळ पगारी मास्तर नेमून शाळा सुरू कराव्या व त्यांना वतनी जमिनी दिल्यानंतर पगार बंद करावा, असा त्यांनीं हुकूम केला. १९१६ सालीं, शिक्षकांना देण्याला योग्य अशा सरकारी जमिनी आणि ज्यांच्या उत्पन्नांतून ज्या त्या देवस्थानाचा खर्च भागून शिल्लक उरण्यासारखी असेल अशीं देवस्थान-उत्पन्नें शोधून काढून रिपोर्ट करण्याबद्दल त्यांनीं शिक्षणाधिकाऱ्यास आज्ञा

केली. १९१७ सालानंतर वतनदार शिक्षक निर्माण करण्याचा बेत अजिबात सोडून दिला; आणि त्या ऐवजीं रोख एक लाख रुपये प्राथमिक शिक्षणासाठीं दरसाल खर्च करण्याचें त्यांनीं मंजूर केलें.

या एक लक्षांत २० हजार रुपये देवस्थानच्या शिलकी उत्पन्नांपैकीं होते, हें येथें सांगितलें पाहिजे. धर्मादाय उत्पन्नांपैकीं ज्या त्या धर्मकृत्यास अवश्य असणारा खर्च भागवून जी शिल्लक राहते, ती योग्य कारणीं खर्च करण्याचा याच सुमारास महाराजांनीं जो निश्चय केला होता त्याचें हें पहिलें दृश्य फळ होय. बहुतेक प्रत्येक गांवीं, विशिष्ट देवस्थानाकरितां किंवा तसल्याच दुसऱ्या धार्मिक कामासाठीं उदार धनिकांनीं दिलेल्या स्थावर देणग्या आढळून येतात. त्यांपैकीं बरींचशीं उत्पन्नें सरकारांतून इनाम करून देण्यांत आलेलीं आहेत. इंग्रजी राज्यांत अशा धर्मादाय इनामांना जवळ जवळ खासगी मालकीच्या उत्पन्नाचें स्वरुप आलेलें असून, वस्तुतः जे लोक या उत्पन्नांचे केवळ संरक्षक अथवा ट्रस्टी असावयाचे ते तीं उत्पन्नें आपल्या चैनीचें साधन समजून वाटेल तसें उपभोगीत असतात. सरकारी कामासाठीं अशाच प्रकारें इनाम करून दिलेल्या जमिनींच्या बाबतींत इंग्रज सरकार हात घालतें. त्यामुळें तीं उपभोगणाऱ्या लोकांना आपलीं वतनें संभाळून ठेवणें व त्यांच्या मोबदला कांहीं तरी सार्वजनिक काम करणें भाग पडतें. धर्मादाय उत्पन्नांतून मूळ देणगी देणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें ज्या त्या देवस्थानाची थोडी फार नोकरी केली जाते, हें खरें आहे. पण या उत्पन्नांच्या विनियोगावर कोणाचेंहि फारसें नियंत्रण हल्लीं ब्रिटिश हिंदुस्थानांत तरी राहिलेलें नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे कीं, हे उत्पन्नवाले लोक आपल्या देवस्थानची जुजबी व्यवस्था ठेवून बाकीचा पैसा व वेळ चैनींत, दुर्व्यसनांत म्हटलें तरी चालेल, घालवीत आहेत. शंकराचार्यांच्या मठासंबंधानें या शतकाच्या प्रारंभीं महाराजांनीं केलेल्या चौकशींत काय प्रकार उघडकीस आले, हें या पूर्वीच सांगण्यांत आलें आहे. अशा तऱ्हेचा धर्मादाय उत्पन्नांचा दुरुपयोग बंद करण्यासाठीं, कांहीं तरी प्रयत्न करणें अवश्य आहे, असा विचार महाराजांच्या मनांत येऊनच त्यांनीं या सुमारास नवीन नियम केले व देवस्थानांचे अवश्य खर्च भागून उरलेल्या रकमेंतून २० हजार रु. प्राथमिक शिक्षणाच्या खर्चासाठीं देण्याचा त्यांनीं हुकूम केला.

याच वेळीं, प्राथमिक शिक्षण सर्वत्र मोफत करण्याची महाराजांनीं आज्ञा दिली. मंजूर केलेले एक लक्ष रुपये कोणत्या तऱ्हेनें खर्च करावे. याबद्दल योजना

तयार करण्यासाठीं त्यांनीं एक कमिटी नेमिली. या कमिटीच्या शिफारशीप्रमाणें खुद्द कोल्हापूर शहरांत व संस्थानांतील तालुक्याच्या गांवांत सक्तीचें शिक्षण देण्याचा त्यांनीं १९१६ च्या सप्टेंबर महिन्यांत हुकूम केला. १९१८-१९ साला अखेर, या सक्तीच्या योजनेस विस्तृत स्वरूप देऊन निरनिराळया खेडयांत ९६ नवीन शाळा उघडण्यांत आल्या, यांपैकीं पहिली सक्तीच्या शिक्षणाची शाळा करवीर पेटयांतील चिखली येथें ४ मार्च १९१८ दिवशीं खुद्द छत्रपतींनींच उघडली. या योजनेमुळें सुमारें पाऊण लाख खेडवळ लोकांच्या टप्प्यांत प्राथमिक शिक्षण प्रथमतःच आलें व त्यांच्यापैकीं ४,६३१ मुलें शिक्षण घेऊं लागलीं. मात्र मंजूर केलेल्या १ लक्ष रुपयांपैकीं सुमारें ६ हजार रुपयेच या योजनेमध्यें आतापर्यंत खर्च होत होते.

मुंबईचे नवे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड यांनीं १९१९ चे अखेरीस कोल्हापुरास भेट दिली. त्यांच्या सन्मानार्थ झालेल्या एका समारंभांत महाराजांनीं आपल्या शिक्षणविषयक धोरणाचा थोडक्यांत खुलासा केला. "माझ्या प्रजेपैकीं बलवान ( पुढारलेल्या ) लोकांपेक्षां निर्बल लोकांची मी अधिक काळजी घेत आहें. त्यांची स्थिति पाहून माझें मन अधिक द्रवतें व त्यांची स्थिति सुधारण्यासाठीं शक्य तेवढा प्रयत्न करणें, हें माझें सर्व कार्यांतील मुख्य ध्येय आहे." या ध्येयानुसार आतांपर्यंत झालेल्या प्रयत्नांचा उल्लेख करून, पुढें महाराज ह्मणाले:--

"निरनिराळया जातींना निरनिराळया तऱ्हेच्या शिक्षणसंस्था पाहिजेत. मराठयांना एकादें सँढर्स्ट कॉलेज जरूर होईल; साक्षर जातींना आर्ट्स कॉलेज आवडेल; परंतु औद्योगिक शिक्षणाकडे मात्र फार थोडया लोकांचें लक्ष आहे. हल्लीं सर्व वर्गांतील प्रजाजनांकडून घेतलेला वसूल साक्षर वर्गाच्या गरजा भागविण्यासाठींच खर्च होत आहे. पण अशा पैशाचा विनियोग सर्वच वर्गांच्या उपयोगासाठीं हल्लीं केला पाहिजे असें माझें मत आहे, ह्मणूनच मी अलीकडे सार्वत्रिक सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला आहे. औद्योगिक, व्यापारविषयक वगैरे सर्वच सुधारणा होण्यास सामर्थ्याचा ओघ न वळवितां, सर्व शिक्षणप्रसारक संस्थांनीं तो प्राथमिक शिक्षणाकडे वळवावा असें मला वाटतें."

या खुलाशाचा सर जॉर्ज लॉइड यांच्या विचारावर परिणाम खात्रीनें झाला असला पाहिजे. प्राथमिक शिक्षणप्रसारार्थ महाराजांनीं कोणतें धोरण स्वीकारिलें होतें, हें अगोदरच आपणांस माहीत असलें तरी, "विद्यार्थीगृहांची



नेक नामदार सर जॉर्ज लॉइड.



राधानगरी येथील साठमारीचा आखाडा.

आपली योजना माझ्या ऐकिवांत फारशी नव्हती व ती आजच मीं पाहिली," असें त्यांनीं कबूल केलें. "ही आपली योजना मला पसंत पडली. कारण प्रत्येक जातीच्या मुलांना आपला मार्ग निष्कंटक रीतीनें तेथें आक्रमितां येतो व शिक्षणाचे फायदे मिळवितां येतात." अशी सर जॉर्ज यांनीं तारीफहि केली.

सर जॉर्ज यांना महाराजांनीं जें शिक्षणविषयक धोरण या प्रसंगीं खुलासवार सांगितलें त्याचा नक्की परिणाम काय झाला, हें कांहीं आकडे देऊन येथें दाखविलें पाहिजे. १९१९ सालीं एकंदर राजाराम कॉलेजांतील विद्यार्थ्यांत शेंकडा १४ च काय ते ब्राह्मणेतर होते. पुढच्या सालीं त्यांचें प्रमाण शेंकडा ३५ पर्यंत वाढलें. १८९४ सालीं ह्मणजे महाराजांनीं अधिकारसूत्रें ज्या सालीं हातीं घेतलीं तेव्हां, ७९ कॉलेज विद्यार्थ्यांत ब्राह्मणेतर फक्त ६ होते. १९२२ सालीं—महाराजांच्या कारकिर्दीच्या शेवटच्या वर्षी—ही संख्या २६५ पैकीं १०० ह्मणजे शेंकडा सुमारें ३९ झाली. कॉलेज सोडून बाकी विद्यार्थी १८९४ सालीं १०,८४४ होते. १९२२ सालीं त्यांची संख्या २७,८३० झाली. या मुदतींत ब्राह्मण विद्यार्थ्यांची संख्या २५२२ पासून २७२२ पर्यंत ह्मणजे फक्त २०० नींच वाढली, हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. याचा अर्थ इतकाच होतो कीं, महाराज गादीवर बसण्यापूर्वीच ब्राह्मणांच्या साक्षरतेचें प्रमाण इतकें वाढलें होतें कीं, २८ वर्षांनंतर सुद्धां त्यांत दोनशेंहून अधिक वाढ होण्यास जागाच राहिली नाहीं ! ब्राह्मणेतर विद्यार्थी मात्र याच मुदतींत ८०८८ चे २१,०२७ झाले. अस्पृश्य विद्यार्थ्यांची संख्या १८९४ सालीं केवळ २३४ असून १९२२ सालीं ती नऊपटीहूनहि अधिक वाढून २१६२ झाली. या सर्व कामासाठीं प्रारंभीं एक लाखाहूनहि कमी खर्च संस्थान करीत असे; परंतु अखेरच्या सालीं तो ३ लक्षांपेक्षांहि जास्त झाला. यावरून, त्यांच्या शिक्षणविषयक कार्याचा विस्तार किती झाला, याची वाचकांना अटकळ करितां येईल.

२

राजाराम कॉलेजाची वाढ आणि त्याचें झालेलें रूपांतर, हा महाराजांच्या एतद्विषयक धोरणांतील एक महत्त्वाचा भाग होता. बरींच वर्षे हें कॉलेज दुय्यम प्रतीचें—सेकंड ग्रेड—असल्यामुळें, आपला जीव मुठींत धरूनच जगलें होतें. कारण संस्थानच्या उत्पन्नाला पूर्ण कॉलेजाचा खर्च झेंपणें अगदींच कठीण होतें. संस्थानांतील सर्व जहागिरदारांकडून मदत मिळेल, या कल्पनेवरच प्रथम तें

सुरू करण्यांत आलें. अपेक्षेप्रमाणें प्रारंभीं त्यांच्याकडून कॉलेजास वर्षासनें मिळत; परंतु महाराजांच्या हातीं अधिकारसूत्रें येतांच, त्यांनीं आपली मदत देण्याचें बंद केलें. हे जहागिरदार म्हणजे इचलकरंजी, विशाळगड व बावडा येथील ब्राह्मणजहागिरदार हेच होत, हें वाचकांच्या लक्षांत सहज येण्यासारखें आहे. दरबारनें व मुंबई सरकारनेंहि, त्यांनीं असें करूं नये × आणि आपली मदत चालू ठेवावी, म्हणून पुष्कळ वेळां व परोपरीनें सुचविलें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. यामुळें कॉलेजाचा सगळा वाढता बोजा दरबारावरच पडूं लागला. प्राथमिक शिक्षणाची यामुळें उपासमार होत आहे, हें महाराजांना आवडलें नाहीं. तशांत धारवाड आणि सांगली येथें नवीन कॉलेजें उघडण्यांत आल्यामुळें किंवा येण्याचा संभव दिसूं लागल्यामुळें, हा खर्चाचा बोजा कमी करून आपलें सर्व सामर्थ्य प्राथमिक शिक्षणाकडेच खर्च करावें, असें महाराजांच्या मनानें १९१८ च्या एप्रीलमध्यें ठरविलें. जूनपासून राजाराम-कॉलेज बंद करावें, असा अर्थातच त्यांनीं हुकूम केला.

परंतु या हुकुमामुळें एकदोन अडचणी उपस्थित झाल्या. एकाएकीं तो प्रसिद्ध झाल्यामुळें, युनिव्हर्सिटीकडून तक्रार येण्याचा संभव उत्पन्न झाला. याहूनहि अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे यामुळें, इतक्या प्रयासानें कोल्हापुरांत अस्तित्वांत आलेल्या अनेक विद्यार्थीगृहांच्या योजनेला फार मोठी उणीव येऊं लागली. मागसलेल्या जातींत उच्च शिक्षणाचा प्रसार करण्याचा या संस्थानचा हेतु, हा ठराव अमलांत येतां तर जागच्या जागींच निमाला असता. हे सर्व विचार लक्षांत घेऊन आणि संस्थानच्या हितचिंतकांचा सल्ला घेऊन लवकरच महाराजांनीं आपला विचार बदलला. मे महिन्यांत त्यांनीं आणखी दीड वर्ष कॉलेज चालूं ठेवण्याचें ठरवून त्याची व्यवस्था डॉ० कुर्तकोटी—या वेळीं ते शंकराचार्य पीठाचे जगद्गुरु होते—यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या एका कमिटीच्या हवालीं करण्यांत आली. या नवीन व्यवस्थेमुळें, कोल्हापूरच्या शिक्षित व श्रीमान् पुढाऱ्यांना संस्थानच्या मदतीनें कॉलेजचा बोजा अंगावर घेण्याचें सामर्थ्य येईल, अशी आशा वाटत होती. डॉ० कुर्तकोटी यांनीं आपलें सगळें उत्पन्न—अर्थात मठाचें उत्पन्न—जरूर तर खर्चीं घालून कॉलेज कायम ठेवण्याचें आश्वासन दिलें होतें. पण मुदतीअखेर हें सर्व बोलणें फोल ठरलें! कारण त्यांच्या उधळपट्टीमुळें, कॉलेजाकरितां खर्च करण्यास तर काय,

पण मठाच्या चालू खर्चास सुद्धां पैसे राहिले नाहींत ! कॉलेज चालविण्याबाबतींत कोल्हापूरच्या लोकांचा उत्साहहि यथातथाच होता. हा प्रकार पाहून, पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांतील डॉ० परांजपे वगैरेंना राजाराम कॉलेज हातीं घेण्याची महाराजांनीं सूचना केली; पण त्यांनाहि तसें करणें शक्य झालें नाहीं. एक दोन ब्राह्मणेतर प्रमुख व्यक्तींनाहि महाराजांनीं विचारिलें; पण त्या वेळच्या परिस्थितींत ही जबाबदारी घेण्यास तेहि तयार झाले नाहींत. कोल्हापुरास अमेरिकन मिशनरी एक हायस्कूल चालवीत होते. त्यांनाहि महाराजांनीं ही सूचना केली. आपण कॉलेज घेऊं, पण मिशनच्या धोरणाप्रमाणेंच व तंत्रानें कॉलेज चाललें पाहिजे, अशी त्यांची अट दिसूं लागली. इतके प्रयत्न झाल्यावर, संयुक्त प्रांतांतील **आर्यप्रतिनिधी सभा** नांवाच्या एका आर्यसमाजी संस्थेच्या हवालीं कॉलेज देण्याचा महाराजांनीं ठराव केला. " या सभेचे सभासद सामाजिक सुधारणेस अनुकूल असून त्यांच्या हातीं कॉलेज भरभराटीस येईल असें वाटतें. ब्राह्मणेतरांच्या शिक्षणाचें हें कॉलेज एक केंद्र बनेल असेंहि मला वाटतें. ब्राह्मणांनीं चालविलेल्या संस्थांत त्यांना उत्तेजन मिळत नाहीं व साहजिकच तेथें ब्राह्मणेतरांचा फायदा होत नाहीं. पुण्याच्या सगळया शाळांत मिळून, गतवर्षी दोहोंपेक्षां अधिक मराठे प्रवेश परीक्षेत पास झाले नाहींत. याचीं अनेक कारणें पुढें करण्यांत येतात; पण ब्राह्मणेतरांच्या दृष्टीनें, हा परिणाम त्या शाळांना मुळींच भूषणावह नाहीं, यांत संशय नाहीं. " या विचारसरणीचा अवलंब करून महाराजांनीं १९१९ च्या जूनपासून हें कॉलेज आर्यप्रतिनिधी सभेच्या ताब्यांत दिलें. राजाराम हायस्कूल व कॉलेज या दोनहि संस्था आरंभापासून एकत्र असल्यामुळें, हायस्कूलहि कॉलेजाबरोबरच आर्यसमाकडे गेलें. दोहोंच्या खर्चासाठीं दरबारनें २० हजार रु० दरसाल देण्याचें कबूल केलें असून, बाकी सर्व खर्च समाजानें स्वतःच्या उत्पन्नांतून करावा असा करार ठरविण्यांत आला होता. याच ग्र्यांटमधून, कॉलेज फर्स्ट ग्रेड करण्याचें आर्यसमाजानें कबूल केलें होतें. पण उदारबुद्धीनें ही ग्र्यांट वाढविण्याचें अभिवचन महाराजांनीं दिलें व स्वतःच्या पदरास कांहीं खार न लावून घेतां, आर्यसमाजानें पुढें या कॉलेजास पूर्ण स्वरूप दिलें.

एवढ्या दृष्टीनें पाहतां, ही नवीन व्यवस्था एकंदरींत कॉलेजच्या हिताची झाली, हें उघड आहे. परंतु आर्यसमाजासारख्या केवळ परस्थ लोकांना कॉलें-

ज्ञासारखी महत्त्वाची संस्था देऊन टाकल्यामुळें दुसऱ्या कांहीं भानगडी कोल्हापुरांत उपस्थित होतील काय ? असा एक प्रश्न या वेळीं महाराजांपुढें होता. राजकारणांत आर्यसमाजाचे अनुयायी महाराजांच्या पसंतीपेक्षां फार पुढें गेलेले होते, ही गोष्ट प्रसिद्ध होती. त्यांचे हातीं कॉलेज द्यावयाचें ह्मणजे ज्या राजद्रोही चळवळींचा बींमोड करण्यासाठीं महाराजांनीं इतका अट्टाहास केला होता त्यांनाच नवीन आश्रय करून देण्यासारखें नव्हतें काय ? " आर्यसमाजी लोकांत, मुसलमानांत आणि ब्राह्मणांत जहाल लोक आहेत, हें मला अगदीं कबूल आहे. परंतु ब्राह्मणांचें खरें स्वरूप उघडकीस आणण्यास दुसरे कोणीतरी प्रतिस्पर्धी जहालच असले पाहिजेत; ह्मणूनच मी आर्यसमाजाला उत्तेजन देत आहें. " असें या प्रश्नास महाराजांचें उत्तर होतें. या उत्तराचा खुलासा महाराजांनीं दिला तो असा:—

" ब्राह्मण आणि आर्य जहालांच्या धार्मिक मनांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. केवळ जन्माच्या श्रेष्ठतेमुळें आपल्याकडे सर्व राजकीय व धार्मिक वर्चस्व रहावें, असें ब्राह्मणांचें धोरण आहे. ज्याला लायखी असेल त्याच्याकडेच हें श्रेष्ठत्व असावें, असा समाजाचा कटाक्ष आहे. ब्राह्मणांना अर्थातच हें पसंत नाहीं. यामुळें ब्राह्मण जहाल आणि आर्य जहाल यांचें कधींहि पटावयाचें नाहीं. मला कोणतेच जहाल पसंत नाहींत; पण निवडच करावयाची तर आर्यसमाजी जहालांना मी खात्रीनें अधिक पसंत करीन. दक्षिणेंत आर्यसमाज बद्धमूल होण्याला निदान ५० वर्षें तरी ब्राह्मणांशीं टक्कर देणें आर्यांना भाग पडेल. "

याप्रमाणें एका प्रकारच्या टीकाकारांना महाराजांनीं उत्तर दिलें व व आर्यसमाजाची कोल्हापुरांतील शिक्षणखात्यांत प्रमुखत्वानें स्थापना केली. १९२० च्या मार्चमध्यें महाराज भावनगर येथें भरलेल्या आर्यसमाजाच्या परिषदेस अध्यक्ष ह्मणून गेले आणि तेथें केलेल्या भाषणांत त्यांनीं या आपल्या प्रयत्नापासून काय परिणाम निष्पन्न झाले पाहिजेत, हें स्पष्टपणें आर्यसमाजी पुढाऱ्यांना सांगून टाकिलें. ते ह्मणाले:—

" वैदिकधर्म सर्वांहून श्रेष्ठ आहे हें मला माहित असल्यामुळें, मीं आर्यधर्म स्वीकारिला आहे व राजाराम कॉलेज, हायस्कूल, गुरुकुल, अनाथगृह सरदार-बोर्डिंग वगैरे संस्था आर्यप्रतिनिधी-सभेच्या ताब्यांत मीं दिल्या

आहेत. नैतिक दृष्ट्या लोक सुधारावेत ह्मणूनच मीं हें केलें आहे. शिक्षणावांचून ही सुधारणा होणें शक्य नाहीं; ह्मणून या शिक्षणाची व्यवस्था मीं आर्यसमाजास दिली आहे.

" मला शक्य होतें तें सर्व मीं केलें आहे. जोतीबा, पंढरपूर वगैरे ठिकाणीं तुह्मीं गुरुकुलें, हायस्कुलें वगैरे संस्था काढाव्यात अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे. मीं माझें कर्तव्य केलें आहे. पुढें काय करावयाचें तें तुमच्या हातीं आहे.

" इतकें सर्व मीं करून, वैदिक धर्माचा प्रसार तुह्मीं केला नाहीं तर त्याचा सर्व दोष तुमच्यावर आणि आर्यप्रतिनिधी - सभेवर येईल. तुमच्यापैकीं कांहीं उत्साही लोक माझ्या संस्थानांत काम करतील, अशी मला आशा आहे."

आपल्या अपेक्षा काय आहेत, इतक्या सढळ हातानें महाराजांनीं आर्यसमाजाला कां उत्तेजन दिलें व केवढ्या कळकळीनें आपले हेतू सफल करण्याबद्दल त्यांनीं आर्यांना विनंति केली, हें यावरून उघड दिसणार आहे. या त्यांच्या आशा, ही त्यांची विनंति कितपत यशस्वी ठरली, हें सांगण्याचें येथें प्रयोजन नाहीं. मात्र त्या यशस्वी न झाल्या तर त्याची जबाबदारी निदान महाराजांवर मुळींच येणार नाहीं, हें निर्विवाद आहे. कारण आपलें काम जोरानें चालविण्यास महाराजांकडून त्यांना जेवढी अनुकूलता करून द्यावयास पाहिजे होती, तितकी ती त्यांनीं अगोदरच करून दिली आहे.

३

महाराजांनीं आतांपर्यंत शिक्षणविषयक चळवळींना जें नवें वळण लाविलें होतें, त्याचा परिणाम कोल्हापूर संस्थानच्या हद्दींनींच मर्यादित होऊन राहणें शक्य नव्हतें. त्यांनीं मागसलेल्या लोकांपुढें आतां एक नवें ध्येय मांडलें होतें. आणि हें ध्येय ह्मणजे ज्यास कधीं कोणाचा हात पोंचत नाहीं अशा झगझगीत पण अप्राप्य ताऱ्याप्रमाणें राहिलें नसून, कोणत्या मार्गानें, कोणत्या जिन्यानें, तें गांठतां येईल, हें त्यांनीं सप्रयोग दाखविलें होतें. सर्व दक्षिणेंत आतां महाराजांच्या उदात्त ध्येयानें स्फुरण पावलेले तरुण पसरले होते. त्यांची संख्या मोठी नव्हती; पण त्यांना उत्तेजित करणाऱ्या कल्पना जोराच्या आणि तेजस्वी होत्या. त्यांपैकीं पुष्कळांचें शिक्षण कोल्हापुरांतील नव्या वातावरणांतच झालेलें होतें. इतर अनेकांनीं तेथील सुंदर व वृद्धिशील संस्था व त्यांचें दीर्घपरिणामी

कार्य प्रत्यक्ष अवलोकन केलें होतें. अशा लोकांचा दक्षिणभर पसरलेला सांप्रदाय आपापल्या परिघांत कोल्हापुरांतील परिस्थिति निर्माण करण्याचा या वेळीं प्रयत्न करीत होता. सरकार अद्याप आपल्या संवयीच्या चाकोरींतच राज्यशकट हांकीत होतें. यामुळें, महाराजांच्या सहाय्यानें आणि त्यापेक्षांहि जास्त प्रोत्साहनानें कोल्हापुरास या प्रयत्नांना जें दृश्य स्वरूप मिळालें, तें इंग्रजी हद्दींत मिळालें नाहीं. तथापि आपल्या अल्पस्वल्प सामर्थ्यास अनुसरून, कोल्हापुराप्रमाणेंच निरनिराळया ठिकाणीं मागसलेल्या जातींतील विद्यार्थ्यांना मदत करणाऱ्या संस्था आणि **सत्यशोधक** समाज हळूहळू उदय पावत होते. अशा संस्थांत नाशीक येथील मराठा समाजानें काढिलेलें **विद्यार्थिगृह** विशेष उल्लेख करण्यासारखें आहे. नाशीक जिल्ह्यांतील रा० थोरात वगैरे तरुण मराठ्यांनीं मोठ्या प्रयासानें ही संस्था नांवारूपास आणिली होती. रा० मोरे या नांवाचे एक सत्यशोधक पिंपळगांव बसवंत या गांवांत रहात असून, तेथें त्यांनीं सत्यसमाजाच्या तत्त्वांचा शेतकरी वर्गांत जोरानें प्रसार चालविला होता. १९१३ सालीं मराठा शिक्षण परिषद नाशकास भरली व त्या परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत उदोजीराव पोवार, धारचे महाराज, यांच्या मदतीनें नाशीकचें विद्यार्थिगृह चिरस्थायी बनलें. या गृहाच्या चालकांनीं उदार मनानें मराठा मुलांचीच नव्हे तर, इतर मागसलेल्या व अस्पृश्य मुलांची देखील सोय केली होती. खरोखर अशा संस्थेला प्रत्येक सुशिक्षितानें उत्तेजन द्यावयास पाहिजे होतें. पण आकुंचित विचारांखालीं दडपून गेलेल्या नाशीकच्या ब्राह्मणांनीं ही संस्था व तिचे चालक यांचा द्वेष करण्यास सुरवात केली. रा० मोरे यांना एका फौजदारी कज्जांत गुंतविण्याचा त्यांनीं खोडसाळ उपद्व्याप केला आणि एका ब्राह्मण माजिस्ट्रेटानें रा० मोरे यांना शिक्षा ठोठावून, त्यास यशहि आणून दिलें! अखेर यूरोपीयन सेशन जजापुढें या शिक्षेवर अपील झालें आणि त्यांच्या न्यायबुद्धीस मोरे यांची निरपराधिता पटून त्यानें त्यांस दोषमुक्त केलें. रा. भोंसले या नांवाचे कोल्हापुराकडील एक मराठा गृहस्थ या वेळीं नाशीक पोलिस सुपरिन्टेन्डंटचे रीडर असून, ते वरील संकटांत आणि नाशीक जिल्ह्यांतील सत्यशोधक चळवळीस सहाय्य करीत होते. मोरे यांच्या विरुद्ध रचलेला कपटव्यूह जरी अशा रीतीनें ढांसळला तरी ब्राह्मणांनीं पोलिस सुपरिन्टेन्डंटचे कान भरले व नाशीकहून भोंसल्यांची बदली करवून, त्यांनीं मोऱ्यांवरील रागाचें उट्टें भोंसले यांच्यावर काढिलें.

थोडयाच दिवसांत नाशीकच्या विद्यार्थीगृहाच्या इमारतीचा पाया घालण्यास शाहुमहाराजांना आमंत्रण आलें. रा. भोंसले यांचा वर्ग झाला असला तरी रजा घेऊन ते छत्रपतींच्या नाशकास झालेल्या आगमनाच्या प्रसंगीं तेथें आले व ते मूळचे कोल्हापूर प्रांतांतीलच असल्यामुळें, छत्रपतींच्या बरोबरच तेथें झालेल्या कांहीं समारंभांस हजर राहिले. एवढयाच कारणाकरितां आश्चर्याची गोष्ट कीं, रा. भोंसले यांना राजीनामा देण्याचा हुकूम फर्माविण्यांत आला ! इतकेंच नव्हे तर, सेशन जज्जानें निर्दोष ठरविलेल्या मोऱ्यांच्या गांवीं महाराजांनींहि जाऊं नये, असें पोलिस साहेबांकडून त्यांना सांगविण्यांत आलें. महाराजांनीं हा सल्ला गुंडाळून ठेवून आपला कार्यक्रम जशाचा तसा पार पाडला. पण गरीब बिचाऱ्या सब् इन्स्पेक्टर भोंसल्याला नोकरीवर पाणी सोडणें भाग पडलें !

१९२० एप्रीलच्या १५ तारखेस नाशिककारांनीं महाराजांचें थाटानें स्वागत केलें. त्यांनीं दिलेल्या मानपत्रांत महाराजांच्या सार्वजनिक कामगिरीचें थोडक्यांत सिंहावलोकन केलें होतें. " ब्राह्मणांच्या मतें सर्वच ब्राह्मणेतर कमजास्त प्रमाणांत अस्पृश्य आहेत. अन्नपाण्याला आणि देवादिकांनाहि त्यांचा स्पर्श खपत नाहीं. ह्मणजे ब्राह्मणांना सगळेच अस्पृश्य ठरले. " ह्मणून अस्पृश्यते-विरुद्ध महाराजांनीं कोल्हापुरास याच वेळीं सुरू केलेली मोहिम अस्पृश्य वर्गाच्याच नव्हे तर सर्व ब्राह्मणेतरांच्या हिताची आहे, असा मानपत्राचा आशय होता. तेंच दिवशीं उदोजी विद्यार्थीगृहाचा महाराजांनीं पाया घातला व इमारतीच्या बांधकामास त्यांनीं १५ हजार रु. दिले. " या संस्थेचें धोरण " महाराज ह्मणाले, " माझ्या मतें सर्वांनीं अनुकरण करण्यासारखें आहे. जरी ती मराठयांच्या औदार्यामुळेंच अस्तित्वांत आली आहे तरी सर्व जातींच्या मुलांना तिचीं द्वारें खुलीं आहेत. यावरून या संस्थेच्या चालकांचा देशाभिमान व त्यांचें विचा-रौदार्य स्पष्ट दिसून येतात. " हें उदार धोरण सर्व लोकांपुढें उदाहरणीय ह्मणून मांडून, पुढें महाराज ह्मणाले:--

" निरनिराळ्या जातींच्या पुढाऱ्यांना माझा एकच संदेश आहे. तुह्मी अदूरदृष्टी बनूं नका. भविष्य काळाकडे दृष्टी फेंका. " जातिभेद मोडणें ही जरूरीची गोष्ट आहे. जातिभेदाला पुष्टि देणें हें पातक आहे. " आह्मां सर्वांच्या

उन्नतीच्या मार्गांत जातिभेद ही एक मोठी धोंड आहे. ह्मणून ती धोंड काढून टाकणें हें आपणां सर्वांचें कर्तव्य आहे. जातिसभा भरवा; पण त्या एक ध्येय गांठण्याचीं केवळ साधनें आहेत हें विसरूं नका. या जाति-परिषदांची अखेर ह्मणजे जातिभेदाची अखेर करणें हीच असली पाहिजे. जातिभेद बळकट करण्यांत या परिषदांचें पर्यवसान होऊं देऊं नका."

"जातिद्वेष हा ( आमच्या देशांतील ) जुनाट रोग आहे. परशुरामानें क्षत्रियांचा केलेला उच्छेद किंवा पेशव्यांनीं ब्राह्मणेतरांच्या घरावर फिरविलेले नांगर, या रोगाचींच चिन्हें होत. असें नसतें तर, आपल्या शिखासूत्रांचें रक्षण करणाऱ्या शिवाजीला व इतर मराठा वीरांना शूद्र ह्मणून संबोधण्याचें त्यांना काय कारण होतें ? हा जातिद्वेष नष्ट करावयाचा तर, जातिभेदच नष्ट केला पाहिजे. चला तर आपण सर्व जातिभेद मोडून एक होऊं या."

दुसरे दिवशीं महाराजांनीं वंजारी लोकांच्या विद्यार्थि-गृहाची सुरवात नाशिकासच केली.

नाशीकप्रमाणेंच, पुणें येथें निघालेल्या ताराबाई विद्यार्थिगृहाला महाराजांनीं १५,००० रु० दिले. अहमदनगर येथें आपले दत्तक वडील चौथे शिवाजी महाराज यांच्या स्मरणार्थ निघालेल्या वसतिगृहासहि पुढें महाराजांनीं आश्रय दिला. प्रिन्स शिवाजी विद्यार्थिगृह नांवाची मराठा विद्यार्थ्यांसाठीं कोल्हापुरासच दुसरी एक संस्था निघाली होती. तिलाहि १९२१ च्या फेब्रुवारींत महाराजांनीं ७,००० रु० दिले व अन्य मार्गांनीं पुष्कळच मदत केली. याप्रमाणें अखेरपर्यंत महाराज ब्राह्मणेतरांच्या शिक्षणमंदिराचे मजले एकामागून एक चढवीतच होते.

आपल्या हद्दीबाहेरील ज्या शैक्षणिक कामांत महाराजांनीं वेगवेगळया प्रकारें भाग घेतला त्यांतील सर्वांत मोठी ह्मणजे शिवस्मारकाची योजना ही होय. मराठा समाजाच्या शिक्षणाचें पुणें येथें एक केंद्रस्थान निर्माण करण्याचा हेतु महाराजांच्या मनांत कित्येक वर्षे घोळत होता. १९११ च्या सुमारासच, पुणें येथें एक मराठा हायस्कूल स्थापन करण्याबद्दल विचार निघाला व महाराजांनीं या कामासाठीं १५ हजार रु० देऊनहि टाकले. या रकमेंतून १९१२ सालीं एक जागा विकत घेण्यांत आली आणि त्या जागेवर एक हायस्कूल उभारावें, असें ठरलें. देवासचे राजेसाहेब श्रीतुकोजीरावमहाराज यांनीं या प्रयत्नांत पुढाकार घेऊन कार्यास प्रारंभ केला. पण मराठा समाजाच्या मार्गे पुष्कळ दिवस लाग-

सहाय्य देईन, हें सांगण्याची जरूरच नाहीं. या स्मारकाचा मला व सर्व मराठा समाजाला मोठा अभिमान आहे.'' अशा अर्थाचें छत्रपतींनीं उत्तर दिलें आणि मराठा राजांचें एक डेप्युटेशन पाठवून, प्रिन्स ऑफ वेल्स यांचे-कडून पाया घालण्यास संमति मिळवावी,, अशी त्यांनीं शिंदेमहाराजांना सूचना केली. या कामासंबंधीं तपशील ठरविण्यासाठीं मराठा राजेरजवाडे व इतर पुढारी यांची एक सभाहि बोलवावी, असें छत्रपतींनीं याच वेळीं ग्वाल्हेरला कळविलें होतें. पुढें २९ आगष्ट दिवशीं छत्रपतींनीं गव्हर्नरसाहेबांची गांट घेतली आणि १९ नोव्हेंबरला युवराज पुण्यास भेट देणार असून आपली मुलाखत यशस्वी झाली; करितां खासेसाहेब यांना आपले 'सर्व हेतू' कळवून इकडे पाठवावें, अशी ग्वाल्हेराधिपतींना तार केली. "मला यांतील कांहीं माहिती नाहीं; हें काम तुह्मींच यशस्वी केलें पाहिजे; शक्य तो प्रयत्न करण्यास मी तयार आहें'' असेंहि आश्वासन त्यांनीं दिलें.

दुसरे दिवशीं सर जॉन वुड ( हिंदुस्थानसरकारचे सेक्रेटरी ) यांना लिहि-लेल्या पत्रांत छत्रपतींनीं स्मारक योजनेचा पुढीलप्रमाणें खुलासा केला:—

"मराठा साम्राज्याचे संस्थापक शिवाजीमहाराज यांचें स्मारक करण्याची मराठा समाजाची फार दिवसापासून इच्छा आहे. या हेतूनें समाजाच्या पुढाऱ्यांनीं — त्यांमध्यें ग्वाल्हेर महाराजांसारखे कांहीं प्रमुख राजेहि आहेत -- एक मोठा फंड जमविला आहे. शिवाजीच्या नांवाची मराठा लोकांकरितां एक शिक्षणसंस्था पुणें येथें काढण्याचा त्यांचा विचार आहे. ज्या मोठ्या नांवाशीं या स्मारकाचा आतां संबंध येणार आहे, त्यास साजेसेंच हें स्मारक होईल अशी अपेक्षा आहे. या स्मारकांत समाजाच्या उत्साहाचेंच फक्त नव्हे, तर राजेरजवाडे यांच्या दातृत्वाचेंहि उत्तम प्रतिबिंब पडेल.''

हें स्मारक कोठें उभारावयाचें, हें ठरविण्याचें काम शिंदेमहाराजांनीं गव्हर्नरांवरच सोपविलें होतें. त्यांनीं छत्रपतींच्या संमतीनें जागा निश्चित केली. या स्मारकाबरोबरच शिवाजी सोसायटीच्या शिवाजी मराठा हायस्कूलकरितां एका वेगळ्याच इमारतीचा पाया युवराजांकडून घालविण्याचा विचार महाराज छत्रपतीसाहेब यांच्या मनांत या वेळीं आल्यासारखा दिसतो. या इमारतीस "प्रिन्स ऑफ् वेल्स् बिल्डिंग'' असें नांव द्यावें, त्यांत युवराजांचा एक बस्ट ठेवावा आणि या कामीं येणारा सर्व खर्च आपण एकट्यांनींच करावा, असा



शिवाजी स्मारकाची कोनशीला बसविण्याच्या समारंभाच्या वेळीं



शिवस्मारकाची कोनशीला बसविण्यासाठीं
महाराज नेक नामदार प्रिन्स ऑफ वेल्स यांना विनंति करीत आहेत.

त्यांचा हेतु होता. १९१२ सालीं भांबुर्डा येथें जी जागा हायस्कूलसाठीं घेतल्याचें मीं मागें सांगितलें आहे, त्याच जागेवर ही इमारत बांधावयाची, असें त्यांनीं ठरविलें होतें.

येथवर दिलेल्या हकीकतीवरून, ज्या शिवस्मारकाचा युवराजांकडून पाया घालण्याचें घाटत होतें, त्याच्या स्वरूपासंबंधानें अद्याप निश्चय असा कांहींच झालेला नसावा, असें वाटतें. अगोदर सुरू केलेली शिवाजी सोसायटी, शिंदे महाराजांच्या मनांतील योजना आणि छत्रपतींच्या विचारांचें स्वरूप, या सर्वांचा अद्याप मेळ नव्हता. गडबडीमुळें, व उभयतां महाराजांची अद्याप भेटहि झाली नसल्यामुळें हा प्रकार स्वाभाविक होता, यांत शंका नाहीं. महाराज अशा मन:स्थितींत असतां, युवराज पुण्यास आले तरी पाया घालण्याची त्यांना सवड होणार नाहीं, असें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें आणि सप्टेंबर १५ तारखेस व्हॉइसरायांकडून महाराजांना पत्रद्वारें त्याच अर्थाचा मजकूर कळविण्यांत आला. मराठा पलटणींचें स्मारक व शिवस्मारक यांपैकीं एकाचा पाया युवराजांकडून घालविण्याचा यत्न केला जात आहे; पण दोन्हींचा पाया घालणें युवराजांना शक्य होणार नाहीं; असा व्हॉइसराय लॉर्ड रेडिंग यांच्या पत्राचा मथितार्थ होता; परंतु नोव्हेंबरपर्यंत या प्रश्नाचा नक्की निकाल झालाच नाहीं. ह्मणून छत्रपति व शिंदेसरकार दिल्लीस जाऊन लॉर्ड रेडिंग यांना भेटले. ता० ७ नोव्हेंबर दिवशीं या भेटींत शिंदेसरकार, आपण आणि व्हॉइसराय यांच्यांत झालेल्या संभाषणाचें महाराजांनीं एक टिप्पण तयार करून अनेक मित्रांकडे पाठविलें. वॉर मेमोरियल व शिवस्मारक हीं दोनहि एकजातीय दिसत असल्यामुळें, दोन्हींचाहि पाया युवराजांनीं घातला असतां जातीय पक्षपातित्वाचा युवराजांवर आरोप येईल; याकरितां वॉर मेमोरियलचा पाया ते घालतील आणि शिवस्मारकाच्या कोनशिला समारंभास युवराज फक्त हजर राहतील; मात्र हा दुसरा पाया उभयतां महाराजांपैकीं एकांनीं घालावा; असा रेडिंगसाहेबांच्या भाषणाचा आशय होता. याला उत्तर काय द्यावयाचें ? हा उभयतां महाराजांपुढें महत्त्वाचा प्रश्न होता.

प्रिन्स ऑफ वेल्स शिवस्मारकाचा पाया घालणार, अशी सर्व ठिकाणीं अगोदरच बातमी पसरलेली होती. यामुळें सर्वत्र एका प्रकारच्या नवीन आशांचीं अंकुरें उगवलीं होतीं. राजद्रोही चळवळीशीं निष्कारण संलग्न झालेली शिवस्मारकाची चळवळ, आतां सम्राटपुत्रांच्या हातानें आणि दोन प्रख्यात

राजनिष्ठ महाराजांच्या नेतृत्वाखालीं मूर्त स्वरूप घेणार, असें सर्वांना वाटूं लागलें होतें. लुटारू ह्मणून निंदिलेल्या शिवरायाचे पराक्रम व त्याची थोरवी ब्रिटिश साम्राज्याचे युवराज प्रत्यक्ष कृतीनें कबूल करणार, या कल्पनेनें सर्वांना आनंदित केलें होतें. अशा स्थितींत सर्व राष्ट्राला प्रिय व पूज्य असलेल्या शिवस्मारकाचें कामावर एकजातीयत्वाचा डाग लागून, पुनः तें थंड पडणार काय ? शिवाजीची पुण्यस्मृति मराठा राष्ट्रांतील प्रत्येक राजाला प्रियतम होती. पण दैवाच्या वक्रते-मुळें, शिवाजीच्या स्मारकाचें नांव तोंडावाटें बाहेर काढण्यास राजेलोक मागेंपुढें पहात असत. युवसम्राटांच्या शिक्कामोर्तबानें आज शिवस्मारक देशाभिमानित्वा-प्रमाणेंच राजनिष्ठेचेंहि ठरण्याची संधि आली होती. ती गमावणें कोल्हापूर व ग्वाल्हेरच्या महाराजांना योग्य होतें काय ? या प्रश्नाचें उत्तर उभयतांनीं स्पष्टपणें दिलें. एकाद्या बडया पार्शाचें अथवा ब्राह्मणाचें स्मारक तयार झालें तर त्याच्याशीं इंग्रज अधिकारी खुशाल संबंध ठेवितात. "असें असतां सर्वांच्या मतें अत्यंत मोठा लढवय्या व मुत्सद्दी ह्मणून प्रसिद्ध असलेल्या शिवाजीच्या पुतळ्याचा पाया घालणें एकजातीय समजण्यांत यावें, हें आश्चर्य आहे. वॉर मेमोरियल व शिवाजीस्मारक या दोनहि बहिणी बहिणी आहेत. सर्व जातींच्या व धर्मांच्या शिपायांच्या पराक्रमास मान देण्यासाठीं पहिलें सुरू झालें आहे. व दुसरेंहि हिंदुस्थानांतील सर्वांत मोठया विभूतीच्या सन्मानार्थच व्हावयाचें आहे. दक्षिणेंत मराठा या शब्दाचा दोन अर्थांनीं उपयोग करण्यांत येतो. महाराष्ट्रांतील सर्व लोकसमुदाय असा या शब्दाचा एक अर्थ आहे. त्याचप्रमाणें मराठा जातीलाहि, आकुंचित अर्थानें, हा शब्द लावण्यांत येत असतो. महायुद्धांत लढून पडलेल्या सर्वांचेंच वॉर मेमोरियल हें स्मारक आहे. त्यांत जातीचा आणि धर्माचा मुळींच भेद नाहीं. शिवस्मारक ही जातीय चळ-वळ आहे, असें समजणें मुळींच बरोबर नाहीं. ही प्रांतीय अथवा राष्ट्रीय चळवळ आहे."

याप्रमाणें शिवस्मारकाचें यथार्थ रूप सांगून, त्याचा पाया घालण्याचें युवराजांनीं नाकारिलें तर त्यामुळें सरकारास हें स्मारक आवडत नाहीं असा लोकांचा समज होईल, असें महाराजांनीं व्हॉइसरायांना बजाविलें. याचा परिणाम काय होईल, हें बरोबर समजण्यासाठीं, आपण सर जॉर्ज लॉइड यांचा हवा तर सल्ला घ्या, असेंहि महाराजांनीं याच वेळीं सांगितलें. उभयतां महा-

राजांच्या या खुलाशाचा इष्ट तो परिणाम होऊन, युवराजांनीं शिवस्मारकाचा पाया घालण्याचें मान्य केलें व १९ नोव्हेंबर १९२१ दिवशीं मोठया समारंभानें हें काम पार पडलें. ब्राह्मणेतर वर्गांतील हजारों लोकांनीं समारंभास हजर राहून दोघां महाराजांच्या नेतृत्वाखालीं युवराजांचें मोठया प्रेमानें स्वागत केलें आणि शिवछत्रपतीविषयींची राष्ट्रप्रीति जोरानें व्यक्त केली. असहकारीपक्षाला आपल्या क्षुद्रत्वाच्या या पुराव्यामुळें मानाच खालीं घालाव्या लागल्या. महाराज शाहु छत्रपति यांनीं स्मारकाचा उद्देश सांगून, पायाचा दगड बसविण्याची युवराजांना विनंति केली. उभयतां राजांना बरोबर घेऊन, युवराज नियमित ठिकाणीं गेले व तेथें मराठा राष्ट्राच्या आकांक्षा जीवंत करणाऱ्या अमरकीर्ति शिवछत्रपतींच्या स्मारकाची कोनशिला कायमपणें बसविली; परंतु स्वस्थानीं आल्यावर या स्मारकाचें महत्त्व सांगून युवराजांनीं आपलें भाषण आटोपलें. या वेळीं ठरलेला कार्यक्रम आटोपला. परंतु एक दोन दिवसच अगोदर मुंबईस जो प्रकार घडला होता, त्याची ताजी आठवण बुजविण्यासाठीं व हिंदी लोकांच्या ब्रिटिश सम्राटा-विषयींच्या प्रेमाचा पुरावा पदरांत घालण्यासाठीं, छत्रपतींनीं जमलेल्या अफाट लोकसमुदायांतून थोडेंसें हिंडण्याची युवराजांना विनंति केली. अधिकारीवर्ग साशंक होता. तरी युवराज कबूल झाल्यामुळें, हजारों ब्राह्मणेतरांच्या संमर्दांत छत्रपतींनीं त्यांना नेलें आणि छत्रपतींच्या त्या अनुयायांनीं युवराजांचें प्रचंड टाळयांच्या आवाजांत आणि ‘ युवराजकी जय ! ’ ‘ शिवछत्रपतीकी जय ’— ‘ शाहुमहाराजकी जय ’ अशा विजयध्वनीनें स्वागत केलें.

समारंभ आटोपल्यावर, १९२२ च्या मार्च महिन्यांत छत्रपतींनीं ग्वाल्हेरास पत्र लिहून कामास सुरवात करण्याची सूचना दिली. हें १५ तारखेचें पत्र ग्वाल्हेरास पोंचण्यापूर्वींच, परंतु १७ मार्च रोजीं, शिंदेमहाराजांनीं पुणें अथवा मुंबईस मे महिन्यांत एक सभा भरवून पुढील कामाचा निश्चय करूं, असें पत्र लिहिलें होतें. सर्व जातींच्या पुढारी लोकांस—“ मुसलमान, ब्राह्मण, मराठा, युरोपीयन, हिंदु वगैरे ” लोकांस या सभेस बोलविण्याचा आपला मनोदय शिंद्यांनीं छत्रपतींना कळविला होता. सर्व जातींच्या पुढाऱ्यांची सभा भरविण्यास नड नाहीं; “ परंतु प्रसंग पडला तर आह्मीं आमची योजना पूर्ण करण्यास तयार असलें पाहिजे असें मला वाटतें. माणशीं एकेक रुपाया याप्रमाणें फंड जमवि-ण्याची कल्पना मला अगदीं पसंत आहे; आमच्या समाजापैकीं पुष्कळ स्वयंसेवक

योजून, ही सूचना अमलांत आणावी असें माझें मत आहे " असें महाराजांनीं यावर उत्तर पाठविलें.

शिवस्मारकाच्या अत्यंत आशाजनक कार्याशीं छत्रपति शाहुमहाराज यांचा संबंध दुर्दैवानें येथेंच संपला. अर्थातच त्यांच्या मृत्यूनंतर या बाबतींत घडलेल्या प्रकारांचा येथें उल्लेख करण्याचें कारण नाहीं. शाहुमहाराजांच्या मनांत हें स्मारक मराठा जातीकरितां, मराठा जातीचें करावयाचें होतें; फक्त शिंदेसरकारांनीं त्यांच्या मृत्यूची संधि गांठून, त्याचें रूपांतर केलें, असा एक महाराजांच्या चरित्रकारानें विचार करण्यासारखा लोकभ्रम आहे. शाहु-छत्रपतींच्या पत्रव्यवहारांतून येथवर जी माहिती दिली आहे ती पाहातां, या समजुतीस आधार नाहीं, असें स्पष्ट दिसतें. मराठा जातीच्या अभ्युदयाची महाराजांना काळजी होती, हें तर स्पष्टच आहे. पण इतर जातींच्या फायद्याच्या गोष्टी करावयाच्या नाहींत, असा आकुंचितपणा त्यांच्या स्वभावांत कधींच नव्हता. प्रारंभीं या स्मारकाचें स्वरूप निश्चित झालेलें नव्हतें. पण युवराजांनीं पाया घालण्याचें कबूल करण्याच्या अगोदरच, शिवस्मारक राष्ट्रीय स्वरूपाचें करावयाचें आणि त्यांत सर्व जातींचा व धर्मीयांचा समावेश करावयाचा, हें शाहुछत्रपतींनींहि शिंदेमहाराजांप्रमाणेंच ठरविलें होतें. ‘ मराठा ’ या शब्दाच्या द्व्यर्थित्वामुळें आणि ‘ महत्त्वाच्या शिक्षण संस्थांशीं शिवाजीचें नांव जोडण्याचा आपला विचार आहे. ’ या युवराजांच्या भाषणांतील वाक्या-मुळें, कोणाचा गैरसमज झाला तर त्यांत आश्चर्य नाहीं. मात्र या शब्दांचा अर्थ आपल्याच म्हणण्याप्रमाणें आकुंचित आहे असें मानणें महाराजांच्या पत्रव्यव-हारावरून योग्य दिसत नाहीं. सुदैवानें या संबंधाचे सर्व वाद मिटून, हें शिव-स्मारक राजाराम महाराज आणि शिंदे महाराज या उभयतांच्या हातानें यशस्वी होईल याबद्दल आतां शंका वाटत नाहीं. वादविवादाचा धुरळा हळूहळू खालीं बसून सगळें वातावरण शुद्ध होईल आणि ज्या उदात्त भावनांनीं प्रेरित होऊन, शाहुछत्रपतींनीं या कामीं मन घातलें त्या राष्ट्रीय भावनांचा विजय होईल, अशी खात्री बाळगण्यास आतां जागा झाली आहे, ही आनंदाची गोष्ट आहे.

---

# प्रकरण २२ वें.

## अस्पृश्य मानिलेल्या वर्गांचा उद्धार.



हाराजांच्या सर्व कामगिरींत अत्यंत थोर मनाचें आणि धाडसाचें काम ह्मणजे अस्पृश्य वर्गांच्या उन्नतीसाठीं त्यांनीं केलेला प्रयत्न, असें ह्मणण्यास नड नाहीं. या कामाइतकें यशस्वी काम त्यांच्या हातून दुसरें झालें नाहीं. त्याचप्रमाणें निरपेक्षतेच्या, स्वार्थत्यागाच्या आणि धैर्याच्या कसोटीच्या दृष्टीनेंहि, त्यांच्या या बाबतींतील प्रचंड उद्योगाच्या बरोबरीचें दुसरें काम आढळूं शकणार नाहीं. राजकारणांत महाराज आणि गांधी यांच्यांत जेवढा विरोध होता, तितका अन्यत्र क्वचितच आढळेल. तथापि अस्पृश्योद्धाराच्या बिंदूवर, पूर्वपश्चिम या दोन भिन्न दिशांकडे तोंड करून पृथ्वीप्रदक्षिणा करणारे जसें कोठें तरी एकत्र होतात, त्याप्रमाणें शाहुमहाराज व महात्मा गांधी एकत्र झाले. दोघांच्या या प्रश्नाबद्दलच्या विचारांत सादृश्य इतकें होतें कीं, इतका मतभेद असूनहि, ' निःस्वार्थ मिशनरी भावनेचें अद्वितीय उदाहरण, ' ह्मणन गांधींची महाराजांनीं केलेली तारीफ पाहून कोणासहि आश्चर्य वाटण्याचें कारण रहात नाहीं. ब्रिटिश राज्याची या देशांत स्थापना झाल्यापासून गेल्या दहा पांच वर्षांपर्यंतच्या कालांत सर्व जातींची व वर्गांची थोडी फार उन्नति झाली; कांहीं दिशांनीं कांहीं वर्गांची पिछेहाट झाली असली तरी त्यांच्या हिशेबीं, फायद्याच्या बाजूस जमा करण्यासारख्या कांहीं तरी रकमा आहेत, असें आढळतें; या गोष्टी निर्विवाद आहेत. पण या सुधारणेच्या, जागृतीच्या कालावधींत अस्पृश्य वर्गांची स्थिति मुळींच सुधारली नाहीं. मागसलेल्या जातींची स्थिति या काळांत कांहीं बाबतींत घसरतच गेली, हें मीं मागेंच सांगितलें आहे. तथापि अस्पृश्यांच्या मानानें, या वर्गांची बौद्धिक जागृति पुष्कळच मोठी होती, हें कबूल केलें पाहिजे. मात्र अस्पृश्यांच्या वांटणीला या कालांत देखील निराशेवांचून

कांहीं आलें नाहीं. शिक्षणासारखी सर्वांच्या हक्काची गोष्ट घेतली तरी ती मिळविण्याच्या मार्गांत त्यांना कसल्या पर्वतप्राय अडचणी अद्याप जशाच्या तशाच होत्या! सभोंवतालचा काळोख अधिकच काळाकुट्ट करणाऱ्या आणि अरण्यांतील मध्य-रात्रीं लुकलुकणाऱ्या पणतीसारख्या ' अस्पृश्य ' शाळा सरकारांनीं कोठें कोठें काढिल्या आहेत. पण त्यांत मिळणारें ज्ञान इतकें गाढ असतें कीं, त्यांतून बाहेर पडलेले अस्पृश्य तरुण बाहेर पडण्याच्या अगोदरच तें विसरून जातात ! आणि तें इतकें अल्प असतें कीं, तें मुलांच्या मनांत राहिलें किंवा बाहेर गळून पडलें तरी सारखेंच ! माग-सलेल्या इतर जातींच्या वांटणीस लष्करांत जाऊन मरण्याच्या तरी नोकऱ्या मिळतात. पण अस्पृश्यांना हा मार्ग देखील बंद करण्यांत आलेला आहे. मुलकी खात्यांतील पट्टेवाल्यांच्या जागा तरी मागासलेल्या वर्गांना राखून ठेविल्या आहेत. पण अस्पृश्यांनीं नोकरी करावयाची म्हणजे जळण गोळा करण्याची, घोडे घांस-ण्याची व थंडीवाऱ्यांत चावडीबाहेर बसण्याची; आणि याबद्दल त्यांना मोबदला एवढाच कीं इंच दोन इंच जमिनीच्या तुकड्याकडे पाहून अथवा रयत लोक देतील तें कुचकें धान्य अथवा मेलेलें मांस खाऊन, त्यांनीं आनंदानें सर्व जातींना दुवा द्यावा ! अशा तऱ्हेच्या परिस्थितींत अस्पृश्यांना या वेळेपर्यंत सरकाराकडून म्हणा किंवा वरिष्ट वर्गांकडून म्हणा कोणती मदत करण्यांत आली आहे ? अस्पृश्ये-तर सर्व वर्गांचे लोक आणि सरकार या सर्वांचेंच हें कर्तव्य होतें कीं, त्यांनीं हिंदी समाजाच्या या प्रचंड परंतु अवमानिलेल्या आणि लुल्या पडलेल्या अवयवास योग्य उपचार करून बलवान् करावयास पाहिजे होतें; परंतु हें कर्तव्य करण्याचा प्रयत्न योग्य प्रमाणांत कोणींहि केलेला नव्हता.

सर्व जातींना उन्नतिपथ मोकळा असतां, अशा दुर्धर स्थितींत अस्पृश्यांनीं कां राहावें ? असा एक प्रश्न या ठिकाणीं पुढें येण्याचा संभव आहे. सुधार-णेच्या शर्यतींत प्रत्येक जातीनें आपलें घोडें पुढें दामटावें, त्यांत जर एखादा घोडा मागें पडला तर तो त्या घोड्याचा अथवा त्याच्यावरील स्वाराचा दोष होय. या विचारसरणींत एक मोठा दोष आहे. जनावरांची शर्यत अथवा त्यांचा जीवनकलह ज्या नीतिबाह्य परंतु एका अर्थी सृष्टिक्रमसंमत नियमानुसार चालतो, त्या नियमाप्रमाणेंच मनुष्या मनुष्यांतील व्यवहार चालावयाचे झाले, तर मनुष्यसमाजाचें अस्तित्वहि राहूं शकणार नाहीं आणि माणसालाहि जनावराप्रमा-णेंच केवळ सुधारणेच्या प्राथमिक अवस्थेंत जीवित कंठावें लागेल. आपापला

स्वार्थ साधण्याकरितां मनुष्यप्राणी जर जनावराच्याच पद्धतीनें वागूं लागला. तर आतांपर्यंत समाजव्यवस्थेला जें संघटित स्वरूप प्राप्त झालें आहे आणि मनुष्याची आतांपर्यंत जी नैतिक उन्नति झालेली आहे ती कोठें राहील ? नैतिक जीवनाचा पाया, प्रबलांनीं निर्बलांना आपली निर्बलता घालविण्याकरितां शक्य तें सहाय्य करण्यांतच आहे. भौतिक सृष्टीमध्यें ज्याप्रमाणें भौतिक सामर्थ्याचा भौतिक निर्बलतेवर विजय होतो, तसाच तो मानवी जीवितांतहि होऊं लागला तर मानवी सुधारणेपैकीं निदान तीनचतुर्थांश भाग नष्टच होऊन जाईल. समाजव्यवस्था असल्या भौतिक नियमावर अस्तित्वांत आलेली नाहीं. ती जरी अंशत: भौतिक सृष्टीपैकींच असली तरी, आधिभौतिक, आध्यात्मिक अथवा नैतिक तत्त्वांमुळेंच तिला विशिष्टत्व आलें आहे; आणि जनावरांत ज्या उन्नतीचा मागमूसहि लागत नाहीं अशी परिणति मानवी समाजव्यवस्थेंत झालेली आहे, किंबहुना ज्या मानानें मनुष्य आपल्या भौतिक वासना मर्यादित करून त्यांच्या ठिकाणीं नैतिक तत्त्वाची स्थापना करितो, त्या मानानेंच त्याची व तो ज्या समाजशरीराचा एक इंद्रिय आहे, त्या सामाजिक शरीराची उन्नति होते. आपल्या शारीरिक अथवा बौद्धिक सामर्थ्यानें कांहीं माणसें इतरांना फसवूं शकलीं किंवा त्यांचें द्रव्य अथवा जीवित हरण करूं शकलीं तर केवळ भौतिक नियमांच्या दृष्टीनें पाहातां काय हरकत आहे ? जीवनकलहांत प्रबलानें निर्बलाचा स्वाहाकार करावा, ' जीवो जीवस्य जीवनम् ' याच नियमाप्रमाणें मनुष्यामनुष्यांतील व्यवहार चालावे किंवा समाजव्यवस्थेंत डार्विनच्या **Survival of the fittest** या सिद्धांतास प्राबल्य यावें, असें समजलें, तर कायदे करण्याची व समाजाच्या एकत्रित शक्तीचा उपयोग दुर्बलांचें सबलांपासून संरक्षण करण्याकरितां करावयाची काय अवश्यकता आहे ? चोरांच्या चोरीला किंवा दरवडेखोरांच्या दरवडयांना किंवा विश्वासानें दुसऱ्यांना फसविणाऱ्यांना आपला " fitness " ( लायखी ) हें आपल्या कृत्याचें समर्थन, असें कां ह्मणतां येऊं नये ? वस्तुतः मानवी समाजव्यवस्था ही भौतिक सृष्टीच्या बाहेरच्या नियमांप्रमाणेंच अस्तित्वांत राहणें शक्य आहे. समाज जरी भिन्न कुटुंबांनीं बनलेला असला तरी, तो एकाद्या व्यक्तीप्रमाणेंच जिवंत असतो आणि त्याचें प्रत्येक अंग आणि उपांग हीं एकमेकाशीं संलग्न झालेलीं असतात, हें लक्षांत ठेविलें असतां, निरोगी अंगानें रुग्ण अंगाची तें रुग्ण ह्मणून उपेक्षा करणें किती आत्मघातकीपणाचें आहे, हें दिसून

येईल. अस्पृश्य लोकांसारखा समाजाचा एक भाग दु:स्थितींत असणें ह्मणजे ती त्या भागाचीच दु:स्थिति नसून सर्व समाजाचीच आहे, हें आमच्या समाजाच्या लक्षांत येत नाहीं. यामुळें, त्यांची उन्नति करण्याचा प्रश्न केवळ त्यांच्या हिताचा ह्मणून नव्हे, तर सर्व समाजाच्या शाबूतीचा ह्मणून लोकांच्या नजरेंत भरत नाहीं; आणि त्यामुळेंच अस्पृश्यांच्या अवनतीमुळें सर्व समाजाची केवढी हानि झाली आहे, याची जाणीव आमच्या लोकांस होत नाहीं.

मागसलेल्या वर्गांच्या उन्नतीचा प्रश्न ज्या वेळीं महाराजांच्या मनांत घोळूं लागला, त्याच वेळीं अस्पृश्यांच्या स्थितीकडेहि त्यांचें लक्ष गेलें होतें आणि त्यांच्या प्रोत्साहनानेंच मिस क्लार्क होस्टेलच्या द्वारें त्यांच्यांत इंग्रजी शिक्षणाचा प्रसार करण्याचा प्रयत्न कोल्हापुरास चालूं होता, हें मागें सांगितलेंच आहे. या प्रयत्नाच्या योगानें अथवा अन्य रीतीनें शिकून तयार झालेले अस्पृश्यवर्गीय लोक उपलब्ध होईतोंपर्यंत त्यांचा आपल्या राज्यकारभारांत कोणत्याहि प्रकारें समावेश करणें किंवा पुढें ज्या प्रकारचे प्रयत्न त्यांच्याकरितां महाराजांनीं केले तसले प्रयत्न आरंभणें महाराजांना शक्य नव्हतें; ह्मणून हें शिक्षण-बीज हळूहळू त्यांच्या मनोभूमिकेंत वाढावयास सोडून, शक्य तेथवर त्यांचा दर्जा वाढविण्याकडे प्रथम महाराजांनीं लक्ष पुरविलें. प्रथम त्यांच्यापैकीं कांहीं लोकांची आपल्या कोचमनच्या जागीं महाराजांनीं निवड केली. सकृद्दर्शनीं क्षुल्लक दिसणाऱ्या या उपायाचा परिणाम पुष्कळच झाला. १९०८ सालीं श्रीआक्कासाहेबमहाराज यांच्या झालेल्या विवाह-समारंभांत हजारों लोकांसमक्ष अस्पृश्य कोचमन मिरवणुकीच्या सरकारी गाड्याघोड्यांवर बसून आपल्या वाढलेल्या दर्जाचें प्रदर्शन करीत होते. राजद्वारीं झुलणारा हत्ती सामान्य हिंदी लोकांच्या दृष्टीनें मोठ्या मानाचा प्राणी होय. कांहीं महारांना महात ह्मणून महाराजांनीं असल्या हत्तीवर बसविण्यास याच सुमारास सुरवात केली. एखाद्या सरदाराप्रमाणें कंबरेस तरवारीचें क्षात्रचिन्ह लटकविण्यास महारांना महाराजांनीं याच वेळीं मुभा दिली. अशा रीतीनें अस्पृश्यांना नवीन आणि इतरांना अपूर्व वाटणाऱ्या गोष्टी अमलांत आणून महाराज आपल्या भावी कार्याचा क्रमाक्रमानें पाया घालीत होते. १९१६ च्या सुमारास महाराजांच्या विचारसृष्टींत जी क्रांति घडून आली, त्याचा एक अत्यंत मोठा आणि ठळक भाग ह्मणजे त्यांनीं अस्पृश्योद्धाराच्या कामीं अधिक जोरानें पडण्याचा केलेला निश्चय हा होय. केव्हां केव्हां महाराज स्वत:च ह्मणत त्याप्रमाणें

ते अगोदर जुन्यास चिकटून राहणारेच होते. आतांपर्यंत जुनें न सोडतांच होईल तेवढी सुधारणा करण्याचा त्यांनीं प्रयत्न करून पाहिला होता. या प्रयत्नामुळें त्यांनीं समाजजागृतीचें काम पुष्कळ अंशानें सिद्ध केलें होतें. समाजरूपी इमारतीची, तिची मूळरचना न बदलतां, डागदुजी करून त्यांनीं आतांपर्यंत पाहिलें होतें; परंतु आतां त्यांच्या मनांत जी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली होती, तिला ही रिपेरीची पद्धत पुरण्यासारखी नाहीं, असें महाराजांना आढळून आलें. पूर्वापार समाजव्यवस्थेंत मोठासा बदल न करितां सुधारणा करावयाची ह्मणजे ती वरिष्ठतम ब्राह्मण वर्गाच्या विचार-स्थितीवरच अवलंबून होती. त्यांचे विचार अधिक प्रगल्भ आणि उदार करण्याकरितां सामदामदंडभेदादि सर्व मार्गांनीं गेलीं पंधरा वीस वर्षें महाराजांनीं प्रयत्न केले; परंतु ब्राह्मण वर्गानें आपल्या विचार-सरणींत रतिभरहि फरक केल्याचें त्यांना आढळून येईना. हा अनुभव आल्यामुळें यापुढचे महाराजांचे विचार आमूलाग्र बदलून गेले; आणि ब्राह्मणी संस्कृति पार झुगारून देऊन नवीन पायावर सुधारणा करण्याचा प्रयत्न कसा करावा हें महाराज पाहूं लागले. ब्राह्मणेतरांपैकीं जैन आणि लिंगायत लोकांनीं अगोदरच ब्राह्मणी वर्चस्व झुगारून देऊन स्वतंत्र समाजव्यवस्था केलेली होती. जातिभेद आणि उपाध्यायवर्गाचें वर्चस्व हाणून पाडण्याकरितां जैनांनीं व जातिभेद मोडण्याकरितां लिंगायतांनीं आपली पराकाष्ठा केली; परंतु कालांतरानें दोघांनींहि आपले मूळ हेतू बाजूस सारून जातिभेदाच्या घातुक छायेचाच पुनः आश्रय केला व आपली अवनति करून घेतली हें लौकरच महाराजांच्या लक्षांत आलें. नंतर महाराजांचें लक्ष सत्यशोधक समाजाकडे गेलें. मागें सांगितल्याप्रमाणें या समाजाला महाराज उत्तेजन देत होते. परंतु या समाजाचा कार्यक्रम अवश्य असला तरी पुरेसा नाहीं, हें त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. अस्तित्वांत असलेली दोषपूर्ण समाज-पद्धति ढांसळून पाडण्याचा सत्यशोधक प्रयत्न करीत होते; आणि ही त्यांची कामगिरी अवश्यहि होती; परंतु पाडून टाकलेल्या इमारतीच्या ठिकाणीं नवी इमारत उभारण्याचा त्यांच्याकडून व्यवस्थित प्रयत्न होत नव्हता, असें महाराजांचें मत होतें व तें सर्वस्वीं योग्यहि होतें. प्रार्थनासमाजा-कडेहि महाराजांनीं कांहीं काळ लक्ष पुरविलें. १९११ च्या सुमारास त्यांनीं मदत करून कोल्हापुरास ब्राह्मसमाजाची स्थापना करविली व पुणें मुंबईकडील

प्रमुख प्रार्थनासमाजिस्टांना कोल्हापुरास बोलवून त्यांच्या कामाचेंहि महाराजांनीं निरीक्षण केलें. प्रत्येक धर्मांतील लहान लहान तुकडे गोळा करून त्यांची गोदडी बनविण्याचा प्रार्थनासमाजिस्टांचा प्रयत्न हिंदू समाजांत यशस्वी होणें शक्य नाहीं, असा सिद्धांत त्यांनीं लौकरच प्रस्थापित केला. १९१५ सालीं त्यांनीं थियासोफिस्ट लोकांना उत्तेजन देऊन त्यांच्या आचार्यस्थानीं विराजमान होणाऱ्या बेझंटबाईना कोल्हापुरास आणविलें; परंतु त्यांच्या मतें प्रार्थनासमाजाप्रमाणेंच हा पंथहि पुरेसा उपयोगी नाहीं असें ठरलें. शेवटीं आर्यसमाज त्यांच्या दृष्टीपुढें आला. वेदांच्या लोकमान्य प्रमाणावर तो स्थापन झालेला असल्यामुळें आणि मनुष्यामनुष्यांतील स्वभावभेद आणि व्यवसायभेद मान्य करून देखील प्रत्येकाला आपापल्या योग्यतेप्रमाणें उच्चनीच स्थिति प्राप्त करून घेण्यास हा समाज संधि देत असल्यामुळें तो त्यांना सर्वांत अधिक ग्राह्य वाटूं लागला. मूर्तिपूजेच्या निषेधासारख्या आर्यसमाजाच्या मतांशीं महाराजांचें फारसें कधीं जुळलें नाहीं हें पूर्वींच सांगण्यांत आलेलें आहे. परंतु ज्या सामाजिक सुधारणेच्या प्रश्नांनीं महाराजांचें मन व्यग्र झालें होतें त्यांचा निर्णय करण्यास आर्यसमाज हाच सर्वांपेक्षां अधिक चांगला मार्ग आहे, असें त्यांना वाटे. केवळ श्रद्धाविषयक आध्यात्मिक बाबतींत त्यांचीं मतें पूर्णपणें निश्चित ठरल्यासारखीं कधींच नव्हतीं. देवभोळेपणाच्या समजुतीविषयीं ते पुष्कळ वेळां तिटकारा दाखवीत; पण तसल्याच कित्येक समजुती त्यांच्या अंतःकरणांत दृढमूल झाल्याचेंहि वारंवार दिसून येई. खरोखर पाहिलें तर आपल्या सामाजिक कल्पना अंमलांत आणण्याचें एक साधन ह्मणूनच धार्मिक प्रश्नांचा ते विचार करीत; या प्रश्नांविषयीं त्यांना वाटणारी सर्व कळकळ केवळ व्यवहारिक सोयीगैरसोयीकरितांच असे. मनोविकार, धर्मश्रद्धा वगैरे सर्व त्यांच्या मनांतील व्यवहारिक हेतू साधण्याचीं साधनें एवढेंच त्यांचें महाराजांना महत्त्व वाटे. १९१७ च्या आगष्ट महिन्याच्या २० व्या तारिखेस ब्रिटिश प्रधानमंडळानें हिंदुस्थानविषयक जें धोरण जाहीर केलें त्यामुळें त्यांच्या मनांतील सामाजिक आणि धार्मिक कल्पनांना अत्यंत मोठें चालन कां मिळालें, हें यावरून लक्षांत येण्यासारखें आहे. या नव्या धोरणामुळें ज्या ब्राह्मणी वर्चस्वावर त्यांनीं आतांपर्यंत युद्ध पुकारिलें होतें, त्याला नवा दम प्राप्त होईल अशी भीति वाटून महाराज आपल्या येथपर्यंतच्या कामगिरीच्या सुरक्षिततेबद्दल साशंक झाले. धार्मिक बाबतींत आर्यसमाजाचा स्वीकार करून शैक्षणिक बाबतींत

सक्तीला सुरवात करून, राजकीय बाबतींत नवीन नवीन कायदेकानू मंजूर करून, क्षत्रिय जगद्गुरु आणि शिवाजी वैदिक शाळा यांची प्राणप्रतिष्ठा करून, ब्रिटिश हद्दींतील ब्राह्मणेतर चळवळीस जोराचा पाठिंबा देऊन आणि दुःखार्णवांत बुडालेल्या अस्पृश्य समाजास आपला हात देऊन त्यांनीं या वाटत असलेल्या भीतीचें निराकरण करण्याचा निश्चय केला. हेतु एकच; परंतु त्यावर आलेली आपत्ति नवीन असल्यामुळें याप्रमाणें त्यांच्या विचारांत किंवा अधिक नक्की सांगावयाचें ह्मणजे, त्यांच्या साधन-निर्णयांत मोठी क्रांति घडून आली. १९१७ च्या नाताळांत खामगांव येथें भरलेल्या मराठा शिक्षण परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें महाराजांनीं केलेलें भाषण, ब्रिटिश प्रधान मंडळाच्या जाहीरनाम्यानंतर पहिलेंच असल्यामुळें त्यांत या त्यांच्या नवीन निश्चयाचें प्रतिबिंब स्पष्टपणें दिसून येतें. " मी येथें महाराज ह्मणून आलों नाहीं, तर एक साधारण मराठा गृहस्थ ह्मणून आलों आहें. * * * तुह्मी मला शिपाई ह्मणा, अगर शेतकरी ह्मणा अगर असलेंच दुसरें कांहीं नांव द्या. " असें सांगून त्यांनीं आपल्या विचारक्रांतीचें दिग्दर्शन केलें. दुसऱ्या एका भाषणांत ते ह्मणाले:—

" शिपाई, शेतकरी, किंवा मजूर ह्मणवून घेण्याचा मला अभिमान वाटतो. राजे होण्यापूर्वीं माझे वाडवडील शेतकरीच होते. माझ्या जनक आईचें मुधोळच्या घोरपड्यांचें घराणें, माझ्या दत्तक आईचें शिर्के घराणें आणि माझ्या दत्तक वडिलांचें भोंसले घराणें, हे सर्व शेतकरी वर्गापैकींच होत. कनिष्ठ आणि अज्ञान वर्गांशीं तुह्मी मिसळून जाऊं नका, असा मला पुष्कळांनीं उपदेश केला; परंतु मी ज्या मजूरवर्गांतून जन्मलों आहें, त्यांच्या विषयींचें प्रेम माझ्यांत मूळचेंच असून शिपाई आणि शेतकरी यांचें रक्त माझ्या धमन्यांतून खेळत आहे. "

ब्रिटिश हद्दींतील निरनिराळ्या चळवळींशीं तुमचा काय संबंध आहे ? असें कित्येक टीकाकार महाराजांना विचारीत असत; परंतु या टीकाकारांना अत्यंत अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाल्या वेळीं देखील त्यांनीं या टीकेचा आपल्या मनावर परिणाम होऊं दिला नाहीं. सर्व देशाशीं आणि विशेषतः महाराष्ट्रांतील जनतेशीं जो दृढ संबंध आहे, असें महाराजांना वाटे; त्यामुळेंच ही टीका त्यांना अनाठायीं वाटे. संस्थानें आणि ब्रिटिश हद्द यांतील भेद कृत्रिम असून, राष्ट्रीय दृष्ट्या संस्थानिक, त्यांची प्रजा आणि ब्रिटिश हद्दींतील जनता, हे सर्व एकच आहेत असें त्यांना वाटत असें. " मी एक संस्थानिक असल्यामुळें "

महाराज येथील आपल्या भाषणांत ह्मणाले, " ब्रिटिश हद्दींत व्याख्यानें देण्या-बद्दल माझ्यावर टीका करण्यांत येते. यावर माझें पहिलें उत्तर असें आहे कीं, मी राजा ह्मणून येथें भाषण करीत नाहीं; तर ज्या माझ्या देशबंधूंची स्थिति पाहून प्रत्येक मानवी अंत:करणास पाझर फुटला पाहिजे, त्यांचा एक मित्र आणि सेवक ह्मणून मी येथें उभा आहें. या नात्यानें माझे देशबंधू एकाद्या विषयावरील माझे विचार समजावून घेण्यास माझ्याकडे आले असतांना त्यांना नाहीं ह्मणून सांगणें अगर मौन धारण करणें ह्मणजे शिष्टाचाराचें अक्षम्य उलंघन करणें होय. "

महाराज ह्मणाले:—

" हल्लीं स्वराज्य अथवा होमरूल मागण्याबद्दल सर्वत्र चळवळ चालू आहे; परंतु आह्मी स्वराज्याला पात्र आहोंत कीं काय हा एक प्रश्नच आहे. आह्मांला स्वराज्य मिळावें अशी खरोखरीच आमची इच्छा आहे. याच्या योगें आह्मांला ' जीवनरक्त ' मिळेल; परंतु याबरोबरच माझा ठाम सिद्धांत ह्मणून हेंहि सांगावेंसें वाटतें कीं, हल्लींची जातिभेदाची शृंखला तोडल्या वांचून आपलें चालावयाचें नाहीं. आमच्या सामान्य नैतिक व आधिभौतिक प्रगतीच्या दृष्टीनें माझें लक्ष या गोष्टीकडे लागून राहिलें आहे. जोंपर्यंत आह्मांमध्यें जातिभेदाच्या भावना आहेत तोंपर्यंत यामुळें आमचें कार्य कमकुवतच राहणार. आह्मां-मधील बखेडे नाहींसे होऊन आह्मीं स्वराज्याला पात्र होण्यासाठीं जातिभेदाचे दोष नष्ट करण्यास आह्मीं शक्य ते प्रयत्न केले पाहिजेत. या गोष्टीचें महत्त्व आपणांस सहज समजून येईल, अशी माझी खात्री आहे. "

" जाती आहेत तशाच राहिल्या तर स्वराज्याच्या परिणाम विशिष्ट वर्गाची सत्ता स्थापन करण्यांतच होईल. याचा अर्थ, मी पुनः सांगतों कीं, मी स्वरा-ज्याच्या विरुद्ध आहें असा नव्हे. खरोखरच आह्मांस तें पाहिजे आहे. परंतु हल्लींच्या परिस्थितींत आह्मांला इंग्रजी सत्तेच्या संरक्षणाची व मार्गदर्शकत्वाची गरज आहे; आणि जातिभेद निर्जीव होईतोंपर्यंत ही गरज कायम राहील. स्वरा-ज्याचें रूपांतर विशिष्ट सत्तेंत होऊं नये, ह्मणून सर्व जातींना दहा वर्षेंपर्यंत तरी प्रतिनिधी पाठवितां आलें पाहिजे. त्या योगानें आमचे हक्क आह्मांस समजूं लाग-तील आणि एकदां तसें झालें ह्मणजे जातवार प्रतिनिधींची जरूरी राहणार नाहीं. "

वर दर्शित केल्याप्रमाणें महाराजांच्या राजकीय विचारांत जो बदल झाला होता, त्यामुळें अस्पृश्य वर्गाविषयींचें त्यांचें प्रेम वाढत गेलें. १९२० सालीं माणगांव ( संस्थान कागल ) येथें केलेल्या अस्पृश्य परिषदेपुढील भाषणांत त्यांनीं पुढील खुलासा केला आहे, "राजकारण आणि अस्पृश्यता यांचा काय संबंध आहे असें कांहीं लोक विचारतात आणि तसा संबंध सिद्ध केल्यास आपण ती दूर करूं असें त्यांचें ह्मणणें आहे. अस्पृश्यवर्गांना निदान माणसाप्रमाणें आह्मीं जर वागविलें नाहीं तर आमचें राजकारण बरोबर रीतीनें कसें चालेल ? ज्यांना राजकारणांत भाग घ्यावयाचा असेल त्यांनीं इतर देशांप्रमाणें याहि देशांत प्रत्येक मनुष्याला मनुष्यत्वाचे सर्व अधिकार दिले पाहिजेत; नाहींतर आमच्या हातून मुळींच देशसेवा होणार नाहीं."

खुद्द संस्थानच्या राजकारणांत महार आणि रयत यांच्यामधील तंट्याच्या रूपानें महाराजांपुढें अस्पृश्यांना मदत करण्याचा प्रश्न उपस्थित झाला. इंग्रजी राज्यापूर्वी महार लोक आपापल्या खेड्यांतील गुन्हेगारांचा तपास करण्याचें काम व गांवकऱ्यांचीं इतर कांहीं कामें करीत असत. या मोबदला सरकारांतून देण्यांत आलेल्या जमिनी त्यांच्या निर्वाहास पुरतनाशा झाल्यामुळें गांवकऱ्यांनीं त्यांना बलुतें देण्याची पद्धति सुरू झाली; परंतु हें बलुतें कोणत्या वतनदारास नक्की किती द्यावयाचें हें नक्की ठरलेलें दिसून येत नाहीं. इंग्रजी राज्यांत ही बलुत्याची पद्धत कायम ठेवण्यांत आली आहे. परंतु सर्व बाबतींत निश्चित नियम ठरविणाऱ्या हल्लींच्या कायद्यानें देखील संदिग्ध आणि वादग्रस्त स्वरूपांत हा प्रश्न ठेविला आहे. त्यामुळें बलुतें देणारे रयत व घेणारे महार यांच्यांत नेहमीं तंटे उपस्थित होत असतात. ही बलुते पद्धति सर्राहा बंद करण्याचा हुकूम महाराजांनीं केला, परंतु १९१८ च्या फेब्रुवारींत हा हुकूम झाल्या वेळीं महार लोकांच्या बलुत्यास ही मनाई लागू करण्यांत आली नाहीं; त्यांच्यापुरती बलुते पद्धति कायम ठेवून या हतभागी वर्गास आपण मदत देतों असें प्रथमतः महाराजांना वाटलें; परंतु त्याच वर्षाच्या जूनच्या २५ व्या तारखेस दुसरा हुकूम काढून त्यांनीं असें ठरविलें कीं महार लोकांकडून सक्तीनें काम करून घेण्याचा अधिकार कोणासहि नसून इतःपर महारकी वतनाच्या जमीनी रयतावा समजण्यांत याव्या. ३ मार्च १९१९ दिवशीं आणखी एक पाऊल पुढें टाकून, बलुतेदारांखेरीज इतरांकडून काम करून घेणाऱ्याविरुद्ध जे कोणी संप करतील त्यांना १०० रु० दंड किंवा ४ दिवसांच्या

कैदीची शिक्षा ठरविण्यांत आली. पुढें त्याच महिन्याच्या २८ व्या तारखेस, महा
लोकांनीं स्वेच्छेविरुद्ध कोणाची नोकरी करावयाची नसल्यामुळें त्यांना रय
लोकांनीं बलुते देण्याचें कांहीं कारण नाहीं, असा स्पष्ट हुकूम देण्यांत आला
१९१८ सालच्या आगष्ट ३१ तारखेस गुन्हेगार जातीच्या प्रत्येक मनुष्याच
हजरी घेण्याची पद्धति बंद करण्यांत आली; मात्र ज्यांना एकदां शिक्षा झाल
असेल त्यांची हजरी ते तुरुंगांतून सुटल्यानंतर पांच वर्षें चांगले राहिले तरच बं
करावी, असा या नियमास अपवाद घालण्यांत आला.

या हजरीसंबंधानें आपल्या हेतूचा १९२० मार्चमध्यें डॉ० आंबेडकर यांच्य
अध्यक्षतेखालीं भरलेल्या माणगांव येथील अस्पृश्य परिषदेंत महाराजांनीं पु
लिहिल्याप्रमाणें खुलासा केला आहे:—

" अस्पृश्य लोकांची हजरी ह्मणजे त्यांच्यावर जुलूम करण्यास गांवकामगा
आणि इतर लोक यांना मिळालेली एक संधि होय. उदाहरणार्थ धमकी देऊ
अंमलदार लोक त्यांच्याकडून फुकटचीं कामें करून घेतात. ही विसाव्य
शतकांतील अत्यंत गर्हणीय गुलामगिरी आहे. हजरीच्या भीतीनें परगांव
आजारी पडलेल्या आप्तेष्टांना भेटणें देखील या लोकांना अशक्य झाल्याचें व अश
स्थितींतच ते आप्तेष्ट मरून गेल्याचें मला माहीत आहे. आजारी पडलेल्य
मुलांच्या अंथरूणावरून ओढून नेऊन त्यांच्या आईबापांस वेठीला लाविलेलें आणि
काम संपवून परत येण्याच्या अगोदरच तीं आजारीं मुलें मरून गेल्याचें त्य
दुर्दैवी आईबापांच्या नशीबीं आलेलें, अशीं उदाहरणें मीं पाहिलेलीं आहेत. यापेक्ष
अधिक जुलमी जुलूम काय असणार ! "

यापुढें अस्पृश्य वर्गाची अस्पृश्यता नाहींशी करण्याचा प्रश्न महाराजांन
सोडवावयाचा होता. त्यांनीं सुरू केलेल्या तलाठी पद्धतीमुळें गांवोगांव कुल
कर्ण्यांच्या ऐवजीं दुसरे लोक महाराजांना नेमावयाचे होते. या जागा भरतांन
पुष्कळ अस्पृश्यांना त्यांनीं तलाठी नेमिले. यामुळें ज्या खेडोंखेडीं अस्पृश
लोक रस्ते झाडण्यापलीकडे अथवा खरकटीं खाण्यापलीकडे कोणतेंहि काम कर
शकत नव्हते, तेथें गांवच्या पाटलाच्या मांडीस मांडी लावून चावडींतील उच्च
तम ठिकाणीं विराजित होण्याचा आणि रयत लोकांचा कारभार करण्याचा महारां
मांगांना मान मिळाला. आतां ते ब्राह्मण जातीच्या कुलकर्ण्यांचें स्थान सुशोभि
करूं लागले. हा बदल खेडगळांच्या दृष्टीनें जितका विलक्षण होता, तितकाच त

प्रभावशाली होता. जे अस्पृश्य लोक तलाठ्याचें काम समाधानकारक करीत, त्यांची बढती निरनिराळ्या खात्याच्या कारकून वर्गांत करण्याचाहि महाराजांनीं १९१९ सालीं उपक्रम केला.

संस्थानांतील सर्व दवाखान्यांत इतर जातींच्या रोग्यांच्या बरोबरीनें अस्पृश्य रोग्यांनाहि वागविण्यांत यावें व अस्पृश्यता न मानितां त्यांची शुश्रूषा करण्यांत यावी, असा याच वेळीं महाराजांनीं हुकूम दिला. असें करणें ज्यांस कबूल नसेल त्या डॉक्टरांनीं, ड्रेसर लोकांनीं व नर्सनीं आपल्या जागांचे राजीनामे द्यावेत, असेंहि त्यांनीं फर्माविलें. पंधरा जानेवारी १९१९ दिवशीं सर्व शिक्षकांनीं याचप्रमाणें अस्पृश्य मुलांना अस्पृश्य न मानितां इतरांच्या बरोबरीनेंच वागवावें, असा हुकूम सोडण्यांत आला. सरकारी, खासगी परंतु मदत घेणाऱ्या वगैरे सर्व शाळांनीं हा हुकूम पाळला पाहिजे असें स्पष्टपणें पुढें थोड्या दिवसांनीं कळविण्यांत आलें. कामानिमित्त कचेऱ्यांत जाणाऱ्या अस्पृश्य लोकांना व अस्पृश्य कारकुनांना इतरांप्रमाणेंच समतेनें वागवावें, अशी सर्व अधिकाऱ्यांना ताकीद देण्यांत आली. नवीन जातवार पद्धतीनें निवडलेल्या कोल्हापूर म्युनिसिपालिटींत अस्पृश्यांना स्वतंत्र प्रतिनिधी निवडण्याचा हक्क दिल्यामुळें एक सुशिक्षित चांभार जातीचे गृहस्थ राजधानीच्या म्युनिसीपालिटीचे चेअरमन झाले. सर्व सार्वजनिक विहिरी, तळीं व पाण्याचे नळ वापरण्याचा आणि धर्मशाळादिकांत इतरांच्या बरोबरीनें राहण्याचा अस्पृश्यांना अधिकार आहे, असें महाराजांनीं ठरविलें. सोनथळी येथें आणि स्टेशन बंगल्यावर दोन नवीन अस्पृश्य विद्यार्थीगृहें काढण्यांत आलीं; आणि अस्पृश्यांच्या स्वतंत्र शाळा बंद करून सार्वजनिक शाळांतच त्यांना शिकविलें पाहिजे अशी व्यवस्था महाराजांनीं केली.

याच वेळीं कित्येक अस्पृश्य वर्गीय तरुणांना संस्थानांत वकीली करण्याच्या सनदा देण्यांत आल्या. याबद्दल महाराजांवर बरीच टीका करण्यांत आली. १९२० च्या मे अखेर नागपूर येथें अखिल भारतीय बहिष्कृत परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत त्यांनीं या आक्षेपास उत्तर दिलें. ते ह्मणाले:—

" मी ज्या महारां-मांगांना वकिलीच्या सनदा दिल्या आहेत, त्यांच्याहून कमी लायकीच्या आणि शिक्षणाच्या इतर जातींच्या लोकांना दुसऱ्या संस्थानांत सनदा देण्यांत आलेल्या आहेत, यामुळें समाजाचा अध:पात झाला असें कोणी ह्मणत नाहीं. कोणास सनद दिली कीं, पक्षकारांनीं त्याजकडे

गेलेंच पाहिजे, असा कोठें नियम करण्यांत आलेला नाहीं. वाटेल त्या वकीला-कडे जाण्याची पक्षकारांना मोकळीक असते. महारांमांगांना सनदा देण्यांत माझा हेतु इतकाच आहे कीं, रूढी आणि कायदा यांनीं या लोकांना ज्या धंद्यांचीं द्वारें बंद केलीं आहेत, ते धंदे या जातीच्या लोकांना उघडे करून द्यावेत. यामुळें त्यांचा दर्जा वाढून आपण इतर कोणत्याहि मनुष्याच्या बरोबरीचे आहोंत, ही भावना त्यांच्यांत रूढ होईल असें मला वाटतें. मला जनावरांचा शोक आहे. घोडयाला पाणी दाखविल्याशिवाय तो तें पीत नाहीं हें मला ठाऊक आहे. त्याचप्रमाणें वकिली करण्याची या लोकांना संधि दिल्याशिवाय त्यांना तो धंदा करितां येणार नाहीं व वकील होण्याचें त्यांच्या स्वप्नींहि येणार नाहीं. मातंग, टंक, पराशर, वशिष्ट, चोखामेळा वगैरे खालच्या जातींत जन्मले असले तरी ते आपल्या बुद्धिमत्तेनें वर चढले. यावरून या लोकांत बुद्धिमान् लोक नाहींत असें कोणालाहि ह्मणतां येणार नाहीं. मॅट्रिक परीक्षाहि पास न होतां विलायतेस जाऊन कांहीं हिंदी लोक बॅरिस्टर होऊन येत असत आणि या भोजनभाऊ बॅरिस्टरांना कोणत्याहि कोर्टांत वकिली करितां येत असे. या लोकांतच कांहीं उत्तम वकीलहि निघाले.

“ महार-मांगांसारख्या हलक्या जातींच्या लोकांना जेव्हां मी सनदा देतों, तेव्हां उच्च वर्गांतील लोक यामुळें आपला अपमान झाला असें समजतात असें आतां कांहीं मोठ्या लोकांना वाटतें; परंतु ही त्यांची चूक आहे. आपलें शिक्षण अगदीं पूर्ण होईतोंपर्यंत पांच पंचवीस वर्षें संशयांत आणि चिंतेंत स्वस्थ रहा, असें या वर्गांना सांगण्यापेक्षां, त्यांना जखडून टाकणाऱ्या भयंकर जुलुमाच्या शृंखला एकदम तोडून टाकणें हीच खरी राष्ट्रसेवा होय, अशी माझी खात्री झाली आहे. जातिभेद नाहींसा करावा असें पुष्कळांस वाटतें; पण हें कसें करावें हा प्रश्न आहे. खालच्या जातींनीं कितीहि प्रयत्न केला तरी हें काम त्यांच्या हातून व्हावयाचें नाहीं. प्राचीन काळापासून वंशपरंपरेनें उपभोगित असलेले हक्क वरिष्ठ जातींनींच सोडले पाहिजेत. असल्या पवित्र आत्मयज्ञानेंच त्यांचें उदाहरण उपयोगी होईल. ”

याप्रमाणें परोपदेशे पांडित्यम् करूनच महाराज थांबले नाहींत. स्वत:च्या वर्तनानें त्यांनीं घालून दिलेलें उदाहरण येथवर वर्णिलेल्या त्यांच्या सर्व काम-गिरीपेक्षां अधिक महत्त्वाचें होतें. महाराज, छत्रपतीच्या सर्व पूज्य सिंहासनावर

विराजित होणारे महाराज, आतां आपल्या परिवारांत अस्पृश्य लोक घेऊन सर्व महाराष्ट्रभर फिरूं लागले आणि अगदीं उघडपणानें त्यांच्या हातचें अन्नपाणी ते घेऊं लागले; आणि ते असें करीत असतां त्यांच्या दृढनिश्चयाचा सर्व जनतेवर इतका परिणाम होई कीं, त्यांच्या या वर्तनाविरुद्ध चकार शब्दहि काढण्याची कोणाची छाती होत नसे. माणगांवच्या भर परिषदेंत उभें राहून डॉ. अंबेडकर यांना आपल्या बरोबर जेवण करण्याचें त्यांनीं आमंत्रण दिलें. नागपूर येथें बहिष्कृत भारत परिषदेंत ब्राह्मण, मराठे वगैरे सर्व जातींच्या पुढाऱ्यांसमक्ष त्यांनीं मुद्दाम अस्पृश्याच्या हातचा चहा घेतला. नाशीक येथें गेल्या वेळीं भरलेल्या एका सभेंत त्यांनीं असाच प्रकार केला. या सार्वजनिक प्रसंगांप्रमाणेंच अनेक खासगी प्रसंगांत महाराज अशाच प्रकारें वागत होते. कोणत्याहि गांवीं ते गेले तरी प्रथम त्यांच्या भोंवतीं अस्पृश्यवर्गाचा गराडा पडूं लागला. हा अनुचर वर्ग बरोबर घेऊन ते इतर लोकांत सहज मिसळत असत आणि त्या योगानें अस्पृश्यतेच्या कल्पनेचा आपोआपच लय होऊन जाई.

त्यांच्या अशा अलौकिक उदाहरणामुळें अस्पृश्य लोक त्यांना आपला देव समजूं लागले, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. आजपर्यंत प्रत्येक लहान मोठ्या मनुष्याकडून तिरस्काराशिवाय त्यांस कांहींहि मिळत नसे. हिंदु समाजांत ज्यांची योग्यता अद्वितीय होती, ज्यांच्याशीं हस्तस्पर्श करण्यास मोठमोठे लोक हपापलेले असत, ज्यांच्याशीं संबंध करणें मोठमोठ्या राजेरजवाड्यांनाहि अभिमानास्पद वाटे, ते छत्रपति आज आपल्याविषयींच्या प्रेमानें भरलेल्या अंत:करणानें आपला उद्धार करण्याकरितां अवतरले आहेत, असें सर्व अस्पृश्यांना वाटूं लागलें. इंग्लंडचे युवराज दिल्लीस आल्या वेळीं असहकारितावाद्यांच्या प्रेरणेनें तेथील लोक आपापल्या घरीं कोंडून बसले; परंतु महाराजांचा इषारा मिळतांच सर्व हिंदुस्थानांतील अस्पृश्यसमाज दिल्लीच्या ऐतिहासिक मैदानांत महाराजांच्या निशाणाखालीं जमला आणि तेथें त्यांनीं युवराजांचें स्वागत केलें. आपल्या स्वार्थत्यागाच्या जोरावर त्यांनीं हें अस्पृश्य वर्गावरील आपलें वजन संपादन केलें. १९२० ची नागपूरची बहिष्कृत परिषद् संपवितांना केलेल्या समारोपाच्या भाषणांत महाराजांनीं आपल्या अस्पृश्योद्धाराच्या उत्कट भावनांचें दिग्दर्शन पुढें लिहिल्याप्रमाणें केलें:—

" मीं तुमची बाजू घेतली आणि तुमचा अध्यक्ष झालों, याबद्दल एका विशिष्ट जातीचे लोक माझ्यावर हल्ला करून लोकमत माझ्याविरुद्ध चिथावीत

आहेत; मात्र यामुळें माझें धैर्य द्विगुणित होऊन माझें मन उत्तेजित होत आहे. या लोकांनीं उत्पन्न केलेलीं संकटें व केलेला अपमान मी मुकाट्यानें सहन करितों. त्यांनीं कांहीं केलें तरी मी तुमच्या सेवेला सर्वदा हजर राहीन. माझ्याकडून सेवा करून घेण्यास तुह्मीं मुळींच कांकूं करूं नका. तुमच्या आशीर्वादानें माझा मुलगा राज्यकारभार पाहण्यास समर्थ झाला आहे. माझ्यावर एखाद्या सत्ताधारी वर्गानें दडपण आणिलें तर आपल्या सेवेकरितां संस्थानचीं सूत्रें, माझ्या युवराजाच्या हातीं देऊन मोकळा होण्यास मी तयार आहें. ''

या उद्गारांचा गर्भित अर्थ काय होता ? ब्राह्मणीं वर्तमानपत्रें या वेळीं त्यांच्यावर टीकेचा भडीमार करीत होतीं. खुद्द त्यांचे नातेवाईक नागपूरचे राजेसाहेब या ब्राह्मणद्वेष्ट्या महाराजांचें स्वागत करण्याचें संकट टाळण्यासाठीं, महाराज नागपुरास गेल्या वेळीं बाहेर गेले होते; आणि एका ख्रिस्ती गृहस्थाच्या बंगल्यांत महाराजांना उतरावें लागलें. अशा तऱ्हेचीं कारस्थानें करून व खुद्द ब्रिटिश अधिकाऱ्यांचेंहि मन महाराजांविरुद्ध कलुषित करून ब्राह्मणद्वेषाबद्दल महाराजांना प्रायश्चित्त देण्याचें ब्राह्मणवर्गानें ठरविलें होतें; आणि या धुमसत असलेल्या संकटास उद्देशूनच महाराजांनीं अधिकारत्यागाची आपली तयारी असल्याचें या प्रसंगीं बोलून दाखविलें.





श्रीमत् क्षात्र जगद्गुरु पीठारूढ झाल्यावेळीं.

## प्रकरण २३ वें.

# क्षात्रजगद्गुरूची स्थापना.



९१७ च्या जूनच्या १० व्या तारखेस कोल्हापूरच्या शंकराचार्य पीठावर डॉ० कुर्तकोटी यांची स्थापना करण्यांत आली. पुढें लवकरच महाराजांनीं क्षत्रिय वर्गाकरितां स्वतंत्र व्यवस्था करण्याचें ठरविलें. या त्यांच्या निश्चयास कुर्तकोटी यांचें, मठाधीश या नात्याचें वर्तन ज्या मानानें कराण झालें तेवढ्याशींच या प्रकरणाचा संबंध आहे. शिवाय यापेक्षां दुसरें महत्त्वाचें कार्यहि त्यांच्या हातून झालेंच नाहीं. कुर्तकोटी हे सामाजिक बाबतींत उदारतत्त्वानुयायी असून, ते राजनिष्ठ आणि नेमस्त राजकीय मताचे आहेत असा महाराजांचा समज असल्यामुळें, शंकराचार्य पीठावर त्यांची निवड करून सामाजिक सुधारणेचें कार्य सोपें करितां येईल अशी त्यांची अपेक्षा होती. शंकराचार्य पीठाच्या जुन्या देहांत पाश्चात्य कल्पनांचें नवीन रक्त घालून समाजोन्नतीचें एक साधन या मठाच्या रूपानें तयार करावें, असा या सुमारास महाराजांचा विचार होता. कुर्तकोटींची निवड करण्यापूर्वी महाराजांनीं प्रो० चिंतामण गंगाधर भानु यांना कोल्हापुरास बोलावून मठांतील एका मोठ्या हुद्यावर नेमूनहि टाकिलें. पुढें क्रमानें त्यांना पीठाधिष्ठित करण्याचाहि महाराजांचा विचार असावा असें दिसतें; परंतु कोणत्या तरि कारणानें अगदीं थोडक्याच दिवसांत प्रो० भानु, एखाद्या धूमकेतुप्रमाणें मठाच्या क्षितिजावरून अस्तंगत झाले. यामुळेंच अधिक हुशार, धोरणी, नरम आणि विश्वासार्ह हस्तक या नात्यानें कुर्तकोटी अधिक उपयोगी होतील, अशा समजुतीनें महाराजांनीं त्यांची योजना केली. मोठमोठ्या अधिकाऱ्यांना भेटून, त्यांच्याशीं पत्रव्यवहार ठेऊन आणि त्याच्या संबंधाच्या गप्पागोष्टींचा सुंदर बाजार मांडून, कुर्तकोटी यांनीं आपली छाप कोल्हापूरच्या घोड्यावर चांगल्याप्रकारें बसविली. गादीवर बसल्यानंतरहि त्यांनीं हें काम चालूच ठेविलें. ब्राह्मणेतर जातींनाहि अघळ-

पघळ वचनें देऊन त्यांनीं आरंभीं खूष करून सोडलें; परंतु गादीवर बसून कांहीं दिवस लोटल्यानंतर त्यांचे पूर्वींचे सर्व विचार बदलूं लागले आणि 'चकाकणारें सर्व सोनेंच नसतें' ही गोष्ट महाराजांच्या लक्षांत येऊं लागली. कुर्तकोटींना गादीवर बसविण्यांत, मनुष्यपरीक्षेच्या बाबतींत महाराजांच्या हातून ज्या थोडया चुका झाल्या त्यांपैकींच एक आपण केली, असें पुढें लौकरच महाराजांच्या अनुभवास आलें. असो.

जूनच्या २९ व्या तारखेस सर्व जातींच्या हिंदु लोकांस वैदिक विद्या शिकविण्याकरितां "छत्रपति संस्कृत विद्यालय" उघडण्याचा समारंभ कुर्तकोटी स्वामींनीं केला; पण कुर्तकोटींच्या सगळयाच चळवळींप्रमाणें हें विद्यालयहि अल्पजीवी ठरलें. मात्र कुर्तकोटींच्या लकाकीमुळें कोल्हापुरांतील ब्राह्मण्य कांहीं कालपर्यंत पुनरुज्जीवित होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. भटशाहीचें प्रस्थ पुनः वाढूं लागलें. मुसलमान काजी आणि जैन स्वामी यांना त्यांचा हक्क दिल्याशिवाय त्या त्या जातींच्या लोकांनीं लग्नें लावूं नयेत, असा या वेळीं महाराजांनीं हुकूम केला. भटशाहीच्या पुनरुज्जीवनाचेंच हेंहि एक फळ होय यांत शंका नाहीं. महाराजांच्या क्षत्रियत्वाविरुद्ध झालेल्या बंडाचे पुढारी राजोपाध्ये, पगारी नोकर या नात्यानें का होईना, पुनः राजवाडयांतील उपाध्येगिरी करूं लागले. संस्थानच्या राज्यकारभारांतहि ब्राह्मणांचें या सुमारास प्राबल्य वाढलें होतें, हें मीं यापूर्वींच सांगितलेलें आहे. सुदैवानें महाराजांच्या मनाचा लंबक उलट दिशेकडे वळण्याची लवकरच वेळ आली आणि ती आली तेव्हां, तो लंबक पूर्णपणें दुसऱ्या बाजूकडेच राहिला. ब्राह्मणेतरांना कुर्तकोटी ज्या आशा दाखवीत होते त्या केवळ दिखाऊ होत्या, हें थोडयाच दिवसांत उघडकीस आलें. उदाहरणार्थ, अस्पृश्यवर्गाच्या दुःखांबद्दल कुर्तकोटी जी सहानुभूति दाखवीत, तिला मिस् क्लार्क होस्टेलच्या महार-विद्यार्थ्यांनीं कस लाविला. लांबूनच कां होईना, मठांत होणारें एका शास्त्र्याचें वेदांतपर व्याख्यान ऐकण्यास त्यांनीं परवानगी मागितली; परंतु मठाच्या एवढया विस्तीर्ण आंगणांत येण्यास देखील कुर्तकोटी यांनीं परवानगी दिली नाहीं ! यूरोपीयनांना आणि खिस्ती झालेल्या महारांना मठांतील सोप्यांत तरी येऊं देण्यास कुर्तकोटी तयार असत; पण या हिंदुधर्मीय लोकांना दरवाजाच्या आंत—जेथें जनावरें जात आणि मलमूत्र विसर्जन करूं शकत अशा ठिकाणींहि—पाऊल टाकूं देण्यास हे अखिल हिंदु लोकांचे जगद्गुरु आणि अद्वैत सिद्धांताचे आचार्य कबूल

होईनात ! " समाज आपणांपासून ज्या सुधारणा अनुकरण्यास तयार असेल तेव-ढयांस संमति देण्यास आपली ना नाहीं, " असें त्यांनीं खाचाखोचाचें पण भ्याड-पणाचें उत्तर दिलें. जोशी आणि कुलकर्णी यांचे वतनी हक्क काढून घेऊन महाराजांनीं कुर्तकोटींच्या अंतःकरणावरील विश्वप्रेमाचा पडदा बाजूस सारिला. ब्राह्मण कुलकर्ण्यांवरील संकट ह्मणजे ब्राह्मण्यावरचें संकट असें ठरवून कुर्त-कोटी महाराजांशीं भांडू लागले आणि आपल्या संस्थानांत तलाठी नेम-ण्याचा बेत जेव्हां महाराजांनीं कृतींत उतरविला तेव्हां मठाच्या उत्पन्नाचा राजीनामा देऊन कुर्तकोटी मोकळे झाले. पुढें राहिलेल्या आठपंधरा दिव-सांत, त्यांनीं केलेलें कर्ज त्यांना भिववूं लागलें व मठांत चूल पेटण्याची देखील पंचाईत पडूं लागली. अशा स्थितींत जगद्गुरुपदाचा त्याग करून, कुर्तकोटी बाहेर पडले.

ज्या कुलकर्णी प्रश्नामुळें कुर्तकोटीची स्थिति या पल्ल्याला पोंचली त्याची थोडीशी हकीकत येथें दिली पाहिजे. १९१८ च्या आरंभींच ब्राह्म-णांच्या पुनरुज्जीवित सत्तेचे जूं बोजड वाटूं लागलें असावें. फेब्रुवारीच्या २२ व्या तारखेस ते आपल्या एका मित्रास लिहितात कीं:- " तुह्मीं त्यांना ( ब्राह्मणांना ) कीतिहि चांगलें वागविलें तरी त्यांच्या इच्छेविरुद्ध झालेल्या एखाद्या गोष्टीमुळें देखील तें सर्व फुकट जातें. त्यांच्याशीं सलोखा करणें अशक्य आहे आणि त्यांच्यांत कृतज्ञता कशी ती मुळींच नाहीं. × × × × माझे आतां चांगले डोळे उघडले. " याच वर्षी मे महिन्यांत महाराज ह्मणतात कीं, " कांहीं तालुक्यांत ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर अधिकारी नेमून मीं पाहिलें आणि या अनुभवावरून असें दिसून आलें कीं, नेमलेले ब्राह्मणेतर पूर्णपणें ब्राह्मणांच्या कारखेत शिरल्याशिवाय ही व्यवस्था चालत नाहीं. " फेब्रुवारीच्या २३ व्या तारखेस तलाठीपद्धति सुरू करण्याचें महाराजांनीं मंजूर केलें. " वतनदार कुल-कर्णी हा पंचायत पद्धति सुरू करण्यास मोठा अडथळा आहे. वतनदार कुलकर्ण्यांचे हक्क कायम ठेऊन, ग्रामपंचायती स्थापन केल्यातर त्याच्या आणि त्याच्या जात-भाईच्या हातीं सर्व अधिकार जातील आणि शेतकरी लोकांच्या हितास धक्का पोंचेल. वतनदार पाटील शेतकरी वर्गापैकींच असल्यामुळें तो पंचायतीच्या कामास धोका आणणार नाहीं, " असा तलाठीपद्धति सुरू करण्याचा हेतु होता. कुलर्ण्यांची नोकरी बंद झाल्यामुळें, आतां खरोखर वतनी जमिनी चालविण्याचें कारण

होतें असें ह्मणतां येणार नाहीं; परंतु महाराजांनीं इतक्या विकोपाला गोष्टी नेण्याचें टाळिलें आणि वतनी जमिनी रयतावा करून कुलकर्ण्यांचा फायदाच करून दिला. कारण त्यामुळें सदरहू जमिनी विकण्याचा नवीन हक्क त्यांना प्राप्त झाला. हा हुकूम जून अखेरपर्यंत अमलांत आला नाहीं, कारण कुलकर्णी लोक चळवळे असल्यामुळें एकदम हा हुकूम अमलांत आणण्याचें महाराजांना धैर्य झालें नाहीं. चारपांच महिने वाट पाहून जुलैअखेर तो अमलांत आणण्याचा निश्चय त्यांनीं कायम केला.

कुलकर्णी वतनावर महाराजांनीं हा जो हल्ला केला त्याचा प्रतिकार करण्याची धडपड केल्यावांचून ब्राह्मण वर्ग स्वस्थ राहणार नव्हताच. या धडपडीचें धुरीणत्व दरबारच्या विश्वासांतील कुर्तकोटींनीं घ्यावें हें मात्र आश्चर्यकारक होतें. कुलकर्णी आणि जोशी यांच्यावांचून "माझें अगदीं चालावयाचें नाहीं," असें ८ जुलै दिवशीं त्यांनीं महाराजांस कळविलें. कुलकर्णी वतनाचा मीं स्वत: ब्रिटिश हद्दींत राजीनामा दिला असून तें बंद करण्याच्या विरुद्ध मी नाहीं, असेंहि ते दुसऱ्या तोंडानें ह्मणत असत. दोनहि पक्षांस खूष करण्याकरितां अशीं विसंगत विधानें ते कांहीं वेळ करीत होते. महाराजांच्या हुकुमाविरुद्ध निषेधप्रदर्शक सभांमध्यें ते केव्हां अध्यक्ष होत, तर तलाठी पद्धतीच्या समर्थनाकरितां भरलेल्या ब्राह्मणेतर सभांतहि ते पुढाकार घेत. त्यांच्या अंत:करणांतील खरें वर्म महाराजांस त्यांनीं लिहिलेल्या एका पत्रांत सांपडण्यासारखें आहे; कुलकर्णी वतनाची मला फिकीर नाहीं परंतु हा ब्राह्मणांच्या अन्नाचा प्रश्न आहे असा त्यांच्या ह्मणण्याचा आशय होता. असल्या तक्रारींचा महाराजांच्या मनावर मुळींच परिणाम झाला नाहीं हें उघड आहे. आपल्या इनाम गांवांत तरी सत्यशोधक मताचें तलाटी मी नेमूं देणार नाहीं असें शेवटीं त्यांनीं कळविलें. ही धमकीहि निष्फळ झाली; आणि चिरडीस येऊन सप्टेंबरच्या १५ तारखेस त्यांनीं सर्व इनामाचा राजीनामा दिला व एक महिन्यानंतर, वर सांगितल्याप्रमाणें, पीठत्याग करून कुर्तकोटींनीं कोल्हापुरास शेवटचा रामराम ठोकला.

महाराजांच्या प्रयत्नांस याप्रमाणें अपशय आलें ही सुदैवाचीच गोष्ट होती. कारण यापुढें त्यांना खूष करण्याचा प्रयत्न त्यांनीं पुन: कधीं केला नाहीं. पुष्कळ दिवसपर्यंत हेलकावे खाणारें महाराजांचें मन आतां अगदीं स्थिर झालें. मराठा समाजाकरितां स्वतंत्र मराठा उपाध्याय वर्ग निर्माण करण्याचें त्यांनीं आतां निश्चित

केलें. असें केल्यावांचून आणि उपाध्यायगिरीचा हक्क ब्राह्मणांकडे ठेऊन त्यांच्याशीं कितीहि गोडीगुलाबीनें अथवा धाकदपटशानें वागून, कायमचा कांहीं फायदा होणें शक्य नाहीं; आणि आपल्यावरील ब्राह्मणांचा दाब या प्रयत्नांनीं कधींहि नाहींसा होणार नाहीं, हें आतां त्यांच्या अनुभवास आलें.

पूर्वींच्या एका प्रकरणांत क्षत्रियांकडे समाजाचें धार्मिक आणि सामाजिक बाबतींतहि धुरीणत्व होतें हें दाखविलेलें आहे. अगदीं अलीकडच्या काळापर्यंत राजाकडे समाजनियंत्रणाचे हक्क चालत आलेले होते; आणि इतर समाजांच्या बौद्धिक अध:पाताचा फायदा घेऊन ब्राह्मण वर्गाचे जगद्गुरु समाजशासनाचा अधिकार बळकावीपर्यंत राजे लोक नि:संशयपणें तो अधिकार चालवीत. मुसलमानी कारकीर्दीनंतरसुद्धां हाच क्रम चालू होता. मराठेशाहींतहि समाज नियंत्रणाचें काम छत्रपतीच करीत होते. पेशवाईच्या ऐन अमदानींत देखील जगद्गुरूंनीं हा अधिकार आपल्याकडे असल्याचा केव्हांहि दावा केला नाहीं. १७६४ सालीं कोल्हापूरच्या महाराणी जिजाबाईसाहेब या संभाजीमहाराजांच्या समाधीजवळ एक आवार-भिंत बांधवीत होत्या. जगद्गुरूंना ही गोष्ट पसंत नव्हती, ह्मणून उपवास करून आणि समाधीजवळचें वृंदावन अशुभसूचक रीतीनें कंपाय मान होत आहे अशा बातम्या उठवून त्यानें राणीसाहेबांस घाबरें करण्याचा प्रयत्न केला. याचा कांहीं उपयोग होईना; तेव्हां त्यानें मिरजेच्या पटवर्धनांना राणीसाहेबांच्या ब्राह्मणद्वेषास आळा घालण्याकरितां पाचारण केलें; तरीहि जिजाबाईसाहेबांनीं स्वामीला धाब्यावरच बसविलें. थोड्या दिवसानंतर पटवर्धनांना मठ लुटण्याची इच्छा झाली. जगद्गुरूंनीं या ब्राह्मण सरदारांस परोपरीनें सांगितलें, परंतु स्वामीचें ह्मणणें गुंडाळून ठेऊन पटवर्धनांनीं मठ जाळून टाकिला आणि आपलें अवमानित जीवन जीभ हांसडून घेऊन जगद्गुरूला संपवूं दिलें ! या उदाहरणावरून या जगद्गुरूचें वर्चस्व खरोखर किती होतें, हें यावरून स्पष्ट दिसून येतें. आज कुर्तकोटींनीं आपल्या एका पूर्वजाचेंच पाउलावर पाऊल ठेवून त्रागा केला होता; परंतु महाराजांनीं आपल्या पूर्वजांच्या फारच पुढें पाऊल टाकून, या आधुनिक जगद्गुरूला पूर्णपणें झुगारून देण्याचा निश्चय केला होता.

शंकराचार्यमठांत याप्रमाणें क्रांति होऊन दोन वर्षें लोटलीं. या कालांत ब्राह्मणेतर चळवळीचीं पाळेमुळें खोल रुजलीं व महाराजहि त्या चळवळीशीं अधिकच तद्रूप झाले. यासंबंधीं सविस्तर हकीकत दुसऱ्या एका स्वतंत्र प्रकरणांत देण्यांत

येईल. १९२१ सालीं क्षात्रजगद्गुरु असें पाठगांवपीठाच्या अध्यक्षास नामाभिधान देऊन, महाराजांनीं या प्रकरणाचा जो शेवट केला त्याच्याशीं या चळवळीचा जेवढा संबंध होता तेवढाच येथें निर्देश करणें जरूर आहे. ही संस्था कोणत्या धार्मिक सिद्धांताच्या आधारावर रचिलेली होती ? आधींच नादान ठरलेल्या व दुर्वर्तनाचें माहेरघर बनलेल्या अनेक मठांतच या एका मठाची भर महाराजांनीं घातली. महाराजांनीं ही संस्था काढून सुधारणेचें पाऊल मागें ढकलिलें; अशा प्रकारची टीका त्यांच्यावर अनेकांकडून करण्यांत आली आहे. या टीकाकारांत महाराजांचे प्रतिपक्षीच नसून, कांहीं विद्वान् मराठा पुढारीहि आहेत. यामुळें, कोणत्या परिस्थितीमुळें आणि कोणत्या विचारांनीं प्रेरित होऊन महाराजांनीं ही योजना केली, हें येथें सांगणें जरूर आहे.

ब्राह्मण उपाध्याय हा जातिविशिष्टतेवरच अवलंबून असतो. जन्मानें ब्राह्मण असल्यावांचून, हें काम करण्याचा कोणास अधिकार नाहीं, असा या ब्राह्मणी रचनेचा पाया आहे. उपाध्यायगिरी हें एक गूढ व संकीर्णशास्त्र असून, तिचा प्रभाव ती ब्राह्मणांच्या हातीं असेंतोंपर्यंतच राहतो, असा दुसरा एक ब्राह्मणी संस्कृतीचा सिद्धांत आहे. ह्मणजे मनुष्याच्या आध्यात्मिक उन्नतीचें हा जन्मसिद्ध उपाध्याय किंवा त्यांचा मुख्य जो जगद्गुरु तो अगदीं अपरिहार्य साधन आहे, असें झालें. आपल्या गुरूनें दिलेल्या गूढ 'मंत्रोपदेशा'मुळें त्यास दैविक सामर्थ्य प्राप्त झालेलें असतें असा जगद्गुरुपीठांचा आणखी एक सिद्धांत आहे. रोमनचे पोपहि याच प्रकारचा ईश्वरदत्त अधिकार आपणांस असल्याचें प्रतिपादन करीत, हें वाचकांच्या लक्षांत येण्यासारखें आहे. हें गुरूंचें बंड इतकें वाढविण्यांत आलें आहे कीं, खुद्द परमेश्वराहूनहि आपण श्रेष्ठ आहों-गुणानें नव्हें तर जन्मसिद्ध हक्कानें श्रेष्ठ आहों - असें ढोंग माजविण्यासदेखील त्यांनीं मागेपुढें पाहिलेलें नाहीं ! आतांपर्यंतच्या जगद्गुरुपीठांची रचना अशा सिद्धांतावर झालेली होती. हे सर्व सिद्धांत महाराजांनीं अजीबात झुगारून दिलेले होते. त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या एका लेखांत निरनिराळ्या पुराणग्रंथांतून या ब्राह्मणी भाकड कथांचा संग्रह केलेला आहे. या कथांचा निष्कर्ष कबिराच्या भाषेंत त्यांनीं असा काढिला आहे कीं, आपणांस ईश्वरांश अथवा अवतार ह्मणविणारे सगळे विषयलंपट असून, त्यांच्यावर विश्वास ठेवण्यांत अर्थ नाहीं. "कित्येक लोक ह्मणतात त्याप्रमाणें पुराणें जर ऐतिहासिक असतील तर, कबिराच्या या ह्मणण्यावरून त्या त्या काळची नैतिक

स्थिति कशी होती हें दिसून येतें. दुसरे कित्येक ह्मणतात त्याप्रमाणें पुराणें जर काल्पनिकच असतील तर या कल्पनांचा प्रसार करणाऱ्या ऋषींच्या काळीं त्यांनीं कशा प्रकारच्या नीतीचा आदर्श लोकांपुढें ठेविला हें दिसून येतें. " ही महाराजांची टीका यथार्थ दिसते. मत्स्यपुराणांत ब्राह्मणेतरांच्या स्त्रियांना उपदेशिलेलें व्रत किती भ्रष्टतेचें आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. महाभारतांत सुदर्शन राजाची अशीच कथा सांगण्यांत आली आहे. कोणत्याहि ब्राह्मणास आपला देह अर्पण करून यमराजाच्या भयापासून मुक्त होण्याचा या क्षत्रिय वीरानें आपल्या पत्नीस उपदेश केला व तो तिनें अमलांतहि आणिला, अशी ही ब्राह्मणी कथा आहे. अशा कथांवर लोकांचा विश्वास बसण्याचें कारण ती सांगणाऱ्या उपाध्यायांच्या आणि धर्मगुरूंच्या जन्मसिद्ध आणि मंत्रसिद्ध ईश्वरांशतेवर लोकांची असलेली श्रद्धा हेंच होय. ईश्वराचें स्वरूप आणि त्याचा मानवांशीं संबंध, याबद्दल लोकांच्या ज्या कल्पना असतील, त्यांच्या बरेंवाईटपणावरच ही उपाध्येगिरी अवलंबून असते. महाराजांनीं या मूळ कल्पनांवर जबरदस्त आघात केले होते. " आव्हान " नामक एका अप्रसिद्ध परंतु छापलेल्या महाराजांच्या लेखांत ते ह्मणतात कीं, ' परमेश्वराला पूजा, श्रद्धा, किंवा प्रार्थना यांची कांहीं गरज नाहीं. तो आपल्याच कायद्यांनीं बद्ध झालेला कैदी असल्यामुळें तो सर्वशक्ती नाहीं. नुसती भक्ति आणि प्रार्थना हीं व्यर्थ आहेत. मनुष्याची स्तुति करून किंवा मध्यस्थास पैसे देऊन, एक मनुष्य दुसऱ्याला प्रसन्न करून घेईल; परंतु अशा प्रकारें परमेश्वराला प्रसन्न करणें शक्य नाहीं. परमेश्वर सर्वव्यापी आणि सर्वसाक्षी असेल तर त्याला मध्यस्थाची, स्तुतीची, प्रार्थनेची किंवा श्रद्धेची काय जरूरी आहे ? ह्मणून स्तुती करावी मनुष्याची, करूं नये व्यर्थ कधीं परमेश्वराची असें मला वाटतें. ईश्वराला चांगलीं कृत्यें पाहिजेत, स्तुति नको. ईश्वरप्रणीत ग्रंथ खोटे आहेत. एकाद्या उपाध्याजवळ आपले अपराध कबूल केल्यानें आपण पापमुक्त होतों ही ख्रिस्त्यांची कल्पना खोटी आहे. " अशा तऱ्हेच्या विचारांनीं महाराजांचें मन या वेळीं भरलेलें असल्यामुळें, त्यांच्याकडून ब्राह्मणांच्या उपाध्याय पद्धतीचें आणि गुरुकल्पनेचें समर्थन मुळींच होण्यासारखें नव्हतें; मात्र समाजहिताकरितां कोणत्याहि धार्मिक संस्थांची जरूरी नाहीं, असें मात्र यावरून सिद्ध होत नाहीं. रोमन कॅथॉलिक पंथांतील धर्मगुरूंच्या नैतिक दुराचारांमुळें कंटाळलेल्या आणि पोपचें बंड मोडून टाकण्यास सज्ज झालेल्या ल्युथरसारख्या धर्मसुधारकांनीं धर्मसंस्थांचें आमूलाग्र

उच्चाटन करण्यास कधींहि सांगितलें नाहीं. उलट त्यांनीं पूर्वीच्या धर्मसंस्था-सारख्याच पण दोषरहित आणि सुधारलेल्या संस्था अस्तित्वांत आणिल्या. क्षात्र-जगद्गुरु आणि शिवाजी वैदिक शाळा काढण्यांत महाराजांचा हेतु या प्रॉटेस्टंट सुधारकांसारखाच होता. १९१९ सालीं कऱ्हाड येथें भरलेल्या सत्यशोधक परिषदेचे अध्यक्ष श्रीयुत मुकुंदराव पाटील, दीनमित्रकर्ते, यांनीं ह्मटल्या-प्रमाणें सत्यशोधक लोकांना धर्माध्यक्ष अगर धर्मगुरु नको आहेत असा प्रकार नव्हता. समाजाचा मुद्दा इतकाच आहे कीं, कोणत्याहि विशिष्ट चिन्हांनें धर्म मर्यादित झाला आहे असें मानूं नये. जो कोणी परमेश्वर आणि भक्त यांच्या-मध्यें अज्ञानाची भिंत उभी करून स्वतःला कांहीं तरी फायदा करून घेऊं पाह-तात,अशा गुरूंवरच समाज बहिष्कार टाकितो. जैन, लिंगायत पार्शी आणि मुसलमान यांचे स्वतंत्र धर्मगुरू असले तरी ते समाजास सहाय्यकच होतात. याप्रमाणें सत्य-शोधक मताचे एक कट्टे पुढारी श्रीयुत पाटील यांच्या मतास अनुसरून महाराजांनीं मराठे उपाध्याय आणि धर्मगुरु स्थापन करण्याचा उद्योग आरंभिला. १९२० च्या जून १५ तारिखेस नव्या जुन्या राजवाडयांत, पूर्वजांच्या छत्रीवर वगैरे, सर्व पूजार्चा मराठ्यांच्या हस्तें करवावी व त्याकरितां मराठा विद्यार्थी शिकवून तयार करावे, अशी महाराजांनीं आज्ञा दिली. या आज्ञेचा अंमल ताबडतोब झाला नाहीं ह्मणून त्यांनीं २६ तारिखेस दुसरा हुकूम काढिला. 'छत्रपतींचा वंश रामकृष्णादिकां-पासून जन्मलेला असून तो मराठा क्षत्रियांचा आहे; परंतु ब्राह्मण मात्र शूद्र आहेत; असें असून या कनिष्ट लोकांकडून धर्मविधी करविल्यामुळें तंजावर, सातारा, नागपूर वगैरे ठिकाणीं वंशक्षय झाला असून कोल्हापुरासहि पुष्कळ दत्तक झाले आहेत; ह्मणून ब्राह्मणांकडून पूजा करविण्याची पद्धति बंद करावयाची असें महाराजांनीं ठरविलें आहे,' असा या आज्ञेंत उल्लेख केला आहे.

याप्रमाणें १९२० जुलैच्या ६ तारखेस शिवाजी-क्षत्रिय-वैदिक-पाठशाळा मे॰ बाबासाहेब खानवीलकर यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू करण्यांत आली. पहिलें दिवशीं १४ विद्यार्थी हजर असून वर्षअखेर त्यांची संख्या ६२ झाली. या-प्रमाणें तयार झालेलीं मराठा मुलें राजवाडयांतील सर्व धर्मविधी करूं लागली. एका वर्षांतच सुमारें ५०० लग्नें वैदिक पद्धतीनें त्यांनीं लाविलीं. या विद्यार्थ्यांत पहिलेच वर्षीं एकजण भोई जातीचा होता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या-प्रमाणें पाया घातल्यानंतर क्षत्रिय वर्गाच्या शिस्तीसाठीं एक मुख्य धर्मगुरु महा-



शिवाजी वैदिक पाठशाळेचे विद्यार्थी व मध्यभागीं बसलेले
क्षात्र जगद्गुरु व श्री बाबासाहेब खानवीलकर.

राजांना अवश्य वाटूं लागला. बराच तपास केल्यानंतर या उच्च स्थानाकरितां महाराजांनीं श्रीयुत सदाशिवराव पाटील या नांवाच्या फर्ग्युसन कॉलेजांत शिकणाऱ्या तरुण मराठ्यास पसंत केलें; व पाटगांव येथील मठाच्या पीठावर समारंभपूर्वक त्यांनीं आरोहण केलें. शिवछत्रपतींच्या काळांत होऊन गेलेल्या मौनीबुवा नामक ब्राह्मणेतर साधूनें या मठाची स्थापना केली. मौनीबुवाची प्रसिद्धि इतकी होती कीं, खुद्द शिवछत्रपतींनीं पाटगांवास जाऊन बुवांचें दर्शन घेतलें व कांहीं गांवें इनाम करून दिलीं. शिवछत्रपति आणि मौनीबुवा यांनीं मिळून लाविलेल्या या मठरूपी वृक्षावर आतां महाराजांनीं नवीन कल्पनांचें कलम लाविलें. या नव्या जगद्गुरूस त्यांची इच्छा असल्यास लग्न करण्याची परवानगी देऊन इतर मठांत होणाऱ्या नीतिभ्रष्ट गोष्टी येथें होऊं नयेत, असा महाराजांनीं बंदोबस्त केला. मात्र मठावर जगद्गुरूचा खासगी लोभ राहूं नये ह्मणून, त्याच्या वंशजांस गादीवर कांहीं हक्क नाहीं असें त्यांनीं जाहीर केलें. नवीन जगद्गुरु बनवावयाचा तो दरबारच्या संमतीनेंच बनवावयाचा असेंहि एक कलम महाराजांनीं या ठरावांत घातलें आहे.

पुढें थोड्याच दिवसांत ह्मणजे २४ जानेवारी १९२१ दिवशीं महाराज नव्या जगद्गुरूंना लिहितात—"आपण आपल्या कार्यास जलदीनें सुरवात करा. तत्त्वज्ञानाचा अभ्यास चालू ठेवा. परमेश्वर आणि मनुष्य यांच्यामधील सर्व दलाल नाहींसे करणें हें आपलें ध्येय असलें पाहिजे. इतर स्वामीप्रमाणें आपण वागूं नका. देशसेवा आणि जनसेवा हेंच आपल्या जीवितांचें मुख्य कार्य असलें पाहिजे."

कोणतीहि संस्था सुरू करण्यापेक्षां ती पुढें जोमांत आणणें अधिक महत्त्वाचें असतें, ही गोष्ट लक्षांत ठेवून आपल्या आयुष्याच्या उरलेल्या थोड्या दिवसांत महाराजांनीं पुष्कळ प्रयत्न केला. मुधोळच्या राजेसाहेबांची सहानुभूति संपादन करून त्यांच्या करवीं मुधोळ येथें १९२१ च्या नोव्हेंबर महिन्यांत क्षात्र जगद्गुरूंचें स्वागत करविलें, हें या प्रयत्नाचेंच फळ होय. बाहेरच्या लोकांप्रमाणेंच स्वतःच्या कुटुंबांतील मंडळींचीं मनें या सुधारणेस अनुकूल करून घेणें अत्यंत जरूरीचें होतें. महाराणी लक्ष्मीबाईसाहेब यांच्या मनावर महाराजांच्या शिकवणुकीचा बराचसा परिणाम झाला असल्यामुळें त्या अस्पृश्योन्नतीचे कामीं झटतच होत्या. पुढें पुराणांतील ब्राह्मणी दंतकथांचें सत्यस्वरूप आणि ब्राह्मणी वर्तमानपत्रांनीं महाराज

आणि त्यांचे कुटुंबीय यांविरुद्ध चालविलेली मोहीम, यांचें स्पष्टीकरण करून महाराजांनीं राणीसाहेबमहाराजांचे विचार परिपक्व आणि दृढ केले. नंतर खुद्द युवराजांच्या मताविषयीं तेवढी त्यांना चिंता राहिली. इंग्लंडांतील शिक्षणाने युवराजांचें मन न्यायप्रिय आणि समतावादी झालेलें होतें; मात्र अनुभवाच्या अभावीं ही सरळ समताबुद्धि फसली जाण्याचा संभव होता. युवराजांच्या बाबतींत ही भीति देखील बाळगण्याचें कारण नव्हतें; कारण यापूर्वींच्याच काळांत घडलेल्या कुलकर्णी वतनाच्या भानगडींची युवराजांनीं स्वतःच चौकशी केलेली असून, त्यांना मनुष्यस्वभावाची आणि ब्राह्मण ब्राह्मणेतरांच्या विशिष्ट गुणावगुणांची चांगली माहिती होत चालली होती.



# प्रकरण २४ वें.

# हिंदी संस्थानिक वर्गाविषयीं प्रश्न.

१



आमच्या संस्थानिकांची संख्या, त्यांच्या ताब्यांतील मुलुखाचा विस्तार, एकमेकांशीं त्यांचा असलेला तुटकपणा त्यांच्या राज्यपद्धतीचें विशेष स्वरूप, वगैरे गोष्टी लक्षांत घेतल्या असतां भविष्य काळच्या हिंदी राष्ट्राच्या रचनेंत त्यांची योग्य व्यवस्था लावणें किती कठीण काम आहे, हें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. हें काम जितकें कठीण आहे, तितकेंच आवश्यकहि आहे; अर्थातच हा प्रश्न सोडविण्याकडे श्रीशाहुछत्रपतींसारख्या दीर्घदृष्टी मनुष्यांचें लक्ष लागल्यावांचून राहणें शक्य नव्हतें. अगदीं आरंभापासून जातिगोतीचा विचार न करितां इतर संस्थानिकांच्या हितसंबंधांत महाराज लक्ष घालीत असत. खैरपूरच्या अमीरांच्या घरगुती पण महत्त्वाच्या भांडणाचा निकाल करण्याकरितां १९०२ पासून अखेरपर्यंत ते प्रयत्न करीत होते. मिरजेंतील अशाच तऱ्हेच्या एका भांडणांत त्यांना अलीकडे मन घालावें लागलें. औंधच्या पदच्युत पंतप्रतिनिधींना बरोबर न्याय मिळावा ह्मणून १९०७ सालापासून ते सतत प्रयत्न करीत होते. लॉर्ड मिंटोसाहेबांनीं संस्थानिकांची वार्षिक परिषद् भरविण्यास प्रारंभ केल्यापासून, असल्या प्रश्नांचा अधिक विस्तृत आणि व्यवस्थित दृष्टीनें विचार करणें महाराजांना शक्य झालें. सभांमध्यें उभें राहून बोलण्याची महाराजांना संवय नव्हती, त्यामुळें इतर कांहीं संस्थानिकांच्या कामाप्रमाणें त्यांच्या कामाचा वर्तमानपत्रांतून गाजावजा होत नसे; परंतु या बाबतींतील त्यांची कामगिरी अत्यंत महत्त्वाची होती, हें सहज सिद्ध करितां येण्यासारखें आहे.

कोल्हापूर संस्थान "अल्पवयी संस्थानिकांचें मातृगृह" आहे, असें महाराज ह्मणत असत; त्यामुळें अल्पवयी संस्थानिकांच्या शिक्षणाबद्दल व हितसंबंधां-

बद्दल स्वाभाविकपणेंच त्यांना विशेष कळकळ वाटे. १९१६ सालच्या संस्थानिक परिषदेच्या अगोदर त्यांनीं याबद्दल आपले विचार पुढें लिहिल्याप्रमाणें कळविले. " शिक्षणाकरितां आपलीं मुलें दूर पाठविण्याची संस्थानिकांची तयारी नाहीं हें ह्मणणें खोटें आहे. डेक्कन किंवा एल्फिन्स्टन कॉलेजसारख्या विद्यालयांत किंवा इंग्लंड आणि अमेरिका यांसारख्या देशांस आपल्या कुमारांना पाठविण्यास ते तयार असतात, इतकी त्यांना शिक्षणाविषयीं काळजी असते; परंतु संस्थानिकांच्या कॉलेजांत ते मुलें पाठवीत नाहींत, कारण हीं कॉलेजें योग्य रीतीनें चालविलीं जात नाहींत. यूरोपीयन शिक्षक आणि चांगल्या कुटुंबांतील यूरोपीयन मुलें या शाळांत राहिल्यास विद्यार्थीदशेंतील संस्थानिकांना अतिशय फायदा होईल. "

आपल्या मुलांचें शिक्षण कोणत्या प्रकारें चालवावें, ही गोष्ट सर्वस्वीं संस्थानिकांच्या मर्जीवर सोंपविली पाहिजे, असें महाराजांना वाटे. आपला राज्यकारभार चालविण्यास जर ते योग्य समजले जातात, तर आपल्या मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत त्यांच्यावर विश्वास कां ठेवूं नये ? अल्पवयी संस्थानिक इंग्रज सरकारच्या देखरेखेखालीं असणें हें वाजवीच आहे. " परंतु अशा प्रसंगीं कित्येक महत्त्वाच्या मुद्यांकडे दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. केव्हां केव्हां आपल्या संस्थानापासून कुमारांना अगदीं दूर ठेवण्यांत येतें आणि एकाद्या यूरोपीयन बाईच्या अथवा गृहस्थाच्या हातीं त्यांना सर्वस्वीं देण्यांत येतें. लहानपणापासून अशा तऱ्हेचें शिक्षण मिळाल्यामुळें, आपल्या धर्माबद्दल आणि चालीरीतींबद्दल त्यांना मुळींच आदर वाटत नाहीं. आपल्या लोकांच्या वर्तनपद्धतीविषयीं त्यांना कांहींच सहानुभूति राहात नाहीं. × × × × हें बिलकूल इष्ट नाहीं. आपलें कुटुंब, आप्तइष्ट आणि प्रजाजन यांच्याशीं त्यांचा वारंवार परिचय झाला पाहिजे आणि बाल्यावस्थेपासून त्यांना कुटुंबाची आणि संस्थानची आणि लोकांची पूर्वपरंपरा व रीतीरिवाज समजले पाहिजेत. "

हल्लींच्या राजकुमार कॉलेजाबद्दल त्यांना किती असमाधान वाटे, हें यापूर्वींच सांगितलेलें आहे. कित्येक संस्थानिकांना महाराजांचीं हीं मतें पसंत नव्हतीं. स्वभावतःच महाराज सामान्य जनतेस चिकटून राहणारे होते.

दुसऱ्या कित्येक संस्थानिकांना अशा लोकांशीं आपलीं मुलें मिसळणें बिलकूल आवडत नसे. बहुधां त्यांचीं तोंडें बंद करण्याकरितांच, निदान वरिष्ठ युरोपीयन अधिकाऱ्यांचीं मुलें राजकुमार कॉलेजांत घालावीं, असें महाराज प्रतिपादन करीत होते. " हीं कॉलेजें हल्लीं जशीं आहेत तशींच राहिल्यास, ज्या अल्पवयी संस्थानिकांना कोणीच पाठीराखा नसेल, तेच तेवढे त्यांत जातील, " असें एकदां महाराजांनीं स्पष्टच सांगितलें. या संस्था सुधारण्याचा उपाय ह्मणून, युरोपीयन वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं आपलीं मुलें या कॉलेजांत पाठविलीं पाहिजेत, असा जो महाराजांनीं उपाय सुचविला, तो किती दूरदर्शीपणाचा होता, हें उघड आहे.

राजकुमारांच्या शिक्षणाचें ध्येय किती उच्च असलें पाहिजे, हें महाराजांच्या लक्षांत पूर्णपणें आलें होतें. १९१६ सालच्या एका लेखांत त्यांनीं पुढील उद्गार काढिले आहेत. " देशाची परिस्थिति झपाट्यानें बदलत चालली आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. . चालू महायुद्धानंतर, लढाईकरितां निरनिराळ्या देशांत गेलेले हिंदी लोक, अपरिचित कल्पनांनीं भारलेलीं अंत:करणें बरोबर घेऊन या देशास परत आल्यानंतर आणि पूर्वींपेक्षांहि अधिक मोठ्या मागण्या ते करूं लागल्यानंतर, ही स्थिति अधिकच झपाट्यानें बदलेल. यामुळें ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यकारभारांत अधिक हिस्सा मागण्यांत येईल आणि या चळवळीचा परिणाम हिंदी संस्थानांतहि होऊन, नंतर आपल्या परिस्थितींतील अडचणी संस्थानिकांच्या लक्षांत येतील; करितां या मागणीस उत्तर देण्यास आपण आतांपासूनच तयार झालें पाहिजे. × × × × आमच्या प्रजेच्या मागण्या कबूल करण्यास आह्मी तयार नसलों तर, ते अनेक प्रकारच्या अडचणी उपस्थित करतील, व आमचा राज्यकारभार चिंतायुक्त होईल. " आपल्या संस्थानिक बांधवांना पाठविलेल्या आणखी एका लेखांत, " हिंदी संस्थानिकांचे प्रजाजन संस्थानिकांना आपल्याहून श्रेष्ठ दर्जाचे व कधींहि चुका न करणारे आतां समजत नसून, ब्रिटिश हद्दींतील अर्वाचीन पद्धतीस अनुसरून संस्थानिकांनीं प्रजेचें हित वाढविलें पाहिजे, असें त्यांना वाटत आहे, " असा महाराजांनीं उघड इषारा दिला. अशा परिस्थितींत, " जेथें आमच्या वर्गाचे मूठभर लोकच — आणि तेहि नव्या सुधारणा स्वीकारण्यास तयार नसलेले लोकच — आह्मांस परिचित होतील, अशा संस्थांत ( प्रजाजनांच्या या चळवळीस ) योग्य वळण लावून, तींत पुढाकार घेण्यास ज्या

शिक्षणानें पात्रता येईल असें शिक्षण मिळेल कीं काय ? " हा प्रश्न संस्थानिकांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा होता. राजकुमार कॉलेज ह्मणजे ऑक्सफर्ड किंवा केंब्रिज येथील कॉलेजांसारखें कॉलेज बनून त्यांत सरदार लोकांचींच नव्हे तर " सुखवस्तु सुशिक्षित हिंदी लोकांचीं मुलें उच्च शिक्षण घेण्याकरितां घ्यावींत, " असें महाराजांनीं सुचविलें. " हा मार्ग स्वीकारिला नाहीं तर "—महाराज विचारतात—" आपल्या शाळांमध्यें आणि विश्वविद्यालयांमध्यें जे मोठे फायदे होतात, असें इंग्रज लोक योग्य अभिमानानें ह्मणतात, ते फायदे आमच्या अपूर्ण स्थितींतील संस्थांपासून आह्मांस कसे मिळवितां येतील ? " हिंदी संस्थानिकांनीं आजहि या प्रश्नाचें योग्य उत्तर दिलेलें नाहीं. मात्र महाराजांनीं केवळ पोकळ शब्दांच्या रूपानें आपलें ह्मणणें संस्थानिक आणि सरकार यांच्यापुढें मांडिलेलें नसून, स्वतःच्या मुलांच्या शिक्षणाचे बाबतींत हे विचार अमलांत आणण्याचा महाराजांनीं शक्य तेवढा प्रयत्न केला होता, हें कोणासहि कबूल करावें लागेल.

२

पुष्कळ संस्थानिकांना ब्रिटिश हिंदुस्थानांत वाढत असलेल्या लोकसत्तावादाच्या चळवळीचा आपल्या संस्थानाशीं कांहीं संबंध नाहीं, असें वाटत असतें. महाराजांना ही विचारसरणी मुळींच पसंत नव्हती, हें आतांपर्यंत वाचकांच्या लक्षांत आलें असलें पाहिजे. " आमचीं संस्थानें हिंदुस्थानच्या इतर भागांपासून अलग एक तृतीयांश नसून, प्रत्येक संस्थानच्या हद्दीस ब्रिटिश हद्द लागलेली आहे. × × × आणि संस्थानिकांची इच्छा असो वा नसो, तेथील राजकीय सुधारणेचा परिणाम संस्थानांवर जबरदस्त रीतीनें होत आहे. " " तत्त्वतः संस्थानें आणि ब्रिटिश हद्द यांनीं एकमेकांत हात घालूं नये, हें ठीक आहे; परंतु यामुळें संस्थानांच्या हल्लींच्या परिस्थितींतील भानगड नाहींशी झाली, असें मात्र नाहीं. " महाराजांच्या मतें संस्थानें आणि इंग्रजी मुलुख यांचे संबंध इतके निकट होते कीं, उभयतांच्या हितसंबंधांच्या प्रश्नांचा निर्णय करण्याकरितां कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें, अशा प्रश्नांच्या विचारापुरतें बसण्याचा, हिंदी संस्थानिकांच्या प्रतिनिधींना अधिकार द्यावा, असें सुधारणांची चर्चा चालल्या वेळीं त्यांनीं सुचविलें होतें. ही सूचना अमलांत आणण्यास अडचणी होत्या हें खरें आहे; परंतु तिचें समर्थन करण्यास योग्य कारणें नाहींत, असें ह्मणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ १९२३ सालीं बजेट चर्चेच्या वेळीं लेजिस्लेटिव्ह

असेंब्लीमध्यें झालेला वादविवाद घ्या. पोलिटिकल आणि फॉरेनडिपार्टमेंटकरितां मंजूर करावयाच्या रकमेबद्दल असेंब्लीपुढें दरसालप्रमाणें त्या वेळीं प्रश्न आला. ही रक्कम कमी करण्याच्या उपसूचनेच्या निमित्तानें असा प्रश्न असेंब्लीपुढें मांडण्यांत आला कीं, ब्रिटिश हद्दींत संस्थानिकांचें रक्षण करण्याकरितां असेंब्लीपुढें जर एखादें बिल आणितां येतें, तर त्या संरक्षणास संस्थानिक पात्र आहेत कीं नाहींत याची चर्चा करण्याचा असेंब्लीस कां अधिकार असूं नये ? संस्थानिकांच्या दृष्टीनें असलेच दुसरे प्रश्नहि मांडतां येतील. संस्थानिकांच्या प्रजेसहि द्यावे लागणारे मिठावरील करासारखे किंवा परदेशांतून येणाऱ्या मालावरील जकातीसारखे कर बसविण्याचा प्रश्न ज्या असेंब्लींत चर्चेला येतो, तेथें आपले प्रतिनिधी कां असं नयेत ? या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे.

हे गुंतागुंतीचे प्रश्न १९१७ सालापासून महाराजांच्या मनांत घोळत होते; आणि त्यांचा निर्णय योग्य रीतीनें व्हावा ह्मणून महाराज पराकाष्ठेचा प्रयत्न करीत होते. त्यांनीं उपस्थित केलेल्या कांहीं प्रश्नांचें स्वरूप इतकें नाजूक होतें कीं, त्यासंबंधानें आपलीं मतें प्रदर्शित करण्याचें पुष्कळांना धैर्य नव्हतें. पोलिटिकल अधिकाऱ्यांशीं संस्थानिकांचा मतभेद झाल्यास काय घोटाळे होतात हा अशापैकींच एक प्रश्न होता. तो व इतर प्रश्न मि० मॉंटेग्यु व लॉर्ड चेम्सफर्ड यांच्यापुढें मांडण्याकरितां त्यांच्याकडे डेप्युटेशन पाठवावें, अशी १९१७ च्या ऑक्टोबर महिन्यांत त्यांनीं प्रमुख संस्थानिकांना विनंति केली. कित्येकांनीं वरील प्रश्न या अधिकाऱ्यांपुढें मांडणें मोठें नाजूक काम आहे, असा स्पष्ट अभिप्राय दिला. पुष्कळ चर्चा करून अखेर डेप्युटेशन पाठविण्याच्या सूचनेस त्यांनीं यश मिळविलें. डेप्युटेशनशिवाय स्वतंत्र रीतीनें डिसेंबरच्या १२ तारिखेस महाराजांनीं मॉंटेग्यु साहेबांची मुलाखत घेतली. संस्थानिकांच्या अडचणी मोकळया मनानें त्यांनीं मॉंटेग्यु साहेबांपुढें मांडिल्या आणि त्या दूर करण्याकरितां एक स्वतंत्र ट्रायब्युनल स्थापन करावें, अशी त्यांनीं सूचना केली. याच वेळीं हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या चळवळीबद्दलहि उभयतांमध्यें वाटाघाट झाली. ‘ या चळवळीचा परिणाम संस्थानावर होणारच, ’ असें त्यांनीं मॉंटेग्यच्या प्रश्नास उत्तर दिलें; मात्र लोकांना आपले हक्क समजण्याकरितां सक्तीच्या शिक्षणाचा अवलंब केला पाहिजे व जातिभेद मोडून टाकिला पाहिजे, हे आपले नेहमींचे सिद्धांतहि त्यांनीं स्पष्ट करून सांगितले.

या मुलाखतींतील सर्वांत महत्त्वाचा प्रश्न ह्मणजे ' ट्रायब्युनल ' चा प्रश्न होय. संस्थानिक आणि संस्थानिक, तसेंच साम्राज्यसरकार आणि संस्थानिक यांच्यामधील मतभेदांचे प्रश्न आणि संस्थानिक आणि त्यांचे जहागिरदार यांच्यांतील वादांचे मुद्दे, यांचा निर्णय करण्याचें काम हल्लीं सरकारच्या पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या मर्जीवरच बहुतांशीं अवलंबून असतें. " संस्थानिकांच्या हिताबद्दल अत्यंत काळजी बाळगणारे सन्मान्य पोलिटिकल अधिकारी " पुष्कळ असून त्यांच्याबद्दल महाराजांना आदरभावच वाटत असे. " सरकारच्या धोरणाबद्दलहि माझी तक्रार नाहीं. मोंगल बादशहा आणि पेशवे यांच्या मांडलिक राजांविषयींच्या धोरणाची ब्रिटिश सरकारच्या ( एतद्विषयक ) धोरणाशीं तुलनाच करितां येणार नाहीं. सरकारनें आपण होऊनच संस्थानिकांची परिषद् भरविण्याचा प्रघात पाडविला आहे, यावरून ही गोष्ट उघड होते; " परंतु कित्येक वेळां पोलिटिकल ऑफिसरांच्या एकपक्षी व गुप्त रिपोर्टावरूनच वरच्यासारख्या वादांचा निर्णय केला जातो. जर त्यांचें एखाद्या संस्थानिकाशीं बिनसलें तर हे रीपोर्ट किती पूर्वग्रहदूषित होतील, याची कल्पना सहज करितां येईल. अशा स्थितींत, " कित्येक वर्षांमागें निकालांत आलेल्या भानगडी पुनः उकरून काढल्या जातात, पुष्कळ दिवस चालत आलेले हक्क आणि वहिवाटी बाजूस सारण्यांत येतात, संस्थानिकांचें पूर्वीचें चांगलें वर्तन निराळ्याच रंगांत रंगविलें जातें आणि त्याचें महत्त्वहि कमी दाखविलें जातें. × × × × कित्येक वेळां खासगी रीतीनें, औपचारिक रीतीनें किंवा सहजासहजीं यूरोपीयन मित्रांची भेट अगर सल्ला घेण्यास मनाई केली जाते. संस्थानिकांना या गोष्टी फार अनिष्ट आहेत, असें मला वाटतें. माझा असल्या बाबींचा अनुभव अत्यंत कडू आहे. " ह्मणूनच 'ट्रायब्युनल' नेमून त्या द्वारें असल्या प्रश्नांचा निर्णय करून घेण्याची आवश्यकता महाराजांना वाटत होती. १९१८ च्या फेब्रुवारीच्या ५ व्या तारखेस दिल्ली येथें मॉंटेग्यु साहेबांची महाराजांनीं पुनः भेट घेऊन हाच प्रश्न त्यांच्यापुढें पुनः मांडिला. हल्लींच्या पद्धतीमुळें सरकारच्या न्याय्य आणि उदार धोरणाचाहि विपर्यास होण्याचा संभव असतो; कारण सरकारचा निकाल ज्या पक्षाविरुद्ध होतो त्याचेंच ह्मणणें तेवढें लोकांपुढें येतें आणि सरकारच्या बाजूचें ह्मणणें प्रसिद्ध न झाल्यामुळें सहजच लोक एका पक्षाच्या ह्मणण्यावरच विश्वास ठेवितात. ' ट्रायब्युनल ' पुढें हे प्रश्न यावयाचे ठरलें असतां, आपलें वर्तन शुद्ध ठेवण्याची जबाबदारी संस्थानिक

आणि पोलिटिकल अधिकारी या उभयतांवरहि राहील. अशा प्रकारें महाराजांनीं आपलें ह्मणणें मॉंटेग्युसाहेबांस कळविलें. त्यांच्या या खटपटीस मॉंटेग्यु-चेम्सफर्ड रिपोर्टमध्यें अंशत: तरी यश आलें हें प्रसिद्धच आहे.

नवीन नरेंद्र-मंडळ स्थापन करण्याचा विचार याच वेळीं चालू होता. या मंडळाची रचना कशी असावी, या प्रश्नाची वाटाघाट मुख्य मुख्य संस्थानिकांमध्यें चालू असतां, लहानसहान सस्थानिकांना या मंडळांतून वगळण्याचा कित्येक मोठ्या संस्थानिकांचा हट्टाग्रह होता. १९१७ सालीं पतियाळा येथें जमलेल्या संस्थानिकांनीं लहान संस्थानिकांना वगळण्याचीच शिफारस केली. आपल्या-पैकींच कित्येकांना "अस्पृश्य" ठरविण्याच्या या योजनेचा महाराजांनीं तीव्र निषेध केला. मोठ्या राजांची स्वत:च्या बडेजावीबद्दलची भावना आणि कोणास या मंडळांत घ्यावें याबद्दल सार्वत्रिक नियम ठरविण्याची अशक्यता, या दोनहि गोष्टी महाराजांना कबूल होत्या; परंतु हिंदुस्थानच्या एक तृतियांश भागाचें प्रतिनिधित्व मागण्याचा संस्थानिकांचा प्रयत्न यामुळें विफल होईल असें त्यांचें ह्मणणें होतें. "या वगळण्याचा परिणाम काय होईल याची या कमिटीला कल्पना आहे काय ? वगळलेल्या संस्थानांचा हा अपमान आहे आणि ही शिफा-रस ह्मणजे अद्यापि अस्तित्वांतहि न आलेल्या नरेंद्र-मंडळाच्या अंत्यविधीचा प्रारंभ होय. या मंडळाचा हेतु संस्थनिकांत एकी उत्पन्न करण्याचा कीं फूट पाडण्याचा आहे ? * * * * अखेर सत्ता ( Sovereign Power ) नसलेल्या संस्थानिकांनीं दुसरें प्रतिस्पर्धी मंडळ स्थापन करावें अशी का या कमिटीची इच्छा आहे ? * * * * हॉऊस ऑफ लॉर्ड्समध्यें ड्यूक आणि बॅरन यांच्यांत फरक केलेला नाहीं," असें असून लहान संस्थानिकांना नरेंद्र-मंडळांतून वगळावें हें सर्वस्वीं अनिष्ट आणि आत्मघातकीपणाचें आहे, असें मोठ्या निकरानें महाराज प्रतिपादन करीत होते. पुष्कळ संस्थानिकांबरोबर या बाबतींत महाराजांना भांडावें लागलें. पुढें सुदैवानें त्यांच्याच प्रयत्नास यश येऊन सर्व संस्थानिकांचा निरनिराळ्या मार्गांनीं समावेश करण्यांत आला. महाराष्ट्रांतील आणि कर्नाटकां-तील संस्थानिकांचे प्रतिनिधी घेण्याबद्दल आरंभापासूनच महाराज प्रयत्न करीत होते. याकरितां त्यांच्या अध्यक्षतेखालीं १९१९ च्या ऑगष्टच्या २२ तारिखेस या संस्थानिकांची एक परिषदहि भरली होती.

३

१९१० सालच्या छापखान्याचा कायदा रद्द करण्यांत आल्यामुळें संस्थानिकांच्या संरक्षणाचा कायदा करण्याची वाटाघाट सुरू झाली. १९१० चा कायदा झाल्या वेळीं महाराजांनीं सरकारापुढें मांडलेल्या अडचणींचा उल्लेख मागेंच केला आहे. १९१७ पासून, विशेषत: कोल्हापुरांतील कुलकर्ण्यांवर गदा आल्यापासून मराठी वर्तमानपत्रांतून आणि महाराष्ट्रीय जहालांच्या सभांतून कोल्हापूर संस्थानावर टीकास्त्रांचा भडिमार सुरू झाला. "अशा गोष्टींची उपेक्षा करावी असें सरकारचें मत दिसतें. लोकांना हेंच हवें आहे आणि मलाहि तेंच नको आहे. यामुळें माझी नालस्ती करून माझ्या प्रजेंत आणि बाहेरहि माझ्याविषयीं गैरसमजुती त्यांना पसरवितां येतात. मला मात्र लोकांची सहानुभूति मिळवितां येत नाहीं आणि माझ्यातर्फे लिहिण्यास मला वर्तमानपत्रेंहि मिळत नाहींत. माझी स्थिति प्रामाणिकपणानें पुष्कळ दिवस काम करून म्हातारा झालेल्या टांग्याच्या घोड्यासारखी झालेली आहे. त्या वेळीं त्यला चांगली चंदीहि देत असत; पण आमच्या हिंदी पद्धतीप्रमाणें आतां हातपाय बांधून मैदानांतील झाडाखालीं ठेवलेल्या घोड्याप्रमाणें माझी स्थिति असून वाटेल त्या कावळ्यानें मला टोंच मारावी. सरकारनें या घोड्याला टोंच मारणाऱ्या ब्राह्मण कावळ्यांचा बंदोबस्त तरी करावा किंवा शेपूट न कातरतां व पायबंद न लावितां घोड्याला तरी मोकळें सोडून द्यावें."

अशा हल्ल्यापासून संस्थानिकांनीं आपला बचाव कसा करून घ्यावा? टीकाकारांच्याच मार्गानें त्यांनीं जावयाचें काय? त्यांच्याप्रमाणेंच सभा भरवून अथवा स्वत: लेख लिहून त्यांनीं टीकाकारांस उत्तरें द्यावयाचीं काय? या गोष्टी जर संस्थानिकांना करूं देत नाहींत, तर त्यांनीं टीकाकारांचीं तोंडें बंद करण्याकरितां त्यांना गुप्त खंडण्या द्यावयाच्या, हा एकच मार्ग मोकळा राहतो. १९२१ च्या सप्टेंबर महिन्यांत प्रेस ॲक्ट रद्द होणार हें ऐकून महाराज सिमल्यास गेले व व्हाइसरॉय साहेबांपुढें त्यांनीं वरील म्हणणें मांडिलें. प्रेस ॲक्ट रद्द करण्याचा यापूर्वींच सरकारचा निश्चय ठरलेला होता. तथापि महाराजांच्या तक्रारींचा पुढें सरकारनें पास केलेल्या प्रिन्सेस प्रोटेक्शन ॲक्टच्या जन्मकारणांत प्रमुखत्वानें समावेश केला पाहिजे.

४

संस्थानिकांसंबंधींचे जे अनेक प्रश्न या वेळीं महाराजांपुढें आले, त्यांपैकीं आणखी एकाचा येथें उल्लेख केला पाहिजे. हिंदुस्थानांतील सर्व संस्थानें हिंदुस्थान सरकारच्याच देखरेखीखालीं घ्यावी अशी मॉंटेग्यु-चेम्सफर्ड रिपोर्टांत शिफारस करण्यांत आल्यामुळें, आपल्यापुरता या शिफारसीचा अंमल करून घेण्याकरितां त्यांनीं प्रयत्न केला; परंतु तत्त्वतः सरकारनें ही गोष्ट मान्य केलेली असूनहि महाराजांच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत ती गोष्ट अंमलांत आली नाहीं. " अधिक अनुकूल परिस्थिति येईतोंपर्यंत " कोल्हापूर वगैरे मुंबई इलाख्यांतील संस्थानें आपल्या ताब्यांत घ्यावयाचीं नाहींत, असें हिंदुस्थान सरकारानें ठरविलें. यामुळें अद्याप महाराजांच्या या प्रयत्नास यश आलेलें नाहीं.



## प्रकरण २५ वें.

# ब्राह्मणेतर चळवळ.



राजकीय दृष्ट्या ब्राह्मणेतर चळवळीचा प्रारंभ मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या वाटाघाटीबरोबर झाला, हें ह्मणणें टोकळ मानानें बरोबर आहे; परंतु मॉंटेग्यूसाहेबांच्या मुखांतून ब्रिटिश सरकारनें वदविलेल्या नवीन राजकीय धोरणामुळेंच ती जन्म पावली, असें ह्मणतां येणार नाहीं. १९१६ सालीं निपाणी येथें भरलेल्या सत्यशोधक परिषदेच्या वेळींच वस्तुत: मे० घोसरवाडकर देसाई यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेंत **डेक्कन रयत असोसिएशनची** स्थापना करण्यांत आली व ब्रिटिश सिंहासनाबद्दल राजनिष्ठा कायम ठेवून, मागसलेल्या वर्गांच्या हक्कांचें व हितसंबंधांचें संरक्षण करण्याकरितां आणि त्यायोगानें देशहित साधण्याकरितां प्रयत्न करण्याचें ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं टरविलें. शिक्षणप्रसार आणि धार्मिक गुलामगिरींतून सर्व वर्गांची मुक्तता, हे दोनच हेतु पुढें ठेऊन यापूर्वींची चळवळ चालविण्यांत आली होती. यापुढें येथपर्यंतच ब्राह्मणेतर न जाण्याचें मुख्य कारण, ब्रिटिश हद्दींत सुशिक्षित ब्राह्मणेतरांचा अभाव होता, हेंच होय. अंत:करणाच्या कळकळीनें ब्राह्मणेतरांच्या उन्नतीसाठीं झटणारे लोक यापूर्वी नव्हते, असें नाहीं; परंतु त्यांना निरनिराळ्या जातींच्या मुलांना उच्च शिक्षण देण्याचें काम पुरून उरण्यासारखेंच होतें, शिवाय राजकारणांत पडावयास, सरकारी नोकरींत न शिरतां स्वतंत्र धंदा करणाऱ्यांची जरूरी असते. पण अशा व्यवसायाचे आंग्लविद्याविभूषित लोक अगदीं क्वचित् असल्यामुळें, ब्राह्मणेतर चळवळ आजपर्यंत फक्त शैक्षणिक आणि धार्मिक अथवा सामाजिक स्वरूपाचीच होती. या चळवळीचा पुढाकार ज्या लोकांकडे होता, त्यांना सरकारच्या धोरणाचा जरूर तेथें निषेध करणेंहि शक्य नव्हतें. त्या वेळच्या परिस्थितीमुळें, त्यांना पुढारलेल्या वर्गाच्या राजकारणांत मन घालण्या इतकें धैर्य नसलें तर आश्चर्य नाहीं. दुसरें असें कीं, इंग्रजी राज्यपद्धतींत वरिष्ठ सत्ता ज्या गोऱ्या

लोकांच्या हातीं होती, त्यांच्याशीं भांडण्याचें आपणांस कांहीं कारण आहे, अशी कल्पना त्यांच्यांत मुळींच उद्भवली नव्हती. किंबहुना, या गोऱ्या लोकांच्या मदतीनेंच झाली तर आपली, पुढारलेल्या वर्गाच्या जाचांतून आणि दाबांतून सुटका होईल, असें त्यांस मनापासून वाटत असे. पाश्चात्य शिक्षणानें उद्भवलेल्या समतेच्या कल्पनांचें श्रेय अर्थातच या गोऱ्या वर्गाला देण्यांत येत असें. हें शिक्षणामृत ज्यांनीं दिलें, विचारस्वातंत्र्य देऊन नवीन कल्पनांचा हवा तसा उपयोग करण्याची ज्यांनीं मोकळीक केली, त्यांच्यावरच उलटून पडणें ह्मणजे कृतघ्नता नव्हे काय ? अशा समजुतीनें येथवर ब्राह्मणेतरांनीं राजकारणापासून स्वतःस पूर्णपणें अलिप्त ठेविलें होतें, ही स्थिति पालटली पाहिजे. राजकीय धोरणांतील चुकांमुळें मागसलेल्या वर्गाची अत्यंत हानी होत असून, त्या सुधारण्यासाठीं राजकीय चळवळहि अवश्य आहे, अशी कल्पना मनांत येऊनच १९१६ सालीं डेक्कन रयत-समाज सुरू करण्यांत आला.

मात्र मॉंटेग्युसाहेबांच्या २० आगष्ट १९१७ च्या भाषणाचा परिणाम या रांगत्या स्थितींतील चळवळीवर अपेक्षेबाहेर घडून आला. दक्षिणेंतील ब्राह्मण वर्गास आतां नवीनच आशा वाटूं लागल्या. इंग्रजी राज्याचे दिवस आतां भरून आले, यूरोपांतील युद्धाच्या जबरदस्त मारांतून इंग्लंड आतां बचावून राहात नाहीं; आणि हिंदुस्थानांतील इतर जनता कोणत्या का स्थितींत असेना, आपणांकडे नव्या मनूंतील प्रभुपद येणार, असें त्यांस वाटूं लागलें. जातिभेदाच्या विषारी वातावरणांत आपल्या देशबांधवांची बौद्धिक आणि नैतिक अवनति किती झाली आहे याचा त्यांना विसर पडला. हिंदुस्थानांतील हीं मनुष्यरूपी मुकीं मेंढरें आपण बुद्धिमान् लोक जिकडे हांकून नेऊं तिकडे येतील असा त्यांना भ्रम झाला होता. आमच्याच जातीच्या हातीं सत्ता आली तरी ती इंग्रजी सत्तेपेक्षां बरीच, असें त्यांचे प्रतिनिधी खुद्द हिंदुस्थान सरकारच्या कायदे मंडळांत बोलूं लागले. हा सर्व प्रकार पाहून राजकीय दृष्ट्या निद्रिस्त असलेली प्रजा खडबडून जागी झाली; आणि परकीय सत्तेच्या अंगभूत असलेल्या इंग्रजी राज्यपद्धतींतील दोषांचा बागुलबोवा दाखवून इतर वर्गांना गप्प बसविणाऱ्या पुढारलेल्या वर्गाच्या राजकीय चळवळयांबद्दल त्यांना आतां भीति वाटूं लागली; आणि शक्य तो प्रयत्न करून या जात्यभिमानी लोकांच्या वाढूं पाहणाऱ्या सत्तेस आळा घातला पाहिजे असें इतर सर्व जातींना वाटूं लागलें.

ब्रिटिश सरकारच्या धोरणांतील हा बदल पाहून, स्वतःस नेमस्त ह्मणविणारे लोक देखील आपल्या पूर्वीच्या ठिकाणापासून पुष्कळच दूर सरले. त्यांच्या राजकीय क्रीडमध्यें, हिंदी लोकांची सुधारणा करून त्या योगानें हिंदुस्थानचा राजकीय दर्जा वाढवावयाचा, असें स्पष्ट नमूद केलेलें असे; परंतु आतां या सुधारणेवांचूनहि एकदम स्वराज्य मिळाल्यास हरकत नाहीं असें ते ह्मणूं लागले. आजपर्यंत सरकारचे आधारस्तंभ मानिलेले मुसलमान लोक तर युद्धोत्पन्न परिस्थितीभेदामुळें राजकीय चळवळीच्या जरीपटक्याजवळ दिसूं लागले. टिळकांची होमरूल लीग कोल्हापूरच्या हद्दीजवळच्या बेळगांवासच स्थापना करण्यांत आली. तिची बहीण, मिसेस बिझंट यांची लीग, डॉ० नायर आणि सर त्यागराय चेट्टी यांच्या मद्रास शहरीं निर्माण झाली. हें सर्व स्थित्यंतर आश्चर्यकारक आणि, कांहीं अंशीं, भीतिप्रद होतें, यांत शंका नाहीं. " माझी एवढीच इच्छा आहे कीं, "—१९१७ च्या डिसेंबरांत महाराज लिहितात — " मनुष्य बदलल्याबरोबर सरकारचें धोरणहि बदलूं नये. तें एकमार्गी आणि निर्भयतेचें असेल तर निःशस्त्र प्रतिकाराच्या धमक्या देऊन सरकारचे हात जखडूं पाहणाऱ्यांचे प्रयत्न विफल होतील यांत शंका नाहीं." पुढें थोड्या दिवसांनींच महाराज लिहितात—" होमरूल पक्ष जनतेबद्दल सहानुभूति बाळगीत नसून त्यांचें वजनहि लोकांवर नाहीं. स्वतःच्या हातीं सत्ता यावी एवढीच त्यांची इच्छा आहे. × × × × अशा संकटप्रसंगीं त्यांनीं सरकारला धमक्या द्याव्या हें मला मुळींच आवडत नाहीं. सरकारनें होमरूल दिलें नाहीं, तर आपण रिक्रूट जमविणार नाहीं असा त्यांच्या ह्मणण्याचा अर्थ आहे. जणूं काय रिक्रूट मिळणें न मिळणें त्यांच्याच मर्जीवर आहे! परंतु आश्चर्याची गोष्ट मला ही वाटते कीं, सरकार त्यांना खरोखरच भीत आहे. × × × × मी थोडेंसें स्पष्टच लिहीत आहें. यांत कांहीं अतिप्रसंग असल्यास माफ करा. आपल्या हीनावस्थेची ब्राह्मणेतरांना आतां कोठें कल्पना येऊं लागली आहे. स्वाभाविकपणेंच या ब्राह्मण पुढाऱ्यांविषयीं ते साशंक आहेत. आणि जर त्यांच्या हातीं सत्ता गेली, तर ब्राह्मणी सत्ता पुनः स्थापन होईल अशी त्यांना भीति वाटत आहे. ब्राह्मणांचे धर्मगुरु आपलें सर्व बल अगदीं अर्वाचीन पद्धतीनें एकत्र जमवीत असून, चातुर्वर्ण्याचें पुनरुज्जीवन करण्याची ते खटपट करीत आहेत. ब्रिटिश लोकांच्या

सहानुभूतिपूर्ण राजछत्राखालीं नांदणाऱ्या समताजनक कारणांची त्यांना स्वभावतःच भीति वाटते. या कारणांमुळें जातिभेदाचीं दृढबंधनें शिथिल पडतील आणि ब्राह्मणेतर लोक आपला दर्जा वाढवून ब्राह्मणांच्या बरोबरीस येतील, हें संकट त्यांना भिववीत आहे."

या उताऱ्यावरून राजकीय वातावरणांत अलीकडे झालेले फेरबदल महाराजांना सर्वस्वीं पसंत होते असें दिसत नाहीं. सार्वत्रिक शिक्षण आणि जातिभेदाचीं बंधनें शिथिल करण्याकरितां सामाजिक सुधारणा, या दोन गोष्टी हिंदी लोकांनीं साध्य केल्यावांचून स्वराज्यविषयक मोठे अधिकार त्यांना मिळणें इष्ट नाहीं असें त्यांचें मत होतें. वस्तुतः कॉंग्रेसच्या उत्पादकांच्या विचारसरणीशीं ही महाराजांची विचारसरणी पूर्णपणें जुळती होती, हें त्यांच्या मताचा विचार करतांना लक्षांत ठेविलें पाहिजे. कॉंग्रेस स्थापन झाल्या वेळींच सामाजिक सुधारणेच्या प्रश्नाचा विचार कॉंग्रेसच्या मंटपांतच करण्याचें या पुढाऱ्यांनीं ठरविलें होतें. सर शंकर नायर यांनीं एकदा म्हटल्याप्रमाणें, "आमच्या देशाच्या उन्नतीस ब्रिटिश राज्य जितकें अवश्य आहे, त्यापेक्षांहि सामाजिक आणि धार्मिक सुधारणा अधिक अवश्य आहे" असें ते प्रतिपादन करीत असत. किंबहुना कॉंग्रेस भरविण्याची कल्पनाच "सामाजिक प्रश्नाची चर्चा करणें" आणि त्याकरितां "हिंदी पुढाऱ्यांना" एकत्र जमविणें हे हेतू मनांत धरून त्या वेळच्या पुढाऱ्यांनीं अस्तित्वांत आणिली. त्यांच्या विचारांत आणि महाराजांच्या विचारांत पुष्कळच साम्य होतें. फरक इतकाच कीं, कॉंग्रेसमध्यें या विचारांना पुढें योग्य अवसर मिळाला नाहीं; आणि महाराजांनीं त्या विचारांस चिकटून राहून आपल्या हातून होईल तितका त्यांचा अंमल केला. कॉंग्रेस स्थापन झाल्यानंतर सुमारें वीस वर्षेपर्यंत सार्वत्रिक शिक्षणाचा किंवा सक्तीच्या शिक्षणाचा किंवा मागसलेल्या वर्गांच्या उच्च शिक्षणाचा तिनें मुळींच कधीं विचार केला नाहीं. महाराजांनीं अगदीं आरंभापासून या सर्व प्रश्नांकडे दक्षतेनें लक्ष पुरविलें. सर शंकर यांच्यासारख्या कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं सामाजिक सुधारणेची आवश्यकता कॉंग्रेसपुढें कितीहि जोरानें मांडली तरी, तिला उत्तेजन देण्याचें बाजूसच राहिलें; पण उलट तिच्या विरोधकांचेंच कॉंग्रेसमध्यें प्राबल्य झालें. महाराजांनीं सामाजिक सुधारणेस ज्या निरनिराळया मार्गांनीं प्रोत्साहन दिलें त्यांचा उल्लेख

येथपर्यंत झालेलाच आहे. येथें त्यांच्या प्रयत्नांच्या आणखी एका अंगाबद्दल मात्र दोन शब्द लिहिणें जरूर आहे. सामाजिक सुधारणेस कायद्याचा पाठिंबा देण्याकरितां त्यांनीं अनेक कायदे केले; त्यांतील पहिला १९१७ च्या जुलैमध्यें मंजूर केलेला पुनर्विवाह नोंदणीचा कायदा होय. या कायद्यानें पुनर्विवाहाची संस्था कायदेशीर ठरली इतकेंच नव्हे तर पुनर्विवाहाच्या बाबतींत इतर विवाहां-प्रमाणें योग्य विधी न करण्याची पद्धति पुष्कळ हिंदु जातींत नसल्यामुळें उत्पन्न होणारे घोटाळे नाहींसे झाले.

महाराजांनीं केलेला जातीजातींतील विवाहाचा कायदा, हा महाराजांच्या सुधारणोन्मुख कामांतील एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. ब्राह्मणेतर चळ-वळीचें सामाजिक ध्येय जातिभेद मोडणें हेंच होतें, हें या कायद्याचें पुरस्करण करून महाराज व इतर ब्राह्मणेतर लोक यांनीं दाखविलें. बाह्यत: ही चळवळ जातिविशिष्ट स्वरूपाची दिसते; परंतु निरनिराळ्या हिंदु जातींत बेटीव्यवहाराचीहि मोकळीक असावी असें बिल हिंदुस्थानच्या कायदे कौन्सिलांत ना० पटेल यांनीं आणिलें असतां त्यास ब्राह्मणांनीं जितका कसून विरोध केला तितकाच ब्राह्मणे-तरांनीं त्यास अंत:करणपूर्वक पाठिंबा दिला. ब्राह्मणांच्या विरोधामुळें पटेल यांनीं सुचविलेलें बिल जरी फेंटाळून लावण्यांत आलें, तरी महाराजांनीं आपल्या संस्थानापुरता त्याच अर्थाचा कायदा १९१८ च्या फेब्रुवारींत मंजूर केला. या कायद्यानें हिंदु आणि जैन यांच्या निरनिराळ्या जातींत होणाऱ्या विवाहास ब्राह्मणी धर्मशास्त्राची असलेली अडचण नाहींशी केली.

या कायद्यांतील मूलतत्त्वास अनुसरून प्रत्यक्ष विवाहानें जातिभेद नाहींसा करण्याचा महाराज प्रयत्न करीत होते. धनगर आणि मराठे यांच्यांत परस्पर विवाह होण्यासंबंधानें १९२० च्या जानेवारींत महाराजांनीं श्री० होळकर सरकार यांना पुढील पत्र लिहिलें:—

“ मी तुह्मांस मदत करण्यास तयार आहें; परंतु इच्छित दिशेनें रोटीबेटी-व्यवहार घडून येण्यास चिकाटीनें प्रयत्न केला पाहिजे. हा प्रयत्न व्यवस्थित व पायाशुद्ध केला पाहिजे. ( अ ) आणि ( ब ) हे शुद्ध मराठे नाहींत हें आपणांस माहीत असलें पाहिजे; पण त्यांनीं व्यवस्थेशीर खटपट केली. भाऊबंधांचीं किंवा नातेवाईकांचीं लग्नें करून त्यांनीं कामास सुरवात केली नाहीं, तर स्वत:-

च्याच कुटुंबांत चांगल्या मराठ्यांच्या मुलींशीं लग्नें घडवून आणिलीं. × × × ह्मणून तुह्मीं आपल्याच राजघराण्यांत अशा तऱ्हेचे विवाह केल्यास तुमचे नातेवाईक मुकाट्यानें तुमचें अनुकरण करतील. × × × तुह्मीं आपली राजकन्या × × × यांच्या सारख्यांस देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. × × × तुमच्या युवराजांचा विवाह काकासाहेबांच्या कन्येशीं केल्यास खरा प्रारंभ केल्यासारखें होईल. फार मोठ्या कुटुंबांतून मुलगी मिळण्यासारखी नसेल. बडोदेकर, ग्वाल्हेरकर आणि मींहि गरीब कुटुंबांतील मुलींशीं लग्नें केलीं आहेत. × × × तुमच्या गरीब नातेवाईकांचीं असलीं लग्नें झालीं तर त्यांच्यावर बहिष्कार पडेल. मी अस्पृश्यांत आणि खालच्या वर्गांत काम करितों. दुसरे लोक आपोआपच माझ्या मागून येतात. असल्या सुधारणेच्या कामीं आह्मींच पुढाकार घेतला पाहिजे, हेंच यावरून शिकावयाचें."

या पत्रांत सुचविलेला इंदूरच्या युवराजांचा महाराजांच्या जन्मघराण्यांतील एका मुलीशीं विवाह जुळून यावा ह्मणून महाराजांनीं पुष्कळ प्रयत्न केला; परंतु बहुधा दुसऱ्या एका मराठा जातीच्या महाराजांच्या विरोधामुळें. त्या वेळीं महाराजांच्या या प्रयत्नास यश आलें नाहीं. मात्र १९२४ च्या फेब्रुवारी महिन्यांत महाराजांनीं सुचविल्याप्रमाणेंच हा धनगर-मराठा-विवाहसंबंध जुळून आला, हें येथें सांगितलें पाहिजे.

मद्रास येथें १९२० सालीं एका ब्राह्मण मुलीचा मि० अरुंडेल यांच्याशीं विवाह झाला. त्यांचें अभिनंदन करून महाराज लिहितात, " पूर्व आणि पश्चिम यांच्यांत विवाहसंबंध घडून यावेत हें अत्यंत इष्ट आहे. असल्या सुधारणेशिवाय त्यांना विभागणारी विस्तृत खांच भरून येणार नाहीं. मी जातिभेद मुळींच मानीत नाहीं. आणि असल्या गोष्टींना मी उत्तेजन देईन हें खचित आहे. आज देखील इंग्लंड आणि हिंदुस्थान सर्व जगाशीं टक्कर देत आहेत, पण पूर्व आणि पश्चिम ही विवाहबंधनांनीं एकत्रित झाल्यास इंग्लंड आणि हिंदुस्थान याहिपेक्षां अधिक पराक्रम करूं शकतील अशी मला खात्री वाटते."

या पत्रांतील शेवटचा भाग थोडयाशा मौजेचा आहे. " माझें फाजील स्पष्ट वक्तृत्व मेहेरबानी करून माफ करा. आपल्या उभयतांच्या वयामध्यें फार फरक आहे. विवाह-सौख्याबद्दल तत्त्वज्ञान्यांचा दृष्टिकोन कसा असतो हें मला समजत नाहीं. तुह्मांला मुलें होतील, त्यांच्याशीं वियोग होतांना तुह्मांला काय

वाटेल हें मला समजत नाहीं; परंतु आपल्या मानिलेल्या कन्येच्या—शकुंतलेच्या—वियोगाच्या वेळीं महर्षि कण्व यांस दुःखच झालें. विवाहित तत्त्वज्ञांला अशा विरहाचें दुःख कितपत होईल कोण जाणे ! ''

असल्या प्रसंगीं, विशेषतः पांडित्याच्या नादानें एखादा मनुष्य अव्यवहारिक चुका करूं लागला ह्मणजे, महाराजांचा थट्टेखोरपणा मोठा खोंचदार बनत असे. एका सुशिक्षित मराठा गृहस्थांची सुशिक्षित प्रौढ कन्या एका तरुण सरदारास देण्याबद्दल वाटाघाट चालू असतां, भावी वधूवरांचा प्रत्यक्ष परिचय वाङ्निश्चयापूर्वीच झाला पाहिजे असें त्या सुशिक्षित गृहस्थांनीं महाराजांस लिहिलें. त्यावर महाराजांचें उत्तर असें होतें:—" हा विवाह सुखाचा व्हावा ह्मणून मी पराकाष्ठेचा यत्न करीत आहें. तसें होईल अशी मला खात्रीच आहे; पण कदाचित् पुढें कांहीं बरें वाईट झालें तर तुह्मी मला जबाबदार धरणार काय ? मुलगी हुशार, चतुर, शहाणी आहे. चांगल्या रीतीनें वागून नवऱ्याला, सासूला आणि आईबापांना सुखी करणें हेंच तिचें काम आहे. × × × या कामांतील यशापयशाची जबाबदारी तुमची आहे. नव्हें, नव्हें, अपयशाची जबाबदारी तुमची आणि यशाचें श्रेय माझें ! ह्मातान्या मनुष्याची चंचलता पाहून माझ्या सारख्या मुलाला भय वाटूं लागलें; पण तुह्मी वृद्ध आहां; तुह्मांला नांवें कोणीं ठेवावीं ? × × × × मी शक्य तेवढा यत्न करीनच; पण लग्नापूर्वीं तीन चार महिने प्रियाराधन होणें तुह्मांला जरूरच वाटत असेल, तर तुह्मीं तसें घडवून आणण्यास माझी ना नाहीं; मात्र मग त्याची जबाबदारी तुमचीच होईल ना? माझ्याबद्दल ह्मणाल तर मी देवावर हवाला ठेवून जुन्या मार्गानेंच जाईन. ''

राजकीय ब्राह्मणेतर चळवळींतील महाराजांचा भाग अर्थातच अप्रत्यक्ष होता. मात्र यामुळें त्याचें महत्त्व कमी होतें असें नाहीं. १९१७ च्या डिसेंबरांत मॉंटेग्यु साहेबांची भेट घेऊन, त्यांनीं मागसलेल्या जातींचें ह्मणणें आणि त्यांना स्वतंत्र प्रतिनिधी देण्याची आवश्यकता समजावून सांगितली. अस्पृश्यापर्यंतच्या सर्व वर्गांना, आणि विशेषतः अस्पृश्यांना, स्वतंत्र प्रतिनिधी जरूर आहेत, असें त्यांनीं त्या वेळीं प्रतिपादन केलें. या वेळीं आणि नंतर अगदीं अखेरपर्यंत महाराज ब्राह्मणेतर पक्षाचें ह्मणणें सरकारापुढें, वरिष्ठ अधिकारी वर्गापुढें आणि आपल्या वजनदार मित्रमंडळीपुढें निर्भीडपणानें आणि चिकाटीनें मांडित होते.



१९२० सालीं हुबळी येथील महाराजांची प्रचंड मिरवणूक.



कोल्हापुरांतील कुस्त्यांचा आखाडा.

त्यांच्या प्रतिपादनांत विशेषत: अस्पृश्य वर्गांविषयीं त्यांची कळकळ स्पष्ट दिसत असे; आणि मराठा जातीप्रमाणेंच लिंगायत, जैन वगैरे जातींचे हितसंबंध रक्षिले जावेत असा त्यांचा कटाक्ष असे. " आपलें धार्मिक व इतर बाबतींत वर्चस्व इतरांवर कायम राहावें, अशा विषयीं धडपडणारे ब्राह्मणांशीं आपला विरोध आहे. विद्येंत पुढें गेलेले ब्राह्मणेतर जातींशीं नाहीं. " असें तारीख २४ मे १९२० दिवशीं लिहिलेल्या एका पत्रांत त्यांनीं ह्मटलें आहे. याच विशाल दृष्टीनें महाराज आपली चळवळ चालवीत होते.

ब्राह्मणेतर पक्षाचें कार्य यशस्वी होण्यास वरील दिशेनें प्रयत्न करूनच भागणार नाहीं, हें महाराजांना माहित होतें; ह्मणून ब्राह्मणेतर पक्षाचीं वर्तमानपत्रें चोहोंकडे काढलीं जावींत असा ते यत्न करीत होते. महाराष्ट्रांतील प्रत्येक ब्राह्मणेतर वर्तमानपत्रास त्यांनीं सढळ हातानें मदत केली. त्याचप्रमाणें सार्वजनिक कामें करणाऱ्या परंतु द्रव्याभावामुळें नडलेल्या अनेक ब्राह्मणेतरांना त्यांनीं द्रव्यसहाय्य करून सार्वजनिक कामें करण्यास संधि दिली. किंबहुना गेल्या आठ दहा वर्षांत महाराष्ट्रांत झालेल्या ब्राह्मणेतर चळवळीच्या प्रत्येक अंगोपांगास महाराजांच्या मदतीचें पाणी मिळालेलें आहे, असें ह्मणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. कांहीं प्रसंगीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील ब्राह्मणेतर सभांत आणि परिषदांत महाराजांनीं प्रमुखत्वानें भाग घेतला. १९१८ च्या नोव्हेंबर महिन्यांत मुंबईच्या " पीपल्स यूनियन " मार्फत भरलेल्या दोन प्रचंड जाहीर सभांचे ते अध्यक्ष होते. त्यांपैकीं दुसऱ्या सभेंत त्यांनीं ब्राह्मणेतरांना जरूर असलेल्या चळवळीची दिशा स्पष्टपणें दाखविली. " ऐक्य, परस्पर प्रेम, विश्वास आणि दृढनिश्चय हीं हत्यारें आह्मीं जवळ बाळगिलीं पाहिजेत, " हें त्यांच्या उपदेशाचें पालुपद होतें. यानंतर १९२० च्या जुलै महिन्यांत हुबळी येथें भरलेल्या ब्राह्मणेतर सामाजिक परिषदेचें त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारिलें. सर त्यागराय चेट्टी यांच्या अध्यक्षतेखालीं एक प्रचंड राजकीय ब्राह्मणेतर परिषद् त्याच वेळीं व त्याच ठिकाणीं भरलेली होती. सुधारलेल्या पहिल्या कौन्सिलच्या निवडणुकी थोड्याच दिवसांत व्हावयाच्या होत्या. अर्थातच या परिषदेचें महत्त्व ब्राह्मणेतरांना फार मोठें वाटत होतें. राजकीय परिषदेंत हजर राहून आणि सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारून, त्यांनीं लोकांचा उत्साह द्विगुणित केला. या परिषदांत त्यांनीं भाग घेऊं नये असा विरोधकांनीं जोरांनीं प्रयत्न केला होता. त्यामुळें या परिषदेस मिळालेलें

यश लोकांना अधिकच आनंददायक वाटलें. आपल्या सभोंवतीं उसळणा-या उत्साहाचा महापूर पाहून, महाराजांचें मनहि उत्साहानें भरून गेलें.

परिषदेचें काम संपतांच कोल्हापुरांतील आपल्या एका मित्रास महाराज लिहितात:-“ राजकीय परिषद् मोठ्या जोराची झाली. तेथील भाषणें जोरदार, किंबहुना जहालच झालीं. × × × तुह्मीहि येथें असतां तर परिषदेस तुह्मी हजर राहिल्यावांचून राहातांना. × × × कांहीं होवो मी परिषदेस गेलों आणि हें मीं फार चांगलें केलें, असें माझ्या मनांत वाटत आहे. परमेश्वर माझें रक्षण करील. × × × संस्थानच्या कामांतून आतां मला सोडवा आणि राहिलेलीं आयुष्याचीं थोडीं वर्षे लोकांची सेवा करण्यांत मला घालवूं द्या. ” पुढें कांहीं महिन्यांनंतर याच त्यांच्या भित्र्या मित्रानें कोल्हापुरांतील कारस्थानांचा, वरिष्ठ अधिका-यांच्या गैरमर्जीचा, विश्वासपात्र झालेल्या ब्राह्मणांनीं केलेल्या फसवणुकीचा उल्लेख करून, ब्राह्मणेतर चळवळींत यापुढें तरी भाग घेऊं नका अशी महाराजांना पुन: विनंति केली. महाराजांनीं पुन: त्यांस असें उत्तर दिलें, “ मीं आतां ब्राह्मणांच्या विरुद्ध भाषणें केलेलीं नाहींत, अगर दुसरें कांहीं केलें नाहीं; पण आपल्या स्वभावास अनुसरून ते माझ्यावर सूड उगवीत आहेत. × × × त्यांच्या पेशवाई, बर्वेशाही किंवा परशुरामशाही कारस्थानांना परमेश्वर यश देवो. × × × मी तुमचा उपदेश ऐकेन, पण क्षत्रियाला अनुचित रीतीनें मला वागतां येणार नाहीं. मला कैद केलें तरी माझा देह कोणत्या तरी सत्कारणीं खर्चण्याचा मी प्रयत्न करीन. ज्या रणभूमीवर मी उभा राहिलों आहें, तेथून पाय मागें घेणें, माझ्या शीलास डाग लावण्यासारखें आहे. × × × मी तुमचा उपदेश स्वीकारीन पण त्याप्रमाणें वागणें मला अशक्य आहे. लॉर्ड × × × यांनीं तर काय पण खुद्द ब्रह्मदेवानें अथवा यमानें मला धमकी घातली आणि मी भ्यालों, तर माझे पूर्वज आणि स्वर्गांतील देव माझ्याकडे पाहून हंसतील आणि रडतील. जय आणि अपजय यांची मला पर्वा नाहीं. माझा स्वभाव तुह्मांला बदलतां येणार नाहीं. × × × × भित्र्या भागुबाईप्रमाणें मी माझीं मतें सोडणार नाहीं किंवा जीव बचावण्यासाठीं देखील शरण जाणार नाहीं. मी तुटेन पण वांकणार नाहीं. जपमाळ ओढीत बसून भटजीप्रमाणें मी कालक्षेप करणार नाहीं. सरकार रागावेल असें तुह्मी ह्मणतां. रागावो बिचारें! मला त्रास होईल यांत संशय नाहीं; परंतु गरजवंतांना मदत केल्याबद्दल, अस्पृश्यांना हात दिल्याबद्दल आणि मराठ्यांचा उद्धार करण्याकरितां माझी शक्ति

ब्राह्मणेतर पक्षाच्या अभिमानामुळें महाराजांना अनेक शत्रु उत्पन्न झाले व त्यांच्यापासून महाराजांना पुष्कळ त्रासहि सोसावा लागला; परंतु त्यांचा उत्साह इतका तीव्र होता कीं, त्यांनीं आपला प्रयत्न अखेरपर्यंत अव्याहत चालू ठेविला. १९२० अखेर झालेल्या निवडणुकींत स्वतः उमेदवार म्हणून उभें राहून प्रांतिक अगर हिंदुस्थानच्या कायदेमंडळांत शिरण्याचा विचार त्यांच्या मनांत आला. कायद्याची या गोष्टीस हरकत आली; आणि त्यांच्या एका यूरोपीयन मित्रानें म्हटल्याप्रमाणें "राजकीय कलहांच्या धुरळयांतच खरी आणि श्रेष्ठतम समाजसेवा घडते असें नाहीं." अशी समजूत करून घेऊन त्यांना स्वस्थ राहावें लागलें. या बाबतींत झालेली निराशा मात्र कमी झाली नाहीं. एका संस्थानचे अधिपति या नात्यानें त्यांना या प्रसंगीं ज्या अडचणीनें अडविलें ती त्यांना आणखी इतर गोष्टींत पावलोंपावलीं आडवीत होती. ब्राह्मणेतर चळवळीच्या लढाईंत त्यांनीं प्रत्यक्ष पाऊल ठेवूं नये, असा त्यांच्या हितचिंतक मित्रांकडून त्यांना वारंवार सल्ला मिळत असे आणि तो डोळयांआड करणें पुष्कळ वेळां अशक्य होई. यामुळें त्यांची निराशा तीव्रतम होत असे. त्यांच्या गुप्त पत्रव्यवहारांतील उतारे एका वर्तमानपत्रानें प्रसिद्ध केल्यामुळें, हा उपदेश करणाऱ्यांना अर्थातच जोर आला. या प्रसंगास उद्देशून एका ब्राह्मण मित्रास लिहिलेल्या पत्रांतील उद्गार, त्यांची मनःस्थिति चांगल्या प्रकारें दाखवितात. "केसरीनें मला आव्हान केलें आहे; पण सांखळीनें बांधलेला मी मांजर आहें. मला हद्दीबाहेर जातां येत नाहीं आणि चळवळींत भाग घेतां येत नाहीं. अशा मांजराला जिंकल्याबद्दल केसरीनें बढाई मारण्यांत हशील नाहीं. मांजराच्या गळयांतील सांखळी काढून टाकिली असती तर या बलाढय वनराजाच्या जबडयांतून सुटण्याचा त्यानें निदान प्रयत्न केला असता."

या अडचणी तर मोठया होत्याच; पण ब्राह्मणेतरांतील अंतःकलहामुळें त्यांचें स्वरूप अधिक भयंकर झालें. मुंबई इलाख्यांतील ब्राह्मणेतरांना दुसऱ्या कितीहि उणीवा भासत असल्या तरी, क्षुद्र मनाच्या लोकांची कधींच उणीव भासली नाहीं. स्वतंत्र मतदारसंघाच्या ऐवजीं राखीव जागा कांहीं ब्राह्मणेतरांनीं मान्य केल्यामुळें पहिलें भांडण सुरू झालें. राखीव जागापासून कांहीं फायदा होणार नाहीं; उलट त्यामुळें इंग्लंडांतील लोक फसतील, असें महाराजांचें मत होतें. अर्थातच महाराजांची सहानुभूति मराठा लीगच्या बाजूस होती. या

ग्नभेदामुळे ब्राह्मणेतर पक्षाचें कार्य शिथिल झालें. पुढें लिबरल पक्षाच्या पुढा-ऱ्यांशीं ब्राह्मणेतरांनीं सहकार्य करण्याच्या बाबतींत दुसरा वाद सुरू झाला. याप्रकारें दुफळी माजलेली पाहून आपलीं मतें बाजूस ठेवून एकी घडवून आणण्याचा महाराज प्रयत्न करीत होते. दोनहि बाजूंच्या पुढाऱ्यांस तोंडी आणि लेखी विनंति करून हे वाद मिटविण्याचा ते प्रयत्न करीत होते. "या वेळीं दुफळी करून आपलें हंसें करून घेऊं नका. विरुद्ध पक्ष आमच्यांत दुफळी करण्यास झटून प्रयत्न करीत आहे. आह्मीं त्यालाच मदत केल्यासारखें होईल. आमचा पक्ष अद्याप निर्बल आहे. आह्मांला पुष्कळ कामें करावयाचीं असून त्यांचा आरंभहि झालेला नाहीं. याच वेळीं भांडणें सुरू झालीं तर असल्या वाळूच्या पायावर आह्मी कसली इमारत उभारणार? 'विजयीमराठा' आणि 'जागरूक' यांच्यांतील वाद पाहून मला अत्यंत दुःख होतें." असा उपदेश ते सर्वांना करीत होते. या उपदेशाचा निदान त्या वेळेपुरता चांगला परिणाम झाला अणि थोडा वेळ वादाचा अग्नि शांत झाला.

परंतु दुसऱ्याच एका दिशेनें पुन: झगड्यास सुरवात झाली. १९२० आक्टोबरच्या तिसऱ्या तारखेस भवानी पेठेंतील धर्मशाळेंत महाराजांच्या अध्यक्ष-तेखालीं **शिवाजी सोसायटीची** सभा भरली होती. याच सुमारास क्षात्र जगद्गुरु-पीठाचें पुनरुज्जीवन करण्याचा विचार महाराजांच्या मनांत घोळत होता. त्यांच्या या कल्पनेस एक दोन सुशिक्षित मराठा पुढाऱ्यांचा विरोध असल्याचें ऐकून महाराजांनीं त्यांनाच जगद्गुरु करण्याचा बूट काढिला! यामुळें ते दोघेहि विद्वान गृहस्थ या सभेंत, कारण नसतां महाराजांना जगद्गुरु करण्याचा अधिकार आहे, असें मोठमोठ्यानें प्रतिपादन करूं लागले. वास्तविक ही सभा शिक्षण-विषयक असल्यामुळें असल्या वादाचें तेथें कांहीं कारण नव्हतें; परंतु कांहीं खोडसाळ ब्राह्मणांनीं आपल्या मराठा हस्तकांच्या मदतीनें अगोदरच सभेंत दंगा करण्याची तयारी केली होती; त्यांना हीं भाषणें निमित्तमात्र झालीं. "(यावेळीं झालेल्या दंग्याचें) एक कारण असें आहे कीं, मी कै० टिळकांच्या विरुद्ध अस-ल्यामुळें माझ्यावर सूड घेण्याचा त्यांचा हेतु होता; आणि लोकांच्या दृष्टीनें माझी योग्यता कमी करून मला पाठबळ आणि अनुयायी नाहींत, असें दाखविण्याचा त्यांचा हेतु होता." झालेली मारामारी, महाराजांच्या शब्दांत सांगावयाचें ह्मणजे, बायकांनीं एकमेकांना ओरखडून एकमेकांचे पदर फाडावें अशापैकीं

होती; पण अनेक कारणांमुळें तिला या वेळीं मोठें महत्त्व आलें. ब्राह्मणांन असें वाटत होतें कीं ब्राह्मणेतर चळवळीला महाराष्ट्रांत आलेला ऊत महाराजांच्या सामर्थ्याच्या ऊष्णतेमुळेंच आलेला आहे. या चळवळीचे दुष्परिणाम त्यांना आतां चांगलेच जाणवूं लागले होते. खुद्द पुण्यास " लोकमान्य " टिळकांना उघडया सभेंत भाषण करणें त्यांच्या ब्राह्मण अनुयायांच्या देखत ब्राह्मणेतरांनीं अशक्य केलें होतें; त्यांनीं भरविलेल्या अनेक परिषदा ओस पाडून त्यांच्यासमोरच हजारों ब्राह्मणेतर विरुद्ध सभा भरवीत होते; आणि हुबळीप्रमाणें अनेक ठिकाणीं महाराजांचा समुद्रप्राय जनसमूहाकडून जयजयकार होत होता. अशा स्थितींत महाराज अध्यक्ष असलेल्या सभेचाच बखेडा करून त्यांचा अपमान करणें टिळकानुयायांना जरूर वाटलें यांत आश्चर्य नाहीं. महाराजांच्या जातीच्याच सभेंत आणि त्यांच्याच जातीच्या लोकांकडून महाराजांचा अपमान झाला तर तें केवढें महत्कार्य ! शिवाय असली एक गडबड झाली ह्मणजे इंग्रज सरकार महा-राजांच्या चळवळीवर दडपण घालील आणि पुढें थोडयाच दिवसांत बारामतीस जी सभा भरणार होती तिचें अध्यक्षस्थान स्वीकारणें त्यांना अशक्य केलें जाईल, असाहि ब्राह्मणांचा अंदाज होता. ही जोडगोळी अचूक लागूं व्हावी ह्मणून याच हस्तकांकडून मारामारीबद्दल महाराजांवर पुण्याच्या फौजदारी कोर्टांत फिर्याद दाखल करण्यांत आली. अर्थातच अशा बिघडलेल्या परिस्थितींत महाराजांनीं बारामतीस जाऊं नये असा ब्राह्मणेच्छित सल्ला महाराजांना मिळाला आणि " एखाद्या साधूस शोभेशा शांत वृत्तीनें " महाराजांनीं तो स्वीकारिला.

महाराजांवर झालेल्या फौजदारी फिर्यादीचा परिणाम व्हावा तसाच झाला. महाराज हे सामान्य ब्रिटिश कोर्टाच्या अधिकारमर्यादेंत येऊं शकत नाहींत, या मुद्यावर फिर्याद काढून टाकण्यांत आली. पण कोर्टाकडून असा निकाल होईतोंपर्यंत ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर कारस्थानी मुत्सद्दी आलेल्या संधीचा फायदा घेण्याचा जोरानें प्रयत्न करीत होते. त्यांपैकीं एक प्रयत्न महाराजांना चुचकारून अपमानास्पद आपसातीच्या जाळयांत अडकविण्याचा होता. याबद्दल एक सुशिक्षित मराठा गृहस्थ महाराजांना लिहितात. " आपण मराठा लीगच्या व सत्यशोधक समाजाच्या सभासदांना उत्तेजन देणार नाहीं, असें आश्वासन दिल्यास तो फिर्याद काढून घेण्यास तयार आहे. आपण सत्यशोधकांस मदत करीत नाहीं; निदान माझा तसा समज आहे. निदान

तटस्थ वृत्ति धारण करून, सर्व मराठ्यांना आपणांस एकत्र करितां येईल. आपण मराठ्यांचे स्वाभाविक पुढारी आहां. हल्लीं उत्पन्न झालेली परिस्थिति अस्वाभाविक आहे. यामुळें तुह्मांला निष्कारण त्रास होईल. कांहीं फायदा नसतां या भानगडींत तुह्मीं स्वतःस कां गुंतवावें ? तुह्मी उद्यां तार करून जरूर तें आश्वासन द्याल, तर कज्जा काढून घेण्यांत येईल. आणि तुह्मी येईपर्यंत मुदत मागून घेण्यांत येईल. का० ची सूचना वाजवी असून त्यामुळें पुष्कळ भानगडी टळतील. '' या पत्रांतील शब्दजाल महाराजांना फसविण्या-इतका गूढ नव्हता; उलट हें जाळें आपलें ह्मणून महाराजांवर टाकूं पाहाणाऱ्या या भोळया गृहस्थांच्या भोळेपणाचें मात्र आश्चर्य वाटतें. त्यांस महाराजांनीं पुढील उत्तर दिलें. "मी सत्यशोधक नाहीं किंवा लीगशींहि माझा संबंध नाहीं, पण ज्यांना मीं लहानाचे मोठे केलें, अशा पी. सी. पाटील किंवा श्रीपतराव शिंदे यांच्याशीं स्नेह ठेवूं नका, किंवा बाबासाहेब खानवीलकर सत्यशोधक आहेत ह्मणून माझ्या बायकोचा मीं त्याग करावा किंवा बापूसाहेब त्यांची पत्नी व मेहुणे ( पर्मेकर ) सत्यशोधक आहेत ह्मणून त्यांच्याशीं असलेलें बंधुत्वाचें नातें मीं विसरावें, असें तुह्मीं उद्यां ह्मणाल, तर मीं काय करावें ? मी मराठ्यांचा गुलाम असलों तरी माझीं मतें मी बदलणार नाहीं. ......प्रागतिक मताच्या कोणत्याहि मराठ्यानें माझ्याकडून हवी ती सेवा करून घ्यावी. फिर्याद काढून टाकिली ह्मणून मी कांहीं फुगलों नाहीं. माझी परंपरा आणि शील यांच्याशीं विसंगत न होणारी कोणतीहि आज्ञा मानण्यास मी तयार आहें. '' तेच दिवशीं पुन: महाराज लिहितात:— मी गोमांस अथवा दारू घेत नाहीं, हें तुह्मांस माहीत आहेच; पण कांहीं राजे आणि सभ्य गृहस्थहि, हे पदार्थ खाऊन ती गोष्ट नाकबूल करतात. मी मात्र जें करितों, तें करितों ह्मणून सांगतों. मीं माझ्याशीं स्नेहानें वागणाऱ्या आणि तत्समान जातींना कधींहि सोडणार नाहीं.........हें सर्व मला भिवविण्यासाठींच चाललें आहे हें मला माहीत आहे. ''

महाराजांच्या या करारीपणाचा फार चांगला परिणाम झाला. कारण सत्यशोधकांना सोडून द्या, ह्मणून उपदेश करणाऱ्या या पंडितांनींच पुढें थोडया दिवसांनीं आपलें ह्मणणें अज्ञानाचें होतें, हें कबूल केलें. "ब्राह्मणलोकांचे 'पुढारी' इतक्या नीचपणाचें धोरण स्वीकारण्या इतकें पतित आहेत, हें माझ्या

लक्षांत आलें नाहीं. यावरून त्यांच्यांत सभ्य गृहस्थांचे अवश्य गुणहि नाहींत, असें दिसतें, ” असें त्यांनीं महाराजांना पुढच्याच महिन्यांत लिहिलें ! “ पुण्यांतील भानगड ( भवानी पेठेंतील मारामारीची ) होईपर्यंत, ब्राह्मणांना बरोबर घ्यावें, असें मला वाटे, हें तुह्मी जाणतांच. पुण्यास तीन आठवडे घालवून आतां माझी खात्री झाली आहे कीं, हे ब्राह्मणलोक ह्मणजे कधींहि न् सुधारण्यासारखे प्राणी आहेत, ” असाहि त्यांनीं शेरा मारिला !

१९२१ सालांत नवीन कौन्सिलें अस्तित्वांत आलीं आणि ब्राह्मणेतर चळवळींतील पहिलें प्रकरण समाप्त झालें. आतां पुढच्या कार्याची भूमिका तयार झाली. महाराजांच्या नेतृत्वाखालीं झालेल्या चळवळीमुळें, ब्राह्मणेतरांचे कांहीं प्रतिनिधी कायदेमंडळांत प्रविष्ट झाले. मिळालेल्या या अपूर्व संधीचा फायदा घेऊन शेंकडों वर्षें ज्या गाऱ्हाण्यांची दाद लागली नव्हती, त्यांची दाद लावून घेण्याचें महत्कार्य आतां ब्राह्मणेतर पक्षापुढें उभें राहिलें. पण तयार झालेल्या या पायावर इमारत उभारण्याच्या कामीं, महाराजांच्या कल्पकतेचा व शक्तीचा या पक्षास फायदा मिळावा, असा विधिसंकेत नव्हता. पुढे राहिलेले थोडे महिने कायदेमंडळांतील आपली मंडळी काय काय कामें करितात, हें पाहाण्यांतच त्यांनीं घालविले. पुण्यास एक ब्राह्मणेतर दैनिक काढण्याची जरूरी वाटल्यामुळें, खर्चाचा सर्व बोजा अंगावर घेऊन या कामास त्यांनीं प्रारंभहि करविला. शिव-स्मारकाचें काम तर त्यांच्या अंगावर होतेंच. या गडबडींतच मागें थोडे दिवस निघून बंद पडलेलें **डेक्कन रयत** नांवाचें इंग्रजी साप्ताहिक काढावें असें १९२२ सालीं त्यांच्या मनांत आलें व हें काम प्रस्तुत लेखकानें अंगावर घ्यावें, असें त्यांनीं पत्रद्वारें सुचविलें. या आणि असल्या शेंकडों कल्पना त्यांच्या मनांत खळबळत होत्या. पण दुर्दैवानें, आकाशांतील निर्जल ढगाप्रमाणें त्या जेथल्या तेथेंच विरघळून गेल्या !





रजपूतवाडी येथील महाराजांचा बंगला.



रजपूतवाडी येथील महाराजांचें विश्रांतिस्थान.

# प्रकरण २६ वें.

## महाराजांचा अंतकाल.





महाराजांची प्रचंड शरीरयष्टि आणि पुष्कळ वर्षे त्यांच्यांत दिसून येणारी शारीरिक आणि बौद्धिक कार्यक्षमता आणि तरतरी ही ज्यांना माहीत होती, त्यांना ४८ व्या वर्षीच त्यांची जीवनयात्रा संपेल, असें कधींहि वाटण्याचा संभव नव्हता. महाराजांना स्वतःच्या शरीरसामर्थ्याविषयीं, त्यांच्या मित्रांप्रमाणेंच पुष्कळ विश्वास वाटत होता; पण कांहीं अंशीं तरी या आत्मविश्वासांतच त्यांच्यावर हळूहळू पडत असलेल्या कालाच्या सावलीचीं पूर्व चिन्हें लपलेलीं होतीं. वातुळपणा हा त्यांच्या प्रकृतींतील दोष पूर्वार्जितच होता; परंतु लहानपणीं केलेल्या व्यायामानें कांहीं दिवस त्यांनीं तो दोष ताब्यांत ठेविला होता. पुढें पुढें, त्यांच्या आयुष्यक्रमांत अनेक तऱ्हेचा अनियमितपणा शिरला व डॉक्टर लोकांनीं सांगितलेले सृष्टिनियम झुगारून देण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत दिसूं लागली, यामुळें रोगांनीं महाराजांच्या उत्तम प्रकृतींत बिघाड करण्यास सुरवात केली. कांहीं कालपर्यंत या अनियमितपणाचा आणि सृष्टिनियमांविरुद्ध बंडाळी करण्याच्या प्रवृत्तीचा परिणाम कोणांसहि दिसून आला नाहीं; आणि कोणत्याहि बंधनांनीं निगडित न होऊं इच्छिणाऱ्या, जन्मजात स्वभावास अनुसरून, त्यांनीं वैद्य आणि स्नेही यांच्या सल्ल्यांकडे दुर्लक्ष करण्याचा प्रकार चालू ठेविला. कांहीं नाहीं तरी १९१० च्या सुमारास बहुमूत्र आणि काळजाची निःशक्तता या दोन विकारांनीं त्यांच्या शरीरांत ठाणें दिलें होतें. डॉक्टरांनीं विश्रांति घेण्यास व जर्मनींत जाऊन स्नानाचे उपचार करण्यास त्यांना सांगितलें; पण कोल्हापुरांतील भानगडींनीं त्यांना इतकें व्यापिलें होतें, आणि ते स्वतःहि त्या भानगडींना इतके चिकटले होते कीं, थोडे दिवससुद्धां, आपल्या प्रकृतीच्या स्वास्थ्याकरितां त्यांना कोल्हापूर सोडून बाहेर जाण्याची इच्छा झाली नाहीं. मनांत धरलेलें काम बाजूस ठेवून विश्रांति घेणें, त्यांच्या स्वभावाला शक्यच नव्हतें.

कांहीं माणसें कामाकरितां जगतात; पण बहुतेक माणसें जमल्यास काम सोडून व नाइलाज झाला, तर जरूर तेवढेंच काम करून जगूं इच्छितात. महाराज यांपैकीं पहिल्या वर्गाचे होते. अशा लोकांना काम करितां करितां, न कळत मृत्यूनें आपणांस उचलून न्यावें, असें वाटत असतें. जूलिअस-सीझरचा खून करण्यापूर्वी कटांत सामील असलेल्या एका मनुष्यानें तुह्मांला कोणतें मरण आवडतें असा त्याला प्रश्न केला. “ अनपेक्षित मरण ” असें त्यानें उत्तर दिलें. अंगावरील कामाची महाराजांना इतकी हौस असे कीं, तें बाजूस ठेवण्याचा त्यांनीं निश्चय केला असता, तरी तें बाजूस झालें नसतें. सतत आणि झपाट्यानें कांहीं तरी काम करीत राहाण्यांतच त्यांची विश्रांति होती. महाराजांचा अलौकिकपणा आणि एका दृष्टीनें त्याचा दोषहि याच वस्तुस्थितींत होता. मनुष्याचें अलौकिकत्व त्याच्या अमर्याद कर्तव्यक्षमतेंत असतें, असें कित्येक ह्मणतात. हें अलौकिकत्व बुद्धीच्या एकांगीपणांत समाविष्ट झालेलें आहे, असें कित्येकांचें मत आहे. या दोनहि व्याख्या लोकोत्तर माणसांत सर्वत्र दिसून येणाऱ्या एका विशेष गुणावरच वसलेल्या आहेत. सृष्टीच्या आणि समाजाच्या नियमांचें आणि रूढींचे दास बनून मनुष्याला सुखासमाधानानें आपलें आयुष्य कंठितां येतें. हाच मार्ग सर्व साधारण लोक पसंत करितात आणि त्यामुळें त्यांच्या हातून मोठेंसें सत्कार्य झालें नाहीं तरी त्यांना लोकनिंदेस पात्र होण्याचेंहि कारण राहात नाहीं. विभूतिमान् माणसें सामान्य जीवनक्रमांतील या खोल चाकोऱ्यांतून आपला जीवितरथ हांकण्यास तयार असत नाहींत. आपल्या रथाचें चाक नेहमींच्या चाकोरींतून बाहेर काढल्यानंतर तें कोणीकडे वळेल हें सांगणें कठीण असतें. सामान्य नीतीच्या नियमांवर आपलें दडपण घालण्यास एखादे वेळीं हीं लोकोत्तर माणसें तयार होतील; किंवा बहुतेक मनुष्यांना दुर्गम अशी नैतिक आणि बौद्धिक पवत शिखरें चढून जाणें त्यांच्या अलौकिक सामर्थ्याला शक्य होईल. सामान्य मनुष्यें लोकांच्या स्तुतिस्तोत्रांस पात्र होण्यासारखें किंवा संसारांतील सुखसाधनांत एखादी नवीन भर घालण्यासारखें कांहीं करूं शकत नाहींत, मात्र आयुष्याचे दिवस मर्यादित सुखाचा उपभोग घेण्यांत त्यांना घालवितां येतात. लोकोत्तर माणसें ह्मणजे ज्वालामुखीच्या भडक्या सारखीं असतात. उंच उंच पर्वत या भडक्यांत जमीनदोस्त होतील किंवा विस्तीर्ण भूमिभाग समुद्राच्या तळाला जाऊन बसेल; परंतु त्याला योग्य वळण लागलें तर सुंदर आणि सुपीक बेटें

समुद्राच्या गुहेंतून बाहेर काढून सूर्यप्रकाशांत आणण्याचें आणि त्यांत मानवी सुखाच्या नदीचे कालवे सर्वत्र पसरविण्याचें महत्कार्यहि त्यांच्या योगानें होऊं शकतें.

महाराजांसारख्या असामान्य पुरुषाच्या जीवितकार्याकडे या गोष्टी लक्षांत ठेवूनच पाहिलें पाहिजे. आपल्या शरीराच्या गरजांकडे दुर्लक्ष करावयास लावण्याइतकी त्यांची कार्यव्यापृतता कां होती, हें यावरून समजण्यासारखें आहे. आपल्या संस्थानचा सर्व कारभार दुसऱ्यावर सोंपवून यूरोपांतील थंड हवेच्या मदतीनें आपल्या आयुष्याची दोरी लांबच लांब वळणारे हिंदी संस्थानिक अश्रुतपूर्व आहेत, असें नाहीं. असलाच एखादा उपाय करून आपलें जीवन निदान शतवार्षिक करणें महाराजांना अशक्य झालें नसतें; परंतु त्यांच्या स्वभावानें त्यांस हा मार्ग कधींहि स्वीकारूं दिला नसता. डॉक्टर लोक त्यांना विश्रांति घ्यावयास सांगत, पण कामाचें व्यसन हीच त्यांची विश्रांति होती, हें त्यांच्या लक्षांत येत नसें. आपण शिकारींत व्यर्थ कालक्षेप करणारे आहों, असें ते केव्हां केव्हां ह्मणत. कोल्हापुरास अथवा अन्य ठिकाणीं ते रिकामटेकडे गाडींतून हिंडत असावेत असें पुष्कळ वेळां दिसें. हा प्रकार पाहून परकीय लोक त्यांची गणना अगदींच आळशी व विक्षिप्त माणसांत करीत यांत आश्चर्य नाहीं; मात्र त्यांची ही समजूत अगदीं चुकीची होती. हा दिखाऊ आळशीपणा खरोखर अत्यंत सहेतुक असे. दिवसांतील पुष्कळ वेळ ते अशा तऱ्हेनें फिरण्यांत घालवीत असत; निरनिराळया तऱ्हेचीं माणसें गाडींत चिकार भरलेलीं आहेत, ड्रायव्हरला अथवा जवळच्या माणसांना गाडी कोठें चालली आहे याचा पत्ता नाहीं, अशा स्थितींत निरनिराळया रस्त्यांनीं अथवा फिरून त्याच त्या रस्त्यांनीं महाराज फिरत असलेला देखावा अद्यापहि पुष्कळांच्या दृष्टीसमोर असेल; पण अशा हालचालींत वरवर दिसणारा रिकामेपणा समुद्राच्या शांत पृष्ठभागाप्रमाणें सर्वस्वीं भ्रमोत्पादक असे. त्यांची दृष्टि आजूबाजूंच्या प्रत्येक लहान मोठया गोष्टींकडे लागलेली असे; आणि वरून शांत दिसणाऱ्या परंतु ज्याच्या तळाला हजारों भिन्न भिन्न प्रकार घडत असतात अशा समुद्राप्रमाणें त्यांचें मन भरलेलें असें. एकाच वेळीं महाराज अनेक गोष्टी मोठया शिताफीनें करीत असत. दृष्टि एके ठिकाणीं, कान दुसरीकडे, भाषण तिसऱ्याच विषयावर, आणि मनांतील विचार चौथ्या गोष्टीबद्दल असा त्यांचा प्रकार नेहमीं चालत असे. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, हीं सर्व व्यवधानें बारकाईनें आणि पूर्ण लक्षपूर्वक ते

चालवीत. त्यांची स्मरणशक्ति तर अचाटच होती; आणि त्यांचें लक्ष एकाच वेळीं अनेक ठिकाणीं अगदीं बिनचूक लागण्यासारखें असे. त्यांच्या बुद्धीचें जाळें अनेक दिशांनीं पसरलेलें असे; आणि त्या जाळयांतील प्रत्येक भूतभविष्य काळांतील अनेक गोष्टींशीं सांगडलेला असे; आणि त्या जाळयाचा प्रत्येक भाग कोणत्या तरी एकाच हेतूच्या सिद्धीकरितां ते सुसंगत रीतीनें हलवीत असत. अशा प्रकारच्या बुद्धीचा अपरिहार्य दोष एकच असतो आणि तो हा कीं त्याला विश्रांति कधींहि मिळत नाहीं. १९१९ सालापासून, आपलें आयुष्य यापुढें फार दिवसाचें नाहीं, असें त्यांचें त्यांनाहि वाटत असे. छातीचा विकार वाढत चालला होता आणि शरीर सर्व बाजूंनीं कमकुवत बनत चाललें होतें; परंतु त्यांची कामाची उमेद मात्र पूर्वी-प्रमाणेंच अजिंक्य होती. १९१९ च्या जानेवारींत ते दिल्लीहून लिहितात, "गेल्या थोडया दिवसांपासून माझ्या प्रकृतींत आकस्मिक बदल झाल्याचें मला दिसून येत आहे. माझे दांत हालूं लागल्यामुळें त्यांपैकीं एक काढून घ्यावा लागला. कानांत कळ येत आहे आणि दृष्टि बिघडत चालली आहे. मुलाच्या मृत्यूच्या धक्क्यामुळें हे सर्व प्रकार होत आहेत, असें माझ्या डॉक्टरांचें मत आहे." जुलै महिन्यांत बरें वाटेना ह्मणून विश्रांति घेण्याच्या इच्छेनें महाराज रायबागला गेले. नोव्हेंबर महिन्यांत ते सर जॉर्ज लाउंडिस् यांना लिहिलेल्या पत्रांत ह्मणतात:-"दिल्लीस असतांना मला एक करट झालें व तेथील सिव्हिल सर्जनकडून मीं तें फोडून घेतलें. दुर्दैवानें येथें येतांच दुसरें करट होऊन आणखी एक शस्त्रप्रयोग मला करून घ्यावा लागला. हल्लीं मिरजेस डॉक्टर व्हेल यांच्या उपचाराखालीं मी आहें. हल्लीं थोडेंसें बरें वाटत आहे; पण फिरूं लागण्यास आणखी एक दोन आठवडे लागतील." खरोखर "हें बरें वाटणें" तात्पुरतेंच होतें. एकामागून एक रोग वाढत होते. तथापि संकटाच्या मानानें जरूर ते उपाय महाराज करीत होते असें दिसत नाहीं. अंगांत ताप असूनहि, सर्व मित्रांचा सल्ला बाजूस ठेवून १९२० च्या मार्च महिन्यांत विमानांत बसून महाराज फेरपटका करावयास गेले. "एक दोन तास विमानांत बसून मुंबई शहरावरची मीं हवा खाल्ली. १०० पेक्षां जास्त ताप माझ्या अंगांत होता आणि हवाहि अतिशय थंड होती. डॉ० कल्याणदास आणि रेळे यांनीं मीं घराबाहेरहि पडूं नये असें मला सांगितलें होतें. दिवाणसाहेबांना चुकवून मी बाहेर पडलों; आणि विमा-नांतून हिंडून परत आलों, तों माझा ताप नाहींसा झाला होता. गेलेली शक्ति

परत मिळविण्याकरितां मी आतां एकदम शेडबाळास जात आहे." या एका प्रसंगीं तरी डॉक्टरपेक्षां महाराजच शहाणे ठरले! मात्र अशा प्रसंगामुळें, अगदींच नाइलाज होईतोंपर्यंत डॉक्टर लोकांचें ऐकावयाचें नाहीं अशी त्यांना लागलेली संवय अधिकाधिक निबर होत चालली होती; आणि त्याचा परिणाम जास्त अधिकाधिक वाईट होत गेला. १९२१ च्या मार्चमध्यें "युरिक ॲसिड फार वाढलें असून, सर्व शरीरभर वेदना होत आहेत," असें महाराज ह्मणतात. "माझ्या मुलाच्या हातीं राज्यकारभार सोंपवावा अशी वेळ आली आहे, असें मला वाटूं लागलें आहे; ह्मणजे ××× मी सर्व कटकटींतून मोकळा राहीन." इतक्या पल्ल्याला जाण्याचें कांहीं कारण नसून प्रकृतीस लौकरच बरें वाटेल, असें कर्नल मेरिवेदर यांनीं त्यांस आश्वासन दिलें.

१९२२ च्या जानेवारींत महाराज मिरजेहून मेरिवेदरसाहेबांना लिहितात:— "डॉ० वानलेस यांचा सल्ला घेण्याकरितां आज संध्याकाळीं मी येथें आलों. सर्व शरीरभर मुंग्या आल्यासारखें मला वाटत आहे. सर्व रक्त विषदूषित झाल असावें अशी डॉक्टरांना शंका असून त्यांनीं पूर्ण विश्रांति घेण्यास मला सांगितलें आहे." या वेळेपासून अखेरपर्यंत महाराजांना कधींच बरें वाटलें नाहीं. मार्चच्या २१ तारिखेस ते डॉक्टर वानलेस यांना लिहितात:—"तुह्मीं दिलेल्या गोळ्या मी सारखा घेत होतों; पण साखर कमी झाली नाहीं आणि त्या घेण्याचें मीं बंद केलें आहे."

याप्रमाणें अस्वस्थता वाढत असूनहि बडोद्यास जाण्याचा एप्रीलमध्यें प्रसंग आला. बडोद्याच्या ऊष्ण हवेंत जाऊन तेथें होणाऱ्या विवाहसमारंभाच्या निरनिराळ्या कामांत भाग घेण्यानें महाराजांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम घडतील या भीतीनें कर्नल मेरिवेदर (रेसिडेंट) आणि इतर अनेक लोकांनीं त्यांना बडोद्यास जाऊं नका असा सल्ला दिला. पण आपलें कर्तव्य बरोबर रीतीनें पाळण्याकरितां हा धोका घेऊनहि बडोद्यास जाण्याचें महाराजांनीं निश्चित केलें. राजकुमारी लक्ष्मीदेवी यांचा सावंतवाडीचे राजेसाहेब यांजशीं होणारा विवाह जुळवून आणण्याकरितां त्यांनीं पुष्कळ परिश्रम केले होते. फत्तेसिंगमहाराजांच्या पत्नी श्रीपद्मावतीबाईसाहेब यांनीं आपल्या आसन्नमरण स्थितींत या आपल्या कन्येच्या हिताकडे लक्ष ठेवण्यास महाराजांना विनंति केली होती; व महाराजांनीं ती गोष्ट मान्यहि केली होती. मातापित्यांच्या मृत्यूमुळें आज ही राजकन्या

प्रोरक्या स्थितींत असून महाराज सयाजीराव गायकवाड —श्रीलक्ष्मीदेवीचे प्रपितें—विवाहमुहूर्ताच्यापूर्वी थोडे दिवस विलायतेस जाण्याकरितां निघून गेले. फत्तेसिंगरावांच्या मुलाबद्दल महाराजांना नेहमींच अतिशय लळा असे. तशांतून श्रीपद्मावतीराणीसाहेब यांना दिलेलें अभिवचन पुरें करण्याचा त्यांच्या मनावर एक बोजाच होता.

२७ एप्रील दिवशीं बडोद्यास जाण्याकरितां महाराजांनीं मुंबई सोडली. पुढें येणाऱ्या संकटाचीं दुश्चिन्हें येथेंच दिसूं लागलीं. " काल रात्रीं मला एक विलक्षण अपघात झाला; "—बडोद्याहून २८ तारिखेस महाराज लिहितात—" आणि तोहि कुलाब्याहून गाडी सुटण्याच्या अगोदर दहाच मिनिटें ! बाबासाहेब खानवीलकर आणि मी स्टेशनाकडे चाललों होतों. इतक्यांत एक भाड्याची व्हिक्टोरिया आमच्या मोटारीवर आदळली. घोडा मोटारीच्या फूटबोर्डवर आला आणि गाडीचा दांडा खानविलकरांच्या तोंडाला लागला. त्यांना दुखापत झाली; परंतु ती थोडी होती. घोड्याचें डोकें माझ्या डोक्यावर आदळलें, मात्र सुदैवानें आह्मांला फारशी दुखापत झाली नाहीं. नाहींतर आह्मांस बडोद्यास येणेंच अशक्य झालें असतें. ज्याचा शेवट गोड तें सर्वच गोड. "

पण या प्रवासाचा शेवट गोड व्हावयाचा नव्हता. महाराजांच्या छातीचा विकार झपाट्यानें वाढत चालला होता. विवाहसमारंभाच्या निमित्तानें तेथें त्यांना अतिशयच त्रास झाला. तीस तारखेस विवाहसमारंभ संपल्यानंतर साठमारी पाहण्यास महाराज गेले. आखाड्याच्या जवळच्या एका पारावर महाराज खेळ पहात उभे होते. जवळ एक दोन माणसें होतीं. एकदां एक मस्त हत्ती त्यांच्या अंगावर येण्याचा प्रयत्न करूं लागला, हें पाहून जवळच्या लोकांनीं त्यांना मागें सरावयास सांगितलें; पण महाराजांनीं तें ऐकिलें नाहीं. दुसऱ्यांदा हत्तीनें चाल केली व दुसऱ्या लोकांनीं मागून येऊन हत्तीला भाले मारिले नसते तर महाराजांच्या पायास त्याच्या सोंडेचा विळखाच पडला असता. या वेळीं हत्तीला मागें वळविणाऱ्या साठमाऱ्याला महाराजांनीं १००० रु. बक्षिस दिले. एप्रीलच्या दुसऱ्या तारिखेस बडोद्याहून वीस मैलांवर चित्त्याच्या शिकारीकरितां महाराज जाऊन आले. या श्रमानें त्यांच्या छातींत जास्त कळा येऊं लागल्या. बडोद्यांतील डॉक्टरांनीं कांहीं उपचार केल्यानंतर तिसऱ्या तारिखेस त्यांना किंचित् बरें वाटलें

व त्याच रात्रीं बडोद्याहून निघून चौथ्या तारिखेस महाराज मुंबईस परत आले. रात्रीं गाडींत झोंप मुळींच आली नाहीं; आणि मुंबईस आल्यावर छातींतील वेदना असह्य होऊं लागल्या. डॉक्टर शिरगांवकर, देशमुख अणि टक्कर यांचे उपचार सुरू झाले. पांचव्या तारिखेस महाराजांची स्थिति अत्यंत चिंताजनक आहे असें डॉक्टरांचें मत पडलें. श्रीमंत बापूसाहेब, मे० आप्पासाहेब कागलकर, मे० बाबासाहेब खानवीलकर आणि श्रीइंदुमतीराणीसाहेब, ही मंडळी त्यांच्याजवळ होती. तेच दिवशीं रा० ब० सबनीस यांना तारेनें बोलाविण्यांत आलें; पण कोल्हापुराहून ते आणि इतर मंडळी निघण्यापूर्वींच, सहाव्या तारिखेच्या पाहटेस पाउणेसहाचे सुमारास, महाराजांची जीवितयात्रा, संपली अशी बातमी कोल्हापुरास येऊन सर्व शहर दुःखांत बुडून गेलें! महाराज अखेरपर्यंत चांगल्या शुद्धींत होते. छातींतील वेदनामुळें रात्रभर त्यांना अतिशय त्रास होत होता. पाउणेसहाचे सुमारास ते खुर्चीवर उठून बसले. "मी जाण्यास तयार आहें. डर कुच नही. सबकु सलाम बोलो!" असें ह्मणून त्यांनीं डोकें खालीं टेकिलें आणि त्यांचें प्राणोत्क्रमण झालें! तारेनें ही बातमी सर्वत्र पसरली. सकाळीं मुंबईहून महाराजांचें शव मोटारींत घालून कोल्हापुरास आणण्याकरितां तयारी करण्यांत आली. संध्याकाळचे सुमारास ही प्रेतयात्रा पुण्यास पोंचली. तेथें आणि रस्त्यांतील दुसऱ्याहि अनेक ठिकाणीं हजारों लोकांच्या झुंडी जमून त्यांनीं महाराजांच्या देहाचें शेवटचें दर्शन घेतलें! मध्यरात्रीचे सुमारास कोल्हापूरच्या दरबारी दिवाणखान्यांतील छत्रपतींच्या सिंहासनावर हें महाराजांचें प्रेत ठेवण्यांत आलें; आणि दुःखपूर्ण शब्दांनीं आपण सिंहासनारूढ झाल्याचें नवे छत्रपति श्रीराजाराममहाराज यांनीं आपल्या प्रजाजनांस जाहीर केलें. लागलींच स्मशानयात्रेस सुरवात झाली. हजारों लोक महाराजांचें शेवटचें दर्शन घेण्यास आणि त्यांच्याविषयीं आदरबुद्धि व्यक्त करण्यासाठीं या प्रेतयात्रेंत सामील झाले होते. अनेक छत्रपतींच्या अंत्यसंस्कारांनीं पवित्र झालेल्या दहनभूमींत महाराजांचें शव नेण्यांत आलें. आणि येथें शिवाजी वैदिक शाळेंतील मराठा विद्यार्थ्यांनीं वैदिक मंत्रांनीं महाराजांच्या देहाचे अंत्यविधी केले, त्यांच्या सन्मानार्थ ४८ तोफांची सलामी देण्यांत आली; आणि त्यांच्या शवास अग्नि देण्यांत आला!

मराठा जातीच्या वैदिकांकडून छत्रपतीसारख्यांचा अंत्यविधि होण्याचा हा महाराष्ट्राच्या इतिहासांत तर पहिलाच प्रसंग होता. दुःखाच्या भारानें नरम

झालेल्या मनास देवभोळेपणाच्या समजूती विशेष चिकटतात असा अनुभव आहे; नवीन सुधारणांचा विचारहि अशा स्थितींत शक्य नसतो. पितृविरहाच्या आकस्मिक संकटानें पोळलेल्या तरुण छत्रपतींना आणि शोकार्णवांत बुडालेल्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेबांना आज कोणत्या दिशेनें पाऊल टाकावयाचें हें ठरविणें भाग पडलें. पूर्वपरंपरेला धरून ब्राह्मणांकडून हा विधि करवावयाचा कीं, एकदम नवीन दिशेनें पाऊल टाकून मराठ्यांच्याकडून हें गंभीर कार्य पार पाडावयाचें, असा त्या वेळीं त्यांच्यापुढें प्रश्न उभा राहिला. एका बाजूनें हजारों वर्षांची रूढी त्यांना धमकावीत होती. दुसऱ्या बाजूनें मृताच्या कृतसंकल्पाची स्मृति त्यांना उत्तेजित करीत होती. " कांहीं होवो माझ्या पतीच्या इच्छा मी पार पाडणार, " असा महाराणीसाहेबांनीं निश्चय केला. अशा प्रसंगीं आजपर्यंत मी, मी, ह्मणणारे पुष्कळ सुधारक कर्तव्यच्युत झाले, आणि जन्मभर प्रतिपादिलेल्या सुधारणांवर त्यांनीं अखेरीस पाणी सोडिलें. याचें कारण त्यांच्यांत या वीरपुत्राचें आणि वीरमातेच क्षात्रतेज नव्हतें हेंच खरें !

महाराजांच्या मृत्यूनें कोल्हापूरच्या गादीवर बसलेल्या सर्व छत्रपतींत अत्यंत बुद्धिमान् गणण्यास योग्य असा छत्रपति आणि महाराष्ट्राच्या इतिहासांतील अत्यंत कर्तबगार आणि पराक्रमी पुरुषांपैकीं एक पुरुष नाहींसा झाला. त्यांच्या स्वभावांत दोष नव्हते असें नाहीं. कविप्रतिभेच्या बाहेरच्या प्रदेशांत निर्दोष मानवी जीवन अनुपलब्ध आहे व तें तसेंच राहणार. हा सिद्धांत लक्षांत ठेवून विचार केला असतां, अनेक जातींच्या मराठा राष्ट्रांत त्यांच्याहून अधिक धाडसी, अधिक हरदमख्याली आणि अधिक पराक्रमी मनुष्य क्वचितच निपजला असेल, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणेतरांचें त्यांच्यावर प्रेम होतें; तसेंच ब्राह्मणांचा त्यांच्यावर अतिशय राग होता. तथापि या त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनाहि ब्राह्मणेतरांप्रमाणेंच महाराजांच्या तेजस्वी बुद्धिमत्तेबद्दल आश्चर्यच वाटत असे. ब्राह्मणांना महाराजांचा राग येत असे यांत आश्चर्य तर नाहींच; पण महाराजांच्या अलौकिकत्वाचा ही गोष्ट एक उत्तम पुरावा आहे, असें ह्मणतां येईल. महाराजांचें जीवितकार्य कलहाच्या दाढेंत हात घालून करावयाचें होतें. सर्व जन्मभर त्यांना वादळांतच राहावें लागलें. या वादळास न जुमानितां महाराजांनीं जें काम केलें तें ब्राह्मणेतरांना जितकें हितप्रद वाटत होतें तितकेंच ब्राह्मणांना अनिष्ट वाटत होतें. महाराजांच्या भोंवतीं पसरलेलें वादळ शांत झाल्यानंतर इतिहासकार त्यांच्या

कार्याचें यथार्थ स्वरूप विरोधकांनाहि पटण्यासारख्या निःपक्षपातित्वानें ठरवितील आणि कदाचित् त्यानंतर आज त्यांचा द्वेष करणारा वर्ग ब्राह्मणेतरांप्रमाणेंच महाराज हे एका अत्यंत मोठ्या राष्ट्रकार्याचे प्रमुख प्रवर्तक होते, हें कबूल करील; परंतु आज देखील सर्व महाराष्ट्रानें त्यांच्या बुद्धिप्रभेपुढें आदरानें मान लवविली पाहिजे यांत संशय नाहीं. त्यांच्या मृत्यूनंतर सर्व पक्षांच्या मराठी वर्तमानपत्रांतून त्यांच्याविषयीं जे उद्गार प्रगट झाले, त्यांवरून ही गोष्ट सिद्ध होते. विशेषतः हल्ला करण्याकरितांच नेहमीं त्यांच्या नांवाचा उल्लेख करणाऱ्या केसरीनें कबूल केल्याप्रमाणें, त्यांची बुद्धिमत्ता इतकी मोठीं होती कीं, पूर्वीच्या काळीं ते जन्मले असते तर आपल्या विलक्षण संघटनाचातुर्यानें त्यांनीं आपलें नांव इतिहासांत अजरामर केलें असतें. प्रतिस्पर्धी पक्षाकडून देण्यांत आलेल्या या सन्मानापेक्षां अधिक मोठा सन्मान ब्राह्मण वर्गाकडून अपेक्षण्याचें कारण नाहीं.

व्यक्तिशः महाराजांचें विलक्षण चारित्र्य सामान्य मनुष्यास न उकलण्यासारखें होतें. त्यांचें राहणें आणि करणें अतिशय साधेपणाचें आणि दयाळुपणाचें असें. त्यांची राहण्याची जागा, त्यांची निजावयाची खाट, त्यांचा पोषाख हीं इतकीं साधीं असत कीं, त्यांना पाहून पुष्कळ साध्या लोकांसहि आपल्या डौलीपणाबद्दल लाज वाटावी. नोकर चाकर आणि मित्रमंडळी यांच्या अत्यंत बारीक सारीक गरजांकडे त्यांचें लक्ष असें. बहुतेक प्रसंगीं ते ममताळुपणानें आणि क्षमाशीलपणानें वागत असत. अगदीं खालच्या आणि अडाणी लोकांत ते अगदीं आपलेपणानें मिसळत. कोणीं त्यांच्यावर निष्ठुरपणानें हल्ला केला, तरी तो शांतपणानें ऐकून घेण्याची त्यांना शक्ति असे. यापेक्षां साधा स्वभाव आणि साधें मन कसलें असावयाचें ? त्यांच्या यशस्वी व्यक्तिसामर्थ्याचें मुख्य कारण हाच गुण होय. त्यांना पुष्कळ शत्रू असले तरी ते त्यांच्याजवळ येऊन, त्यांच्या स्वभावाच्या मोहांत सांपडल्यावांचून, क्वचितच परत जाऊं शकत असत. असें होण्याचें कारणहि त्यांचें हेंच स्वभाववैशिष्टय होय. महाराज हे अत्यंत निष्ठुर आणि खोल मनाचे शत्रु होते; परंतु शत्रुत्व विसरण्याची त्यांची शक्तीहि तितकीच अचाट होती. सर जॉर्ज लॉइड यांनीं एकदां ह्मटल्याप्रमाणें " मनुष्यस्वभावांतील दोषांविषयीं सहानुभूति आणि त्यांतच आनंद मानण्याची त्यांची गूढ शक्ति " यामुळेंच विशेषेंकरून त्यांना सर्वप्रकारच्या लोकांवर प्रेम करितां येत असे. आपल्या विरुद्ध झगडणाऱ्या मनुष्याचें देखील

गुणग्रहण करण्याचें त्यांच्यांत मनौदार्य होतें. यामुळें त्यांचें वैर कितीहि निष्ठुर असलें तरी कारणपरत्वें त्यांच्याशीं हस्तांदोलन करणें कोणासहि शक्य होई. सकृद्दर्शनीं ‘ वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ’ दिसणाऱ्या त्यांच्या परस्पर विसंवादी स्वभावाचें मर्म वर सांगितल्याप्रमाणें होतें.

महाराजांच्या मनौदार्याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. राजेश्री टिळक हे आजारी असतां महाराजांनीं त्यांच्या चिरंजीवास पुढील पत्र लिहिलें:– “ लोकमान्यांची प्रकृति बरी नाहीं असें ऐकून मला अत्यंत दुःख होत आहे. मेहेरबानी करून दररोज त्यांच्या प्रकृतीविषयीं मला तार करा. ऊष्ण हवेंत त्यांना नेण्यांत यावें असें मला वाटतें. मिरजेस माझ्या बंगल्यांत ते येऊन राहतील अशी मला आशा आहे. ” हें पत्र लिहिल्या वेळीं टिळकांच्या हातून ताईमहाराजांच्या कज्जासंबंधानें महाराजांचा पराभव झाला होता, हें येथें सांगितलें पाहिजे. राजेश्री टिळक आणि त्यांचे मित्र यांच्यावर **संदेश** पत्रांत कांहीं फंडांच्या अव्यवस्थेसंबंधानें झालेली टीका वाचकांच्या स्मरणांत असेलच. यामुळें संदेशाचे वर्गणीदार कमी होऊन, तें पत्र नुकसानींत येऊं लागलें. संदेशनें उघडकीस आणलेल्या भानगडी सार्वजनिक पैशाच्या असल्यामुळें, त्या बाहेर काढून संदेशनें चांगलें काम केलें, अशी महाराजांची समजूत होती; ह्मणून एका तिऱ्हाइत मनुष्यामार्फत संदेशकर्त्यास त्यांनीं कांहीं रक्कम उसणवार दिली. ही गुणगुण बाहेर पडतांच त्या पत्राचे ग्राहक आणखीहि कमी होऊं लागलें. तेव्हां महाराजांनीं संपादकांस असें स्पष्ट पत्र लिहिलें कीं, ब्राह्मणेतर पक्षाच्या न्याय्य अंगाची प्रसंशा करून जर त्याच्या पत्राची नुकसान होत असेल तर तसें करणें त्यानें बंद करावें. कांहीं दिवसांनीं त्या पत्रांत महाराजांवर टीका येऊं लागली. लागलीच ज्यांच्या नांवें त्या संपादकाकडून दिलेल्या रकमेबद्दल प्रॉमिसरी नोट लिहून घेतली होती त्यास महाराजांनीं लिहिले कीं, आपल्या जवळची प्रॉमिसरी नोट फाडून टाका ! “ नाहीं तर सूड उगविण्याच्या बुद्धीनें या नोटीचे पैसे वसूल करण्याची आह्मांस वासना होईल. अशा तऱ्हेची दुर्बुद्धि आमच्या मनांत उत्पन्न होणें अशक्यच करून ठेवूं या ! ”

एकदां थंडीच्या दिवसांत महाराज अंथरुणावर पडल्या पडल्या अंग दाबून घेत होते. महाराजांना लवकरच झोंप लागली. थोडया वेळानें अंग रगडणाऱ्या नोकरास झोंप आली; आणि तो तेथेंच महाराजांच्या शेजारीं घोरत पडला. रात्र

कडक थंडीची होती. हळूहळू महाराजांच्या अंगावरील गरम पांघरूण हुज-ऱ्यानें ओढून घेतलें. अखेर त्यानें सर्वच रग आपल्या अंगाभोंवतीं घेतली. कडकडणाऱ्या थंडीनें महाराजांना जागें केलें! आपली रग कोठें गेली हें तात्काल त्यांच्या लक्षांत आलें. पण त्या नोकरास जागे न करतां महाराज बाहेर आले आणि विस्तवाजवळ शेकत बसलेल्या पाहरेकऱ्यांजवळ जाऊन ते तेथें आपणहि शेकत बसले. पहाटे जागा झाल्यानंतर घाबरून जाऊन त्या हुज-ऱ्यानें दुसऱ्या दारानें तेथून पळ काढिला. एक दोन दिवसांनीं पुष्कळ तपास करून महाराजांच्या हुजऱ्यांनीं त्यास गर्भगलित स्थितींत महाराजांपुढें आणिलें. त्याच्याकडे पाहून महाराज नुसते हंसले आणि घडलेली सर्व हकीकत लोकांना सांगून त्यांसहि त्यांनीं हंसावयास लाविलें!

महाराजांचे टीकाकार त्यांच्यावर जितक्या जोरानें हल्ला करीत तितक्या जोरानेंच त्यांची सहनशीलता वाढत जाई. इतकेंच नव्हे तर क्षणभर जरी त्या टीकमुळें त्यांना राग आला, तरी मागाहून टीकाकाराचें ते कौतुक करीत. एकदां एक सत्यशोधक गृहस्थ महाराजांचा कित्येक बाबतींतील देवभोळेपणा पाहून कांहींसे रागावले. आपलें डोकें त्याला थंड ठेवितां आलें नाहीं ह्मणून महाराजांनीं त्यांचे कान उपटले. कांहीं वेळ गेल्यानंतर तुह्मी भटाळलेले आहां असा त्यानें महा-राजांवर आरोप केला. एकदम महाराज उसळले आणि तूं मूर्ख आहेस असे उद्गार त्यांच्या तोंडून निघाले. शांतपणानें त्या सत्यशोधकानें उलट प्रश्न केला:-"कोण मूर्ख आहे? कटु सत्य सांगणारा मूर्ख कीं डोकें थंड ठेवण्याबद्दल दुसऱ्यास उपदेश करून स्वतः डोकें तापवून घेणारा मूर्ख?" महाराजांच्या हंसण्यामध्यें त्यांचा सर्व राग नाहींसा झाला. आणखी एका प्रसंगीं महाराज आपल्या जवळच्या एका मुलावर रागावले. "तूं कल्ले राखून किती डौल करतोस?" असा त्यांनीं त्या मुलांस प्रश्न केला. मुलानें कांहीं उत्तर दिलें नाहीं; परंतु जवळच्या एका मनुष्यानें हळूच महाराजांना विचारिलें कीं, आपल्या लहानपणच्या फोटोंत दाखवि-लेले कल्ले फोटोग्राफरनें रंगविले कीं कसें? महाराज एकदम खजील झाले, आणि कल्ले राखल्याबद्दल त्या मुलावर त्यांनीं कधींहि पुनः टीका केली नाहीं.

सहनशीलतेला जोडूनच त्यांचा दुसरा एक विशेष गुण होता. लोकांच्या चुका आढळल्या असतां ते सहसा बेफामपणानें रागावत नसत. जशा आपल्या चुका तशाच दुसऱ्याच्या असें समजून, विनोदानें त्या चुका ज्याच्या त्यास दाख-

विण्यापलिकडे ते कधींहि जात नसत. किंबहुना उघडया मनाच्या मनुष्यानें केलेल्या चुका सोसून घेण्यांतच त्याना एक प्रकारचा आनंद होत असे. यामुळें पुष्कळ वेळां ऐदी आणि लबाड लोकांना चांगली संधि मिळे ही गोष्ट खरी आहे; पण त्याबरोबरच हेंहि खरें आहे कीं, शेंकडो लोक अनेक चुका करूनहि त्यांच्या जवळ राहूं शकले आणि त्यांची विनोदपूर्ण क्षमाशीलता पाहून त्यांचें ते एकनिष्ठ मित्र बनले. मात्र या आनंदी स्वभावाला दुसरेंहि एक अंग होतें, हें विसरतां कामा नये. कोणीहि नम्रपणानें अंगशीं आलेली चूक पदरांत घेतली असतां ते जसे तात्काल क्षमाशील होत त्याचप्रमाणें ते त्यांच्याशीं कुऱ्यानें वागणाऱ्यांशीं अत्यंत निष्ठुरतेनें वागत असत. सर्व गोष्टी खपल्या तरी एक दोन गोष्टीची ते कधींहि कोणास क्षमा करावयाचे नाहींत. एकदां परगांवच्या एकदोन गृहस्था-समक्ष त्यांच्या विश्वासांतले एक मोठे अंमलदार आपल्या कर्तबगारीच्या बढाया मारूं लागले. हेतु असा दिसत होता कीं आपलें महाराजांवर फार वजन आहे असा पाहुण्यांचा ग्रह व्हावा. हें ओळखून हत्ती आणि कोंबडा यांच्या मैत्रीची गोष्ट माहीत आहे काय, असा महाराजांनीं प्रश्न केला, 'नाहीं.' असें पाहुण्यांनीं उत्तर दिलें. तेव्हां महाराज ह्मणाले:-" दोघांसहि एकाच मालकानें ठेविले होतें. यामुळें दोघांची मैत्रीहि चांगली जमली. हत्ती स्वस्थ बसला असतां कोंबडा त्याच्या अंगावर खेळे आणि इतरांना आपलें वैभव दाखवून तो कोंबडा खूष होत असे. हत्तीहि आपल्या मित्राच्या या सौख्याच्या आड कधींहि आला नाहीं. पुढें कोंबड्याची बडेजावी थोडी फाजील झाली आणि त्यानें हत्तीच्या सोंडेवर टोंच मारून शेजाऱ्यांना आपला मोठेपणा दाखविण्यास प्रारंभ केला. हें पाहून हत्तीनें हळूच आपला एक पाय कोंबडयाच्या अंगावर ठेवून त्याला तो खालीं दाबूं लागला. मग त्या कोंबडयाच्या दैन्याचें वर्णन काय करावयाचें आहे ! हत्तीनें या वेळीं त्यास जीवंत सोडलें; पण त्याच्या अंगावर बसून डौल करण्याचा त्याला पुन: कधींहि मोह झाला नाहीं." बिचारा अंमलदार लाजून खालींच पाहूं लागला हें सांगण्याची जरूरी नाहीं.

महाराजांच्या स्वभावांतील ज्या सौम्य आणि सात्विक भागाबद्दल येथवर उल्लेख केला आहे त्याचें साहचर्य तद्विरुद्ध स्वभावविशेषाशीं असणें शक्य आहे काय ? असा प्रश्न महाराजांचें एकंदर वर्तन पाहून सुचल्याशिवाय राहात नाहीं. अगदीं लहानपणापासून आपलें सर्वस्व एखाद्या हेतुसिद्धीसाठीं अर्पण करून,

बाकीचें सगळें जग त्या मूल हेतूस अनुषंगिक समजावयाचें अशी कांहीं थोडया लोकांची वृत्ति असते. औरंगजेब अत्यंत धार्मिक होता असें इतिहासकार ह्मणतात; परंतु त्यानें आपल्या पित्याचा आणि बंधूंचा अत्यंत क्रूरतेनें छल केला, त्या वेळीं त्याचा धार्मिकपणा कोठें गेला ? पितृच्छल हें औरंगजेबाच्या जीवनहेतूच्या सिद्धीचें एक साधन असल्यामुळें त्यांच्यांत धार्मिकता आणि निर्दयता या दोहोंची संगति जमली कीं काय ? महाराजांच्या जीवनाच्या विविध रंगांनीं भरलेल्या चित्रपटांत एक निश्चित कल्पनेची छाया पसरलेली होती; आणि भिन्न भिन्न रंगांचा त्यांनीं केलेला संग्रह ती कल्पना वठविण्याकरितांच होता. त्या सर्वव्यापी कल्पनेच्या दृष्टीनें, त्यांचे अनेक परस्परभिन्न गुण आणि व्यवसाय एकाच सूत्रांत गुंफलेल्या हाराप्रमाणें परस्परसंबद्ध होते असें दिसून येतें. हेतु-सिद्धीसाठीं वाटेल तो स्वार्थत्याग—आपल्या बाह्य संपत्तीचाच नव्हे, तर स्वतःच्या सुखाचा, किंबहुना त्याहूनहि प्रियतर असणाऱ्या गोष्टींचाहि त्याग—करण्यास ते तयार होते. अशा स्थितींत त्या हेतूच्या सफलतेकरितां दुसऱ्या कोणाच्या स्वार्थाचा बळी घेणें जरूर पडलें तर, तसें करण्यास मागें पुढें पाहणारा त्यांचा स्वभाव नव्हता. अशा स्वभावास स्वार्थप्रिय ह्मणावें कीं स्वार्थरहित ह्मणावें, हें सांगणें देखील कठीण आहे. त्या हेतूशीं अशीं माणसें इतकीं तद्रूप बनलेली असतात कीं, तीं माणसें आणि त्यांचा स्वार्थ भिन्नच मानतां येत नाहींत ! मात्र इतकें खरें कीं, सामान्य मानसशास्त्राच्या दृष्टीनें अशा स्वभावसंमिश्रणाचें पृथक्करण करणें अशक्य होतें.

महाराजांच्या आयुष्याचे असे कोणते हेतू होते कीं, ज्यांच्याकरितां त्यांनीं जगांतील सर्व गोष्टी गौण मानाव्या ? कोल्हापूर राज्याची इभ्रत, सत्ता आणि वैभव वाढून, हल्लींच्या बदललेल्या परिस्थितींत शक्य तितकें मराठा राष्ट्राचें धुरीणत्व त्या राज्याच्या अधिपतीकडे यावें, हा त्यांच्या अंतःकरणांतील स्पष्ट विचार होता. आपली सर्व महत्त्वाकांक्षा ब्रिटिश सरकारच्या राजकीय धोरणाशीं संलग्न झालेली आहे हें त्यांना माहीत होतें; अर्थातच महाराज त्या सरकारशीं पूर्णपणें राजनिष्ठ असत. संस्थानिक या नात्यानें आणि आपलें स्वत्त्व स्थापन करूं पाहणाऱ्या ब्राह्मणेतरांचे सहाय्यक ह्मणून, त्यांना असंख्य अडचणींतून आपला मार्ग आक्रमावा लागे. या अडचणींपैकीं कित्येकांचा येथें नामनिर्देश करणें देखील शक्य नाहीं. पुष्कळ दिवस दुसऱ्यांच्या अधिकाराखालीं असलेल्या संस्थानांत त्यांना आपलें वर्चस्व स्थापावयाचें होतें.

अनेक कारणांमुळें त्यांच्या घराण्याचा दर्जा इतर संस्थानिकांच्या मानानें कमी झाला होता. आह्मीं पूर्वींच सांगितल्याप्रमाणें शिवछत्रपतीच्या या वंशजांना कितीतरी कमी योग्यतेच्या संस्थानिकांच्याहि खालीं बसावें लागे. स्वतःचे जहागिरदार पुष्कळ वर्षांपासून छत्रपतींचा अधिकार झुगारून देऊं पाहात होते. त्यांचे मोठमोठे अंमलदार या नव्या राजाला आपल्याच हातचें बाहुलें समजत असत. अशा स्थितींत आपल्या गादीचें वजन वाढविण्याचा प्रयत्न करावयाचा ह्मणजे गैरसमजुतींचें अमूप पीक माजावयाचें हें त्यांना पक्कें ठाऊक होतें. त्यांच्याविरुद्ध हव्या त्या कंड्या पिकविण्यांत येत होत्या. महाराजांची निरंतर सावलीच बनलेल्या बापूसाहेबमहाराजांवर राजद्रोहीपणाचा आरोप करण्यापर्यंत मजल गेली होती. यावरून या गोष्टीची चांगली कल्पना येईल. मल्हारराव गाइकवाडांच्या खटल्याचीच कोल्हापुरास पुनरावृत्ति होते कीं काय, अशी एक दोनदां भीति उत्पन्न झाली होती. थोड्याशा ब्राह्मणेतरांचा नोकरींत प्रवेश झाल्याबरोबर ब्राह्मण आणि त्यांचे पाठीराखे आकाशपाताळ एक करण्यास तयार झाले. त्यांचे जिवलग मित्र, तुह्मी युरोपीयन अधिकाऱ्यांच्या विरुद्ध आहां, असा त्यांना टोमणा मारूं लागले. हल्लींच्या कालमानाप्रमाणें यःकश्चित् दिसणारा वेदोक्ताचा मान त्यांना देण्यास ब्राह्मण वर्ग—बलाढ्य, शिक्षणसंपन्न आणि देशाभिमानी ब्राह्मण वर्ग-क्षणभरहि तयार होईना. प्रसंगीं अशा वर्गाकडून महाराजांची संभावना कशी होणार, हें यावरून त्यांना दिसतच होतें. ज्या लोकांच्या जीवावर त्यांनीं सर्व आधार ठेवावयाचा, तें मराठाराष्ट्र मातीमोल होऊन गेलें होतें. इतिहासाचें मोठ्या आवडीनें अध्ययन करून, आपल्या पूर्वजांच्या अधःपाताला कारण झालेल्या त्यांच्याच नोकरांचीं कारस्थानें व विश्वासघात त्यांनीं समजून घेतलीं होतीं. शिवाजी आणि राजाराम यांनीं उभारलेली इमारत ब्राह्मणांनीं उत्पन्न केलेल्या वादळांत सांपडून कशी ढांसळली, हें त्यांच्या मनःचक्षूंपुढें स्पष्टपणें दिसत होतें. कैदेंत पडलेले छत्रपति, स्वतःच्याच सरदारांनीं वेढ्यांत कोंडून ठेविलेले आपले पूर्वज आणि आपल्याच लोकांच्या कलहप्रियतेमुळें ओढवलेलीं संकटें, अशा प्रकारचा भयानक इतिहासपट त्यांच्या दृष्टीसमोर उभा होता.

अशा संकटांनीं भरलेल्या मार्गानें पुढें जाऊन या तरुण राजाला आपला हेतु साधावयाचा होता. १९२२ सालीं त्यांनीं आपला हा प्रवास कितपत पार पाडला ? गमाविलेल्या इभ्रतीचा पुष्कळ भाग त्यांनीं आतां परत मिळविला होता. संस्थानांत

त्यांची सत्ता अनिरुद्ध आणि अरोधनीय झाली होती. आरंभीं जमलेले ढग पार वितळून गेले होते. आतां साम्राज्य सरकारच्या विश्वासाचें, आपलया लोकांच्या प्रेमाचें आणि शत्रूंच्या भीतीचें महाराज आस्पद बनले होते. हजारों देशबांधव त्यांना आपल्या गळयांतील ताईत समजत होते. पतित आणि निराश्रित जनता त्यांना आपलें संरक्षण करणारा अवतार असें समजूं लागली होती. पराक्रमी मनुष्य, पराक्रमी मुत्सद्दी, पराक्रमी समाजसुधारक, अशी त्यांची प्रसिद्धि झाली होती. दक्षिणेस होऊं घातलेल्या लोकसत्तात्मक समाजपद्धतीचा विस्तृत पाया घालण्याचें महद्भाग्य त्यांनीं आतां संपादिलें होतें. त्यांनीं केलेलें काम निर्दोष होतें, असें ह्मणणें चुकीचें होईल. पण त्यांच्या कामांतील पुष्कळसे दोष अपरिहार्य होतें. ज्या विरोधाशीं त्यांना टक्कर द्यावयाची होती, तो विरोध नाहींसा करणाऱ्याला ते दोष टाळणें अशक्यप्राय होतें. त्यांना फसविणारे अनेक लोक त्यांच्या जवळ होतें ते खोटे बोलत आहेत, पैशाचा अपहार करीत आहेत, त्यांना देण्यांत येणारे पारितोषिक अनाठायीं आहे आणि केव्हां केव्हां आपण एखाद्यास करीत असलेलें शासन निष्कारण आहे, या सर्व गोष्टी त्यांना माहित होत्या. तरीहि फसविणाऱ्यानें फसविलेलें आपणांस जणूं माहीतच नाहीं, असा त्यांना बहाणा करावा लागत असे. परंतु त्यांनीं अंगावर घेतलेलें काम अशा प्रकारचें होते कीं, तें करीत असतां यापैकीं बरेचसे दोष अपरिहार्य होत. कित्येक लोक महाराज गोऱ्या लोकांची खुशामत करणारे आहेत असें ह्मणत. वस्तुतः त्यांच्या महत्त्वाकांक्षा इतक्या मोठया होत्या कीं, कोल्हापूरच्या, किंबहुना मराठा राष्ट्राच्या इतिहासांत त्यांची गणना श्रेष्ठ प्रतींतच करावी लागेल. आतांपर्यंत वर्णिलेल्या चरित्रांतील प्रत्येक गोष्टीचें समर्थन न करितां, महाराजांनीं या आपल्या उच्चतम महत्त्वाकांक्षा परिस्थितीच्या मानानें पुष्कळच साध्य करून घेतल्या आणि तसें करण्याकरितां लोकोत्तर बुद्धिसामर्थ्याचा त्यांनीं भरपूर प्रमाणांत उपयोग केला असें निर्विवाद ह्मणतां येईल. त्यांनीं मिळविलेलें यश पूर्ण नसलें तरी इतकें मोठें होतें कीं, कोल्हापूरच्या इतिहासांत त्यांचें नांव प्रमुख ठिकाणीं सर्वदा चकाकत राहील यांत मुळींच शंका नाहीं.



# परिशिष्ट.

## ' टिळक ' पत्रांतील मृत्युलेख.

# कोल्हापूरचे महाराजांचा मृत्यु.

अरितें द्वादश अब्द न ज्याच्या चिंतेकरूनि निज लागे;
तो हा पुन्हां नुठाया वसुंधरे तुज धरूनि निजला गे.

[ ज्याच्याविषयींच्या धडकीमुळें त्याच्या शत्रूंना बारा बारा वर्षांत कधीं एकहि दिवस डोळ्याला डोळा लागला नाहीं तो हा वीर, पृथ्वीमाते, आज तुझ्या अंकावर कायमची विश्रांति घेण्याकरितां पडलेला आहे. ]

वरील वाक्य कर्णनिधनास उद्देशून लिहिलें गेलेलें आहे. आणि आज तें वाक्य कुणाला यथायोग्य लागू पडत असेल, तर कै० कोल्हापूरचे महाराज यांनाच होय. पुढारलेले व मागसलेले लोक, जन्मत: जास्त अधिकार प्राप्त झालेले लोक ( Privileged classes ) व जन्मत: कमी अधिकार असलेले लोक, धर्मदृष्ट्या अग्रमान असलेले लोक व धर्मदृष्ट्या अग्रमान नसलेले लोक, सुविद्य व निर्विद्य लोक, ज्ञानावर जन्मसिद्ध हक्क असलेले लोक व ज्ञानाला पिढ्यान्‌पिढ्या आंचवलेले लोक, ज्ञानव्यवसायाचीं द्वारें खुलीं असलेले लोक व ज्ञानव्यवसायाचीं द्वारें बंद असलेले लोक, सुशिक्षित लोक व शिक्षणाला मुकलेले लोक, अथवा स्पृश्य लोक आणि अस्पृश्य लोक ह्यांचे दरम्यान जो घोर संग्राम सध्यां चाललेला आहे, त्यांत कनिष्ठ पक्षाचा अभिमान धरून वरिष्ठ पक्षाचे लोकांना सळो का पळो करून सोडणारा जर कोणी आजपर्यंत निघाला असेल, तर ते कोल्हापूरचे महाराजच होत. अमुक एक मनुष्य बहाद्दर आहे कीं, मेंग्यामारुती आहे याची एक खूण अशी आहे कीं त्याचें

**नांव ऐकल्यावरोबर तीव्रतम प्रेम किंवा तीव्रतम द्वेष**

जर हजारों लाखों लोकांच्या अंत:करणांत उत्पन्न होत असेल, तर तो बहाद्दर मनुष्य आहे व तो जर तसा उत्पन्न होत नसेल तर त्यांत कांहीं अर्थ नाहीं, तो मेंग्यामारुती आहे. आमच्या टिळकांचें असें होतें. टिळक ह्मटलें कीं, मवाळ

लोकांची छाती फाटून जात असे, सरकारी अधिकाऱ्यांना घाम सुटत असे; पण त्याजप्रमाणें लाखो लोकांना टिळक म्हटलें कीं आनंद होई, आपलें स्वराज्य आपल्याला मिळालें असें वाटे. हल्लीं गांधींचें असेंच आहे व पूर्वी बापू गोखले, महादजी शिंदे, हरिपंत फडके यांचेंहि असेंच असे. नाना फडणीस वारले त्या दिवशीं सर्व मराठी दुनिया हताश झाली, पण इंग्रजांना उमेद चढली. बापू गोखले पडले, त्या वेळीं मराठी फौज रडली; पण इंग्रजी फौजेला नवें अवसान आलें. लो० टिळक वारले, त्या वेळीं आलम दुनियेनें डोळ्यांतून पाणी काढलें; पण धारवाडचे पेन्टरना त्याच वेळीं हलकी भाषा वापरण्याइतका उल्हास उत्पन्न झाला. कारण हीं नररत्नें अशीं होतीं कीं, ज्यांनीं त्यांचेवर प्रेम करावें, त्यांनीं

## आपला प्राण त्यांचेवर कुर्बान करावा

व ज्यांनीं त्यांचा द्वेष करावा त्यांनीं तो इतका करावा कीं, त्यांच्या नाशाला त्यांनीं टपून बसावें. कै० कोल्हापूरचे महाराज हेहि अशांपैकींच एक अपूर्व नररत्न होते. ज्यांना ते अप्रिय होते ते त्यांचा इतका द्वेष करणारे होते कीं, साऱ्या दुर्गुणांचा पुंजाडा, साऱ्या पापकर्मांचें अधिष्ठान, साऱ्या देशद्रोहाचें आगर व साऱ्या कुटिलतेचें सागर जर कोणी असेल तर ते कोल्हापूरचे महाराजच आहेत, असें ते मानीत. उलट पक्षीं जे लोक त्यांचेवर प्रेम करणारे होते, ते त्यांचेवर इतके फिदा असत कीं, त्यांचें नांव हा त्यांना स्वर्ग होता, हें नंदनवन होतें, ही त्यांना देववाणी होती, हा त्यांना आशेच्या रविकिरणांचा तेजःपुंज गगनगोल होता. हीं दोन मतें-ह्या दोन बाजू-ह्या दोन कडेलोटीच्या अभिमानवृत्ति-ह्या दोन्ही त्यांचे मृत्युसमयीं आपण आपल्या डोळ्यांपुढें ठेवल्या म्हणजे त्या काय दाखवितात ? हेंच कीं कोल्हापूरचे महाराज हे एक अपूर्व नररत्न होते व वर उल्लेख केलेल्या यादींत-होय, हें आम्ही लो० टिळकांविषयींवरील निरतिशय प्रेमानें म्हणतों-वर उल्लेख केलेल्या यादींत लो० टिळकांचे मांडीस मांडी लावून स्वर्गलोकांत कै० कोल्हापूरचे महाराज विराजमान होतील यांत बिलकूल संशय नाहीं.

गोखले आणि टिळक ह्या दोघांचेहि मृत्युलेख लिहिणें, फार कठीण आहे, कारण त्यांनीं एकमेकांचा अत्यंत द्वेष केलेला होता. ताराबाई आणि पहिला नानासाहेब

ताराबाईचा मनसुबा बुडविला व ताराबाईनीं नानासाहेबांना पाण्यांत पाहिलें. शिवाशी व अवरंगजेब ह्या दोघांच्याही आयुष्य–रहस्यांत शिरणें फार कठिण आहे, कारण शिवाजीनें अवरंगजेबाच्या राज्याचा विध्वंस केला व अवरंगजेबानें आजन्म शिवाजीचा धिःकार व तिरस्कार केला. पण कालाच्या कीर्तिमन्दिरांत दोघेहि विराजमान झाल्यानंतर आतां आपणांस त्यांच्यांतील द्वेषाशीं काय करावयाचें आहे ? आपणांस नानासाहेबाकडे मराठी राज्याचा घटक व ताराबाईकडे कर्तृत्ववान् स्वाभिमानी स्त्रीरत्न ह्याच नात्यानें पाहिलें पाहिजे. गोखल्यांचा मनमोहक मुत्सद्दीपणा व टिळकांचा कडवा आणि कणखर कार्यक्रमच आपण पाहिला पाहिजे. अवरंगजेबाचा हिंमतबाज स्वधर्माभिमान व शिवाजीचा धाडसी पराक्रम हाच आपण लक्षांत घेतला पाहिजे. त्या त्या व्यक्ति जिवन्त होत्या तेव्हां आपण कदाचित् शिवाजीच्या गोटांत असूं किंवा कदाचित् औरंगजेबाच्या गटांत असूं, त्या त्या व्यक्ति जिवन्त होत्या तेव्हां आपण कदाचित् ताराबाईच्या पक्षाचे असूं, कदाचित् नानासाहेबांच्या पक्षाचे असूं, त्या त्या व्यक्ति जिवन्त होत्या त्या वेळीं आपण कदाचित् टिळकांच्या सैन्यांत असूं, कदाचित् गोखल्यांच्या पथकांत असूं, पण ते वारल्यापासून त्याचें काय ? जितक्या दुःखानें आपण ताराबाईचे शवास वन्दन करूं तितक्याच सन्मानानें नानासाहेबाचे शवास खान्दा देऊं, जितके लोकमान्यांचे मृत्यूकरितां हळहळूं तितके गोखल्यांच्या मृत्यूकरितां शोक करूं, जितकें शिवाजीच्या समाधीपुढें गुडघे टेकूं तितकाच अवरंगजेबाच्या कबरस्थलापुढें कुर्निसाद करूं ! कारण मृत्यु आल्यानन्तर पक्षभेद द्वेष व अभिमान यांना अवकाश कुठला ? मृत्यु आला ह्मणजे द्वेषाचा मुलुख सम्पला. मग आपण गुणनिरीक्षणाचे प्रांतांत शिरलों, मग शोकाचा आणि सहानुभूतीचा मुलूख लागला. मग गुणैकदृष्टीनें मृत व्यक्तीच्या गुणसमुद्रांत अवगाहन करण्याचा हक्क आपणांस मिळाला ! हें अवगाहन करीत असतां द्वेषाचा विषारी वारा आपल्या आनन्दाचा भंग कसा करील ? समरसत्तेच्या सुखानुभवांत द्वेषाचा विषारी फवारा व्यत्यय कसा आणिल ? ह्या वेळीं द्वेषाचा एकही मनोविकार आपणांस चलित करणार नाहीं. ह्या वेळों मृत व्यक्तीच्या गुणानुरंजनांत द्वेषाचा एकही मिठाचा खडा पडणार नाहीं.

शिवाजी वारल्याचें ज्या वेळीं औरंगजेबानें ऐकलें त्या वेळीं त्याला

**दुःखाचा अनावर हुन्दका**

आला. विष्णुशास्त्री चिपळूणकर, कीं ज्यांनीं आपल्या निबंधमालेंतून महादेव

गोविंद रानड्यांची रेवडी उडवून दिलेली होती, ते ज्या वेळीं वारल्याचें समजलें त्या रानड्यांच्या डोळ्यांतून पाणी आलें व 'विष्णुशास्त्री, आतां जायचें तुह्मांला काय कारण होतें?' असे उद्गार त्यांचे मुखांतून निघाले. आगरकर वारले तेव्हां पहिला शोकाचा उमाळा टिळकांना आला व गोखले वारल्यानंतर सिंहगडावरून पहिल्यान्दा टिळक धांवत आले. लोकमान्यांचा व कोल्हापूरच्या महाराजांचा भयंकर द्वेष! इतका द्वेष कधीं कुणीं पाहिला नसेल, इतका द्वेष कधीं कुणीं ऐकला नसेल! पण लोकमान्यांच्या निधनाचें वृत्त ऐकल्याबरोबर कोल्हापूरच्या महाराजांचा कण्ठ दाटून आला व पुढील ताट दूर लोटून त्यांनीं कडकडीत उपवास केला. मृत्यूच्या गम्भीर प्रान्तांत कुठला द्वेष व कुठलें वैर? तेथें फक्त गुणैक दृष्टीचाच अधिकार!

आणि ह्या गुणैक दृष्टीनेंच आज विचार करतां कोल्हापूरच्या महाराजांच्या समाधीवर प्रत्येक महाराष्ट्रीय आज स्मृतिसुमनांचा वर्षाव करील अशी आमची खात्री आहे. कोल्हापूरच्या महाराजांचे मृत्यूनें आज एक वीर नाहींसा झालेला आहे, त्यांचे मृत्यूनें एक योद्धा शरपंजरीं पडलेला आहे, त्यांचें मृत्यूनें महाराष्ट्रांतला एक सेनापति, महाराष्ट्रांतला एक रणगाजी स्वर्गाला गेलेला आहे. महाराष्ट्रांत आज दोन युद्धें चाललेलीं आहेत, एक अखिल हिंदुस्थानचें नोकरशाहीशीं युद्ध व दुसरें मागसलेल्या वर्गाचे पुढारी लोकांशीं युद्ध! दोन्हीं युद्धें स्वातंत्र्याकरितां आहेत. दोन्ही हिंदुस्थानच्या अभ्युन्नतीला आवश्यक आहेत. हिंदुस्थान राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झाला पाहिजे आणि हिंदुस्थानांतील प्रत्येक समाज धर्मदृष्टीनें व व्यवहार दृष्टीनें स्वतंत्र झाला पाहिजे. सबंध तवा तापला व भाकरीचा प्रत्येक भागहि पक्व झाला पाहिजे. सर्व हिंदुस्थान राजकीय दृष्ट्या स्वावलंबी बनला पाहिजे व हिंदुस्थानांतील प्रत्येक समाज धर्मदृष्टीनें व व्यवहारदृष्टीनें स्वावलंबी बनला पाहिजे. सबन्ध साखरभात शिजला पाहिजे व साखरभाताचें शीतन् शीतहि शिजलें पाहिजे. सबन्ध हिंदुस्थान युरोपीयन राष्ट्रांचे बरोबरीच्या दर्जाला चढला पाहिजे व हिंदुस्थानांतील प्रत्येक समाज धर्मदृष्टीनें व व्यवहारदृष्टीनें एकमेकांच्या बरोबरीच्या दर्जाला आला पाहिजे सबंध स्वैंपाक उत्कृष्ट झाला पाहिजे. व स्वैंपाकांतला

प्रत्येक पदार्थहि स्वादिष्ट व मिष्ट

झाला पाहिजे. राष्ट्रकार्य करायला हीं दोन्हीं कार्यें केलीं पाहिजेत, हीं दोन्हीं कार्यें सिद्धीला नेलीं पाहिजेत. लो. टिळकांनीं यांपैकीं पहिलें कार्य उचललें, कोल्हापूरच्या महाराजांनीं दुसरें कार्य उचललें. पहिलें कार्य उचलल्यामुळें

लो० टिळक हे दुसऱ्या कार्याचे ह्मणजे सामाजिक सुधारणेचे द्वेष्टे गणले गेले, दुसरें कार्य उचलल्यामुळें कोल्हापूरचे महाराज हे पहिल्या कार्याचें ह्मणजे राजकीय सुधारणेचे द्वेष्टे समजले गेले. दोघांत द्वेष पडला, दोघांचे तट निराळे झाले, दोघांत विस्तव जाईनासा झाला ! हे दोघे एक होते व एक रहाते, तर महाराष्ट्राचें दैव ताबडतोब उघडलें असतें. पण ह्या दोघांतील द्वेषामुळें दुही माजली व फाटाफूट पडली. पण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं दोघेहि खन्दे वीर होते. दोघांचीही कार्यें राष्ट्रास अवश्य होतीं.

आतां दोघेहि वारले आहेत, दोघेहि स्मृतिवश झालेले आहेत. आतां दोघानांहि देव्हाऱ्यांत ठेवलें पाहिजे, दोघांच्याहि गुणांवर प्रेम केलें पाहिजे, राज्याधिकृत वरचढ वर्गाशीं झगडणारा टिळक-वीर व धर्माधिकृत वरिष्ठ वर्गाशीं झगडणारा कोल्हापूरचा बहाद्दर राजा, या दोघांचेंहि कार्य आपणांस करावयाचें आहे, ह्या दोघांच्याहि इच्छा आपणांस पार पाडावयाच्या आहेत. युरोपीयनांचा वरचढपणा पाहून चीड येणारा टिळक व उच्च वर्णाचा वरचढपणा पाहून चीड येणारा कोल्हापूरचा राजा—दोघांचीही चीड सात्त्विक आहे, उन्नतिमूलक आहे. वन्द्य आहे.



# परिशिष्ट २ रें.

## ‘ विजयी मराठा ’ पुणें, ता. २७ एप्रील सन १९२५ इ०

# राजर्षि शाहुमहाराज यांच्या कांहीं आठवणी.

### श्रीक्षात्रजगद्गुरु यांचा लेख.

---

#### दरबार शोभेचे प्राणी !

लोकशाहीच्या या काळांत एखादी सुधारणा यशस्वी करणें झाल्यास सरदार जहागिरदारांपेक्षां सामान्य लोकांचीच सहानुभूति अधिक घ्यावी लागते, याची जाणीव श्रीशाहुमहाराज यांना पूर्णपणें होती. कोल्हापुरांतील सर्वसाधारण नागरिक मराठे आपले धर्मविधी स्वज्ञातीच्याच पुरोहितांकरवीं करवून घेत असतांना, अमुक एक मराठे सरदार आपले धर्मविधी अद्यापि ब्राह्मणांकडूनच करवून घेतात, अशा तऱ्हेची तक्रार श्री० मामासाहेब खानवीलकर यांनीं श्री-शाहुमहाराज यांचेकडे केली. त्यावर महाराज बोलले, “हत्ती, घोडे, उंट हे जसे आतां लवाजम्याच्या शोभेचे प्राणी झालेले आहेत; तसेच सरदार, जहागिरदार, दुमालदार हे आतां दरबारच्या शोभेचे प्राणी झालेले आहेत ! त्यांच्या हाल-चालीकडे लक्ष देऊन तुह्मी त्यांना अधिक महत्त्व कां देतां ? ”

#### महाराजांचे गुरु कोण ?

“ श्रीशाहुमहाराज यांचें लक्ष ब्राह्मणेतर चळवळीकडे ओढण्यास आप-णच कारणीभूत झालों, ” अशा अर्थाचें एक विधान श्रीयुत बाबूराव यादव यांनीं श्रीयुत कीर्तिवानराव निंबाळकर यांचेंजवळ केलें. पुढें कांहीं दिवसांनीं कीर्तिवानराव निंबाळकर यांनीं हीच गोष्ट खुद्द महाराजांजवळ बाबूराव हजर असतांना काढिली. महाराजांनीं वरील विधानाचा इनकार केला, एवढेंच नव्हे उलट कांहीं वर्षांपूर्वी खुद्द बाबूराव यादव हेच ब्राह्मणाळलेले होते हें त्यांनीं सप्रमाण सिद्ध केलें; व शेवटी महाराज ह्मणाले, “ पूर्वजांचा इतिहास व स्वानुभव हेच माझे या बाबतींतील खरे गुरु होत. तथापि मूलारंभीं या बाबतींत मला विशेष सहाय्य कोणीं केलें असेल

तर ते रा० ब. सबनीस दिवाण व नानासाहेब मुळीक या दोन गृहस्थांनीं-राजकारणांतील ब्राह्मणांचे दोष रा० ब. सबनीस दिवाण हे मोठ्या कुशलतेनें दाखवीत असत व ब्राह्मणांचें खाजगी बाबींतील दोष नानासाहेब मुळीक हे अत्यंत विनोदी व चटकदार भाषेंत सांगत असत. ''

## महाराजांची सहनशीलता.

लष्करी शिक्षणांत तरबेज असलेले व स्वतः बहाद्दर ह्मणून घेणारे संस्थानिक स्वज्ञातीच्याच चार दोन मुलांनीं केलेली टीका सहन करण्याच्या बाबतींत किती धैर्यशील असतात, हें शिवस्मारक प्रकरणावरून महाराष्ट्रास कळून चुकलेंच आहे. पण श्री शाहुमहाराज यांची कृति अगदीं त्याच्या उलट होती. स्वज्ञातीयांनीं नव्हें, प्रतिपक्षियांनीं टीकेचा भडिमार केला, नव्हें आकाश पातळ एक केलें तरी देखील ते अंगिकारिलेल्या कार्यापासून एक रतिभरहि ढळत नसत. अंतःकणरपूर्वक इच्छा करणाऱ्यापैकींच ते एक होते. एके दिवशीं रात्रीं सुमारें नऊ वाजतां श्रीशाहु-महाराज हे नोकर लोकांकडून आंग थोपटून घेत बसले होते. ( तरुणपणीं कुस्ती केल्यामुळें व उतार वयांत ती सोडल्यामुळें श्रीशाहुमहाराज यांना झोंपण्यापूर्वी आंग रगडून घेण्याची संवय होती. ) व त्याच वेळीं रा. बने वकील हे खुद्द महाराजां-वरच आलेली ब्राह्मणी वृतपत्रांतील कडक टीका महाराजांना वाचून दाखवीत होते. अशा संधींतच आह्मी तेथें गेलों. महाराज चांगले उठून बसले व ह्मणाले "या उतार वयांत मला दोन संवयी पडल्या आहेत. नोकर लोकांकडून आंग थोपटून घेणें ही एक आणि ब्राह्मण लोकांकडून शिव्या खाणें ही दुसरी ! या दोन्ही गोष्टी दररोज यथासांग व यथास्थित झाल्याखेरीज मला चांगली झोंपच येत नाहीं ! ''

## महाराजांची स्मरणशक्ति.

पाटगांव येथील मठाचे आंवारांत लहान मोठ्या बऱ्याच इमारती आहेत. त्या इमारतींपैकीं कोणत्या इमारतींत हत्ती बांधण्याची कायमची सोय करावी, याबद्दलची विचारपूस श्रीशाहुमहाराज कोल्हापूर मुक्कामीं करीत होते. मठांतील सर्वच इमारती लहान व जुन्या पद्धतीच्या असल्यामुळें कोणत्याच इमारतींत हत्ती बांधण्याची सोय होणार नाहीं; नवीनच पीलखाना बांधिला पाहिजे अशा अर्थाची विनंति पीलखाना कामगार श्रीयुत बाळासाहेब घोरपडे यांनीं महाराजांस केली. त्यानंतर महाराज बोलले, " असें कसें होईल ? मठाचे पूर्व तटास लागून तूते गिरी यांची लहानशी समाधि आहे, तिचे नजिकच भंडारगृह नांवाची एक

इमारत आहे. या इमारतीची पश्चिमेकडील-नव्हे—दक्षिणेकडील भिंत पाडून कमान बांधल्यास तेथें हत्ती बांधण्याची सोय झालीच पाहिजे." महाराजांनीं दिलेली ही माहिती व या लहानसहान इमारतींचीं नांवें देखील इतकी बिनचूक होतीं कीं, कोल्हापुरापासून साठ मैल दूर जंगलांत आडमार्गी असलेल्या पाटगांव या गांवीं महाराज नुकतेंच जाऊन आले असावेत, अशी आमची ठाम समजूत झाली. पण पुढें चौकशीअंतीं असें कळलें कीं, त्यांना मुखत्यारी मिळाल्यानंतर लागलींच—सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी—महाराज पाटगांवीं एकदांच गेले होते व राजगुरु श्रीमौनीमहाराज यांच्या समाधीचें दर्शन घेण्याकरितां ते मठांत अवघे पांच दहा मिनिटेंच आले होते!

## कोल्हापूरच्या गादीचा महिमा.

श्रीमद्युवराजमहाराज (सध्यांचे श्रीमच्छत्रपति सरकार) यांना ब्राह्मणेतर चळवळीची माहिती देण्याकरितां त्या चळवळींतील एखादा तज्ञ त्यांचेजवळ कांहीं दिवस ठेवल्यास बरें होईल, अशा अर्थाची सूचना श्रीशाहुमहाराज यांना एकदां करण्यांत आली. त्यावर महाराज बोलले, "तसें करण्याची जरूरीच नाहीं. कोल्हापूरच्या या गादीचा महिमाच असा आहे कीं, तिच्यावर अधिष्ठित होण्याबरोबर कोणाहि व्यक्तीस ब्राह्मणांचे गुणधर्म स्पष्टपणें दिसूं लागून ब्राह्मणेतरांची न्याय्य बाजू सांभाळावी, असें आपोंआपच वाटूं लागतें! करवीर राज्यसंस्थापक ताराबाईपासून तों तहत आमच्या कारकीर्दीपर्यंत कोल्हापूरच्या कोणत्या राजानें पेशव्यांची अगर त्यांच्या जातभाईची बाजू संभाळलेली आहे?"

## मराठ्यांचें महावस्त्र.

थंडीचे दिवसांत एकदां श्रीशाहुमहाराज हे बल्लारी घोंगडी पांघरून बसले होते. खुद्द छत्रपतींनींच अंगावर घोंगडी घेतलेली पाहून आह्मांस थोडेंसें हंसू आलें. तें पाहून महाराज बोलले, "यांत हंसण्यासारखें काय आहे? हें तर आह्मां मराठ्यांचें महावस्त्र! आज रायगडावर तर उद्यां पन्हाळ्यावर तर तेरवा रांगण्यावर असा प्रकार शककर्ते श्रीशिवाजीमहाराज यांच्या कारकीर्दीत सुरू होता. त्या वेळीं प्रत्येक किल्ल्यावर भरजरी कोच थोडेच होते! खाटलें टाकलें व त्यावर घोंगडी पसरली कीं झालें छत्र-

